भारतवीर प्रश्नावलीत भाग घ्या अ

# भारताचे वीर – ४

क्षेत्रांतल्या या वीरांबद्दलची ही प्रश्नावली पाहा !

तीन बिनचूक उत्तरांना बक्षिसादाखल सायकली मिळतील.*

1 साहित्यासाठीं नोबेल पुरस्कार मिळवणारे ते पहिले आशियाई होते. भारताच्या स्वातंत्र्यसंग्रामात भाग घेण्यासाठी अनेकांना ह्यांच्या कवितांनी स्फूर्ति दिली होती. यांचे नांव ठाऊक आहे?

-----------------------------------------------

2 भारतांत पोखरणच्या अणुचांचणीविषयी विचार आला, कीं तुम्हाला कुणाचे नांव प्रथम आठवते? त्यांना भारतरत्न ही पदवी मिळाली असून ते संरक्षण तंत्रशास्त्रज्ञ आहेत. हे कोण आहेत?

-----------------------------------------------



3 या नोबेल पुरस्कार विजेत्याच्या सन्मानार्थ आपण २८ फेब्रुवारीला राष्ट्रीय विज्ञान दिन साजरा करतो. त्यांना १९२८ मधें पदार्थविज्ञानाचे पारितोषिक मिळाले होते. त्यांचे नांव सांगा.

-----------------------------------------------

4 इंग्लंडच्या राणीने ह्या सतारवादकास मानद उमरावपद दिले आहे. तुम्हाला त्यांचे नांव ठाऊक असेलच, होय ना?

-----------------------------------------------

5 कोट्यवधी लोकांच्या या लाडक्या अभिनेत्याचे कोलकात्यांत एक मंदिर बांधले आहे. टीव्हीवरच्या एका अतिलोकप्रिय कार्यक्रमाचे ते सूत्रधार आहेत. त्यांचे नांव काय?

-----------------------------------------------

प्रत्येक प्रश्नाचे उत्तर दिलेल्या ओळीवर लिहा. या पांच वीरांपैकी तुम्हाला कोणता वीर आवडतो व कां? माझा आवडता ''आधुनिक वीर' याबद्दल दहा शब्द लिहा.

.......................................................

.......................................................

.......................................................

स्पर्धकाचे नांव :.......................................

वय: .................... वर्ग: ....................

पत्ता : .......................................

पिन : .................... फोन: ....................

स्पर्धकाची सही : .......................................

पालकांची सही : .......................................

हे पान नीट कापून ५ फेब्रुवारी २००१ पूर्वी पुढील पत्त्यावर पाठवा.

HEROES OF INDIA QUIZ - 4
CHANDAMAMA INDIA LIMITED
No.82, DEFENCE OFFICERS COLONY
EKKATTUTHANGAL, CHENNAI - 600 097.

सूचना :

१. ही स्पर्धा ८ ते १४ वयोगटांतल्या मुलांसाठी आहे.
२. *सर्व भाषांतून फक्त तीन विजेते निवडले जातील. विजेत्यांना योग्य उंचीच्या सायकली बक्षिस दिल्या जातील. एकापेक्षा जास्त अचूक उत्तरें आल्यास विजेत्यांची निवड ''माझा आवडता वीर'' या वर्णनावरून केली जाईल.
३. परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील.





# जबाबदारी

रामपुरांतल्या मोठ्या तलावाच्या कांठावर कांही गोरगरीब लोकांनी झोंपड्या उभ्या केल्या आणि त्यांत ते राहूं लागले. अशाच एका झोंपडीत सुदामा आपल्या बायकामुलांबरोबर राहात होता.

सुदामा अत्यंत आळशी होता. झोंपडीच्याबाहेर खाटेवर पडल्यापडल्या तो दिवसभर मनोराज्य करीत राही, हवेंत किल्ले बांधत राही. त्याला विश्वास होता कीं एक ना एक दिवस त्याचे भाग्य उजळेल आणि एक दिवस तो श्रीमंत होईल. त्याने ऐकलं होतं कीं असे कितीतरी लोक जगांत आहेत कीं ते कांहीही मेहनत, कष्ट न करताच भाग्यवंत होतात. असल्या भाग्यवानांच्या यादींत मीदेखील असूं शकेन असं त्याला वाटायचं.

नवऱ्याच्या या असल्या नाकर्तेपणाबद्दल त्याची बायको विमला नेहमी नाराज असायची. कांही कामधंदा केला नाही तर पोट कसं भरायचं हे त्याला अनेकवेळा समजावून सांगायचा तिने प्रयत्न केला. पण सुदामा तिचे बोलणे न ऐकल्यासारखा करून त्याकडे दुर्लक्ष करी. बिचारी विमला काय करणार? चार पांच घरांतून ती काम करून आपला परिवार सांभाळत होती.

एक दिवस जेव्हां सुदामा आपल्या झोंपडीबाहेर बाजेवर पडला होता, तेव्हां एक दुर्बल, हाडकुळी कुत्री तिथे आली. तिच्या पाठोपाठ तिची अगदी लहान अशी तीन पिल्लेंही आली. आईचे दूध पिण्यासाठीं ती पिल्लें तिच्यामागे येत होती. पण त्या अशक्त कुत्रीला त्यांना दूध देता येईना. भुकेलेली पिल्लें थकून गेली आणि झोंपडीच्या बाहेर थोड्याच अंतरावर पडून राहिली.

ती कुत्री हळूंच झोंपडीत आपले तोंड घालणार तितक्यांत विमला तिथें आली. कुत्री जेवणांत तोंड घालणार असं दिसताच विमलाने भिंतीजवळची काठी उचलली आणि तिला फेंकून मारली. कुत्री केंकाटतच बाहेर पळाली.

ज्या भांड्यात कुत्रीने तोंड घातलंय ते अन्न कसं खायचं, असा विमलाच्या मनांत विचार आला. दुसरा कांही उपाय सुचला नाही म्हणून तिने ते सारं जेवण बाहेर टाकून दिलं. कुत्रीने पोटभर अन्न खाल्लं. आता तिची पिलं उपाशी राहिली नसती.

दुसऱ्या दिवशी नेमकी त्याच वेळेला ती कुत्री पुन्हां झोंपडीत घुसली. विमलाने तिला पाहिलं आणि तिच्यावर एक लहानसा दगड फेंकून मारला. कुत्री किंचाळत, ओरडत तिथून पळाली. हे सगळं अगदी सहज बघताबघता झालं.

या गडबडीमुळें बाजेवर पडून स्वप्नरंजनांत दंग असलेला सुदामा खडबडून उठला आणि बाजेवर बसला. काय झालं होतं त्याचा त्याला अंदाज आला. जरा चिडूनच तो म्हणाला, ''ही कुत्री परत आली काय? काल तिला काठी लागली तरीसुद्धां तिला अक्कल आली नाही कांही!''

त्याचं गुरगुरणं ऐकून विमला त्याला म्हणाली, ''तो कुत्री बिचारी आपल्या पिल्लांना दूध मिळावं म्हणून जिवाचं रान करतेय. तिला दगड लागला तरी हरकत नाही. जेवण तर नक्की मिळेल, या आशेने ती मार लागला तरी इथें घुटमळते आहे. तिला फक्त आपल्या पिल्लांची काळजी करायची एवढेच लक्ष्य आहे. आपल्या पिल्लांची भूक भागवण्यासाठी एक अशक्त कुत्री इतकी तडफड करते, पण तुमच्यासारखा धडधाकट पुरुषाबद्दल मी काय बोलूं? नुसते लोळत पडता. आणि मनांतल्या मनांत नुसतेच इमले बांधत बसता!'' असं रागाने बोलून ती झोंपडीत निघून गेली.

बाकोच्या टोंचून बालण्यांतला अर्थ सुदामाच्या मनाला लागला. तो बाजेवरून उठला, त्याने बाज उचलून कोपऱ्यांत उभी ठेवली आणि कामधंदा शोधण्यासाठी तो बाहेर निघून गेला.



# व्यापाऱ्याची बुद्धी

एक व्यापारी होता. तो व्याजाने कर्जाऊ रकमा देत असे. त्याचबरोबर तऱ्हेतऱ्हेचे इतर व्यापारही तो करीत असे. थोड्याच काळांत त्याने लाखों रुपये कमावले. जेव्हां त्याला थोडीशी सवड मिळे, तेव्हां तो सरोवराच्या कांठावर जाऊन मासे पकडत असे. मासे पकडण्याचा त्याच्या आवडीचा छंद होता.

एकदा लहानशा नावेत बसून व्यापारी सरोवराच्या मध्यभागापर्यंत गेला. आणि त्याने जाळें फेंकले. त्याच्या जाळ्यांत एक मासोळी फसली. त्याने जाळें वर उचलले आणि तिला बाहेर काढून नावेत ठेवले.

ती सामान्य मासोळी नव्हती. पांच रंगांची ती मासोळी सूर्यकांति सारखी चम्‌चम् चमकत होती. तिला पाहून व्यापारी आश्चर्य चकितच झाला. तिला श्वास घेणे अवघड होत होते व ती तडफडत होती. ती बोलायला लागली. ''मी किन्नर जातीची मासोळी आहे. तुला मी तीन वर देते, माग तुला काय हवं ते! पण मला लगेच सरोवरांत सोडून दे.''

''तीन नाही. मला पांच वर दे तू.'' व्यापाऱ्याने सांगितलं. मासोळी तडफड करीत होती. ''तीनच वर देईन. पांच वर देण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.'' बोलताना तिला धाप लागत होती.

''तुझ्याशी सौदा करण्याचा माझा हेतू नाही. बस, साडेचार वर देऊन टाक.'' व्यापारी म्हणाला.

''नाही, फक्त तीन वर मी देईन.'' कांपऱ्या आवाजांत मासोळीने सांगितले.

''हे बघ, मी आहे व्यापारी. घासाघीस करायचा माझा कांही स्वभाव नाही. तेव्हां आता चार वर देऊन टाक ना!'' व्यापाऱ्याने सांगितलं.

मासोळीने त्यावर कांहीच उत्तर दिलं नाही. कारण तोपर्यंत तिचे पंचप्राण उडून अनंतात विलीन झाले होते.

- शकुंतला



ORISSA
The soul of India



## कटक

'हजार वर्षांच्या नगरींत' एक फेरफटका करायची कल्पना छान आहे नाही? ओरिसांतल्या कटक या शहराला भेट दिलीत कीं हजार वर्षांच्या या नगरीमधें उत्साही पर्यटक, दुकानदार, सहलीला येणारे, निसर्गप्रेमी व इतर अनेकांची हौस पूर्ण होते.

कटक ही ओरिसाची प्रमुख नगरी, पूर्वी काटका म्हणून ओळखली जात होती. या नगरीचा इतिहास अनेकपदरी आहे, अनेक रियासतींनी इथें राज्य केलेले आहे. गंगा रियासतीने बांधलेल्या बाराबाती किल्ल्याचे अवशेष आजही इतिहासकारांना मोहून टाकतात.

तुम्ही तीर्थयात्रेला निघताय? मग या शहरांत निरनिराळ्या देवतांची अनेक मंदिरें व तीर्थस्थानें आहेत. कदम-इ-रसूल हे स्थान हिंदू व मुस्लिम भाविकांना आकर्षित करते. महंमद पैगंबराची पदचिन्हें असलेला एक गोल दगड या ठिकाणीं आहे अशी श्रद्धा आहे.

अनसूया तलावाच्या भोवतीची गर्द वनराई निसर्गसुंदर आहे. हिंवाळ्यांत अनेक स्थलांतरित पक्षी इथें येतात.

पर्वतारोहण प्रेमी व भ्रमणवीरांनो! अशोकझरची साहसी सफर विसरूं नका. धवलेश्वर, महानदीवरचे हे छोटे बेट, दिवसभराच्या सहलीसाठीं छानच आहे.

नक्षीदार चांदीच्या वस्तू, पितळेची सुबक भांडी, शिंगांच्या वस्तू, रेशमी व सुती कापड यांसाठी कटक अतिशय प्रसिद्ध आहे.

### तुमच्यासाठी एक स्पर्धा

**फक्त चौदा वर्षांखालील मुलामुलींसाठी**

**स्पर्धा - V**

१. पुरीतले रघुराजपुर हे खास तऱ्हेच्या चित्रांसाठी प्रसिद्ध आहे. ही शैली कोणती आहे?

..............................................

२. ओरिसांतले कोणते शहर पोलाद कारखान्यासाठी प्रसिद्ध आहे?

..............................................

३. ओरिसांतले उषाकोठी अभयारण्य कुठे आहे?

..............................................

दिलेल्या ओळीवर तुमची उत्तरें सुवाच्य अक्षरांत लिहा. खाली दिलेले कूपन भरा व तुमची प्रवेशपत्रिका खालील पत्त्यावर पाठवा.

**Orissa Tourism Quiz Contest**
**Chandamama India Limited**
**No.82, Defence Officers Colony**
**Ekkatuthangal, Chennai - 600 097**

नांव : ..............................................
वय : ..............................................
पत्ता : ..............................................
पिनकोड: .................. फोन: ..............................

ORISSA Winners picked by Orissa Tourism in each contest will be eligible for **3 days, 2-night** stay at any of the **OTDC Panthanivas** upto a maximum of four members of a family. Only



# यक्ष पर्वत

## 12

*(खड्ग व जीवदत्ताने मोठ्या हुशारीने वीरपूरच्या सैनिकांना भुयारी किल्ल्यांत घेरून टाकलं. सेनाध्यक्ष आणि सर्व सैनिकांनी पराजय स्वीकारला. जेव्हां ते समरबाहूच्याबरोबर पर्वतावरच्या किल्ल्यावर आले, तेव्हां त्यांनी वीरपूरच्या वृद्ध मंत्र्याला पाहिलं. मंत्र्याने समरबाहूला एक स्वतंत्र राजा घोषित केलं. नंतर खड्गवर्मा व जीवदत्ताला घेऊन तो नदीवर गेला)*

*- त्यानंतर*

खड्ग आणि जीवदत्त वीरपूरच्या मंत्र्याबरोबर नदीच्या कांठावर आले. नदींत रथाच्या आकाराची एक नाव होती. तो त्यांच्याच दिशेने येत होती. खड्ग आणि जीवदत्ताने ती नांव नीट निरखून पाहिली. रथाच्या आकारात बनवलेली ती लांकडी नाव होती ते त्यांच्या लक्षांत आलं.

वीरपूरच्या मंत्र्याकडे वळून पाहात जीवदत्त म्हणाला, ''महामंत्री, आपण म्हणत होतात कीं आमची माहिती आपल्याला एका यक्षाकडून मिळाली होती. आपण त्या यक्षाला नावेत भेटला होतात कां?''

''क्षत्रिय योद्धयांनो, मला तुमच्यापासून कांहीही लपवायचं नाही. जे कांही झालं ते मी सरळसरळ तुम्हाला सांगणार आहे. गेल्या रात्रीं दुसऱ्या प्रहरीं एक यक्ष आकाशमार्गाने आला. त्यावेळेला वीरपूरची राजकन्या वसंताकुमारी आपल्या मैत्रिणीं-बरोबर गप्पा मारीत होती. यक्षाने बळजबरीने तिचे अपहरण केले आणि तिला तो आपल्याबरोबर घेऊन गेला. परत जाताना तो राजभवनांत एक तालपत्र टाकून गेला. त्या तालपत्रांत लिहीलं होतं कीं त्याने यापूर्वी पद्मसेन महाराजांची कन्या पद्मावती हिलाही अशाच रीतीने पळवून नेलेलं होतं.'' मंत्री म्हणाला.

मंत्र्यांचे बोलणें ऐकून जीवदत्त गंभीर झाला व बोलला, ''हाच यक्ष आम्हाला अरण्यापूर नांवाच्या



प्रदेशांत भेटला होता. त्याने आम्हाला खोटंच सांगितलं कीं त्याने पद्मावतीशी विवाह केला होता आणि तिला तो आपल्या घरी घेऊन जातो आहे म्हणून!"

"जीवदत्त, अशीच गोष्ट आहे! जें तालपत्र तो इथें सोडून गेला होता, त्याच्यांत हेदेखील लिहीलेलं होतं कीं विंध्यपर्वतातल्या दगडांपासून बनवलेल्या एका रथाला सरकवण्याची तुम्ही प्रतिज्ञा केली आहेत. हे खरं आहे कां?" मंत्रीजीने विचारले.

जीवदत्त उत्तर देणारच होता, त्यापूर्वीं खड्ग-वर्मनें म्हटलं, "होय, हे खरं आहे. त्या दुष्ट यक्षाला आम्ही जरूर शिक्षा करूं आणि त्याच्या जाळ्यांत फसलेल्या पद्मावती व बसंताला जर आम्ही सोडवले नाही तर आम्ही क्षत्रियच म्हणवणार नाही!"

तोपर्यंत नाव किनाऱ्याला लागली होती. यक्षासारखी आभूषणें घालून सजलेली एक व्यक्ती नावेच्या पुढच्या भागांत आली. क्षणभर सर्वांना नीट न्याहाळल्यानंतर तो म्हणाला, "विंध्य पर्वतावरचा दगडी रथ सरकवणारा वीर तुमच्यापैकी कोण आहे?"

खड्ग आणि जीवदत्त, दोघांनी कांहीही न बोलता आपापले हात वर केले. तेव्हां यक्षाने कुत्सितपणे म्हटले, "तर तुम्ही दोघे नावेत येऊं शकता. मी तुम्हाला यक्षपर्वताकडे घेऊन जाईन. तिथें माझा मित्र यक्ष मणिरंजित राहातो. पद्मावती आणि वसंताकुमारी ही तिथें आहेत. त्यांच्याशी तो विवाह करणार आहे." यक्षाने सांगितलं.

मंत्रीजींना तिथें सोडून खड्ग आणि जीवदत्त नावेत बसले. जीवदत्ताने यक्षाला त्याचे नांव विचारले.

"माझे नांव मणिभूषण आहे. माझा मित्र मणिरंजित पराक्रमांत असामान्य आहे. त्याच्या बरोबरीचा कुणीही नाही. मंत्रतंत्राच्या शक्तींमधेही तो अत्यंत निपुण आहे. यक्षपर्वतावर येणे म्हणजे तुम्ही दोघांनी आपल्या जिवाशी खेळणें आहे. तुमच्या मृत्यूचं स्वागत तुम्ही स्वतः करीत आहात." यक्ष म्हणाला.

"असं काय, असं आहे तर!" असं म्हणत जीवदत्तने आपला मंत्रदंड त्याच्या हातावर ठेवला. लागलीच यक्ष थरथर कांपायला लागला. त्याला वाटलं कीं जणूं कांही त्याच्या हातावर वीजच कोसळलीय. तो म्हणायला लागला, "हा कसला मंत्रदंड आहे? तुमच्याकडे असलेल्या अद्भुत शक्ती आहेत कां?"

जीवदत्ताने मौन पाळून मंत्राचा जप केला,



आणि त्यानंतर आपल्या तर्जनीने त्या यक्षाला स्पर्श केला. यक्ष जोरात किंचाळत जमिनीवर कोसळला. थोड्या वेळानंतर तो जरासा सावरला, आणि म्हणाला, "तुम्ही माझ्या मित्राइतकेच सशक्त आहात. पण मग तुमच्या दोघांत हे वैर कशापायीं आहे, ते मला कळेल कां?"

खड्गवर्मनें चिडून जाऊन आपली तलवार त्याच्यावर धरली आणि तो गरजला,

"बंद कर तुझी बडबड! वायफळ गोष्टी बोलूं नकोस. निमूटपणें यक्षपर्वताकडे नाव घेऊन चल. तुझा मित्र तिकडे राहातो ना? आम्हाला त्याचे तुकडे तुकडे करुन कावळ्यांना व गिधाडांना खाण्यासाठी ते फेकायचे आहेत. त्याची नांवनिशाणी आम्हाला नष्ट करायची आहे."

हे दोन मनुष्य अशा प्रकारें त्याला घाबरवून सोडत होते. यक्ष अपमानाच्या भाराखाली दबला गेला. अतिशय विनम्र स्वरांत तो बोलायला लागला, "क्षत्रिय वीरांनो, मणिरंजितने तुम्हाला दोघांना घेऊन येण्याचा आदेश दिलेला आहे. दोन्ही राजकन्यांचे अपहरण करण्यांत, किंवा दगडी रथाच्या बाबतींत माझा कांहीही हात नाही."

जीवदत्तच्या आज्ञेनुसार यक्षाने नावेचे सुकाणूं धरले आणि नदीच्या पात्रांत मध्यभागी त्याने नाव नेली. किनाऱ्यावर उभे राहिलेल्या मंत्रीजींनी हात वर उचलून खड्ग आणि जीवदत्त यांना आशिर्वाद दिला.

नदीच्या मध्यभागी जेव्हां नाव आली तेव्हां जीवदत्ताला शंका आली कीं या नावेतच बसून मणिरंजित आकाशमार्गाने उडत असावा. आपली शंका त्याने यक्षाला बोलून दाखवली.



मणिभूषण म्हणाला, "ती ही नाव नाही. रथाच्या आकाराची कोणतीही वस्तू त्यांना आवडते."

त्यावर जीवदत्त हंसला. नंतर त्यांना दोन्ही बाजूंना उंचउंच पर्वत व मोठमोठे वृक्ष दिसायला लागले. तेव्हां त्याने यक्षाला विचारले, "हा सगळा विंध्य पर्वतांचा प्रांत आहे कां?"

यक्षाने होकारार्थी मान डोलावली. अस्ताला जाणारा सूर्य पाहात जीवदत्ताने खड्गवर्माला सांगितलं. "आपण रात्रीं नदीच्या किनाऱ्यावर भोजनाची व्यवस्था करूं या आणि सूर्योदय होताच लगेच निघूं या. तसं करणंच योग्य होईल असं मला वाटतं."

त्यांचे बोलणे ऐकून मणिभूषण जरा चिडूनच बोलला, "माझ्या मित्राने तुम्हा दोघांना लागलीच

घेऊन येण्याचा आदेश दिलेला आहे. जर आपण रात्रीं इथें राहिलो तर जायला उशीर होईल आणि वेळ वाया जाईल."

जीवदत्ताने रागावून कठोर स्वरांत त्याला म्हटले, "इथें आमचा हुकूम चालतो. आम्ही आज्ञा करणारे आहोत. मुलींचे अपहरण करण्यांत हुशार असलेल्या तुझ्या त्या मित्राचा हुकूम इथें चालणार नाही. सुकाणू फिरव आणि नाव किनाऱ्याकडे वळव. ऐकलंस ना?"

यक्षाने मुकाट्याने नदीच्या पात्रांतून मध्यभागी असलेली नाव किनाऱ्याकडे आणली. किनाऱ्यावर पोंचल्याबरोबर खड्ग व जीवदत्ताने नावेतून उडी मारली व ते जमिनीवर आले. जीवदत्ताने खड्गवर्मास सांगितले, "खड्ग, या घनदाट जंगलात हरणाची शिकार करून आत्ता परत येतो. तोपर्यंत तू वाळलेली लांकडे एकत्र करून आग पेटव."

हे बोलणें ऐकून मणिभूषण घाबरून म्हणाला, "या दाट जंगलात, या उंच पर्वतांच्या गुहांमधून भयंकर राक्षस राहातात. तुम्ही संकटात कां उडी घेता आहात?"

जीवदत्त हंसून म्हणाला, "घाबरट कुठला! तुमचे यक्ष राक्षसांपेक्षांदेखील भयंकर असतात. मंत्रतंत्रात निपुण असतात. मी आता त्यांच्यामधेच जाणार आहे, तेव्हां त्या राक्षसांबद्दल भिती कसली आलीय?" असं म्हणून तो झाडीकडे वळला व पुढे गेला.

थोड्याच वेळांत त्याने एक हरीण मारले आणि त्याला आपल्या खांद्यावर घेऊन तो परत आला. दोघांनी मिळून हरणाचे कापून तुकडे केले आणि त्याच्या मांसाचे तुकडे ते आगीवर भाजूं लागले. मांस भाजत असताना त्याचा वास चौफेर पसरला.

त्याच वेळेस एक विकृत आकाराची राक्षसी झाडींतून हात पसरून पुढें येत ओरडायला लागली, "माणसाचा वास, माणसाचा वास!"

राक्षसीला पाहिल्याबरोबर खड्गवर्माने म्यानांतून तलवार काढली. पण जीवदत्ताने त्याला





थांबवून त्या राक्षसीला म्हटले, "माणसाच्या वासाबरोबर हरणाच्या मांसाचा वासदेखील इथें येतो आहे. तू राक्षसी आहेस कीं राक्षसीच्या रूपांतला यक्ष आहेस?" "अखेर तू आहेस तरी कोण? माणूस आहेस आणि मला पाहून तुला भिती नाही वाटत? उलट मलाच तू प्रश्न विचारतो आहेस काय?" राक्षसीने विचारले.

जीवदत्तने लगेच आपला मंत्रदंड राक्षसीच्या डोक्यावर ठेवला आणि विचारले, "अग राक्षसी, आता सांग. आम्ही साधी माणसं आहोत कीं..." असं म्हणून तो थांबला.

राक्षसीचे शरीर घामाने डबडबले होते. ती म्हणूं लागली, "तुम्ही दोघे माणसें असूं शकणार नाही. तुम्ही बहुतेक यक्ष असाल. माझ्या दोन्ही मुलांना पकडून तुम्ही त्यांना आपल्या यक्षपर्वतावर घेऊन गेला होतात. पण मला मात्र कैद करून घेऊन जाऊं नका. मी आता म्हातारी झाले आहे. यक्षपर्वतावर दगड फोडून तुमच्यासाठीं सोनें, रत्नें बाहेर काढता नाही येणार मला. आता माझ्यांत तेवढी शक्ती नाही राहिली."

जीवदत्ताने राक्षसीला आपल्या बाजूला वळवण्यासाठीं म्हटलं, "तुला मारायचा माझा मुळींच हेतू नाही. मला वाटतं, यक्षपर्वताबद्दल तुला बरंच कांही माहीत असावं. आम्ही दोघे यक्षपर्वतावरच जातो आहोत. बघ, त्या नावेत जो आहे, तो यक्ष आहे. त्यांच्याबद्दलचे रहस्य इथें सांगू नकोस. पुढें हो आणि मला तुझ्या गुहेंत घेऊन चल."

"अरे माणसा, माझी गुहा इथें जवळच आहे. माझा पती गुहेंत आहे. तो तुम्हाला यक्षपर्वता-



बद्दलची बरीच रहस्यपूर्ण माहिती सांगेल." राक्षसीने सांगितले.

अजूनदेखील ती राक्षसी भितीने थरथर कांपत होती. तरीही धीर गोळा करून तिने जीवदत्ताला थोड्या अंतरावर असलेल्या एका गुहेच्या तोंडाशी नेले. गुहेच्या समोरच एका मोठ्या दगडावर एक भलामोठा राक्षस मशालीच्या उजेडांत त्याला दिसला. तो घोरत होता.

तो राक्षस खडबडून उठला आणि जीवदत्ताला पाहून म्हणूं लागला, "अरे, अरे, काय हे! एक माणूस आणि इथें? तुझ्याबरोबर न भिता हा इथे आलाय! कोण आहे हा?"

राक्षसी प्रथम आपल्या पतीजवळ आली आणि सौम्यपणें, हळूं आवाजांत त्याला म्हणाली, "भूक लागलीय म्हणून याला मारून चघळूं नका हं! या माणसाच्या हातांत महिमामयी मंत्रदंड आहे. त्याने

घेऊन येण्याचा आदेश दिलेला आहे. जर आपण रात्रीं इथें राहिलो तर जायला उशीर होईल आणि वेळ वांया जाईल.''

जीवदत्ताने रागावून कठोर स्वरांत त्याला म्हटले, ''इथें आमचा हुकूम चालतो. आम्ही आज्ञा करणारे आहोत. मुलींचे अपहरण करण्यांत हुशार असलेल्या तुझ्या त्या मित्राचा हुकूम इथें चालणार नाही. सुकाणूं फिरव आणि नाव किनाऱ्याकडे वळव. ऐकलंस ना?''

यक्षाने मुकाट्याने नदीच्या पात्रांतून मध्यभागी असलेली नाव किनाऱ्याकडे आणली. किनाऱ्यावर पोंचल्याबरोबर खड्ग व जीवदत्ताने नावेतून उडी मारली व ते जमिनीवर आले. जीवदत्ताने खड्गवर्मास सांगितले, ''खड्ग, या घनदाट जंगलात हरणाची शिकार करून आत्ता परत येतो. तोपर्यंत तू वाळलेली लांकडे एकत्र करून आग पेटव.''

हे बोलणें ऐकून मणिभूषण घाबरून म्हणाला, ''या दाट जंगलात, या उंच पर्वतांच्या गुहांमधून भयंकर राक्षस राहातात. तुम्ही संकटात कां उडी घेता आहात?''

जीवदत्त हंसून म्हणाला, ''घाबरट कुठला! तुमचे यक्ष राक्षसांपेक्षांदेखील भयंकर असतात. मंत्रतंत्रात निपुण असतात. मी आता त्यांच्यामधेच जाणार आहे, तेव्हां त्या राक्षसांबद्दल भिती कसली आलीय?'' असं म्हणून तो झाडीकडे वळला व पुढे गेला.

थोड्याच वेळांत त्याने एक हरीण मारले आणि त्याला आपल्या खांद्यावर घेऊन तो परत आला. दोघांनी मिळून हरणाचे कापून तुकडे केले आणि त्याच्या मांसाचे तुकडे ते आगीवर भाजूं लागले. मांस भाजत असताना त्याचा वास चौफेर पसरला.

त्याच वेळेस एक विकृत आकाराची राक्षसी झाडींतून हात पसरून पुढें येत ओरडायला लागली, ''माणसाचा वास, माणसाचा वास!''

राक्षसीला पाहिल्याबरोबर खड्गवर्माने म्यानांतून तलवार काढली. पण जीवदत्ताने त्याला





थांबवून त्या राक्षसीला म्हटले, ''माणसाच्या वासाबरोबर हरणाच्या मांसाचा वासदेखील इथें येतो आहे. तू राक्षसी आहेस कीं राक्षसीच्या रूपांतला यक्ष आहेस?'' ''अखेर तू आहेस तरी कोण? माणूस आहेस आणि मला पाहून तुला भिती नाही वाटत? उलट मलाच तू प्रश्न विचारतो आहेस काय?'' राक्षसीने विचारले.

जीवदत्तने लगेच आपला मंत्रदंड राक्षसीच्या डोक्यावर ठेवला आणि विचारले, ''अग राक्षसी, आता सांग. आम्ही साधी माणसं आहोत कीं...'' असं म्हणून तो थांबला.

राक्षसीचे शरीर घामाने डबडबले होते. ती म्हणूं लागली, ''तुम्ही दोघे माणसें असूं शकणार नाही. तुम्ही बहुतेक यक्ष असाल. माझ्या दोन्ही मुलांना पकडून तुम्ही त्यांना आपल्या यक्षपर्वतावर घेऊन गेला होतात. पण मला मात्र कैद करून घेऊन जाऊं नका. मी आता म्हातारी झाले आहे. यक्षपर्वतावर दगड फोडून तुमच्यासाठीं सोनें, रत्नें बाहेर काढता नाही येणार मला. आता माझ्यांत तेवढी शक्ती नाही राहिली.''

जीवदत्ताने राक्षसीला आपल्या बाजूला वळवण्यासाठीं म्हटलं, ''तुला मारायचा माझा मुळींच हेतू नाही. मला वाटतं, यक्षपर्वताबद्दल तुला बरंच कांही माहीत असावं. आम्ही दोघे यक्षपर्वतावरच जातो आहोत. बघ, त्या नावेत जो आहे, तो यक्ष आहे. त्यांच्याबद्दलचे रहस्य इथें सांगूं नकोस. पुढें हो आणि मला तुझ्या गुहेंत घेऊन चल.''

''अरे माणसा, माझी गुहा इथें जवळच आहे. माझा पती गुहेंत आहे. तो तुम्हाला यक्षपर्वता-



बद्दलची बरीच रहस्यपूर्ण माहिती सांगेल.'' राक्षसीने सांगितले.

अजूनदेखील ती राक्षसी भितीने थरथर कांपत होती. तरीही धीर गोळा करून तिने जीवदत्ताला थोड्या अंतरावर असलेल्या एका गुहेच्या तोंडाशी नेले. गुहेच्या समोरच एका मोठ्या दगडावर एक भलामोठा राक्षस मशालीच्या उजेडांत त्याला दिसला. तो घोरत होता.

तो राक्षस खडबडून उठला आणि जीवदत्ताला पाहून म्हणूं लागला, ''अरे, अरे, काय हे! एक माणूस आणि इथें? तुझ्याबरोबर न भिता हा इथे आलाय! कोण आहे हा?''

राक्षसी प्रथम आपल्या पतीजवळ आली आणि सौम्यपणें, हळू आवाजांत त्याला म्हणाली, ''भूक लागलीय म्हणून याला मारून चघळूं नका हां! या माणसाच्या हातांत महिमामयी मंत्रदंड आहे. त्याने



आणि त्याच्या मित्राने मिळून एका यक्षाला बंदी बनवलं आहे. तो यक्ष आत्ता नावेतच पडलेला आहे.''

जीवदत्ताकडे राक्षस डोळे फाडफाडून बघत होता. त्याने विचारले, ''हे अद्‌भुत माणसा, माझी बायको जे सांगतेय, ते खरं आहे कां? ही थोडीशी वेडसर आहे.''

जीवदत्ताने हंसून म्हटले, ''तुझ्या बायकोने जे कांही सांगितलं आहे, ते सगळं कांही खरं आहे. आम्ही ऐकलंय कीं तुमच्या दोन्ही मुलांना यक्षाने बंदी बनवून त्यांना यक्षपर्वतावर नेले आहे. त्या यक्षपर्वताच रहस्य तुला ठाऊक आहे कां?''

राक्षसाने मान डोलावली आणि थोडा वेळ तो नुसताच जमिनीकडे पाहात राहिला. नंतर तो म्हणूं लागला, ''यक्षपर्वत आणि त्याच्या पाठीमागच्या प्रांताचा अधिपती आहे मणिरंजित. यक्षराजाने फार पूर्वीच त्याला या प्रांताचा अधिपती बनवलं होतं. तो फार दुष्ट आणि पापी आहे. त्याने केला नाही असा एकही अपराध शिल्लक नाही.''

''मलाही ठाऊक आहे कीं तो फार दुष्ट आणि पापी दुरात्मा आहे. आमच्या देशांतल्या दोन राजकुमारींना त्याने पळवून नेले आहे. आता सांग, तिथें एखादा दगडी रथ आहे कां?''

''हो, हो तर! पर्वताच्या दगडांतूनच तो रथ बनला आहे असं म्हणतात.''

जीवदत्ताने तिथून परत येताना राक्षसीला म्हटले, ''माणसाचा वास समजून तू इथें आलीस, हे अगदी चांगलं झालं. माझ्याबरोबर ये आणि तुला जेवढं हरणाचं मांस पाहिजे तेवढं घेऊन जा.''

थोड्या वेळानंतर जीवदत्ताबरोबर राक्षसीला येताना पाहून मणिभूषण यक्ष भीतीने थरथरायला लागला. कांपऱ्या आवाजांत तो खड्‌गवर्माला म्हणूं लागला, ''हे काय? तुझा मित्र एका राक्षसीला घेऊन येतो आहे?''

''तुलाच खाऊन टाकायला असेल बहुतेक. येऊं दे त्याला, म्हणजे विचारल्यानंतर कळेलच.'' मोठ्याने हंसत खड्‌गवर्मा म्हणाला.

''हा मात्र अगदी अन्याय आहे बरं कां! मणिरंजित माझा फक्त मालक आहे. माझा मित्र नव्हे. मी फक्त त्याच्या आज्ञेचं पालन करतो. मला जेवढं आठवतंय, त्यावरून माझ्याकडून कुणालाही कधीच त्रास किंवा नुकसान झालेलं नाही.'' मणिभूषणने भेदरलेल्या आवाजांत सांगितलं. येत असताना जीवदत्ताने मणिभूषणचे बोलणें ऐकले होते. तो नाराज होऊन म्हणाला, ''मणिभूषण, आत्ताच भितीने अर्धमेला होऊं नकोस. जर मी आणि खड्‌गवर्मा तुझ्या मालकाला जिंकू शकलो नाही, तर तुम्हा यक्षांना पकडून राक्षसांची सेना तऱ्हेतऱ्हेने तुम्हाला त्रास देईल. त्यांची फार मोठी सेना तिकडे तयारच बसलेली आहे. तुमच्या पर्वताचा सर्वनाश करण्यासाठी ते उत्सुक आहेत. माझे बोलणें शंभर टक्के सत्य आहे.''

''राक्षस सेना!'' असं म्हणून मणिभूषण कासावीस झाला. त्याचा चेहरा पांढराफटक पडला.

''हो, हो, राक्षस सेनाच!'' असं म्हणून जीवदत्ताने राक्षसीकडे पाहिले आणि तो म्हणाला, ''लाज वाटायचं कांही कारण नाही. जेवढं हरणाचं मांस हवंय तेवढं खरंच घेऊन जा. आणखी एक गोष्ट ऐक. आपल्या हजार राक्षसांचा महान नेता महोग्रनेत्रला जाऊन सांग कीं आता यक्षपर्वतावर आक्रमण करण्यास थोडाच वेळ आता उरला आहे. पण हे आक्रमण केव्हांही सुरुं होईल, तेव्हां त्याला सज्ज राहायला मात्र सांग.''

राक्षसीने मान डोलावली. नेता येईल तितके जास्त मांस घेऊन ती आपल्या गुहेकडे निघून गेली. नंतर या तिघांनी भोजन केले व एका झाडाखाली असलेल्या दगडावर डोके टेकून ते आडवे झाले. मणिभूषण त्या दोघांपासून दूर झोंपला होता. झोंपण्यापूर्वी त्याने दोनतीन वेळा नाव पाहिली. त्याचे वारंवार नावेकडे पाहाणें खड्‌गवर्माच्या लक्षांत आले होते. त्याने जीवदत्ताला अगदी हळूं आवाजांत सांगितले, ''यक्ष घाबरलेला दिसतो आहे. तो आपल्याला घाबरतो आहेच. मला तर शंका येतेय कीं मध्यरात्रीं तो या नावेत बसून पळूनदेखील जाईल. त्याच्यावर बारीक नजर ठेवली पाहिजे.''

जीवदत्ताच्या मनांतही मणिभूषणच्या बाबतींत हीच शंका होती. म्हणून त्याने झोंपी गेल्याचे नाटक केले आणि तो विचार करूं लागला. अर्ध्या रात्रीं जमिनीचा वास घेत घेत तिथें एक अस्वल व एक लांडगा येऊन थांबले. बहुतेक त्यांनाही हरणाच्या मांसाचा वास आला असावा. ते फिरता फिरता मणिभूषणाच्याजवळ जाणार होते. तेवढ्यांत खड्‌गवर्मा चटकन उठून बसला आणि त्याने त्यांच्यावर एक लहानसा दगड भिरकावला. ती जनावरे दचकून तिथून पळून गेली.

जनावरांच्या पळण्याच्या आवाजाने मणि-भूषणची झोंपमोड झाली. चारी बाजूला तो बघूं लागला आणि एकीकडे ओरडूं लागला, ''खड्‌ग, जीवदत्त, उठा! राक्षसांची सेना पुढें यायला लागली आहे.''

**(पुढल्या अंकात समाप्ति)**



# प्रसिद्धी

श्रीपती रामपूरचा जमीनदार होता. गौरीशंकर हा जमीनदाराचे कामकाज मोठ्या हुशारीने व जबाबदारीने करीत असे. एक दिवस अकस्मात गौरीशंकरचे निधन झाले.

त्याच्या जागेवर कुणाची नेमणूक करावी हे कांही श्रीपतीला ठरवता येत नव्हते.

रामपूरच्या राजवाड्यांत रुक्मिणी स्वयंपाकघरांत कामाला होती. एक दिवस ती जमीनदाराकडे आली.

श्रीपतीने तिला विचारले, ''काय काम आहे? तू इथें कशासाठी आली आहेस?''

''मालक, राणीसाहेबांच्याकडून मला कळलं कीं आपण एखाद्या नव्या मदतनीसाच्या शोधांत आहात.''

''हो हो, मी बघतोच आहे कुणी चांगला माणूस ! ह्या जमीनदारीचा व्याप नीट सांभाळण्यासाठी मला एक योग्य माणूस लगेचच हवा आहे. कुणाला नेमावं याच विचारांत मी आहे.'' जमीनदाराने एक दीर्घ श्वास घेऊन सांगितलं.

''सरकार, मी माझा मुलगा केशव याच्याबद्दल सांगायला आले आहे. आपण त्याला चांगले ओळखता. गौरीशंकरजींनाही तो आवडत असे. हुशार आहे. चुणचुणीत आहे, तो अगदी मन लावून काम करील.'' रुक्मिणीने तरफदारी केली.

श्रीपती हंसायला लागला आणि म्हणाला, ''तूं जे सांगते आहेस, ते बरोबर आहे. तुझ्या मुलाला मी दोनतीन वेळा भेटलोय सुद्धां! पण या जागेसाठी मला ज्याची ख्याति असेल असाच माणूस हवा आहे. तुझ्या मुलामधें हा गुण अजून तरी नाही!'' रुक्मिणी क्षणभर विचारांत पडली. नंतर ती म्हणाली, ''मालक, आपण त्या जागेवर त्याची नेमणूक केलीत, कीं ती जागाच त्याला प्रसिद्धी मिळवून देईल कीं!''

दुसऱ्याच दिवशी गौरीशंकरच्या जागी जमीनदाराने रुक्मिणीच्या मुलाची नेमणूक केली. - प्रताप वर्मा



राजा विक्रम व वेताळ यांच्या नवीन कथा

# विलक्षण सामसूम

ती वादळी रात्र भयावह होती. मुसळधार पाऊस कोसळत होता आणि ढगांचा गडगडाट थरकांप उडवत होता. मधूनमधून विजा चमकत होत्या त्यामुळें वातावरण जास्तच भेसूर वाटत होते. राजा विक्रम त्या जुनाट वृक्षाजवळ अडखळत गेला. फांदीवर लटकलेले प्रेत त्याने पुन्हां खांद्यावर घेतले आणि तो परत फिरुन चालूं लागला. त्या विचित्र याचकाला दिलेला शब्द त्याला पाळायचा होता.

''मला इथून घेऊन जाण्याचा तुझा इतका अट्टाहास कां आहे?'' प्रेतांत लपलेल्या वेताळाने प्रश्न केला. पण राजा विक्रमने उत्तर दिले नाही. ''तुझे मौन हे जास्तीच कोड्यांत



टाकणारे आहे, त्या राजा सुशांत सारखेच !" वेताळाने बोलणे सुरू ठेवले. "तू ऐकलं आहेस त्याचं नांव? मी तुला त्याची कथा सांगतो, म्हणजे चालत असताना तुझा थकवा कमी होईल." असं म्हणून त्याने पुढील गोष्ट सांगितली.

पुष्पानगरचा राजा सुशांत एक सूज्ञ आणि सुस्वभावी राजा होता. तो साधूंना दानधर्म करीत असे आणि गुणवंत कवी व कलाकारांना पुरस्कार देत असे. प्रजा सुखी होती आणि राज्याची भरभराट होत होती, त्याबद्दल ते जागरूक होता. त्याच्यांत एकच दोष होता, तो म्हणजे तो तापट होता. त्याने सांगितल्याप्रमाणे एखादी गोष्ट झाली नाही कीं तो अतिशय संतापून जात असे. एकदा राजवाड्यांतल्या आचाऱ्यांना राजाने खास पाहुण्यांसाठी कांही खास पदार्थ बनवायला सांगितले होते. ते पदार्थ चांगले बनले नाहीत म्हणून राजाने त्या आचाऱ्यांना नोकरीवरूनच नाही तर राज्याबाहेर तावडतोब हाकलून दिले.

एखाद्या अधिकाऱ्याने कांही चूक केली किंवा कामांत दिरंगाई केली, तर राजाची त्याच्यावर वक्रदृष्टी होत असे. त्याची हकालपट्टी होईच, शिवाय त्याला मरणदंडाची शिक्षा होई. राजाच्या या शीघ्रकोपी स्वभावामुळें प्रजाजन नेहमी अस्वस्थ पण शांत असत.

एक दिवस एक साधू दरबारांत आला. राज्यांतल्या मंदिरातून प्रवचनें करण्यासाठी त्याला राजाकडून संमती हवी होती.

"हे महात्मन्, आपण कोण आहात आणि कुठून आला आहात?" राजाने विनम्रपणें विचारले.

"मी प्राणानंद आहे. मी नुकताच इथें हिमालयांतून आलो. गेली दहा वर्षें मी तिथें ध्यानधारणा करीत होतो." त्या सात्विक साधूने सांगितले. "ध्यानचिंतनामुळें मला मनःशांती मिळाली. पण माझ्या गुरूंनी सांगितलं कीं माझ्या आयुष्याचं ध्येय केवळ स्वतःपुरती शांती मिळवायची इतकेच नसावे. मी दुसऱ्या कमनशिबी स्त्रीपुरुषांना हा मार्ग दाखवावा, त्यासाठीं मी इथें आलो आहे."

सुशांत राजा या बोलण्यामुळें चांगलाच प्रभावित झाला होता. "स्वामीजी, आपण या इथेंच कायम राहायचे ठरवावे, आणि मला आणि आमच्या प्रजाजनांना मार्गदर्शन करावे."

प्राणानंद हंसले, "हे राजन्, मी कोणत्याही एका गांवी कायम राहायचे नाही असे ठरवले आहे. पण तुमचे प्रेम आणि दयाळूपणा ऐकून मी आपल्या राज्यांत आलो आहे. मी इथें कांही दिवस राहीन आणि इथल्या लोकांच्या उपयोगी पडायचा प्रयत्न करीन."



राजाने शाही उद्यानांत स्वामीजींसाठी एक छोटीशी झोंपडी बांधून घेतली. उद्यानाची देखभाल करणारा माळी सुमंगल याला राजानें खास स्वामीजींच्या दिमतीला नेमले व त्यांच्या सुखसोयींची काळजी घेण्यास सांगितले.

लौकरच स्वामीजी आणि सुमंगल यांची मैत्री जमली. उद्यानांतल्या एका झोंपडीत सुमंगल, त्याची पत्नी व दोन मुलगे राहात होते. दररोज सकाळची प्रार्थना झाल्यानंतर प्राणानंद राजाबरोबर दोन तास बसत असत स्वामीजींची प्रवचने राजा लक्षपूर्वक ऐकत असे. आणि त्यांच्या सल्ल्यानुसार वागायचा प्रयत्न करीत असे. त्यानंतर स्वामीजी दिवसभर निरनिराळ्या मंदिरांतून लोकांसमोर प्रवचन, सल्ला देत फिरत असत.

रात्रीचे भोजन ते सुमंगलच्या झोंपडींत करीत. त्याच्या दोन्ही मुलांना ते रात्रीं चांगल्याचांगल्या गोष्टी सांगत असत.

एक दिवस स्वामीजी व राजा उद्यानांत बसले होते. जवळच सुमंगल एका झुडुपाची छाटणी करीत होता. स्वामीजींच्या आसपास त्याने कांही गांधील माशा पाहिल्या. तो धावतच आला आणि त्याने हाताने त्या माशा वारल्या.

सुमंगलने मधेच येऊन स्वामीजींच्या बोलण्यांत व्यत्यय आणला म्हणून राजा नाराज झाला. "अरे, आमच्या दोघांच्यामधें एकदम उडी मारून तू कां आलास? असा उद्धटपणा करायला तुला कांहीच असा कसं वाटलं नाही? गांधीलमाशा जवळ आल्या असत्या तर मी त्या स्वामीजींच्या डोक्यावरून हाककल्या नसत्या कां? चालता हो इथून. पुन्हां माझ्या डोळ्यासमोरसुद्धां यायचं धाडस करूं नकोस." राजा ओरडला.



सुमंगल स्तंभित झाला. पण स्वामीजींनी त्याची बाजू घेतली. "राजन्, त्याच्यावर रागावूं नकोस." ते अजीजीने म्हणाले "नाहीतरी त्याचा हेतू निष्कपट होता. रागावणें फार सोपें असते. पण रागाच्या भरांत, क्षणिक संतापाने घेतलेला निर्णय चुकीचा ठरूं शकेल. जेव्हां तुम्ही चिडलेले असता, तेव्हां तुमचे मन शांत होईपर्यंत तुम्ही निमूट बसणें हे सर्वांत श्रेयस्कर असते. रागाच्या भरांत तुम्ही जरी सुमंगलला हाकलून दिलेत, तरी त्याच्याइतका विश्वासू आणि निष्णात माळी तुम्हाला सहजासहजीं मिळणार नाही."

सुशांत राजाने स्वामीजींचा सल्ला ऐकला आणि सुमंगलला माफ केले.

प्राणानंदाया या शब्दांनी राजाच्या मनावर अतिशय परिणाम झाला. कांही महिन्यानंतर स्वामीजी जरा अस्वस्थ झाले होते. एके दिवशीं त्यांनी राजाला सांगितलं, "माझ्या आयुष्याचा उद्देश अनेक लोकांना मदत करण्याचा आहे, केवळ तुमच्या



राज्यांतल्या नागरिकांनाचा नव्हे, तर मला आता इतर प्रदेशांत फिरून येण्याची व तिथल्या लोकांना मदत करण्याची इच्छा आहे.''

पण त्यांच्या जाण्याची गोष्ट राजाला कांही मान्य होईना. तेव्हां स्वामीजींना दया आली व त्यांनी सांगितले कीं दर तिसऱ्या महिन्यानंतर ते पुष्पानगरला येतील व राजाच्या संगतीत महिनाभर राहातील. त्यांची ही योजना राजाला मान्य करावीच लागली.

तीन महिन्यानंतर एका संध्याकाळीं प्राणानंद पुष्पानगरला परत आले व त्यांच्यासाठी बांधलेल्या झोंपडीकडे गेले. सुमंगलला ते आल्याचे कळले नव्हते. अंधार पडला होता आणि स्वामीजींना तहान लागली होती. पिण्याचे पाणी भरण्यासाठी सुरई घेऊन ते उद्यानांतल्या तळ्याकडे गेले. पाणी भरण्यासाठीं जेव्हां त्यांनी सुरई पाण्यांत बुडवली, तेव्हां गुडगुडगुड असा मोठा आवाज झाला.

सुमंगलची झोंपडी जवळच होती. त्याने तो आवाज ऐकला. त्याला वाटलं कीं कुणी रानटी जनावर बागेंत शिरलंय आणि तळ्याजवळ आलंय. तो तडक बाहेर आला आणि तळ्याच्या दिशेने त्याने आपला भाला अंधारात फेंकला.

हाय रे दैवा! तो भाला स्वामीजींच्या शरीरांत घुसला आणि ते किंचाळले. सुमंगलने त्यांचा आवाज ओळखला आणि तो घाबरुन त्यांच्याकडे पळाला. स्वामीजींना श्वास घेता येत नव्हता. तो त्यांच्या पाया पडला आणि त्याने क्षमेची याचना केली. स्वामीजी त्याला म्हणाले, ''माझ्या पाठींत घुसलेला भाला काढ, म्हणजे मला सुखाने मरण येईल.'' सुमंगलला हुंदके अनावर झाले होते. स्वामीजींच्या सांगण्याप्रमाणें त्याने तसं केलं आणि हळुवारपणें त्यांना जमिनीवर ठेवलं. ''मला क्षमा करा'' तो रडतरडत म्हणाला, ''मला तुम्हाला मारायचं नव्हतं हो!''

स्वामीजी मंद हांसले, ''मला ते ठाऊक आहे.



मी तुला क्षमा केलीय.'' असं म्हणून त्यांनी प्राण सोडला.

आता मात्र सुमंगल चांगलाच घाबरला, ''जर महाराजांना हे कळलं तर माझं कुटुंब आणि मी, आमचं काय होईल?'' तो तडक झोंपडीत परत गेला, आणि सारी हकीकत त्याने आपल्या पत्नीला सांगितली. आपली दोन्ही मुलें घेऊन त्या रात्रींच ती दोघेजण त्या नगरांतून नाहीशी झाली.

दुसऱ्या दिवशी पहारेकऱ्यांना स्वामीजींचा मृतदेह उद्यानात आढळला. त्यांनी सुमंगलचा शोध घेतला. पण तो कांही त्यांना सांपडला नाही. म्हणून सुमंगलनेच कांहीतरी कारणास्तव स्वामीजींना ठार मारले असावे असा त्यांनी तर्क केला. त्यांनी ही वार्ता महाराजांकडे पोंचवली. राजा अतिशय संतापला. त्याने जारीने सुमंगलचा शोध घेण्याची व त्याला मारण्याची आज्ञा दिली, पण सुमंगल कांही कुणाला दिसला नाही.

त्याने शेजारच्या राज्यांत नोकरी पत्करली होती. पण तिथें त्याचे मन रमत नव्हते. त्याला पुष्पानगरला परत येण्याची इच्छा होती. वर्षभरानंतर तो एकदा धाडस करून पुष्पानगरांत आला. त्याचा एक जुना मित्र त्याला भेटला. तो दरबारांत काम करीत असे. स्वामीजींच्या मृत्यूबद्दल राजाने सुमंगलला माफ केले आहे कीं नाही, याची चौकशी करायला सुमंगलने त्या मित्राला सांगितले.

राजाजवळ हा विषय काढण्याची संधी त्या मित्राला लवकरच मिळाली. शाही उद्यानांतला माळी बागकामासाठीं कांही सामान मागत होता; त्या मित्राने मधेंच म्हटले, ''महाराज, सुमंगल किती चांगला माळी होता, नाही कां? त्याने कधी सामानसुमानावर जास्त खर्च केला नाही!''

राजा कांहीच बोलला नाही. त्या मित्राने



सुमंगलला पुष्पानगरापासून दूरच राहायला सांगितलं. सहा महिने झाले, सुमंगलने येऊन पुन्हां आपल्या मित्राला विनंती केली. त्या मित्राने सुमंगलची स्तुती केली. यावेळेलाही राजाने कांहीही उत्तर दिले नाही.

आणखी सहा महिने तसेच गेले. आता मात्र सुमंगल अतिशय कासावीस झाला. यावेळेला आपल्या प्राणाची पर्वा न करता तो सहकुटुंब पुष्पानगरला परत गेला. त्याच्या मित्रामार्फत न जाता, तो सरळ दरबारांत राजासमोर गेला आणि त्याने राजाच्या पायाशी लोळण घेतली. त्याने स्वामीजींच्या अपघाती मृत्यूबद्दलची खरीखुरी हकीकत सांगितली.

''सुमंगल, मला हे सगळं माहित आहे. तू कांही त्यांना जाणूनबुजून मारणार नाहीस याची मला खात्री होती. तू परत आला आहेस तर आता लागलीच कामावर रूजूं हो!'' राजाने त्याला सांगितले.

इथे वेताळाने आपली गोष्ट संपवली. तो राजाला

म्हणाला, "हे राजन्, जेव्हां सुमंगलच्या मित्राने दरबारांत दोन्ही वेळेला त्याच्या कामाची स्तुती केली, तेव्हां राजा कांहीच बोलला नाही. पण स्वामीजींच्या मृत्यूनंतर जेव्हां दोन वर्षे उलटल्यावर सुमंगल स्वतःच परत आला, आणि राजाच्या पाया पडला, तेव्हां मात्र राजाने त्याला परत कामावर ठेवले. यांत राजाची अस्थिर बुद्धी नाही कां दिसत? तुला काय वाटतं की सुमंगलला प्रत्यक्ष पाहिल्यानंतरच राजाला तो निरपराध आहे असं वाटलं? या माझ्या प्रश्नांची उत्तरें माहित असूनही तूं मौन पत्करलेस, तर तुझ्या डोक्याचे हजार तुकडे होऊन इकडेतिकडे पडतील."

राजा विक्रमने लागलीच उत्तर दिले. "नाही, हा निर्णय देताना राजाची बुद्धी अस्थिर नव्हती. स्वामीजींचा मृत्यू ही हत्या नव्हती, तो एक केवळ अपघात होता हे त्याला यापूर्वीच समजले असेल. कारण तो एक सूज्ञ व कुशल राज्यकर्ता होता असं तूच सांगितले होतेस ना? त्याच्या माळ्याचा स्वभाव त्याला निश्चितच ठाऊक होता. त्याने सुमंगलला जिवानिशी पकडून आणायची आज्ञा दिली होती, कारण ज्या स्वामीजींबद्दल त्याला अत्यंत आदर होता, त्यांचा असा अकाली भीषण मृत्यू पाहून तो संतापाने वेडापिसा झाला होता. राजाच्या स्वभावांतला एकच दोष म्हणजे तो रागीट होता. स्वामीजींनीच एकदा त्याला सांगितलं होतं कीं रागाच्या भरांत असताना कांही निर्णय घेऊं नये व राग शांत झाल्यावर नीट विचार करावा म्हणून! जेव्हां सुमंगलच्या मित्राने त्याची तारीफ केली होती, तेव्हां सुमंगलवरचा राजाचा राग मावळला नव्हता. राजाला आपल्या मार्गदर्शक स्वामीजींचे शब्द आठवले व तो गप्प बसला. कदाचित जर सुमंगल समोर आलाच, तर रागाच्या भरांत त्याला शिक्षा करण्याची राजाला इच्छा झाली असती. दोन वर्षानंतर, राग व दुःख, दोन्हीही विरले होते. म्हणून जेव्हां सुमंगल स्वतःच दरबारांत आला, तेव्हां राजाने अतिशय न्यायी असा निर्णय दिला. राजा आपल्या गुरूचा सल्ला मानून दोन वर्षे गप्प बसला होता. राग मावळल्यानंतर मात्र सुमंगलशी तो नीटपणें बोलूं शकला."

राजा विक्रमाने हे उत्तर देताच त्याचा मौनभंग झाला म्हणून वेताळ पुन्हां एकदा शवासहित गायब झाला आणि त्या जुनाट वृक्षावर जाऊन बसला. राजा विक्रमने आपली तलवार उपसली आणि तो वेताळाच्या पाठोपाठ जाऊं लागला.



# गणेश पुराण

सत्यलोकांत कमलासनावर बसून दिवसभर सृष्टी करण्याचे काम करीत राहिल्याने ब्रह्मदेव दमून गेला, आणि कल्पांत जवळ येताच पेंगू लागला. डोळ्यांवर झोप आली असतां तो जांभया देऊ लागला. तेव्हां पर्वतशिखरे दुभंगून जाऊ लागली व त्यांतून अग्निज्वाळा बाहेर येऊ लागल्या. त्याला झोप लागण्याच्या सुमारास त्याचे डोळे थोडे पाणावले, तेव्हां आकाश प्रलयकाळातल्या ढगांनी व्याप्त झाले, हत्तीच्या सोंडेसारखी पावसाची संततधार सुरू झाली, आणि चतुर्दश लोक पाण्याखाली बुडून गेले. पापण्यांवर झोपेचे ओझे असल्याने त्या थरथर कांपत होत्या. सर्वत्र प्रलय काळांतला अंधःकार पसरला.

असा प्रलय सुरू झाल्यावर ब्रह्मदेव झोपला. प्रलयकाळ म्हणजे त्याची रात्र. पुन्हां कल्पांत प्रारंभ व्हायची वेळ जवळ येऊन ठेपली. नव्या जगतावर प्रकाश येण्याच्या पुण्यसमयी, सरस्वतीने वीणेच्या तारा स्वरांत लावल्या. त्यांवर बोटे फिरवीत ती भूपाली म्हणूं लागताच ब्रह्मदेवाला जाग आली. तो पद्मासन घालून बसला व आपल्या चारही मुखांनी त्याने चतुर्दिक नजर फिरवून पाहिली.

खालचे सर्व जगत जलमय झाले होते. मोठमोठ्या पर्वताकार लाटा येत होत्या. त्या लाटांच्यावर एका जागी शुभ्र कांतिरेखा दिसत होती. त्या प्रकाशांत लाटांवर तरंगत असलेल्या मोठ्या वटपत्रावर चंद्रासारखा एक सुंदर शिशू पहुडला होता. तो आपल्या उजव्या पायाचा अंगठा चोखत असलेला दिसला.

ब्रह्मदेव हात जोडून डोळे मिटून क्षणभर ध्यानमग्न झाला. डोळे उघडून पाहतो तर त्याला विचित्र दृश्य दिसले.

तो शिशू आणखी दुसरा कोणी नसून विश्वविराट स्वरूप परब्रह्मच असल्याचे ब्रह्मदेवाला खात्रीपूर्वक वाटले. परंतु या वेळी त्या शिशूचे डोके हत्तीसारखे होते व तो आपल्या लहानग्या सोंडेने आपला उजवा पाय धरून तोंडात घालीत असल्यासारखा दिसला.

१. वटपत्रशायी बालगणपती



त्याचे ते स्वरूप प्रसन्न होते. तो शिशू चंद्रकांतीसारखा प्रकाशित होत होता. त्याला चार हात होते. ब्रह्मदेव त्याच्याकडे आश्चर्यचकित होऊन पहात असतां एकाएकी तो शिशू वटपत्रासह अदृश्य झाला, व त्या जागी मातीची एक उंच टेकडी दिसू लागली.

क्रमाक्रमाने पाण्यांतून विशाल भूभाग वर आला आणि महासागर निर्माण झाले.

ब्रह्मदेवाने पुन्हां सृष्टीची निर्मिती करण्याचे ठरविले. सर्व प्रथम पर्वत व नद्या यांची सृष्टी व्हावी, यासाठी संकल्प करून त्याने कमंडलातून पाणी घेतले व जगतावर प्रोक्षण केले. त्यानंतर वृक्ष, वनस्पती, धान्य व खनिज निर्मितीसाठी संकल्प सोडला. त्यानंतर प्राण्यांची सृष्टी करायचे ठरवून क्रमाने सर्वप्रथम समुद्रांत माशांची, जमिनीवर जीवजन्तू, कृमीकीटक व पक्ष्यांची सृष्टी केली. त्यानंतर मानवसृष्टी करायचे ठरवून कमंडलातले पाणी घेऊन प्रोक्षण केले.

इकडे ब्रह्मदेव सृष्टीची निर्मिती करण्यांत गुंतला होता, त्या वेळी तिकडे सरस्वतीचे वीणावादन चालू होते. परंतु कां कोणास ठाऊक वीणेतून सर्व अपस्वरच निघत होते. सरस्वती थक्क झाली, व खाली पाहूं लागली आणि जास्तच थक्क झाली. ब्रह्मदेवाने आश्चर्यचकित झालेल्या अर्धांगीकडे पाहिले. परंतु ती चकित कां झाली हे त्याला कळले नाही. म्हणून त्याने खाली वाकून पाहिले.

सर्व पर्वत लोळत असलेले व पर्वत शिखरे उलटी पुरल्यासारखी होती व त्यांचा पाया वर पसरलेला, आणि सूर्यकिरणांना छत्रीसारखा अडवीत असलेला दिसला. नद्या समुद्राकडून उंच प्रदेशाकडे वहात असलेल्या दिसल्या. वृक्ष वनस्पती उलट आकाशाला आपल्या मुळांच्या पायांनी लाथा मारीत होते.

समुद्राच्या लाटांवर जलचर प्राणी तरंगत बेडकासारखे उड्या मारीत होते. कांही जागच्या जागी उभे होते तर कांही पक्ष्यांसारखे उडत होते.

कित्येक प्राणी विचित्र स्वरूपात निर्मिले गेले होते. कांहींना डोकीच नव्हती, तर कांहींना मागचे पायच नव्हते. कांहींना एकच एक पाय होता, तर कांहींना तीन पाय होते. कांहींना डोळे, कान वगैरे सर्व होते पण तोंडच नव्हते, कांहींच्या शेपटीलाच तोंड होते तर कांहींच्या डोळ्यालाच शेपटी होती. पक्ष्यांना पंखच नव्हते. कांहींना चालायचे झाले तर पाय नसल्यामुळे लोळणे आवश्यक होते.

ब्रह्मदेव ते सर्व पाहून गोंधळून गेला व आपली सर्वोत्तम सृष्टी, मानव सृष्टी कशी आहे हे, आतुरतेने पाहूं लागला. तेव्हां त्याला कांही मनुष्य दोन डोकी



असलेले दिसले. त्यांत एक डोके स्त्रीचे होते तर एक पुरुषाचे.

पुरुष हातभर किंवा वीतभर उंचीचे होते तर बायका मोठ्या हत्तीएवढ्या लठ्ठ व ताडाच्या झाडाएवढ्या उंच होत्या. कांहींना पाठीला तोंडे चिकटविलेल्यासारखी होती तर कांहींना चार, तीन किंवा एकच पाय होता. पोटालाच मोठे तोंड असलेले कांही कबंध आक्रंदन करीत असलेले दिसले.

प्राणी तोंडे वर करून असहाय अवस्थेत दीनवाणीने ओरडत होते. ब्रह्मदेवाची निंदा करीत असल्यासारखे तडफडत, आदळआपट करीत असल्यासारखे दिसत होते.

एक हातभर उंचीचा माणूस ताडाएवढ्या एका विकृत आकृतीच्या बाईकडे बोट दाखवून आकाशाकडे पहात ओरडत होता - "अरे ब्रह्मदेवा! मी अशा बायकोसह संसारसागर कसा तरून जाणार?"

विकृत आकारवाले कांही लोक आक्रोश करून रडत ब्रह्मदेवाची निंदा करीत होते - "अरे चार डोकीं असूनही खरे डोकेच नसलेल्या व डोक्यांत मेंदू नसलेल्या ब्रह्मदेवा! आमची अशी सृष्टी कां केलीस रे?"

तो सर्व आक्रोश ऐकून ब्रह्मदेवाची चारही डोकी गरकन फिरल्यासारखी झाली. आठही डोळ्यांना अंधेरी आल्यासारखे झाले. ब्रह्मदेव किंकर्तव्यमूढ होऊन सरस्वतीकडे पाहू लागला. त्याची चारही तोंडे पांढरी फट्ट पडलेली पाहून सरस्वती स्मित करून त्याच्याकडे पाहू लागली. परंतु बोलली मात्र नाही.

"असं कां बरं झालं? नियमितपणे सृष्टीची कार्ये चालू व्हावीत यासाठी मी सत्संकल्प करूनच तर



सृष्टीची पुनर्रचना सुरू केली होती! मग असं कां बरं व्हावं?" असं स्वतःशीच मोठ्याने बोलत ब्रह्मदेव चारही डोक्यांनी वर आकाशाकडे पहात जोराने म्हणाला. त्याचा तो आवाज दशदिशांत दुमदुमला.

किंकर्तव्यमूढ अवस्थेंत चारीबाजूला पहात असलेल्या ब्रह्मदेवाला एक अत्यंत उज्वल मूर्ती दिसली. त्या मूर्तीला हत्तीचे डोके होते. चार हातांत क्रमाने पाश, अंकुश, कलश व परशू धारण केले होते त्या गजाननाने! पूर्णचंद्रासारखी त्याची सौम्य कांती होती. त्याच्या खांद्यावरचे पांढरे शुभ्र उपरणे आकाशांत फडफडत होते.

तेव्हां सरस्वतीने आपल्या वीणेवर 'ओंकार' नाद केला. सरस्वतीची बोटे वीणेवर चालूं लागली व नादनामक्रिया रागाचे स्वर आसमंतात तरळू लागले. नंतर ते भैरव रागांत बदलून हंसध्वनि रागांत प्रवेश करते झाले. गजानन रूपात ब्रह्मदेवाला त्या मूर्तीचा



साक्षात्कार झाला. वटपत्रावर ती बालगणेशाची मूर्ती अभयहस्ते उभी राहून ब्रह्मदेवाला अभयदान दान देत होती. त्या मूर्तीच्या चौफेर शरद पौर्णिमेच्या चांदण्यासारखे ज्योतिर्वलय होते.

ब्रह्मदेवाचे हात आपोआप जोडले गेले व तो म्हणाला, - "प्रभो, या अद्भुत स्वरूपांत तू कोण आहेस? तुला ओळखूं न शकण्याइतका मी अज्ञानी आहे. म्हणून आता अनुग्रह कर!"

"बाबा रे, ब्रह्मदेवा ! संकल्पापाठोपाठ विकल्प येत असतो. त्यालाच विघ्न म्हणतात. विघ्नांचे हरण करून संकल्पपूर्ण करणारा मी विघ्नहर्ता आहे! विघ्नांचे नायकत्व करणाऱ्या विकल्पांचा मी माझ्या परशूने नाश करून प्रत्येक काम पूर्णकुंभवत यशस्वी करणारा मी विघ्नविनायक आहे! पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश नावाची जी पंचमहाभूते आहेत त्या भूतगणांचा अधिपती मी गणपती आहे! आहार धान्यांची पिकें नष्ट करणाऱ्या मदोन्मत हत्तीसारख्या विघ्नांना मी आपल्या अंकुशाने आपल्या काबूंत ठेवून आपल्या पाशाने बांधून ठेवतो. म्हणून तू मला विघ्नहर्ता गणेश या नांवाने हाक मारीत जा!" विघ्ननायक गणेशाची अशी गंभीर वाणी झाली.

तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला - "हे विघ्ननाशा गणाधिपा! माझ्या सृजनशक्तीला अशी भयंकर विघ्ने कां आली? ही सर्व सृष्टी अशी विकृत कां झाली? उत्तम सृष्टी कशी होईल हे सांगण्याचा अनुग्रह कर!"

"विघ्नांची तुला कल्पना असावी म्हणूनच हे सर्व झालं. वटपत्रावर बालगणपतिरूपे प्रगट झालेला मीच तो वटपत्रशायी गणपती होतो. त्यावेळी तूं माझ्याविषयी कांहीच विचार केला नाहीस. माझा विचार करणे म्हणजेच विघ्नाविषयी प्रथमच सावध राहण्याचे ज्ञान असणे होय ! ते ज्ञानस्वरूपच मी आहे! ब्रह्मदेवापासून सर्व प्राणिमात्रांपर्यंत प्रत्येकाने कार्यारंभ करण्यापूर्वी निर्विघ्नपणे कार्यसिद्धी व्हावी यासाठी योग्य ती सावधगिरी व ज्ञान ठेवणे आवश्यक आहे ! हत्ती कोठेही पाय ठेवण्यापूर्वी जमीन आपले वजन पेलण्याइतकी घट्ट आहे कीं नाही हे पाहातो. प्राण्यांत आपल्या आकाराइतकाच हत्ती हा प्राणी थोर बुद्धीचा असतो. हत्तीसारखी बुद्धी असावी ही सूचना देण्याच्या हेतूनेच मी गजानन रूप धारण केले आहे. तू झोपला होतास तेव्हां सोमकासुर नांवाच्या राक्षसाने तुझे चारी वेद चोरून नेऊन समुद्राच्या बुडाजवळ लपवून ठेवले. विष्णूने मत्स्यावतार धारण करून त्या राक्षसाचा संहार केला आणि मी वटपत्रावर पहुडलो असताना माझ्याजवळ आणून ते वेद ठेवले. ते वेद आणि सृष्टीची कार्ये चालू ठेव. हे घे," असे सांगून विघ्नहर्त्या गणेशाने ब्रह्मदेवाला वेद दिले.



ब्रह्मदेवाने ते घेतले व परमानंदाने विघ्नहर्त्याचे स्तवन करू लागला - "विघ्ननाशा गणनायका! सृष्टीची रचना करण्यापूर्वी तुझे स्मरण करून आणि हृदयपूर्वक तुझे पूजन करून मी विनवितो की माझ्या हातून कार्यारंभ व्हावा, असा वर देण्याचा माझ्यावर अनुग्रह कर ! आणि ही जी विकृत रूपांत सृष्टी झालेली आहे ती पुन्हां सुस्वरूप व्हावी असं कांहीतरी करण्याची कृपा कर!"

विघ्नहर्त्याच्या कृपेने आतापर्यंत झालेली, व विकृत रूपात असलेली सृष्टी क्षणार्धात सरळ झाली. तेव्हां विघ्नहर्ता गणेश म्हणाला - "अरे ब्रह्मदेवा! तुझ्या या वक्र सृष्टीची वक्रता मी तुकडे तुकडे करून टाकली म्हणून मी वक्रतुंड झालो. या वक्रतुंडाचे स्मरण करून कोणतेही कार्य प्रारंभ केल्यास ते कार्य यशस्वीच होईल. तू माझे स्मरण करून तुला जशी सृष्टी करावयाची असेल तशीच कर. सृजन ही एक कला आहे. ती कला कोणत्याही प्रकारे वांकडीतिकडी न होता तू निर्मिलेले जग हे कलेचे सत्स्वरूप म्हणूनच दिसेल. तू सृष्टी केलेल्या जगतात सुरवातीला माझी पूजा करून कोणी कार्यारंभ केला तर मी त्याला पावेन व त्याची विघ्ने दूर करीन व त्याची संकल्पसिद्धी व्हावी म्हणून मी सिद्धविनायक या नांवे ओळखला जाईन. सर्व गणांचा अधिपती होऊन गणपती या नावे शिवपार्वतीचा पुत्र म्हणून अवतार धारण करीन!" असे सांगून व ब्रह्मदेवाला आशीर्वाद देऊन गजानन अंतर्धान पावला.

सरस्वतीने भैरवी रागात सर्व आकाशाला पुलकित करून टाकणारे वीणेवरचे स्वर काढले.

ब्रह्मदेव - "विघ्नाशो गणाधिपय नमः!" म्हणाला आणि त्याने सृष्टीचा आरंभ केला. सृष्टी पूर्वीपेक्षा जास्त सुंदर निर्विघ्नपणे होऊ लागली. उच्च हिमाच्छादित शिखरांसह सुंदर पर्वत, अमृततुल्य जलपावन करणाऱ्या नद्या, मनोहर वने, विविध प्रकारच्या बाहुल्यांसारखे सुंदर प्राणी, शरीर सौंदर्य असलेले बलवान व मेधावी मानव, यांची सृष्टी होऊन सर्व जग ब्रह्मदेवाच्या कलेचे प्रतीक झाले. वाग्देवी सरस्वतीने आपली सुमधुर संगीतासारखी वाणी प्राण्यांना प्रदान केली. जीवजंतूंनी पृथ्वी व्याप्त होऊन अधिक सुंदर दिसू लागली. पारंब्यांच्या आधारे पसरणाऱ्या वट-वृक्षासारखे सर्व जग वाढू लागले.



पण शापाच्या परिणामामुळे राजा तिला ओळखत नाही. शकुंतलेची राजाने भेट दिलेली अंगठी, नावेतून नदी पार करताना पाण्यांत हात बुडविताना हरवते.

शकुन्तलेला खूप दुःख होते. पण तिची आई मेनका तिला घेऊन जाते. शकुन्तला जंगलात एका मुलाला जन्म देते.

एक दिवस एका कोळ्याला एका माशाच्या पोटांत एक अंगठी सांपडते. त्याला राजाकडे आणतात. अंगठी बघितल्याबरोबर राजाला शकुंतलेची आठवण येते. त्याला पश्चाताप होतो. पण शकुन्तला कुठे आहे? आपण शकुन्तलेवर केलेल्या अन्यायाच्या आठवणीने राजा दुःखांत दिवस काढत असतो.

एक दिवस काश्यप ऋषींच्या आश्रमांत गेला असताना सिंहाच्या छाव्यांशी खेळणाऱ्या छोट्या मुलाला पाहून राजाला आश्चर्य वाटते. तो त्याचा मुलगा असतो. मुलाबरोबर तो शकुन्तलेला भेटतो. आणि ते सुखाने राहूं लागतात.

त्यांचा मुलगा भरत हा पुढे फार मोठा राजा बनतो. त्याच्या नांवाने आपला देश भारतवर्ष म्हणून ओळखला जातो.

आजोबा गोष्टीचा शेवट करताना म्हणाले, "एका थोर जर्मन कवीने काय म्हटले आहे ते तुम्हाला माहिती आहे कां? ते त्याने म्हटलंय:

तुम्हाला जर तारुण्याचा आनंद लुटायचा असेल आणि परिपक्व वयाची फळं चाखायची असली, तुम्हाला अशी एखादी मोहक गोष्ट हवी असेल कीं जिच्यांत मोहिनीचे आकर्षण आहे, तुम्हाला जर पृथ्वी व स्वर्गाचे वर्णन करायचे असेल, तरच एकाच शब्दांत सांगतो.

"शाकुन्तल वाचा. तुमच्या सर्व इच्छा पूर्ण होतील."





# देवी भागवत

त्वष्ट्र प्रजापती सर्व देवांमधें श्रेष्ठ होते. त्यांनी घोर तपस्या केलेली होती. त्यांना इंद्राचा मत्सर वाटत होता, म्हणून त्यांनी तीन मस्तकांच्या विश्वरूपाची निर्मिती केली. विश्वरूप जसा मोठा होत गेला तशी त्याची तिन्ही शिरें निरनिराळी कामें करूं लागली. ते पाहून मुनिजन त्याची खूप प्रशंसा करीत असत. तो एका तोंडाने वेदपठण करीत असला तर दुसऱ्या तोंडाने दारू पीत असे. तिसऱ्या मस्तकाने विश्वांत होणाऱ्या सर्व घटनांचे निरीक्षण तो करीत असे.

विश्वरूप पांचअग्नींच्या मध्यांत तप करूं लागला. एकाच पायावर उभा राहून थंडीमधें पाण्यांत, व उन्हाळ्यांत अग्नीच्या मधें, कांहीही न खाता पिता तो तपस्येंत मग्न होता. जेव्हां इंद्राने हे सर्व कांही पाहिलं, तेव्हां त्याला वाटलं कीं त्याचं इंद्रपद जिंकण्यासाठी ही तयारी सुरुं आहे. इंद्राने विश्वरूपाच्या तपस्येचा भंग करण्याचा निश्चय केला. त्याने अप्सरांना पाठवलं. परंतु त्यांच्या शृंगारिक हावभावांचा कांहीही उपयोग झाला नाही. त्या इंद्रलोकीं परत गेल्या. त्यांनी सांगितले कीं विश्वरूपाच्या तपस्येचा भंग करणं त्यांच्याने शक्य होणार नाही.

इंद्राने महात्मा विश्वरूपाचा अंत करण्याचा निर्णय घेतला. आपण हे केवढे घोर पाप करणार आहोत याचा त्याने विचार देखील केला नाही. तो ऐरावतावर स्वार होऊन विश्वरूपाकडे गेला आणि त्याच्यावर त्याने आपल्या वज्रायुधाचा प्रयोग केला.

त्वष्ट्राला जेव्हां समजलं कीं इंद्राने त्याच्या पुत्राची हत्या केली आहे, तेव्हां तो अतिशय संतापला. त्याने अथर्वण मंत्रांचा उच्चार करीत अग्नी



प्रज्वलित केला. त्यांतून प्रकाशमान होत होत एक पुत्र उत्पन्न झाला. त्याला पाहून त्वष्टूने घोषणा केली, ''तुझे नांव वृत राहील. इंद्राने आपल्या वज्रायुधाने तुझ्या थोरल्या भावाचा बध केला होता. त्या इंद्राचा अंत करण्यासाठींच तुझा जन्म झाला आहे. हे काम योग्य रीतीने करायला हवं.''

वृतासाठी त्वष्टूने वेगवेगळ्या प्रकारची अस्त्रें निर्माण केली आणि त्याच्या स्वाधीन केली. त्याला रथ दिला, आणि एका सुमुहूर्तावर, ब्राम्हणांच्या आशिर्वादासहित वृताला इंद्राचा वध करण्यासाठीं पाठवले.

ही बातमी कळताच मुनी, यक्ष, आणि देवदेवता घाबरून गेले. त्यांना पळताना पाहून इंद्राने आपल्या सेवकांना आज्ञा दिली. ''रुद्र, आदित्य, वसू आणि दिग्पालकांना विमानांत बसून युद्ध करायला येण्यासाठीं बोलवा.''

असं म्हणून इंद्राने बृहस्पतीलाही आपल्या हत्तीवर बसवले आणि तो युद्ध करायला निघाला. त्याच्या पाठोपाठ देवताही आपापली अस्त्रें घेऊन निघाल्या. वृताने आपल्याबरोबर दानवसेना नेलेली होती. दोन्ही सैन्यें मानससरोवराच्या उत्तरेस असलेल्या पर्वतावर समोरासमोर भिडली.

हे युद्ध शंभर वर्षे सतत चाललेलं होतं. त्यामुळें सर्व लोकांवर त्याचे परिणाम होत राहिले. प्रथम वरुणदेवाने युद्धांतून पलायन केले. नंतर ओळीने वायुगण, यम, कांतिहीन अग्नी, एक-एक करत सर्वजण पळून गेले. शेवटी इंद्रालाही पलायन करणें भाग पडले. साऱ्या देवताच्यावर विजय प्राप्त केल्यानंतर वृत आपल्या पित्याकडे परत आला. त्याने पित्याला प्रणाम केला आणि म्हटले, ''सगळेच्या सगळेजण भिऊन पळून गेले. ते सगळेच अगदी खूप भेदरलेले होते, म्हणून मी त्यांच्यापैकीं कुणालाच मारलं नाही. इंद्रही धूम पळत सुटला. म्हणून मी त्याचा हत्ती पकडून आणला आहे. हा हत्ती आपण भेट म्हणून स्वीकारावा. आणि आता यानंतर काय करायचे त्याचा कृपा करुन मला आदेश द्या. कोणतेही कठीण काम करण्यासाठीं मी तयार आहे.''

आपल्या पुत्राची ही करामत पाहून त्वष्टू अतिशय संतुष्ट झाला आणि म्हणाला, ''पुत्रा, तुझा पराक्रम असामान्य आहे. आता मी ताठ मानेने सगळीकडे मोठ्या अभिमानाने जाऊं शकतो. माझी मनोवेदना आता संपली आहे आणि माझे जीवन सफल झाले आहे. माझ्यांत आता जरादेखील अस्वस्थपणा राहिलेला नाही. आता याच्यानंतर काय करायचे तेही मी तुला सांगतो. लक्षांत ठेव,



इंद्रावर कधीही विश्वास ठेवूं नकोस. तो अतिशय लबाड आहे, आणि कांहीही करण्यास तो मागेपुढें पाहणार नाही. ब्रम्हाची तूं तपस्या कर. अमरत्व प्राप्त कर. आणि नंतर इंद्राचा संहार कर. त्या दुष्टाने विनाकारण माझ्या मुलाला मारले आहे, आणि ते मी कधीच विसरूं शकणार नाही. त्या इंद्राचा अंत केल्यानंतरच माझ्या मनाला खरी शांती लाभेल.''

वृतने पित्याकडून अनुमोदन घेतले आणि संतापून जाऊन आवेशाच्या भरांत तो गंधमादन पर्वतावर गेला. त्याने गंगेत स्नान केले, सर्व प्रकारचा आहाराचा त्याग केला, योगाचे पालन केले आणि तो ब्रम्हाच्या तपस्येंत लीन झाला. सारे मुनीगण देखील त्याच्या घोर तपस्येची स्तुती करायला लागले. त्यांच्या तपस्येने संतुष्ट झालेल्या ब्रम्हाने प्रत्यक्ष दर्शन देऊन म्हटले, ''आता तपस्या पुरे कर. विचार, तुला काय हवंय?''

वृताने हात जोडून ब्रम्हाला सांगितले, ''भगवन्, मला इंद्रपद मिळाल्यावर मी अतिशय आनंदित झालो आहे. आज आपले दर्शन लाभले हे भाग्य त्यापेक्षांही मोठे आहे. आता मी धन्य झालो आहे. आपण मी मागेन तो वर देणार असाल तर असा वर द्या, कीं ज्यामुळें मी अमर बनूं शकेन. कोणत्याही लोखंडी, लांकडी, कोमल किंवा कठोर वस्तूने, कोणत्याही शस्त्राने मला कुणी मारूं शकणार नाही. जसेजसे युद्ध तीव्र व गंभीर होत जाते, तशीतशी माझी शक्ती वाढत राहील, असा मला वर द्यावा.''

त्याने मागितलेला हा वर ब्रम्हाने त्याला दिला व ते तिथून परत गेले.

वृत मोठ्या प्रसन्न मनाने आपल्या पित्याकडे आला. जे कांही घडलं, ते त्याने सविस्तर सांगितलं.



''पुत्रा, तुझे सदैव मंगल होवो. तुझा थोरला भाऊ विश्वरूप याचा वध करणाऱ्या त्या दुष्ट पापी इंद्राचा वध आता तू अवश्य करूं शकशील. निर्भय होऊन पुढे हो.''

आपल्या पित्याच्या आज्ञेनुसार इंद्राचा वध करण्यासाठीं वृत रथांत बसला आणि बरोबर मोठी सेना घेऊन युद्ध करायला निघाला. आणखी एकदा वृतबरोबर युद्ध करण्यास इंद्राला यावे लागले.

इंद्र व वृतमधें भीषण युद्ध झाले. हे युद्ध दीर्घकाळ चालत राहिले होते. त्यांत शेवटीं इंद्र पराभूत झाला आणि अनाथ झाला. वृताने अमरावतीला जाऊन तिथली सारी संपदा त्याने घेतली.

आपला मुलगा स्वर्गाचा राजा झालेला पाहून त्वष्टू फारच आनंदित झाला. देवता इतरत्र जाऊन राहायला लागल्या. देवनगरी आता राक्षस नगरी



झाली होती. देवांनी शिवाला आपली दुर्दशा सांगितली. त्यांनी शिवाला सांगितले, ''आम्ही आपल्याला शरण आलो आहोत. आम्हाला आपण वाचवा.''

शिवाने सर्व देवांना सहजपणें सांगितलं, ''आपण ब्रम्हाला बरोबर घेऊन विष्णूच्याकडे जाऊं या. फक्त त्यांच्याकडे वृताला मारणारी शक्ती असेल.''

सर्व जण मिळून वैकुंठाला गेले. त्यांना पाहून विष्णूने विचारलं, ''सर्वजण एकत्र इथें आला आहात. काय घडलंय?''

देवांनी त्यांची कथा सविस्तर सांगितली. तेव्हां विष्णूने त्यांना असं सांगितलं, ''तुमच्यावर जे कांही संकट आलेलं आहे, ते मला माहीत आहे. तुम्ही इंद्र व वृत यांच्यामधें स्नेह प्रस्थापित करा. मी वज्रायुध घेऊन अदृश्य राहीन व तुम्हाला मदत करीन. सर्वांच्या इच्छा पूर्ण करणारी जगन्माता आहे, तिची प्रार्थना कराल तर ती आपल्या योगमायेने तुम्हा सर्वांना मदत करेल. तिच्या मायेच्या प्रभावाखाली वृत येईल. आणि इंद्राच्या हातून मारला जाईल. तुम्ही सर्वांनी तिच्या मदतीने वृताला मारा.''

सर्व देव कल्पवृक्षांनी भरलेल्या मेरूपर्वतावर गेले. तिथे त्या सर्वांनी महादेवीचे ध्यान केले. महादेवीकडून मदतीची याचना करण्यापूर्वी आपल्या स्थितीचे सविस्तर वर्णन करून त्यांनी म्हटले, ''देवीमाते, आपण यापूर्वी महिषासुर, शुंभ, निशुंभा आणि इतर राक्षसांना मारून आम्हाला मदत केलेली आहेच. माते, हा वृतदेखील यापूर्वी आपला शत्रू असला पाहिजे. नाहीतर आमच्यासारख्या देवीभक्तांच्यावर तो असा हिंसाचार कां करतो आहे?''

त्यांच्या स्तुतीने प्रसन्न होऊन देवीने तीन नेत्र, चार हात, दिव्यास्त्रें, रंगीत सुंदर वस्त्रें व अनेक आभूषणें अंगावर आहेत अशा स्वरूपांत त्यांना दर्शन दिले. त्यांना मदत करण्याचे वचन देऊन देवी अंतर्धान पावली. देवांनाही परमसंतोष झाला. वृत आणि इंद्रामधें स्नेह निर्माण व्हावा म्हणून त्यांनी कांही मुनीजनांना वृताकडे धाडले.

वृतला भेटून मुनींनी त्याला सांगितलं, ''वृत, तू अवश्य एक अतिशय योग्य व्यक्ती आहेस. इंद्रालादेखील महान मानतात. अशा स्थितीमधें तुमच्या दोघांच्यात जर मैत्रीपूर्ण संबंध राहिले तर सोन्याहून पिवळें होईल. दुधांत साखर पडेल. तुमच्याशी मैत्री करण्यास इंद्र उत्सुक आहे. तुम्हालाही तसं करता येईल. तुम्हा दोघांच्यात मध्यस्थी करायला आम्ही मुनी आहोतच.''

त्यावर वृत म्हणाला, ''तुमच्याबद्दल माझ्या मनांत अपार श्रद्धा आहे. आपली इच्छा मी अव्हेरणार नाही. पण ब्रम्हहत्या करणाऱ्या पापी इंद्रावर मी कसा विश्वास ठेवूं शकेन?''

त्यावर मुनी म्हणाले, ''पाप्याला पापाची शिक्षा अवश्य मिळेल. ब्रम्हहत्या व मदिराप्राशन या अपराधाला प्रायश्चित्त हा उपाय आहे. परंतु मैत्रीद्रोहासाठी कोणतेही प्रायश्चित्त नाही. म्हणून इंद्राची आणि तुमची खरोखर मैत्री जुळली, तर तुम्ही दोघेही त्या बंधनाने बांधले जाल.''

''ओल्या किंवा कोरड्या वस्तूने, दगडी किंवा लांकडी वस्तूने, दिवसा किंवा रात्रीं, कोणत्याही देवाने, किंवा त्याचा राजा इंद्राने, मला मारता कामा नये. हे जर मान्य असेल तर आम्ही दोघे अवश्य मैत्री करूं.'' वृताने सांगितले.

मुनींनी हे वर्तमान इंद्राला सांगितले. इंद्राने या साऱ्या अटी मान्य केल्या. इंद्राने अग्नीला साक्षी ठेवून जेव्हां वचन दिले. तेव्हां वृताने इंद्राशी सख्य केले.

दोघेही एकमेकांना प्रेमाने भेटले आणि एकत्र हिंडूफिरूं लागले. समुद्रकिनाऱ्यावर आणि नंदन-वनात एकत्र जात होते. आता वृताचा इंद्रावर विश्वास बसला. परंतु इंद्राच्या मनांत वृताला मारण्याचा बेत होता.

एका संध्याकाळीं इंद्र व वृत समुद्रकांठावर फिरत होते. आता रात्रही नव्हती व दिवसही नव्हता. त्याशिवाय वृत एकटाच होता. इंद्राला वाटलं कीं वृताला मारायला ही वेळ योग्य आहे. त्याने विष्णूचे स्मरण केले व ध्यान लावले. विष्णू आले व त्यांनी अदृश्य होऊन वज्रायुधामधें प्रवेश केला. इंद्राने समुद्राचा फेंस पाहिला. तो ओलाही नव्हता किंवा कोरडाही नव्हता. तो फेंस कोणतेही शस्त्र होऊं शकत नव्हते. इंद्राने मनःपूर्वक देवीचे ध्यान केले. देवीने आपला अंश त्या समुद्रफेंसात मिसळला. इंद्राने आपले वज्रायुध समुद्रफेंसाने झांकले आणि वृतावर जोराने फेंकले. त्या आघाताने वृत जमिनीवर कोसळला आणि तिथल्यातिथें मरण पावला.

शत्रूच्या भीतीतून मुक्त झालेला इंद्र अमराव-तीला परतला. मुनींजनांच्या स्तोत्रपठणाच्या कार्य-क्रमाने महादेवीचा उत्सव साजरा झाला. नंदन-बनांत देवीचे एक अतिशय रमणीय मंदिर बांधले व त्यांत देवीच्या मूर्तीची प्रतिष्ठापना केली गेली.





# एकी

सुकर्म नांवाचा एक महात्मा, सुहस नांवाच्या आपल्या शिष्याबरोबर देशभर हिंडत होता. सूर्यास्ताच्यावेळीं ते दोघेजण निरंजनवर नांवाच्या एका गांवात पोंचले. त्या रात्री तिथें मुक्काम करावा या उद्देशाने ते एका धर्मशाळेकडे गेले.

जेव्हां गुरूशिष्य धर्मशाळेंत पोंचले, तेव्हां आंतून आरडाओरडा ऐकूं येत होता. एक दणकट पुरुष एका बारा वर्षांच्या मुलाला पकडून वेताने मारत होता. या दोघांनी आंत डोकावून ते दृश्य पाहिलं तेव्हां त्यांना फार वाईट वाटलं.

नंतर त्यांनी याविषयी जर चौकशी केली तेव्हां त्यांना कळलं कीं तो मुलगा त्या दिवसापर्यंत त्या मनुष्याच्या घरीं काम करीत होता. त्या मुलाला त्या घरांत काम करणें आवडत नव्हते. म्हणून कुणाला न सांगता तो त्या घरांतून पळून आला होता. त्याला ते घर नरकासमान वाटत होते. त्याला कोणी नातलग नव्हते, म्हणून तो त्या धर्मशाळेंत राहायला आलेला होता. त्या बलदंड पुरुषाने त्या मुलावर एक किंमती हार चोरल्याचा आरोप केला.

धर्मशाळेंत येऊन या अपराधाबद्दल त्याने या पोराला मारायला सुरवात केली. तो मुलगा कळवळून वारंवार सांगत होता कीं त्याने ही चोरी केली नव्हती. त्याने पुन्हां त्याच घरीं कामाला सुरवात करावी म्हणून हा त्या मालकाचा डाव होता.

त्या मुलाला अशा प्रकारें जोराने मारहाण केलेली पाहून धर्मशाळेंत उतरलेल्या लोकांना फारच वाईट वाटले. पण त्या मुलाला सोडवण्यासाठी त्यांच्यापैकीं कुणीही पुढें आले नाहीत.

त्या मुलाला ही मारहाण सहन होईना. कांही दुसरा उपाय न सुचल्यामुळें, त्याने गंगा नांवाच्या एका इसमाचे पाय धरले. आणि आपल्याला वांचवावे म्हणून तो त्याला विनवूं लागला. गंगादेखील चांगला धष्टपुष्ट होता, उंच, तगडा होता. पण गंगाने त्याच्याकडे सरळ दुर्लक्ष केलं. त्याने बेपर्वाईने त्या मुलाला मागे ढकलून दिलं आणि म्हणाला, "मला काय गरज तुला वांचवण्याची? ते माझं काम नाही. पाहिजे तर कोतवालच्या चावडींत तक्रार कर."

तिथें एक दुबळा, हडकुळा असा पुराणिक नांवाचा गृहस्थ हे सगळं पाहात होता. त्याला राग आला आणि तो त्या दांडगा इसमाला म्हणाला, "हा कसला न्याय? जर खरोखरच तुमचा हार हरवला असेल तर जा आणि कोतवालींत तक्रार करा. या मुलाला तुम्ही गुरासारखं मारलंत, तुम्हाला काय वाटलं? सोडून द्या त्याला अगोदर!"

त्या दांडगट माणसाने त्या पुराणिकाकडे वळून पाहिलं नि म्हटलं, "अरे दुबळ्या, तुला जिवंत राहायचंय कीं नाही?" आणि त्याने पुराणिकाला असा जोरदार धक्का दिला, कीं बिचारा पुराणिक जमलेल्या लोकांच्यावर जाऊन कोसळला.

तरीदेखील पुराणिक त्या मुलाला वांचवण्या-साठी तिथें जमलेल्या लोकांना विनवत होताच. पण कुणीही त्याच्या बाजूला आले नाहीत.



शेवटी या गुरूशिष्यांनी सांगितल्यावरुन त्या धर्मशाळेचा मालक पुढें सरसावला आणि त्याने शिपायांना बोलावले. त्या मुलाला आणि त्या बलदंड, मारकुट्या माणसाला त्याने शिपायांच्या स्वाधीन केले. तोपर्यंत रात्र झाली होती. त्या रात्रीं गुरु व शिष्य तिथेंच राहिले आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं पुढें निघाले.

वाटेंत शिष्य सुहस याने आपले गुरुजी सुकर्म यांना विचारले, "गुरुजी, धर्मशाळेंत जे घडलं त्यामुळें माझ्या मनाला फार त्रास झाला. एक दणकट माणूस एका लहान मुलाला मारतच होता आणि तिथें उपस्थित असलेले सगळे लोक निमूटपणें पाहात उभे होते. कुणीही त्या मुलाला वांचवायला आले नाहीत. खरंच, त्यांचा स्वभाव किती क्षुद्र आहे!"

सुकर्म महात्मनने म्हटले, "तू पहिल्यांदाच असं दृश्य पाहातो आहेस. म्हणून तुझ्या मनाला याचा त्रास होतो आहे. जेव्हां कुणा माणसाच्या

- कीर्ति अग्रवाल -

आयुष्यांत एखादी घटना घडते. तेव्हां त्या माणसाची त्यावर काय प्रतिक्रिया होते, त्यावरून त्या माणसाच्या व्यक्तिमत्वाचा अंदाज लावणें शक्य होते. प्रत्येकाला मनांतून भिती वाटत असते कीं त्याचा परिणाम आपल्यावर होऊं नये म्हणून! याचं मूळ कारण एकीचा अभाव हेच आहे. गंगामधें त्या दांडगट इसमाशी सामना करण्याचे शारीरिक बळ होते. त्याला वाटलं असतं तर तो त्या मुलाला त्या माणसापासून सोडवू शकला असता. परंतु त्या घटनेचा त्याच्यावर कांहीही प्रभाव पडला नाही. कारण त्याच्यांत संवेदनाक्षम मन नव्हते. माणुसकी नव्हती. पुराणिकाच्यामधें रोमरोमांत माणुसकी भरलेली होती, त्या मुलाला वांचवण्यासाठी तो तडफडत होता, पण त्याच्यामधे शारीरिक बळ नव्हते. तिथें जे लोक होते, ते सगळे एकत्र झाले असते, तर त्यांच्यात आपोआप शक्ती उत्पन्न झाली असती. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं ते सगळे एकत्र झाले नाहीत, होऊं शकले नाहीत.''

''यावर कांही उपाय नाही कां, गुरुजी?'' शिष्याने पृच्छा केली. गुरुजींनी स्मितहास्य करीत म्हटले, ''कां नाही? त्याचा उपाय अवश्य आहे. मी आता एक गोष्ट सांगतो ती नीट लक्षांत ठेव.

फार फार वर्षांपूर्वी दहाजण काशीयात्रेला निघाले. वाटेंत त्यांना तीन डाकूंनी अडवले. त्यांना सुरा दाखवून घाबरवले, त्यांना धमकावले. त्या सर्वांना ते डाकू आपल्या सरदाराकडे घेऊन जाऊं लागले. यात्रेकरूंच्यामधें एक बुद्धिमान गृहस्थ होता. त्याला परिस्थितीचा अंदाज आला व तो गाणें गाऊं लागला. डाकूंना वाटले, साधं गाणंच तर गातोय, गाऊं दे! त्यांत आपलं काय बिघडतंय? त्या गाण्याचे शब्द असे होते कीं तीन, तीन, मिळून नऊ होतात. तो बुद्धिवंत आपल्या सहकाऱ्यांना गाण्यांतून सुचवत होता तो अर्थ इतरांच्या चांगलाच लक्षांत आला. मग काय, तिघांतिघां यात्रेकरूंनी एकेका चोराला घट्ट धरले व पकडले. दहावा यात्रेकरू होता, त्याने डाकूंच्या हातांतले सुरे काढून घेतले आणि जंगलातल्या वेलींचे दोर करून त्यांचे हातपाय बांधून टाकले. व त्यांच्या तावडीतून आपली सुटका केली. अशा तऱ्हेने, माणुसकीवर विश्वास ठेवणाऱ्या चांगल्या, बुद्धिवादी लोकांनी इतर माणसांच्या मनांतली निद्रिस्त चेतना जागवली पाहिजे व लोकांना मार्गदर्शन केले पाहिजे.''

सुहासची शंका आता फिटली होती. निमूटपणें तो गुरुजींच्या पाठोपाठ जाऊं लागला.





# सुंदरीची हुशारी

एका गांवात सुंदरी व कमल नांवाचे एक जोडपें राहात होते. त्यांचं एक लहानसं खपरेल घर होतं आणि थोडीशी शेती होती. त्याखेरीज त्यांच्याजवळ कांहीही नव्हतं. कमल एक नंबरचा आळशी होता. घरांत तो कांहीही काम करीत नसे. कौटुंबिक झेंगटांशी त्याला कांही देणेंघेणें नव्हते. सुंदरी हुशार होती. म्हणून ती कसातरी प्रपंच चालवत होती.

एक दिवस कमलने बायकोला सांगितलं, ''आता सणवारांचे दिवस येतील. घराच्या भिंती जुन्या झाल्या आहेत. सणाच्या दिवशीं कुणी नातेवाईक जर आपल्या घरीं आले तर? असलं घर पाहून त्यांना बरं वाटणार नाही. आजच तीनचार मजूर बोलावून आपण भिंतींना चुन्याचा हात देऊं या.''

हे ऐकून सुंदरी नाराज झाली व त्याला म्हणाली, ''आपण दोघेजण इथें खांबासारखे भक्कम आहोत. दोघंही मिळून हे काम करून टाकूं कीं! मजूर बोलावले तर त्यांना मजुरी द्यायला लागते. लागतो त्याच्याहीपेक्षां ते जास्त चुना वांया घालवतील. एक थेंब देखील वाया न घालवता चुन्याचा हात भिंतीवर कसा देतात ते मला ठाऊक आहे. तुम्ही जाऊन शेजारच्या गौरीकडून शिडी घेऊन या. तोपर्यंत मी चुना पाण्यांत कालवून ठेवते.''

कमलला आता मात्र वाटलं कीं आपण उगीचच चुना लावायची गोष्ट काढली. स्वतःला त्याबद्दल दोष देत तो तिथून निघून गेला. व सरळ आपली बहीण कमला हिच्या घरीं गेला.

कमलाचे सासूसासरे खूप सधन होते. कमला जरा जास्त काळी होती. त्याच्यावरून तिची सासू तिला नेहमी टोमणे मारीत असे कीं सून काळी असली कीं तिचे सारे माहेरदेखील काळेच असते! कधीकधी सासूसुनेमधें आपसांत बोलाचालीदेखील होत असे. तसं कांही झालं कीं कमला आपल्या भावाकडे घेऊन राहात असे. मग तिचा नवरा यायचा, तिची समजूत घालायचा आणि तिला परत घरी घेऊन जाई. हे असं अनेक वेळा होत असे.

- निर्मला देवी -



कमलाच्या घरी कमलने आल्याआल्याच सांगितलं, "कमला, तुझ्या वहिनीची इच्छा आहे कीं तू सणाच्यापूर्वीं चार दिवस अगोदरच माहेरीं ये. म्हणून मी बोलवायलाच आलो आहे. उशीर करूं नकोस, तुझ्या सासूबाईंना सांगून आत्ताच नीघ."

कमलाला अशा आमंत्रणाची अपेक्षा नव्हती. तिला आपल्या वहिनीचा स्वभाव चांगला माहीत होता. तरीही भावाचे हे बोलणें ऐकून ती खूष झाली. तिने सासूला ही गोष्ट सांगितली आणि भावाच्याबरोबर ती लगेच निघाली.

थोड्या अंतरावर गेल्यानंतर कमलने कमलाला सांगितलं, "तू सरळ आपल्या घरी जा. मला बाजारांतून कांही सामान खरेदी करायचं आहे. काम संपवून मी लागलीच घरीं पोंचतो."

कमलाने 'बरं' अशा अर्थीं मान डोलावली आणि आपल्या भावाच्या घराकडे ती चालूं लागली. त्यांतदेखील कमलची एक चलाखी होती. त्याला वाटलं होतं कीं आपली नणंद कमला हिच्यासमोर चुन्याने भिंती सारवायला सुंदरीला लाज वाटेल, ती जरा बिचकेल. आणि नंतर ती मजुरांना बोलावून घेईल आणि भिंती सारवून घेईल.

सुंदरीच्या लक्षांत आलं कीं तिचा पती शिडी आणायला शेजारी गौरीच्या घरीं गेला नव्हता. म्हणून तिने स्वतःच तिथें जाऊन शिडी आणली. कमल कुठे गेला असेल याचा ती विचार करूं लागली. आणि स्वतःच चुन्याने ती भिंती रंगवायला लागली.



तेवढ्यांत कमला तिथें आली आणि म्हणूं लागली, "वहिनी, भाऊ म्हणत होता कीं मी सणाच्या अगोदर तीनचार दिवस इथें यावं आणि इथेंच सण साजरा करावा म्हणून! भाऊ सामान खरेदी करायला बाजारांत गेला आहे."

कमलाचे बोलणें ऐकून सुंदरीला आपल्या नवऱ्याची लबाडी लक्षांत आली. ती चिडली होती पण तिने वरकरणी कमलाला हंसतहंसत म्हटले, "बरं झालं, अगदीं योग्य वेळेला आली आहेस तूं! घराच्या भिंतींच्या बरोबर तुझ्या चेहऱ्यावरदेखील थोडी रंगसफेती करून तुला सासरीं पाठवीन. कारण तुझी सासू नेहमी तुझ्या काळ्या रंगावरून तुला बोलते ना! मग तुझा चेहरा पाहिला कीं तिचे तोंड बंद होईल."

बहिनीचे हे बोलणें ऐकून कमला रागावून तिला म्हणाली, "हे काय बोलता आहात तुम्ही? मी इथें आले तेच चुकलं!" असं म्हणून ती तडक मागे फिरली व आपल्या घराकडे चालूं लागली.

सुंदरीने तिच्या बोलण्याकडे सरळ दुर्लक्ष केले. चुन्याने भिंत रंगवायच्या कामांत ती पुन्हां गर्क झाली.

कमलला चिडून परत फिरलेली कमला दिली. ती स्वतःशीच बडबडत, सासरच्या घराकडे भराभरा चालत जात होती. त्याने घरीं येऊन बायकोला विचारले, "कमला चिडली वाटतं? तू कांही बोललीस तिला हीं काय?"

नाराज झाल्यासारखं नाटक करत सुंदरीने म्हटलं, "नणंद भावजयीच्या नात्यांत खूप गोष्टी होत असतात. तुमची बहीण म्हणजे चिडखोर आहे अगदी! सारखं रूसून माहेरी यायचं आणि नंतर सासरीं परत जायचं - हे नेहमीचंच आहे. तिला आता त्याची संवय झालीय. नंतर तिच्या घरीं जा आणि तिचा राग शांत करा बरं! पण त्यांच्यापूर्वी या शिडीवर अगोदर चढा आणि चुना फासायला लागा!" तिने कठोर आवाजांत सांगितलं.

आपली लबाडी उपयोगी पडली नाही हे कमलला समजायला वेळ लागला नाही. पण बिचारा करेल काय? रंगाचा डबा हातात घेऊन शिडीवर चढायला लागला.



भारतवीर प्रश्नावलीत भाग घ्या आणि आवडती सायकल मिळवा

# भारताचे वीर - ५

भारतीय स्वातंत्र्य लढ्यांत अनेक वीर चमकले. तुम्ही त्यांना ओळखता कां?

तीन बिनचूक उत्तरांना बक्षिसादाखल सायकली मिळतील.*

1 यांनी आझाद हिंद सेना स्थापली. जास्त कांही सांगायला नकोच. ओळखा

---

2 तमिळनाडच्या या वीराने स्वतःची शिपिंग कंपनी चालवण्याचे ब्रिटिशांना आव्हान दिले. त्याला सागर-विजेता म्हणत. तो कोण आहे?

---

3 या स्वातंत्र्यसैनिकाने बालवयांतच वाघाला ठार मारले होते. त्यामुळे त्याला एक पदवी मिळाली. तो कोण ते माहीत आहे?

---



4 बाजनगर इथे याने आपल्या मित्रांसह एक रेल्वेगाडी थांबवली, आणि मोठ्या रकमेची पेटी गाडीतून काढून घेतली. ब्रिटिशांविरुद्ध लढायला त्याला शस्त्रं खरेदी करायची होती. तो कोण होता?

---

5 याने नानासाहेबांच्या सेनेचे नेतृत्व करून ब्रिटिशांकडून कानपूर जिंकले. १८५७च्या बंडात त्याने ग्वाल्हेरचे रक्षण करण्यास झांशीच्या राणीला मदत केली होती. त्याचे नांव सांगा.

---

प्रत्येक प्रश्नाचे उत्तर दिलेल्या ओळीवर लिहा. या पांच वीरांपैकी तुम्हाला कोणता वीर आवडतो व कां? 'माझा आवडता राष्ट्रीय वीर' यावर दहा शब्द लिहा.

.................................................

.................................................

.................................................

स्पर्धकाचे नांव : .................................

वय : ........................ वर्ग : ....................

पत्ता : .........................................

पिन : .................. फोन : ...................

स्पर्धकाची सही : .................................

पालकाची सही : ...................................

हे पान नीट कापून ५ मार्च २००२ पूर्वी पुढील पत्त्यावर पाठवा.

HEROES OF INDIA QUIZ - 5
CHANDAMAMA INDIA LIMITED
No.82, DEFENCE OFFICERS COLONY
EKKATTUTHANGAL, CHENNAI - 600 097.

सूचना :

१. ही स्पर्धा ८ ते १४ वयोगटांतल्या मुलांसाठी आहे.
२. स्पर्धेत भाग घेणाऱ्यांतून फक्त तीन विजेते निवडले जातील. विजेत्यांना योग्य उंचीच्या सायकली बक्षिस दिल्या जातील. एकापेक्षा जास्त अचूक उत्तरें आल्यास विजेत्यांची निवड 'माझा आवडता वीर' या वर्णनावरून केली जाईल.
३. परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील.
४. त्याबद्दल वेगळा पत्रव्यवहार केला जाणार नाही.
५. विजेत्यांना पोस्टाने निर्णय कळवला जाईल.








# वीरबाहूचा संन्यास

जोगपूरमध्ये वीरबाहू नांवाचा एक गरीब इसम राहात होता. त्याच्या घरीं त्याची पत्नी, दोन मुलें आणि म्हातारी आई इतकी मंडळी राहात होती. तो खूप कष्ट करीत असे पण कुटुंबाचं पालनपोषण करण्याइतके उत्पन्न त्याला मिळवता येत नव्हते. पोटभर जेवणदेखील सगळ्या परिवाराला तो देऊं शकत नव्हता. निराश होऊन त्याने संन्यास घ्यायचा निर्णय घेतला, आणि जंगलात असलेल्या एका संन्याशांच्या मठाकडे जायला तो निघाला.

बिचारा वीरबाहू दुःखाने खाली मान घालून जंगलातल्या वाटेने चालला होता. रस्त्यांतच त्याला एक मोठी थैली दिसली. त्याने ती थैली उचलली. त्यांत रुपये भरलेले होते. तो आनंदाने स्वतःशीच बडबडूं लागला, "असं दिसतंय, कीं मी संन्यास घेतला तर वनदेवीला आवडले नसते. म्हणून तिला माझी दया आली आणि तिने माझ्या वाटेंत ही थैली ठेवली. आता मी घरी परत जाईन आणि सुखाने दिवस काढीन" असं म्हणून तो उलट फिरला आणि घराच्या दिशेने तो चालूं लागला.

दुसऱ्याच क्षणीं कुणीतरी जोरांत ओरडलं, "थांब आधी." वीरबाहूने घाबरून मागें वळून पाहिलं. दोन धट्टेकट्टे चोर तिथें उभे होते. त्यांच्या हातांतल्या धारदार तलवारी चमकत होत्या. त्या तलवारी पाहून तो फारच भ्यायला. त्या चोरांनी जवळच्या एका गांवात चोरी केली होती. रुपयांनी भरलेल्या थैल्यांमधली एक थैली रस्त्यांत पडली. चोरांच्या जेव्हां हे लक्षांत आले तेव्हां ते थैली शोधत परत येत होते आणि त्यांना ती थैली वीरबाहूच्या हातांत दिसली.

दोघेही चोर वीरबाहूच्याजवळ आले आणि त्याला दरडावून ते म्हणाले, "मुकाट्याने ती थैली आम्हाला देऊन टाक. हे सगळं धन मिळवण्यासाठी आम्ही मोठं धाडस केलंय, खूप शकल लढवलीय आम्ही, आणि तूं हे हडप करायला निघाला आहेस काय?"

वीरबाहूची घाबरून गाळण उडालेली होती. थरथर कांपतच त्याने ती थैली चोरांना देऊन टाकली नि तो म्हणाला, "हे बघा भाऊ, ही तुमची संपत्ती आहे ते मला माहीत नव्हतं. मी आयुष्यांत असंख्य अडचणी सोसल्या आहेत. खूपखूप कष्ट केले. पण माझ्या कुटुंबाचा सांभाळ करणें कांही मला जमले नाही. म्हणून संन्यास घ्यावा या विचाराने मी संन्याशांच्या मठाच्या दिशेने निघालो होतो. वाटेंत

- रमणी -

रस्त्यांत पडलेली ही थैली मला मिळाली. मी विचार केला की माझी दया येऊन माझे कष्ट दूर करण्यासाठी वनदेवीने ही थैली मला भेट म्हणून दिली असावी."

त्याचा खुलासा ऐकून ते चोर जोरजोराने हंसायला लागले. ते म्हणाले, "तुझी गरीबी दूर करायला काय वनदेवी तुला मदत करील होय? अशी फुकट आशा मुळींच बाळगूं नकोस. असले पोकळ विचार मनांतून साफ काढून टाक. तो पहा, डाव्या बाजूला संन्याशांचा मठ दिसतोय. तिथले संन्यासी आता भिक्षा मागायला बाहेर निघाले असतील." असं म्हणून चोर तिथून निघून गेले.

चोरांचे बोलणें ऐकून वीरबाहूच्या मनांत संन्याशांच्याबद्दल तिरस्कार निर्माण झाला. तो विचार करूं लागला, "मला शेती करायची माहीत आहे, नांगर चालवणं माहीत आहे, माझ्या अंगात मेहनत करायची ताकद आहे, तेव्हां मी संन्याशांच्याप्रमाणें भिक्षा कशाला मागू? आणि ते सुद्धां फक्त माझं पोट भरण्यासाठी? छे, छे! हे संन्यासी कांहीही कामधंदा न करता, केवळ भीक मागत फिरतात? हे म्हणजे आपल्या जबाबदारीपासून पळून जाण्यासारखे आहे. हे संन्यासी इतके कां आळशी असतात?" त्याचे मन बदलले, तो तडक मागे फिरला आणि घरीं गेला.

वीरबाहूच्या आईला आपला मुलगा गोंधळून गेला आहे हे लगेच समजले. तिने त्याला विचारले, "अरे वीर, काय झालं? इतकी कसली काळजी वाटतेय रे? कसला विचार करतो आहेस?"

जे कांही घडलं होतं, ते वीरबाहूने कोणतीही लपवाछपवी न करता, सगळं आईला सांगितलं. त्याला धीर देत त्याची म्हातारी आई म्हणाली, "बरं झालं, शेवटच्या क्षणीं देवाने तुला चांगली बुद्धी दिली. चुकीच्या मार्गावरून तुला परत आणलंन! अरे, हे संन्यासी कसे गुजराण करतात ते तुला ठाऊक आहे कां? आपल्यासारख्या गृहस्थांच्या दयेवरच ते जगतात. आपण जे कांही त्यांना निर्मळ मनाने थोडंफार देतो, तेवढ्यावरच ते भागवतात. ते स्वतःवर अवलंबून नसतात, पण दुसऱ्यांच्या मदतीवर जरूर अवलंबून असतात. लक्षांत ठेव बाळा, देणारा हा नेहमी घेणाऱ्यापेक्षां श्रेष्ठ असतो. समाजांत देणाऱ्यांबद्दल आदराची भावना असते. तेव्हां संन्यास घ्यायचाबियचा विचार पुन्हां कधीं मनांत आलाच तर तो काढून टाक. लक्षांत आलं कां?"

"एवढी साधी गोष्ट मला समजत नाही कां? इतका का मी बावळट आहे?" वीरबाहू चिडून म्हणाला, तेव्हां त्याची आई म्हणाली, "अरे, हे समजत असूनदेखील संन्यास घ्यायला घरांतून गेला होतास ना? हे कांही शहाण्या माणसाचं लक्षण आहे कां? चारपांच वर्षं अशीच कसून मेहनत कर. तोपर्यंत तुझे दोन्ही मुलगे मोठे होतील. ते तुला मदत करायला तयार होतील. आणि मग आपल्या सर्वांना आनंदात राहाता येईल."



# प्राणाची भिती

एका जंगलात एक ससा राहात होता. एकदा एका खड्ड्यांत त्याचा पाय अडकला. खड्ड्यांत पाणी होते पण तो बुडण्याइतके नव्हते. सशाने बाहेर यायचा खूप प्रयत्न केला पण त्याला कांही कांठावर येता येईना.

तो मनांत फारच कष्टी झाला. त्याला वाटलं कीं आता इथून बाहेर पडायला कांही मार्ग नाही तेव्हां आता या ठिकाणीं आपण निश्चितच मरणार. तो खूप दुःखी झाला होता. त्याच वेळीं तिथून जाणाऱ्या एका माकडाला व दोन सशांना त्यांची ही दशा समजली. त्या तिघांनी मिळून त्याला बाहेर काढण्याचे आटोकाट प्रयत्न केले. पण त्यांत ते अयशस्वी झाले. खड्ड्यांत अडकलेल्या सशाने त्यांना सांगितले, "तुमचा प्रयत्न वांया जाईल. तुम्ही तिघेही इथून निघून जा."

त्या दोघा सशांना व माकडाला त्याच्याबद्दल फार वाईट वाटत होते, पण ते बिचारे काय करणार? ते तिथून निघून गेले.

थोड्या वेळानंतर एक लांडगा ओरडत खड्ड्याच्या दिशेने जाऊं लागला. लांडग्याचा आवाज ऐकूनच खड्ड्यांत पडलेला ससा भीतीने थरथर कांपायला लागला. त्याला वाटलं कीं आता मात्र प्राण वांचणे कठीण आहे. जिवाची बाजी लावून त्याने छलांग मारली. आणि काय गंमत, तो चटकन खड्ड्याच्याबाहेर आला आणि पाहता पाहता नजरेआड झाला.

जेव्हां ससा जोरांत पळत जात होता, तेव्हां वाटेतच त्याला ते दोन ससे व माकड भेटले. ह्या सशाला पाहून त्यांना आश्चर्य वाटले. त्यांनी चकित होऊन विचारले, "आम्ही इतका प्रयत्न केला तरी तूं बाहेर येऊं शकला नाहीस. पण आता तू कसा बाहेर आलास?" सशाने उत्तर दिले, "मी पाहिलं कीं लांडगा ओरडत माझ्याकडेच येतोय. मी सारी शक्ती एकवटून उडी मारली आणि बाहेर आलो झालं!"

त्याचा खुलासा ऐकून माकड व दोन्ही ससे हंसायला लागले.

– जमुनाराणी



ORISSA

The soul of India

तुमच्यासाठी एक स्पर्धा





# कोरापुट

निसर्गप्रेमींना कोरापुट अतिशय आवडते. ओरिसाच्या या जिल्ह्यांत निसर्गाची संपदा भरभरुन सांडली आहे. कोरापुट २९९० फूट उंचीवर असून प्रसिद्ध दंडकारण्य जंगल लगतच आहे.

कोरापुट जिल्ह्याचं व्यापारी केंद्र असलेले जेपोर - तिथेही धबधबे, आणि वन्य प्राणी असलेली जंगले आहेत. जेपोरला प्रमुख ठाणें करुन आजू-बाजूची प्रेक्षणीय स्थळें व सहली यांचे आयोजन करता येते.

जेपोरपासून ७० कि मी अंतरावरचे दुदुमा - इथें मच्छकुंड नदीवर एक सुंदर धबधबा आहे.

पर्यटकांसाठी दुसरे आकर्षण केंद्र म्हणजे गुप्तेश्वर. या सुंदर जागी भगवान शिव गुप्तेश्वराचे एका गुहेंतले मंदिर आहे. हे जेपोर पासून ५८ किमी. दूर आहे.

रायागड-हे जिल्ह्याचे व गांवाचेही नांव आहे; हे कोरापुटहून बेहरामपुरला जायच्या वाटेवर आहे. हे गांवही त्याच्या निसर्गसौंदर्याबद्दल प्रसिद्ध आहे. इथून १३४ किमी अंतरावर असलेले मिनाझोला, हे तीन नद्यांच्या संगमावर वसलेले आहे. हे केवळ सौंदर्य-स्थळच नव्हे, तर एक तीर्थस्थळ म्हणून देखील प्रसिद्ध आहे. कोरापुट हे अनेक आदिवासी जमातींचे मूळ ग्राम आहे.

## तुमच्यासाठी एक स्पर्धा

### फक्त चौदा वर्षांखालील मुलामुलींसाठी

### स्पर्धा - VI

1. कोरापुट जिल्ह्याच्या सदाहरित वन्यांमधे एक हवाई यंत्रांचा कारखाना आहे. तो कुठे आहे ते ठाउक आहे कां?

--------------------------------------------

2. नाल्को हा आशियांतला सर्वात मोठा ॲल्युमिनियमचा कारखाना कोरापुटजवळच आहे. तो कुठे आहे?

--------------------------------------------

3. नागवली नदीवर या ठिकाणीं दोन धबधबे आहेत. इथले दोन आगळ्याच आकाराचे खडक फार प्रसिद्ध आहेत. या जागेचे नांव सांगा.

--------------------------------------------

दिलेल्या ओळीवर तुमची उत्तरें सुवाच्य अक्षरांत लिहा. खाली दिलेले कूपन भरा व तुमची प्रवेशपत्रिका खालील पत्त्यावर पाठवा.

**Orissa Tourism Quiz Contest - VI**
**Chandamama India Limited**
**No.82, Defence Officers Colony**
**Ekkatuthangal, Chennai - 600 097**

नांव : ..............................................

वय : ..............................................

पत्ता : ..............................................

पिनकोड: .................... फोन: ....................

ORISSA Winners picked by Orissa Tourism in each contest will be eligible for 3 days, 2-night stay



# यक्ष पर्वत

## 13

*(खड्ग, जीवदत्त आणि मणिभूषण जिथें थांबले होते, तिथें एक राक्षसी आली. तिच्या पतीकडून जीवदत्ताला यक्षपर्वताबद्दल कांही रहस्यपूर्ण गोष्टी कळल्या. मध्यरात्रीं कांहीतरी आवाज ऐकूं आला म्हणून मणिभूषण जागा झाला आणि घाबरुन ओरडायला लागला.) यानंतर पुढें...*

मणिभूषणच्या ओरडण्यामुळें जीवदत्ताची झोंपमोड झाली आणि तो जागा झाला. जीवदत्ताने मणिभूषणला धीर देण्याच्या उद्देशाने म्हटले, "मणिभूषण, गप्प बस बघूं ! घाबरायचं कांही एक कारण नाही. ज्या दोघी राक्षसिणी इथें आल्या होत्या ना, त्यांना माहीत आहे कीं तू कांही यक्ष मणिरंजित नाहीस.

तू मणिरंजितचा सेवक आहेस हे त्यांना ठाऊक आहे. कारण तू मणिभूषण आहेस हे मी त्यांना सांगितलं आहे. त्यांनी माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवला आणि त्या निघून गेल्या."

त्यानंतर मणिभूषणने झोंपण्याचा खूप प्रयत्न केला, पण त्याला झोंपच येईना. तो जागाच राहिला. उजाडल्यानंतर खड्ग व जीवदत्त जागे झाले. त्यानंतर ते सर्वजण मिळून नावेजवळ गेले आणि नावेंत बसले. मणिभूषण हळूंहळूं नाव चालवूं लागला.

एक प्रहरानंतर नाव किनाऱ्यावर थांबवली गेली. नावेतून उतरत मणिभूषणने त्या दोघांना सांगितले, "हा यक्षपर्वत आहे. आत तुम्ही इथें उतरूं शकाल. माझे मालक मणिरंजित आपणा दोघांना भेटायला इथें स्वतःच आलेले आहेत."

खड्ग व जीवदत्त किनाऱ्यावर उतरले आणि पर्वताच्या दिशेकडे पाहूं लागले. तिथें एका उंच खडकावर एक तरुण उभा होता. त्याच्या हातांत



एक लहानशी गदा होती. तो तरुण खड्ग व जीवदत्ताकडे एकटक पाहात होता.

तिघेजण त्या युवकाजवळ पोंचले. खड्ग व जीवदत्ताला तीक्ष्ण नजरेने न्याहाळत त्या युवकाने म्हटलं, ''खड्ग आणि जीवदत्त, तुम्हा दोघांचं हे दुर्धर साहस पाहून मला आश्चर्य वाटतंय. म्हणतात ना, बुद्धि कर्मानुसारिणी! तुम्हाला पाहून मला तर तुमची दया येते!''

जीवदत्ताने मणिरंजितला नखशिखान्त नीट न्याहाळलं, आणि तो म्हणाला, ''मणिरंजित, पद्मावतीचं म्हणणं आहे की जो इथल्या दगडी रथाला त्याच्या जागेवरुन सरकवू शकेल, तोच महावीर आहे. आणि या कामासाठी येणाऱ्याचा वध करण्याची तुझी योजना आहे. आता तीच योजना तुझा गळफांस बनणार आहे. कुठे आहेत त्या दोघी राजकन्या? पद्मावती व वसंतकुमारी?''

त्यांचे बोलणें ऐकून मणिरंजित संतापला. तो आपली गदा उचलणारच होता, तितक्यांत खड्गवर्मने तलवारीच्या मुठीवर हात ठेवीत म्हटले, ''मणिरंजित, जेव्हां आम्ही तो दगडी रथ त्याच्या जागेवरुन हालवूं शकणार नाही, तेव्हांच तू आपली गदा उचल. जर आम्ही या कामांत अयशस्वी झालो तर मग तुलाच महावीर समजून पद्मावती तुझ्याशी विवाह करील. पण अगोदर आम्हाला तो रथ कुठे आहे तो दाखव.''

मणिरंजित त्यांना कांही उत्तर देण्यापूर्वीच मणिभूषण त्याला म्हणाला, ''उतावळेपणा करुं नकोस मणिरंजित. प्रथम या दोघा तरुणांना रथाच्याजवळ घेऊन चल.'' मणिरंजितने आपला राग आवरला आणि तिघांना आपल्याबरोबर तो घेऊन निघाला.

थोड्याच वेळांत ते एका पठारावर पोंचले. त्या पठाराच्याखाली फळाफुलांनी लगडलेले वृक्ष दिसत होते. तिथल्या विस्तीर्ण उद्यानांतल्या मधल्या भागांत एकमेकांपासून जरा दूर असलेली रथाच्या आकारांतली दोन मोठी घरे होती. त्यांपैकी एका भुवनाच्या सौधावर दोन तरुणी उभ्या होत्या, आणि तिथून त्या खड्ग व जीवदत्ताला पाहात होत्या. त्या दोघांना पाहून त्या दोघींच्या चेहऱ्यावर आनंदाची झळाळी दिसूं लागली.

जीवदत्ताने त्या दोघी युवतींना पाहून म्हटलं, ''मणिरंजित, वसंताकुमारी आणि पद्मावती, म्हणजे याच दोघीजणी ना?''



''हो, तुमचा दोघांचा पराक्रम पाहाण्यासाठी त्या आतुर झाल्या आहेत, म्हणून तिथें उभ्या आहेत.'' असं म्हणून तो वळला आणि दगडी रथाकडे बोट दाखवून म्हणाला, ''तुम्ही जो पाहात आहात तोच दगडी रथ आहे.'' दांतओठ आवळत मणिरंजित म्हणाला.

त्या दोघांनी तिकडे पाहिलं कीं तो वीस फूट उंचीचा रथ होता त्याला लागूनच पर्वत होता. जेव्हां ते दोघेजण रथाच्या दिशेने जाऊं लागले, तेव्हां मणिभूषणला बोलावण्यासाठीं मणिरंजित मागे फिरला. पण मणिभूषण इकडेतिकडे कुठेच दिसेना.

कांहीही न बोलता मणिभूषण तिथून निघून गेलेला पाहून मणिरंजितला आश्चर्य वाटले. नंतर तो रथाजवळ गेला. तोपर्यंत खड्ग व जीवदत्ताने रथाच्या चारी बाजूंना फिरून रथाचे नीट निरीक्षण केले होते.

जीवदत्ताने वांकून रथाच्या खालच्या बाजूचे भाग खड्गला दाखवत म्हटले, ''खड्ग, हा रथ पर्वताला जोडलेला नाही आहे. इथें पडलेल्या पत्थरांतूनच हा रथ निर्माण केलेला आहे. त्याच्या खालून अस्पष्ट आवाज येत आहेत आणि अंधुकसा प्रकाश येतो आहे. असं वाटतंय कीं कांही माणसें आपसात बोलत आहेत.''

जीवदत्ताचे बोलणें ऐकून मणिरंजित स्तंभित झाला. जणूं कांही त्याला एखाद्या सापाने दंश केला होता! नकळत तो उद्गारला, ''रथाच्या खालून काय तुम्हाला माणसांचे आवाज ऐकूं येत आहेत आणि प्रकाश दिसतो आहे? अशक्य, हे सर्वथैव अशक्य आहे.''



''अशक्य कसं असेल? डोंगरात जे हिरे जवाहीर आहे, ते खणून बाहेर काढणारे तुझे सगळे गुलाम मुके तर नाहीत ना?'' जीवदत्ताने तीक्ष्ण स्वरांत विचारले.

क्षणभर मणिभूषण बावचळून गेला. नंतर स्वतःला सावरत त्याने विचारलं, ''तुम्हाला हे रहस्य कसं माहित झालं? कोणी सांगितलं हे रहस्य? आत्ता लक्षांत आलं, मणिभूषणनेच हे रहस्य तुम्हाला सांगितलं असलं पाहिजे.''

''बिचाऱ्या मणिभूषणवर संशय पाखडूं नकोस. त्याच्या बोलण्यावरुन अजून तरी आमच्या ध्यानांत येत नाही कीं तो तुझा सेवक आहे कीं दोस्त आहे! यक्षपर्वताबद्दलची सारी रहस्यें मला माझ्या दिव्य दृष्टीमुळें समजली आहेत.'' जीवदत्ताने हंसून म्हटले.

मणिरंजितचा चेहरा रागाने काळानिळा झाला.

तो म्हणाला, "जीवदत्त, उगीच पोकळ गप्पा मारूं नकोस. रथ जागेवरुन सरकवण्याचा प्रयत्न करता आला तर करुन पाहा ना! तुमच्याकडून हे काम होतंय कीं नाही याचा निर्णय तरी होईल. तुमचे शक्ती-सामर्थ्य पाहाण्यासाठी पद्मावती आणि वसंताकुमारी त्या भवनावर उत्सुकतेने उभ्या आहेत."

जीवदत्ताने खड्गवर्माला खूण केली आणि रथाच्या आकाराची बांधलेली ती दोन घरें दाखवत त्याने मणिरंजितला विचारले, "ज्या भवनाच्या सौधावर दोन्ही राजकुमारी उभ्या आहेत, त्यांच्या शेजारचे भवन हे तुझें निवासस्थान आहे ना?"

"हो, पण हा प्रश्न तू कां विचारतो आहेस?" मणिरंजितने विचारले.

"कारण ते भवन कांही क्षणांतच कोसळणार आहे, हे पाहा!" असं म्हणून जीवदत्ताने मंत्रोच्चारण केले व आपला दंड दगडी रथावर ठेवला. नंतर त्याने लाथ मारली.

झालं, पाहता पाहता रथ आपल्या जागेवरुन हलला. आणि उताराच्या बाजूला वेगाने सरकत मणिरंजितच्या भवनावर आदळला. त्या भवनाचे व दगडी रथाचे तुकडे झाले. त्यांतले कांही तुकडे उडाले आणि उद्यानवनांत जाऊन पडले.

आपल्या डोळ्यासमोर होत असलेला हा सर्वनाश पाहून मणिरंजितचे शरीर कांपायला लागले. त्याच्या तोंडून शब्द फुटेना. असं कधी होऊं शकेल हे त्याच्या स्वप्नांत देखील कधी विचार आला नव्हता. स्वतःला सावरत जीवदत्तावर प्रहार करण्यासाठी त्याने आपली गदा वर उचलली. परंतु तेवढ्यांत खड्गवर्माने तलवार उपसली आणि तो मणिरंजितवर चालून गेला.





जीवदत्ताचा आनंद गगनांत मावेना. गंधर्व वसुमतीने त्याला दिलेला कांशाचा छोटा नगाडा हातांत घेतला आणि जोरजोराने वाजवूं लागला. दुसऱ्याच क्षणीं दगडी रथ जागेवरुन हलल्यामुळें तिथें एक भुयार दिसले. त्यांतून कांही राक्षस व गंधर्व वर आले. ते जोरजोराने ओरडायला लागले.

जीवदत्ताने त्यांना सर्वांना गप्प बसण्यास सांगितले आणि तो म्हणाला, "या क्षणापासून तुम्ही सर्वजण स्वतंत्र आहात. तुम्ही आता आपापल्या घरी जाऊं शकता." त्याने पुन्हां कांशाचा नगाडा हातांत धरला व म्हटले, "हा कांशाचा नगाडा वसुमती नांवाच्या गंधर्वाने मला भेट दिला होता. तुमच्यापैकीं जर कुणी गंधर्व असेल तर पुढें या आणि हा घेऊन जा."

एक गंधर्व पुढें आला. जीवदत्ताला दिलेला नगाडा त्याने घेतला आणि त्याचे चुंबन घेतले. बंधमुक्त झालेल्या गंधर्वांना आणि राक्षसांना जीवदत्त कांहीतरी सांगणार होता तेवढ्यांत मणिरंजितचे किंचाळणें ऐकायला आले. जीवदत्ताने वळून पाहिले. खड्गवर्माने मणिरंजितला घायाळ केले होते आणि खाली पडलेल्या मणिरंजितच्या गळ्यावर आपली तलवार टेकवून तो मोठ्या रुबाबांत उभा होता.

ते दृश्य पाहून जीवदत्त जोरांत हंसायला लागला. तेव्हां खड्गवर्माने जीवदत्ताला सांगितले, "जीवा, या दुष्ट मणिरंजितला मी मृत्यूच्या दाढेंत लोटूं कीं सोडून देऊं? या पापीने राजकुमारीचे अपहरण करुन केवळ त्या दोघींनाच त्रास दिला आहे असं नाही, तर त्यांच्या मातापित्यांनाही त्याने मानसिक धक्का दिला आहे."



राजकुमारी पद्मावती व वसंताकुमारी तिथें आल्या. मणिरंजितला पाहताच वसंताकुमारी उद्गारली, "मी तर प्रतिज्ञा केली होती कीं जो वीर या नीच माणसाला मारील, त्याच्याशीं मी विवाह करीन. जर माझ्या डोळ्यांदेखत याचा मृत्यू झाला नाही तर मी आजन्म ब्रम्हचारिणी बनून राहीन."

खड्गवर्माने वसंताकुमारीला निरखून पाहिले. तिचे अद्भुत सौंदर्य पाहून तो मुग्ध झाला. तिच्या बोलण्यावरुन स्पष्ट समजत होते कीं मणिरंजितला ठार मारले तरच वसंताकुमारी त्याची पत्नी होऊं शकली असती. त्याने आणखी कांही विचार न करता तलवारीला हात घातला व ती मणिरंजितच्या गळ्यांत तो घुसवणार, तेवढ्यांत आवाज आला "थांब जरा". सर्वांनी



आवाजाच्या दिशेने वर पाहिले.

हंसाच्या आकाराचे एक आकाशयान त्यांच्यासमोर येऊन खाली उतरले. त्यांतून यक्षराजा व मणिभूषण बाहेर आले.

यक्षराजाने सगळ्यांकडे बघून म्हटले, ''खड्ग आणि जीवदत्त, तुम्ही दोघेजण असामान्य वीर आहात यांत संशय नाही. मणिभूषणने मला सारं कांही सविस्तर सांगितलं आहे. हा मणिरंजित एक काळा डाग आहे. ह्याच्यामुळें सारा यक्षवंश काजळला गेला आहे. परंतु याला सोडून द्या. हा जिवंत असला तरी मेल्यांतच जमा आहे.''

खड्गवर्माला आता प्रश्न पडला. मणिरंजितला मारावे कीं सोडून द्यावे याचा त्याला निर्णय करता येईना. तेव्हां जीवदत्ताने म्हटले, ''खड्ग, यक्षराजाचे बोलणें तू ऐकले आहेस ना? मणिरंजितला क्षमा कर आणि त्याला सोडून दे.''

''मग वीरपुरच्या राजकुमारीच्या प्रतिज्ञेचं काय होईल?'' खड्गवर्माने राजकुमारीकडे पाहात म्हटले.

वसंताकुमारी लाजून चूर झाली आणि पद्मावतीच्या पाठीमागे लपली. यक्षराजाने हंसत म्हटले, ''मी आधीच सांगितलंय कीं मणिरंजित आता जीवंत असला तरी मेल्यासारखाच आहे. म्हणून वसंताकुमारीच्या प्रतिज्ञेचा भंग होणार नाही. तिची प्रतिज्ञा खोटी ठरणार नाही. तिच्या शब्दाप्रमाणेंच होईल. मी स्वतःच दगडी रथ सरकवणाऱ्या जीवदत्ताचा विवाह पद्मावतीशी, आणि खड्गवर्माचा विवाह वसंताकुमारीशी लगेच करून देतो. पुष्पमाळा घेऊन या रे!''

मणिभूषणने विमानांतून चार पुष्पमाळा आणल्या. त्याने चौघांना एकएक माळ दिली. पद्मावती व जीवदत्ताने एकमेकांच्या गळ्यांत माळ घातली. खड्गवर्मा व वसंताकुमारीनेही एकमेकांना माळा घातल्या. त्या साऱ्या प्रदेशांत आनंदाचा आवाज गुंजत राहिला.

मणिरंजितच्या कैदेत आत्तापर्यंत जे गंधर्व व राक्षस गुलाम होते, ते आता एक एक करुन पुढें येऊं लागले. त्यांनी खड्ग व जीवदत्ताच्या पायांना हात लावून प्रणाम केला.

जीवदत्ताच्या लक्षांत आले कीं त्यांना कांहीतरी सांगायची इच्छा आहे. म्हणून त्याने त्यांना विचारले, ''काय सांगायचंय तुम्हाला? तुम्ही न भिता काय मनांत असेल ते सांगा.''

प्रथम गंधर्व बोलला. ''महावीरांनो, मी



गुलाम यक्षाचा नेता आहे. माझी विनंती आहे कीं पर्वताच्या आंत जे अपार सोने आहे, हिरे जडजवाहीर आहे, ते आम्हाला भेट म्हणून द्यावे.''

हे ऐकताच जीवदत्त व खड्गवर्माने एकमेकांकडे पाहिलं. खड्गवर्माने हंसून म्हटलं, ''गंधर्व नेत्याची इच्छा किंवा राक्षसांच्या नेत्याचीही इच्छा असेल तर गंधर्व आणि राक्षसांच्यामधें भयंकर युद्ध होईल.''

राक्षसांच्या नेत्याने त्याचे बोलणें तोडत नम्रपणाने म्हटले, ''महाराज, आम्ही बराच काळ मणिरंजितचे गुलाम बनलो आहोत. सुखदुःखांत आम्ही एकत्र राहिलो. आमच्यांत कधीही भांडण तंटा झाला नाही. कोणत्याही गोष्टीवरुन आमचे मतभेद झाले नाहीत. आमच्यांत मैत्रीची भावना नेहमी जागृत राहिली आहे. मला सोने नको कीं हिरे जवाहीर नको. माझी इतकीच इच्छा आहे कीं आजपासून संपूर्ण यक्षपर्वत प्रदेश आमचा व आमच्या मुलांबाळांचा असावा. माझी फक्त इतकीच विनंती आहे!''

त्याची इच्छा ऐकून आश्चर्यचकित झालेले खड्ग आणि जीवदत्ताने यक्षराजाला म्हटले, ''हा सारा प्रदेश आपल्या राज्याचाच भाग आहे. दुसऱ्यांना हा प्रदेश देण्याचा हक्क आम्हाला कसा असेल?''

तेव्हां यक्षराजाने राक्षसांना सांगितलं, ''या माझ्या प्रदेशाचं राज्य मी मनःपूर्वक तुम्हाला भेट देत आहे. आता यापुढें हा तुमचा प्रदेश आहे.''

त्यानंतर यक्षराजाने खड्ग, जीवदत्त व त्यांच्या पत्नी यांना विमानांत बसायची खूण केली व म्हटले, ''खड्ग आणि जीवदत्त, तुम्हाला जिथें जायचे असेल ते या विमानांत बसून जा. आजपासून एक महिनाभर तुम्ही या यानाचा उपयोग करुं शकाल. हे यान तुमचंच आहे असं समजा. एका महिन्यानंतर हे मला परत द्या. तुम्हा सर्वांचे कल्याण होवो.''

''यक्षराज, आम्ही आपले आभारी आहोत'' असं कृतज्ञतापूर्वक म्हणून चौघांनी यक्षराजाला प्रणाम केला. विमान उडाले आणि वायुवेगाने पद्मावीरपुरच्या दिशेने जाऊं लागले.

(समाप्त)



# आदरसत्कार

एका गांवात पुरुषोत्तम शर्मा नांवाचे एक पंडित राहात होते. शास्त्रांचा त्यांनी फार गाढा अभ्यास केला आहे व ते फार उच्च दर्जाचे विद्वान आहेत असं सारेजण म्हणत असत. दूरच्या गांवात राहाणारे रघुपती त्यांना भेटायला एकदा आले. तेही मोठे नामांकित पंडित होते.

दुपारी भोजन झाल्यानंतर दोघेजण ओसरीवर बसून शास्त्रांसंबंधी चर्चा करीत होते. रस्त्यावरुन एक लांकूडतोड्या जात होता. पुरुषोत्तम शर्मांना पाहून त्याने आपल्या डोक्यावरचा भारा खाली उतरवला, आणि दोन्ही हात जोडून त्याने त्यांना नम्रपणें नमस्कार केला.

पुरुषोत्तम शर्मांनीदेखील त्याला हात जोडून नमस्कार केला आणि विचारले, ''कसा आहेस रतन? सारं कांही ठीक चाललंय ना?''

हे पाहून रघुपती पंडितांना आश्चर्य वाटलं. त्यांनी पुरुषोत्तम शर्मांना विचारलं, ''शर्माजी, हे आपण काय करत आहात? तुम्ही त्या लांकूडतोड्याला कशाला नमस्कार करायला हवा?''

त्यावर पुरुषोत्तम शर्मांनी हंसून उत्तर दिलं, ''रतन हा आदरसत्कार जाणणारा माणूस आहे. आमचे दोघांचे व्यवसाय जरूर निरनिराळे आहेत, पण आम्ही दोघेही माणसेंच आहोत. आपली शास्त्रें व पुराणेंदेखील आपल्याला हेंच सांगतात. जो आपला मान राखतो, आदरसत्कार करतो, त्याचा आदर करणं हे आपलंही कर्तव्य आहे. यांतच आपला गौरव आणि आपली मर्यादादेखील आहे !''

-किरण राठी



नव्या वेताळ कथा

# शिव्यांची राक्षसीण

अंधारी रात्र होती आणि वातावरण भेसूर होते. मधूनमधून पाऊस पडत होता. सोसाट्याच्या वाऱ्याने अरण्यांतली झाडें हलत होती. विजांचा गडगडाट आणि कोल्हेकुई यांत मधेच भुतांचा हंसण्याचा आवाज येत होता. पण राजा विक्रम डगमगला नाही. निर्धाराने तो प्रेत घेऊन पळालेल्या वेताळाचा पाठलाग करीत होता. वेताळ प्रेत घेऊन झाडावर पुन्हां लपला होता. राजा त्या जुन्या झाडावर परत चढला आणि त्याने ते प्रेत खाली आणले. आपल्या खांद्यावर ते प्रेत घेऊन तो स्मशानाच्या दिशेने चालायला लागला.

तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ राजाला



म्हणाला, ''राजन, मला तुझा हेतू काय आहे ते कांही उमजत नाही. हे इतके कष्ट तूं कशासाठी करतो आहेस? मध्यरात्र झाली आहे, गडद अंधार आहे, कांहीही दिसत नाही आणि तुला भिती वाटत नाही कां? वन्य श्वापदांच्या, विषारी जनावरांच्या आणि भुताखेतांच्या या अरण्यांत तू तुझे प्राण धोक्यांत कां घालतो आहेस? तुझ्या मनांत काय आहे ते तरी मला सांग. अनेकवेळा असं दिसतं कीं आपली आकांक्षा पूर्ण करण्याच्या आवेगांत माणूस इतका दमतो कीं आपण कां व कशासाठी हा प्रयत्न करतोय तेच तो विसरतो. अरूणा नांवाच्या मुलीला एका महर्षीकडून एक वर मिळाला होता. तिची कथा मी तुला सांगतो. तिने या वराचा उपयोग स्वतःसाठी न करता कोणताही विचार न करता इतरांसाठी केला. या गोष्टीवरून तरी तू तसाच मूर्खपणा करणार नाहीस. आता ही गोष्ट नीट लक्ष देऊन ऐक.''

वेताळाने आपली कथा सुरू केली.

''गंगा ही एक तोंडाळ आणि भांडखोर स्वभावाची बाई होती. इतरांचा अपमान करण्याची, त्यांना उणेंदुणें बोलण्याची एकही संधी ती वांया दवडीत नसे. तिचा पती, बिरबल, हा एक सज्जन गृहस्थ होता. तिचे सर्व बोलणें तो निमूटपणें सहन करीत असे. त्यांना एक मुलगा होता. त्याचे नांव होते भीम! भीमही शांत व सालस स्वभावाचा होता. त्याच्या आईखेरीज त्याला इतरांची कुणाचीही भिती वाटत नसे.

एक दिवस भीम गंगापूरला त्याच्या आईसाठी रेशमी साडी आणायला गेला. गंगापूर गांवच्या रेशमी साड्या अतिशय प्रसिद्ध होत्या. दूरदूरचे लोक तिथें साड्यांची खरेदी करण्यासाठी येत असत. इथली साडी गंगाला खूप दिवसांपासून हवी होती. तिने भीमाला तिला हवा असलेला रंग व साडीवरची नक्षी याबद्दल सविस्तर वर्णन सांगितले होते.

भीम अनेक विणकरांकडे जाऊन पाहून आला. पण त्याच्या आईला हवी असलेली साडी कांही त्याला मिळेना. साडीची खरेदी न करता जर तो घरी परतला असता, तर त्याच्या आईने प्रहरभर त्याच्यावर आग पाखडली असती हे त्याला ठाऊक होतं. काम करावं ते त्याला सुचेना. निराश होऊन तो नदीच्या कांठावरच्या एका झाडाच्या सांवलीत बसला.

त्याच वेळेला तिथून एक मुलींचा घोळका जात होता. रोज त्या साऱ्याजणीं आपली पाण्याची भांडी घेऊन नदीवर जात असत. स्नान करून पाणी भरून त्या घरीं परत जात. त्यांच्यापैकीं एक मुलगी होती अरुणा! तिने भीमला जरा दरडावूनच विचारलं, ''अहो, तुम्ही



इथें कां बसलात? तुम्हाला माहीत नाही कां इथें आम्ही रोज स्नानासाठी येतो ते?''

तिचा कठोर स्वर ऐकून भीम जरा दुखावला गेला. त्याने आपण तिथें कां बसलो ते सविस्तर सांगितलं. ते ऐकल्यानंतर अरूणा जोरजोराने हंसत सुटली आणि म्हणाली, ''तुमची आई तरी एक चमत्कारिक बाई दिसतेय! तिने स्वतः तरी यायचं, किंवा कुणा बाईमाणसाला पाठवायचं! आता बघा, तुमच्यासारख्या भाबड्या आणि अनुभव नसलेल्या माणसाला कसं पाठवलं हो तिने? असूं दे. तुम्ही चिंता करूं नका. मी तुम्हाला मदत करीन. तुम्ही गांवात जा आणि शिवराजचं घर कुठे आहे ते विचारा. तिथे माझ्यासाठी थांबा. मी तुमच्या आईच्या पसंतीची साडी घेऊन येईन. त्यावर तुमची आई तुमचं कसं कौतुक करते ते पहाच!''

भीम तिथून निमूटपणें उठला आणि शिवराजचे घर शोधून तिथें अरुणासाठीं थांबला. थोड्याच वेळानंतर अरुणा तिथें आली. तिने गंगा कशी दिसते त्याची माहिती विचारली. नंतर तिने एक कमी किंमतीची साडी पसंत केली व भीमला दिली.

''ही घेऊन घरी जा आणि तुमच्या आईला द्या. तिला सांगा 'विणकर म्हणाला कीं अगदी अशीच साडी पांच वर्षापूर्वी राणीसाहेबांनी विकत घेतली होती. तुमच्या आईला हेही सांगा कीं दोन भिन्न स्त्रियांची पसंती सारखी आहे हे पाहून विणकराला फार आश्चर्य वाटले. तुमच्या आईची बरोबरी राणीसाहेबांशी केली गेली म्हणून ती खूष होईल बघा! तुम्ही निश्चिंत राहा. ही साडी तुमच्या आईला पसंत पडेलच.''

भीम साडी घेऊन गांवी गेला आणि अरुणाने



सांगितल्याप्रमाणें त्याने तिचे शब्द आपल्या आईला सांगितले. आई ते ऐकून भलतीच आनंदून गेली. अशी साडी आणल्याबद्दल तिने भीमाचे खूप कौतुक केले.

नंतर भीमाने ही सारी कथा आपल्या पित्याला सांगितली. त्यांना वाटले कीं जर भीमाचे अरुणाशी लग्न झाले तर आपल्या पत्नीचा आक्रस्ताळा स्वभाव बदलेल.

दुसऱ्या दिवशी कांहीतरी कारण काढून भीम पुन्हां गंगापूरला गेला आणि अरुणाची वाट बघत थांबला. तिनें भीमाला पाहिल्याबरोबर ती उत्सुकतेने पुढें आली व तिने विचारले, ''तुमच्या आईला साडी आवडली नाही कां? ती तुम्हाला रागावली कां?''

''नाही, माझ्या आईला ती साडी फारच आवडली. मी इथें आलोय ते दुसऱ्याच महत्वाच्या गोष्टीबद्दल बोलायला! मला तुझ्याशी लग्न



करायची इच्छा आहे.'' भीम जरा चांचरतच म्हणाला.

''मग हे तुम्ही मला कशाला विचारता? तुमच्या आईवडिलांना माझ्या आईवडिलांशी बोलायला सांगा.'' अरुणाने उत्तर दिले.

''ते येतीलच. पण त्याअगोदर याबाबतींत तुझं मत काय आहे ते मला विचारायचं होतं. म्हणून मी तुला भेटायला आलो.''

अरुणा क्षणभर विचारांत पडली. तिने लगेच उत्तर दिले, ''तुम्ही सज्जन आणि सौम्य स्वभावाचे आहात म्हणून तर मी तुम्हाला साडी पसंत करायला मदत केली. मला तुम्ही आवडला आहात.''

त्यानंतर भीमने तिला आपल्या आईबद्दल सारं कांही सांगितलं आणि त्याने विचारलं, ''माझ्या आईचा असला स्वभाव तुझ्या हुशारीने आणि चतुराईने बदलता येईल कां?''

अरुणाला निर्णय घ्यायला उशीर लागला नाही. तिला महर्षी विलंब यांची आठवण झाली. ते देशभर भ्रमण करीत असताना गंगापूरला आले होते. नदीच्या कांठावर एकदा निसरड्यावर त्यांचा पाय घसरला आणि ते पडले. त्यांना उठून उभे राहाता येईना इतकी पायाला दुखापत झाली होती. इतर मुली नदीवर आलेल्या होत्या, त्यांना हंसायला कारण पुरले. पण अरुणाने त्या मुलींना दटावले आणि महर्षींना उठून चालायला मदत केली. महर्षी तिच्या चांगुलपणामुळे प्रसन्न झाले. त्यांनी तिला सांगितले, ''तू मला मदत केली आहेस म्हणून मी प्रसन्न झालो आहे. तुझी कांही इच्छा असेल तर सांग.''

त्याक्षणीं अरुणाला काय सांगावं ते उमजेना तिने नंतर सांगायचे ठरवले. त्यावर महर्षी म्हणाले, ''जेव्हां केव्हां तुला कांही मागावेसे वाटेल, त्यावेळेस डोळे मीट आणि माझे नांव तीनवेळां उच्चार. मी तुझ्याकडे येईन आणि तुझी मागणी पूर्ण करीन.'' त्यानंतर ते दुसऱ्या गांवी निघून गेले.

अरुणाने हा प्रसंग भीमला सांगितला आणि ती म्हणाली, ''हे पहा, तुमच्या आईचा स्वभाव बदलायचा, हे कांही सामान्य माणसाचे काम नव्हे. आपल्याला महर्षी विलंब यांची मदत घ्यायला लागेल.'' असं म्हणून तिने त्यांच्या नांवाचा तीन वेळा उच्चार केला.

विलंब त्यांच्याकडे आले. त्यांनी अरुणाकडून सारी कहाणी ऐकली आणि ते भीमला म्हणाले, ''चल मुला, आपण तुझ्या मातोश्रीला भेटायला जाऊं या.''

ते भीमच्या गांवी पोंचले महर्षी भीमच्या घरांत शिरले. पलंगावर लोळत पडलेल्या गंगाला



ते म्हणाले, ''आई, मला कांही भिक्षा घाल.''

गंगा दचकून उठली आणि कर्कशपणें त्यांच्यावर ओरडली, ''भिक्षा मागायला इथें आला आहेस. अशी भिक्षा मागतात कां घरांत शिरून?'' आणि तिने तोंडाचा पट्टा सुरुं केला. पुन्हां विलंब म्हणाले, ''आई, तुझी इच्छा असेल तर मला भिक्षा वाढ, नाहींतर मला जायला सांग. तुझ्या कठोर शब्दांचं एका राक्षसिणींत रूपांतर होईल, आणि ती तुला छळेल.''

''मी लहानपणापासून अस्संच बोलतेय. मला त्याची संवय आहे. मी माझे आईवडील, सासूसासरे, सगळ्यांना चांगलं दटावलंय बरं! माझा नवरा आणि मुलगा यांची माझ्यासमोर तोंड उघडायची ताकद नाही. ते 'ब्र' देखील काढीत नाहीत, मी कांही म्हटलं तरी! या बोलण्याने माझं कांहीही आजपर्यंत बिघडलं नाही. ''गंगाने महर्षींना उर्मटपणे उत्तर केले. ''हे बघ, माझ्या हातून जर कांही पाप घडले असेल तर तुझे कठोर शब्द, शिव्या, यांची शापवाणी माझ्यावर पडेल. पण तू कारण नसताना माझ्यावर आग पाखडलीस. तर मात्र तुझे शब्द परत तुझ्यावर शाप होऊन आदळतील. हे सत्य तुला कळलेच पाहिजे. कुणालाही जर तू विनाकारण ओरडत सुटलीस, तर तुझ्या शिव्यांची राक्षसीण बनून तुझ्यासमोर येईल.'' महर्षी विलंब यांनी सांगितलं.

त्यानंतर क्षणांतच एक भीतीदायक दिसणारी भयानक आकृती गंगाच्यासमोर येऊन उभी राहिली. ती आकृती म्हणाली, ''गंगा, मी आहे. शिव्यांची राक्षसीण. चार वर्षांत तुला लुळंपांगळं करून टाकायची कामगिरी माझ्यावर सोंपवली होती. नंतर त्याच्यावर कांहीही उपाय चालला नसता. पण ऋषींच्या शापामुळें मला आता



राक्षसिणीच्या रूपांत तुझ्याकडे यावं लागलंय. तुला जर कुणाचा सत्यानाश करायचा असेल तर ते अगोदरच सांग. नाहीतर मीच तुझा नाश करीन.''

गंगा खूप घाबरली. तिला कांहीच सुचेना. तिने महर्षींचे पाय धरले आणि त्यांना ती अजीजीने म्हणाली, ''गुरुदेव! मला क्षमा करा. माझी फारच मोठी चूक झालीय.''

त्यावर महर्षीं म्हणाले, ''ही राक्षसीण तुझ्याजवळच्याच कुणाचातरी नायनाट करील. तुझ्या मागील दारच्या अंगणात एक आंब्याचे झाड आहे. तुझे ते फार आवडते आहे ना? त्या झाडाचा नाश करायला ह्या राक्षसीला सांग, म्हणजे ती तुझा पिच्छा सोडील.''

गंगाने त्याप्रमाणें केले आणि राक्षसीण ताबडतोब अदृश्य झाली. अंगणातले ते आंब्याचे झाडदेखील नाहीसे झाले.

    

महर्षींनी अत्यंत प्रेमळ आवाजांत गंगाला सांगितले, ''गंगा, आजपासून कारणाशिवाय तू कुणालाही रागवूं नकोस. जर तूं तसं केलंस, तर ही राक्षसीण तुझ्यासमोर येईल आणि तुला शिक्षा करील. गंगापुरमधे अरुणा नांवाची एक मुलगी आहे. तिला तुझी सून करून घे. ती एक हुशार, गुणी मुलगी आहे. तू जर तिच्याशी चांगली वागलीस आणि तिची काळजी घेतलीस तर या राक्षसिणीची दुष्टशक्ती निस्तेज होईल आणि हळूंहळूं नष्ट होईल. तुझं सुख तुझ्या हातांत आहे.''

कांही दिवसानंतर अरुणा व भीम यांचा विवाहसोहळा पार पडला.''

ही कथा सांगितल्यानंतर वेताळ म्हणाला, ''राजन्, असं वाटतं कीं महर्षी विलंब यांनी दिलेल्या वरदानाचा चांगला उपयोग अरुणाला करता आला नाही. या वरदानामुळें तिला कुणा श्रीमंत माणसाची सून होता आलं असतं आणि आयुष्य चैनींत घालवता आलं असतं. तिने या वरदानाचा उपयोग स्वत:साठी किंवा तिच्या घरांतल्या मंडळींसाठी केला नाही. तिने त्याचा उपयोग भीमच्या भल्यासाठीं केला. मला तर वाटतं यांत तिने शहाणपणा केला नाहीच. तुला काय वाटतं? या प्रश्नाचं उत्तर माहीत असूनही जर तू मौन पत्करलंस, तर तुझ्या मस्तकाचे असंख्य तुकडे होतील.''

राजा विक्रम म्हणाला, ''कोणत्याही आई-वडिलांना आपला मुलगा किंवा मुलगी लग्न झाल्यानंतर सुखाने संसारात रमावी असंच वाटत असतं. मला वाटतं कीं अरुणाने ह्या वरदानाचा उपयोग आपल्या मातापित्याला आनंद देण्यासाठीं केला. साधारणत:, पुरुष हे जरा लवकर चिडतात. पण भीमचा स्वभाव अगदी विरुद्ध होता. तो अतिशय शांत आणि विवेकी होता. कोणत्याही मुलीला अशा पुरुषाशीं विवाह करायला आवडलं असतं. भविष्यांत अशा व्यक्तीचा स्वभाव फारसा बदलला नसता. अरुणाने या वरदानाचा उपयोग आपल्या सासूचा स्वभाव बदलण्यासाठीं केला. त्यामुळें घरांत शांती आणि आनंद, दोन्हीही टिकली असती. हे सगळं साऱ्या कुटुंबपरिवाराच्या सुखासाठी अरुणाने केलं होतं. म्हणून तिचा निर्णय चुकीचा किंवा मूर्खपणाचा नव्हता.''

राजा विक्रमचा मौनभंग झाल्यामुळें प्रेत अदृश्य होऊन पुन्हां त्या जुन्या वृक्षावर जाऊन लटकले. राजाने आपली तलवार उपसली आणि तो त्या प्रेताच्या पाठोपाठ निघाला.



# भारताची ओळख - प्रश्नावली

**प्रश्नावली**

कांही स्थळें कांही खास कारणांमुळें प्रसिद्ध किंवा लोकप्रिय होतात. खाली दिलेल्या प्रश्नांत ही खास कारणें तुम्हाला जरूर समजतील.

१. जपानला 'उगवत्या सूर्याचा देश' असं म्हणतात. भारताच्या कोणत्या भागांत सूर्याची किरणें सर्वप्रथम पडतात?
२. कोणत्या राज्यांत आदिवासींची लोकसंख्या सर्वांत जास्त आहे?
३. एका भारतीय राज्याची स्वत:ची खास नृत्यशैली आहे. कविवर्य टागोरांनी या शैलीचा परिचय जगाला करून दिला. हे राज्य कोणते आहे?
४. एका राज्यांत अनेक बुद्धधर्माचे विहार आहेत, त्यावरून त्या राज्याचे नांव पडले आहे. हे राज्य कोणते?
५. जेव्हां ब्रिटिशांनी दिल्लीतून राज्यकारभार पाहिला, तेव्हां त्यांनी उन्हाळ्याच्या दिवसांपुरती दुसरी राजधानी ठरवली होती. कोणत्या राज्यांतल्या या गांवाला हे महत्व प्राप्त झालं होतं?
६. कोणत्या राज्यांत जगांतले पहिले निवडून आलेले कम्युनिस्ट सरकार होते?
७. फ्रेंच आर्किटेक्ट ल कॉर्बुझिये याने एक आदर्शनगरी बनवली. ही नगरी दोन राज्यांची राजधानी आहे. या शहराचे नांव काय? ही दोन राज्यें कोणती आहेत ते सांगा.
८. कुंभमेळा हा चार निरनिराळ्या ठिकाणीं भरतो. त्यापैकीं दोन गांवे एकाच राज्यांत आहेत. हे राज्य कोणते?

**(उत्तरें पुढील अंकी)**

## जानेवारी प्रश्नावलीची उत्तरें

१. 'नेताजी' सुभाषचंद्र बोस
२. मगनलाल गांधींनी 'सदाग्रह' हा शब्द योजला. त्याचा अर्थ होता चांगल्या गोष्टीचा आग्रह. गांधीजींनी त्याचा सत्याग्रह असा बदल केला.
३. १९१६च्या लखनौ कॉंग्रेसमधे.
४. लाला लाजपतराय, बाळ गंगाधर टिळक आणि बिपिनचंद्र पाल.
५. १९०५
६. १८५७
७. ३१ डिसेंबर १९२९ ला लाहोर कॉंग्रेसच्या अधिवेशनांत.
८. १९२८ मधे सर जॉन सायमन, यांच्या नेतृत्वाखाली भारतीय नेत्यांशी नव्या सुधारणांबद्दल चर्चा करण्यासाठी.
९. २४ ऑगस्ट, १९४६.
१०. बाळ गंगाधर टिळक.

हस्तलिखिते घेऊन गुणाढ्य प्रतिष्ठानला परत आला. त्याला वाटलं होतं कीं राजाकडून त्याचं थाटांत स्वागत होईल. पण कां कोण जाणे, राजाने त्याबाबतींत फारसा रस घेतला नाही. गुणाढ्यला अतिशय वाईट वाटले. आपली सारी हस्तलिखिते घेऊन तो एका टेंकडीवर गेला. त्या संध्याकाळीं आकाशांत बरेच ढग होते. गुणाढ्यने शेकोटी पेटवली. त्या उजेडांत त्याने आपल्या संग्रहातला पहिला भाग मोठ्याने वाचला. निसर्गाबद्दलच्या कथा त्यांत होत्या. एव्हाना ढगही पळायला लागले व मंद वारा वाहूं लागला. गुणाढ्य एकेक हस्तलिखित वाचून शेकोटींत टाकून देत होता. वाऱ्याचा जोर वाढला आणि ढगांचा गडगडाट सुरूं झाला.

गुणाढ्यने दुसरा भाग काढून त्यांतल्या कथा वाचायला सुरवात केली. पशुपक्षी व वृक्षराजी यांच्या कथा ऐकायला प्राणी गोळा झाले आणि पक्षीही टेकडीवर येऊं लागले. तो भाग वाचून त्याने तो शेकोटींत केला, पक्षांनी पंख आपटले, कलकलाट केला आणि आग विझवायला झाडें वाकली, पण कांही उपयोग झाला नाही.

कोणीतरी जाऊन राजाला हा प्रकार सांगितला. राजा धावतच तिथे आला, त्याने गुणाढ्याला मिठी मारली, आणि ती आग विझवली. परंतु तोपर्यंत पांच भागांतले चार भाग आगींत भस्मसात झाले होते. सोमदेव, हा काश्मीरच्या राजा अनंतच्या दरबारांतला विद्वान होता. त्याने अकराव्या शतकांत या कथांचे पुन्हां संस्कृतमधे भाषांतर केले. राजा व राणी म्हातारपणीं दुःखी होती. कारण त्यांचा पुत्र दुर्वर्तनी होता. सोमदेवाच्या कथा ऐकणे हा त्या दोघांना एक छान विरंगुळा होता.

"या गोष्टींच्या मागे कितीतरी उपदेश करणाऱ्या बोधकथा असतात, नाही?" शामला उत्स्फूर्तपणे म्हणाली, आणि सर्वांनी तिच्या म्हणण्यावर मान डोलावली.





# गणेश पुराण

देवादानवांनी मिळून क्षीरसागराचे मंथन केले आणि समुद्रांतून अमृत निघाले. विष्णूने जगन्मोहिनी रूप धारण करून राक्षसांना फसविले आणि अमृत देवांना दिले. अमृत प्राशन करून अमरत्व प्राप्त होताच देव गर्वाने हिंडू फिरू लागले. तो अन्याय पाहून राक्षस चिडले. त्यानंतर देवांवर सूड उगवण्याचे ठरवून तारकासुराने घोर तपश्चर्या सुरू केली. ब्रह्मदेवाने प्रसन्न होऊन दर्शन दिले. तारकासुराने त्याच्याकडे अमरत्वाचा वर मागितला.

'जातस्य हि ध्रुवो मृत्युः' जो जन्मतो त्याला मृत्यु टळत नाही असे सांगून ब्रह्मदेवाने त्याला आणखी एखादा वर पाहिजे तर मागून घेण्यास सांगितले.

तारकासुराने बराच विचार करून शंकराच्या मुलाशिवाय आणखी कोणाच्या हातून मृत्यू येणार नाही असा वर प्राप्त केला.

त्यापूर्वीच शंकराची पत्नी सतीने दक्षयज्ञात उडी टाकून देहत्याग केला होता. संतान प्राप्ती होण्यापूर्वीच सतीवियोग सहन करावा लागल्यामुळे शंकराला उन्माद चढला आणि तो हिमालय पर्वतात वैराग्य धारण करून घोर तपश्चर्या करू लागला.

तारकासुराने राक्षसांचे सैन्य जमविले व युद्धाला तयार झाला. त्याने त्रिलोक जिंकला आणि देवांवरचा सूड उगविण्यासाठी देवांवर अत्याचार सुरू केला. इंद्रादिक देव आपली दीन अवस्था निवेदन करण्यासाठी ब्रह्मदेवाकडे गेले.

"शंकराला मुलगा झाला पाहिजे व त्याच्या हातीच तारकासुराचा वध होईल! असा वर मी तारकासुराला दिला आहे! आणखी कोणाच्याही हाताने तारकासुराच्या केसालाही धक्का पोचणे शक्य नाही, किंबहुना, आणखी कोणत्या ही रीतीने त्याला ठार करणे शक्य नाही!" असे सांगून ब्रह्मदेव सर्व देवांना बरोबर घेऊन कांहीतरी मार्ग काढायला विचारण्यासाठी विष्णूकडे गेला.

विष्णू म्हणाला-"सती हिमालय पर्वताची पुत्री पार्वती म्हणून जन्मली आहे व ती त्याच्या घरात वाढत आहे. तेव्हां शंकरपार्वतीचा संबंध कसा जुळवून आणता येईल हे पहा!"



देवांनी नारदाला हिमवंताकडे पाठविले. नारदाने केलेल्या सूचनेप्रमाणे हिमवंत, शंकर तपश्चर्येत समाधी धारण करून बसला होता तेथे गेला व त्याने शंकराची पूजाकरून तपश्चर्येच्या वेळी आवश्यक ती सेवा करण्यासाठी पार्वतीला ठेवून घेण्यासाठी शंकराजवळ विनम्रपणे विनंती केली.

पण शंकर तर बोललाच नाही. तरी 'मौनं सम्मति लक्षणम्' या न्यायाने शंकराचे मौन होकारार्थी असल्याचे मानून हिमवंताने पार्वतीला शंकराच्या सेवेसाठी तेथेच ठेवले आणि निघून गेला.

पार्वतीला बालपणीच शिवभक्तीचा नाद लागला होता. नारद पार्वतीला शंकराच्या गोष्टी नित्य सांगत असे. शंकराच्या आशुतोष आदि अनेक सद्गुणांची माहिती व शंकराचे महात्म्य कळावे म्हणून पार्वतीला क्षणोक्षणी कुतूहल वाटत असे. म्हणून लग्न करायचं तर शंकराशीच असेही तिने मनाशी ठरविले होते. अशा शंकराची सेवा करायला संधी मिळाल्याबद्दल पार्वतीला परमानंद झाला.

उजाडण्याच्या सुमारास शंकर तपश्चर्या करीत असे. त्याच्या चारी बाजूचा प्रदेश पार्वती मोरपिसांच्या केरसुणीने झाडून स्वच्छ करी. बर्फाच्या पाण्यांत सुगंधी द्रव्ये घालून ती सडा घाली आणि मोत्यांनी रांगोळी घाली. सोन्याच्या तारेत विविध रत्ने घालून विणलेल्या परडीत शंकराला आवडणारी फळेफुले, बिल्वपत्रे व शुभ्र पांढरी कमळे आणून ठेवी. सुवर्णकमंडलात हिमालयाच्या शिखरावरून वहात येणारे स्फटिकासारखे स्वच्छ पाणी जपमालेजवळ आणून ठेवी. शंकराला स्वतः कडे आकर्षित करून घेण्यासाठी सर्वदा वेणी घालून व पुष्पमालांनी नटून राही. शंकराला प्रिय असलेले केदार वगैरे राग व भैरवी वगैरे रागिणीचे आलाप गाई. शंकराची दृष्टी तिच्यावर पडावी यासाठी ती निरनिराळे प्रयत्न करी. शंकराच्याजवळ रहायला मिळाले या गोष्टीमुळ तिला फार बरे वाटले.

समाधी लावून बसलेला शंकर एखादे वेळ तरी आपल्याकडे पाहील व त्याची ती शांत दृष्टी आपल्यावर पडेल, या हेतूने पार्वती निर्निमेष शंकराकडे पहात राही. परंतु शंकर चुकूनसुद्धा आपल्याकडे पहात नाही, हे, पाहून तिला फार निराशा वाटे.

शंकराच्या मनात चलबिचल होण्यास कामदेवाच्या मदतीची आवश्यकता असल्याचे ओळखून इंद्राने कामदेवाकडे बोलावणे पाठविले. सर्व प्रकारे त्याचा आदरसत्कार करून त्याला





आपल्या सिंहासनावर आपल्या बाजूला बसवून घेतले व त्याची स्तुती करून त्याला खूष केले आणि पार्वतीवर शंकराचा अनुराग होईल असे काहीतरी करण्यास विनंती केली.

वसंत ऋतू सारथ्य करीत असता, धनुष्यावर पुष्पबाण चढवून कामदेव रतीसह पोपटाच्या रथांत बसून शंकर तपश्चर्या करीत होता, त्या हिमशिखराच्या जवळ आला. दऱ्याखोऱ्यात एकाएकी वसंत ऋतू आल्यासारखा सर्व प्रदेश कसा मनोहर दिसू लागला. कोकिळा 'कू कू' करू लागली आणि भ्रमरांचा गुंजारव सुरू झाला. आपण रहातो तो प्रदेश एकदम कसा काय बदलला असे वाटून शंकराने डोळे उघडून पाहिले. अकाली वसंत आगमन झाल्याचे पाहून त्याला आश्चर्य वाटले आपला तपोभंग कां बरं व्हावा, असा विचार करीत असतां त्याच्या हातातली जपमाला निसटून खाली पडली. पार्वती ती माळा उचलून शंकराला देऊ लागली त्या वेळी कामदेवाने खूप फुललेल्या वेलींवर भ्रमण करीत असलेल्या काळ्या भ्रमरांच्या आडून नीलकमळाचा बाण शंकराच्या हृदयाला लागेल अशा बेताने मोडला. तो लागताच शंकर दचकला. त्याने डोळे उघडून पाहिले. निर्निमेष त्याच्याकडे पहात बसलेल्या पार्वतीचे मनोहर मुखबिंब त्याला दिसले. ते पाहून त्याचे मनच हरपले.

आपला तपोभंग झाल्याबद्दल शंकर आश्चर्यचकित झाला. त्याने रुद्ररूप धारण करून आपला तिसरा डोळा उघडून कामदेवाला पाहिले. त्या पाठोपाठ त्याच्या भालनेत्रातून झाला. शंकर उठून उभा राहिला आणि झपाझप पावले टाकीत आपल्या कैलास शिखराकडे निघून गेला.

कामदेवाच्या बरोबर आलेली रती पतीच्या राखेच्या ढिगावर पडून रडू लागली. शंकराचा तपोभंग करण्यासाठी मन्मथाला इंद्रादि देवांनी पाठविले होते. म्हणून ती इंद्राला शाप देण्याच्या बेतात असतां ब्रह्मदेवादि देव आले व म्हणाले- "शंकर पार्वतीचे लग्न होईल तेव्हां कामदेव पुनर्जीवित होईल," असे तिच्या मनाचे समाधान करून देऊन इंद्रादी देव परतले. रती रात्रंदिवस कामदेवाच्या राखेच्या ढिगावरच दृष्टी ठेवून त्या जागी बसून राहिली.

पार्वतीच्या मनांतून तिच्या स्वतःच्या सौंदर्यावरचा विश्वासच उडाला-आपल्या लावण्याविषयीचा अहंकार पार नाहीसा झाला. शंकराला आकर्षू न शकलेला देह तिला निरर्थक वाटला. तिने शिवरंजनी रूप तपश्चर्या करण्याचे ठरविले. माता मेनकेने तिला तो विचार सोडण्याविषयी किती सांगितले तरी तिने तिकडे दुर्लक्ष केले. थोडी पर्णे (पाला) मात्र खाऊन तिने



शरीर कृश करून तपश्चर्या केली. जया व विजया नांवाच्या तिच्या मैत्रिणी नित्य तिच्या सेवेला हजर रहात व तिच्या प्रकृतीची माहिती मेनका व हिमवंताला येऊन सांगत. काही दिवसांनी पार्वतीने पर्णे खायची सुद्धा सोडून दिली. म्हणून पार्वती अपर्णा नांवे ओळखली जाऊ लागली.

शंकराने कामदेवाला भस्म केले खरे, परंतु कामदेवाचा पुष्पबाण व्यर्थ गेला नाही. पार्वतीची तपश्चर्यासुद्धा यशस्वी झाली. शंकर वेष पालटून पार्वतीजवळ गेला व पार्वतीची परीक्षा घेतली. त्याने पार्वतीच्या तपश्चर्येची स्तुती करून तिच्याशी लग्न करण्याचे ठरविले. नंतर त्याने सप्तर्षींना लग्नाविषयी बोलणी करण्यासाठी हिमालयाकडे पाठविले हिमवंताला इतका आनंद झाला की त्याची शिखरे आणखी उन्नत झाली. सप्तर्षी मुहूर्त ठरवून निघून गेले.

शंकराचे सर्व गण वऱ्हाडी होऊन पुढे चालले व शंकर नवरामुलगा होऊन हिमवंताच्या घरी निघाला. हिमालय पर्वताची सर्व शिखरे मांडवाचे खांब झाले. विष्णू, ब्रह्मदेव इत्यादी देव, सप्तर्षी व नारद वगैरे सहस्रावधी मुनींद्र लग्नाला आले.

वडीलधाऱ्या सौभाग्यवती अरुंधतीने शंकराच्या विशाल कपाळावरच्या डोळ्याच्या वरच्या बाजूला मंगल तिलक लावला. लग्नाच्या वेळेला अनुकूल अशा सर्व वस्त्रालंकारासह शंकर फार सुंदर दिसू लागला. तेव्हां सर्व देव शंकराला सुंदरेश्वर या नव्या नांवाने हाक मारू लागले.

सर्व वस्त्रालंकार धारण केल्यावर विद्युल्लतेसारखी दिसणारी पार्वती नवरीमुलगी शोभू लागली. तिला घेऊन विष्णु आला व शंकराला म्हणाला-''तू सुंदरेश्वर आहेस तर माझी धाकटी बहीण पार्वती मीनाक्षी देवी आहे!'' असे सांगून त्याने पार्वतीचा उजवा हात शंकराच्या उजव्या हातात देत दोघांना बोहोल्यावरच्या पाटावर बसविले.

शंकरपार्वतीचा विवाह शंकरपार्वतीला शोभेल अशाच थाटाने झाला.

हिमालय पर्वताच्या खोऱ्यांत शंकर पार्वतींनी जेथे तपश्चर्या केली होती तेथे देवांचा शिल्पकार विश्वकर्मा याने नवदंपती पार्वतीपरमेश्वरांसाठी एक दिव्य अंतःपुर बांधून तयार केले.

मंगलवाद्ये व वाजंत्री वाजत असतां परस्परांचा हात धरून पार्वतीपरमेश्वर गर्दीमधून चालत त्या अंतःपुर मंदिराकडे निघाले. त्या मंदिराच्या वाटेवरच कामदेवाच्या राखेचा ढिगारा होता. त्या ढिगाजवळ गुढघे टेकून पतिभिक्षा मागणारी रती बसली होती.

शिवपार्वतीने तिच्या जवळ जाऊन तिच्या डोक्यावर हात ठेवला व तिला ''दीर्घकाळ सौभाग्यवती भव' असा आशीर्वाद दिला. शंकराने



पुन्हा आपला तिसरा डोळा उघडला. परंतु या खेपेस मृदु शांत चंद्रकिरणांसारखी शीतल कांती त्यांतून आली व भस्माचा ढीग नाहीसा होऊन कामदेव स्वस्वरूपात उठून उभा राहिला आणि एकदांच आपल्या उसाच्या धनुष्याचा झणत्कार करून अदृश्य झाला.

तेव्हां शंकर रतीला म्हणाला- ''मुली, तुझा पती पुनर्जीवित झाला आहे.. तुला नेहमीप्रमाणेच दिसत राहील. तुझ्याशिवाय इतर कोणलाही तो दिसणार नाही. म्हणून कोणी कोणत्याही प्रकारे त्याच्यावर वार करू शकणार नाही. अशा तऱ्हेने त्याने सोडलेल्या पुष्पबाणांपासून कोणी वांचणेही शक्य होणार नाही. तुझ्याशिवाय इतर कोणाच्या दृष्टीस पडणें किंवा न पडणें, त्याच्या इच्छेवर अवलंबून राहील. मी असाच वर त्याला देत आहे.''

शिवपार्वतींनी गृहप्रवेश केला. कोणाला दिसत नसल्यामुळे कामदेवाने सुद्धा अदृश्य पुष्पबाणांसह त्या गृहात प्रवेश केला. अरुंधतीने नवदंपतीची तांबड्या पाण्याने दृष्ट काढली व त्यांना ओंवाळले. तेव्हां विश्वकर्म्याने पडद्यामागे झांकलेली एक मोठी तसबीर समोर उभी केली व म्हणाला-''ही एक अपूर्व तसबीर आहे. या चित्रांत दोघे जण आहेत. त्या दोघांपैकी कोण जास्त सुंदर आहे, हे आमच्या सारख्या सामान्यांना सांगता येणार नाही. तुम्हां दोघांनाच ते शक्य होईल, असे मला वाटते आहे, म्हणून मी ही तसबीर तुमच्यासमोर ठेवीत आहे, तरी कोण जास्त सुंदर आहे, सांगण्याची कृपा करावी!'' असे सांगून त्याने तसबिरीवरचा पडदा बाजूला सारला.

ती तसबीर नसून तो एक उभा आरसा होता. शिवपार्वती त्यात आपले प्रतिबिंब पाहून खदखदां हंसू लागली.



''खदखदां हंसून भागणार नाही. सांगितले पाहिजे!'' नारद म्हणाला.

शंकर स्मित करून पार्वतीकडे कटाक्षपात करीत म्हणाला-''शुक्राच्या कांतीसारखी झगझगणारी नथ घातलेली चित्रांगीच जास्त सुंदर आहे!'' शंकराने असे म्हणतांच पार्वतीचे मुखकमळ लाजेने लाल झाले व लाजतच हसऱ्या मुखाने म्हणाली- ''त्रिनेत्र असलेल्यांचेच सौंदर्य मोठे आहे!'' तिचा तो स्वर वीणेच्या स्वरासारखा झंकारला.

'सर्वांनी शिवपार्वतीवर फुलांचा व अक्षतांचा वर्षाव करून निघून गेल्यावर नवदंपती रेशमी गादी अंथरलेल्या झोपाळ्यावर बसली.

त्यांच्या समोरच्या भिंतीवर दिव्य चित्र काढलेले होते. त्यांत एक हत्तीचे सुंदर जोडपे समोरचे पाय उचलून व सोंड एकमेकींत अडकवून नाचत असल्यासारखं चितारलेले होते. तोरण बांधल्यासारख्या त्या दोन्ही हत्तींच्या मधून पलीकडे

दिसणाऱ्या सरोवरात एक मोठे कमळ फुललेले होते. त्या चित्रात चितारलेल्या हत्तींच्या जोडप्यावर शिवपार्वतींची दृष्टी खिळली. इतक्यांत कमळ दिसत होते तेथे चांदणीसारखी ज्योती दिसू लागली व ती हळूहळू मोठी होत गेली. त्या ज्योतीतून चंद्रकांतीसारखे विघ्ननाशाचे रूप दोघांना दिसले.

विघ्ननाशांचे रूप हत्तीसारखेच दिसत होते तरी ते दिव्यच होते व प्रसन्नही होते. त्याची दृष्टी शांत ऋद्धि, सिद्धि व शक्ति युक्त होते. त्याचे सुंदर विशाल उदर मोहक होते. अभयहस्त धारण करून उभा असलेला तो विघ्नेश्वर पार्वतीला लहान बालका-सारखा कांहीतरी बोबडा बोलत असल्यासारखा भासला.

विघ्ननाशाकडे पहात असतां शिवपार्वतीला एक अपूर्व व अनिर्वचनीय आनंद उन्मळून आल्यासारखा वाटला. त्या आनंदात देहभान विसरून गेल्यामुळे दोघांच्या तोंडावाटे शब्दही उमटत नव्हते व दोघे निर्निमेष विघ्नेश्वराकडे पहात राहिले. विघ्नेश्वर डाव्याबाजूला वळलेल्या सोंडेवर हात फिरवीत गोड बोबड्या स्वरात म्हणाला-"मी विघ्नेश्वर आहे! विघ्नांचानाश करणारा विनायक आहे! पंच महाभूत व गणाधिपती आहे! गणपती आहे! चित्रविचित्र रूप धारण करणारा चित्र गणपति आहे! तुमच्या दोघांच्या परस्पर प्रेमामुळे शंकराच्या तेजातून कुमारस्वामीचा जन्म होईल व तो तारकासुराचा वध करील. कुमारस्वामीच्या आधी मी अवतार धारण करीन व तुमचा मुलगा म्हणून राहीन." असे तो म्हणत असतांच हात पुढे करून पार्वती त्याला घ्यायला सरसावली. तो विघ्नेश्वर एकाएकी अंतर्धान पावला.

आतांपर्यंत पाहिले ते स्वप्न होते की खरे होते या अर्थी पार्वतीपरमेश्वरांनी परस्परांकडे पाहिले. दोघांच्या दृष्टी भिडल्या व दोघेही सर्व विसरले. त्यांनी पाहिलेले अद्‌भुत दृश्य जणू काही घडलेच नाही इतक्या सहजी ती दोघं विसरून गेली.

शंकरपार्वतीने त्या मंदिरात आनंदाने संसार थाटला. त्या वेळी पूर्वी कधी न पाहिलेली व न ऐकलेली अशी एक भयंकर गोष्ट जगात घडली.







# चमत्कारी वीणा

फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. एका गांवात एक संगीतकार राहात होता. त्याला तीन मुलगे होते. सर्वजण मिळून संगीताचे जलसे करीत असत व आपल्या परिवाराचे पालन पोषण करीत. कांही वर्षानंतर संगीतकार आजारी पडला आणि त्यामुळें त्याची बोटे हालेनाशी झाली. त्याचबरोबर त्याची वाचादेखील बंद झाली. गांवातल्या वैद्याने त्याची परीक्षा केली आणि नंतर म्हटले, "हा कांही सामान्य आजार नाही. कुणीतरी श्रेष्ठ राजवैद्याने यांना तपासायला हवे. माझ्यासारखा सामान्य वैद्य कांहीही करूं शकणार नाही. आणि जर राजवैद्यांकडून चिकित्सा करून घ्यायची असेल, त्यांची मदत घ्यायची असेल, तर आपल्या देशाच्या मूर्ख राजाची त्यासाठी परवानगी घ्यावी लागेल. त्यांची मंजुरी आणि परवाना मिळाल्यानंतरच राजवैद्य येऊं शकतील. सारेजण म्हणतात कीं दगडाला खूष करता येईल, संतुष्ट करता येईल. पण राजाला प्रसन्न करणें नि त्यांना संतुष्ट करणे अशक्य आहे. या रोगाचे निदान होऊं शकेल असं मला वाटत नाही. तुमचे वडील यांतून बरे होतील याचा तुम्ही प्रयत्न अवश्य करा. पण मला तर हे कठीण वाटते आहे." आपले मत देऊन तो वैद्य निघून गेला.

तिघा मुलांपैकीं सर्वात मोठ्या मुलाने आपल्या भावांना सांगितले, "मला ठाऊक आहे कीं राजा महामूर्ख आहे. परंतु मी माझ्या वीणावादनाने राजाला संतोष देऊं शकेन आणि राजवैद्याला बोलावण्याची परवानगी मिळवूं शकेन. आपल्या वडिलांची प्रकृति सुधारली तर आपल्याला यापेक्षां आणखी काय हवे?"

तो राजाला जाऊन भेटला आणि म्हणाला, "महाराज, मी वीणा चांगली वाजवूं शकतो. आपल्याला माझे वादन ऐकवण्याची माझी इच्छा आहे. आपल्याला जर माझे वीणावादन आवडले तर माझ्या वडिलांच्या आजाराची चिकित्सा राजवैद्यांकडून करण्याची संमती आपण आम्हाला द्यावी, अशी माझी नम्र विनंती आहे."

राजाने हंसतहंसत सांगितले, "मीच नव्हे तर

- रीता राठौर -




माझे सेवकदेखील वीणा वाजवूं शकतात. तुझी इच्छा पुरी करायला तू एक काम कर. सर्वांचे मत आहे की वीणावादनांत कुणी माझी बरोबरी करूं शकणार नाही. तेव्हां तू पैज लाव. जर तूं जिंकलास तर तुझी इच्छा पूर्ण होईल. पण जर मी जिंकलो तर तुला मी पंचवीस फटके मारण्याची शिक्षा देईन. या स्पर्धेचा निर्णय जनता करील.''

संगीतकाराच्या थोरल्या मुलाने ही अट मान्य केली. दुसऱ्या दिवशीं ही स्पर्धा जनतेसमोर घेण्याचे ठरले. या स्पर्धेत राजापेक्षां थोरल्या भावाने जास्त चांगले वीणावादन केले. तरीदेखील जनतेने राजालाच विजयी घोषित केले. कारण जनता राजाला घाबरत होती थोरल्या भावाला पंचवीस फटक्यांची शिक्षा दिली गेली. आपल्या भावाची ही केविलवाणी अवस्था पाहून धाकट्या दोघांना फारच वाईट वाटले. जे झालं, त्याबद्दल दुसऱ्या भावाने पूर्ण चौकशी केल्यानंतर म्हटले, ''आजकाल वीणावादन फारच लोकप्रिय झाले आहे म्हणून महाराजांनी तुला हरवले. पण मृदंगाची गोष्ट निराळी आहे. फारच थोडेजण मृदंग चांगल्या प्रकारें वाजवूं शकतात. मी एक मृदंगवादक आहे. मी माझी कला सादर करुन महाराजांकडून प्रशस्तीपत्रक मिळवीन. आणि राजवैद्याकडून वडिलांची चिकित्सा करवून घेईन.''

दुसरा भाऊ ही राजाला भेटून म्हणाला, ''मृदंगवादनांत माझी बरोबरी करणारा कुणीही नसेल. वाटल्यास माझी परीक्षा करावी. जर मी जिंकलो तर माझ्या वडिलांची चिकित्सा राजवैद्याकडून करवावी.''

राजाने त्याच्याकडे निरखून पाहिले आणि म्हटले, ''वीणावादनात पराजित झालेल्या वादकाचा तू भाऊ दिसतो आहेस. मी संगीतसम्राट आहे हे तुला ठाऊक नसेल. माझ्याशी सामना करण्याचे धाडस जर तूं केलेस तर तुझ्या भावासारखीच तुझी दशा होईल. जर तुला ही अट मान्य असेल तर हो तयार ! या स्पर्धेत मी तुझ्याबरोबर जरूर भाग घेईन.''

दुसऱ्या दिवशीच राजा आणि संगीतकाराच्या दुसऱ्या भावाच्यामधे मृदंगवादनाची स्पर्धा झाली. राजाचे वादन लोकांना मुळींच आवडले नाही. ते अगदींच सुमार होते, ताल चुकत होता आणि लय बिघडत होती. मृदंगवादनाबद्दचे सारे नियम राजाला माहीत नसावेसे वाटत होते. पण दुसऱ्या मुलाने मात्र मन लावून वाद्य वाजवले आणि आपले कौशल्य पुरेपूर दाखवले. त्याचे वादन ऐकायला फारच मधुर वाटत होते. परंतु काय उपयोग? राजाला घाबरून जनतेने पुन्हां राजालाच विजयी घोषित केले. साहजिकच दुसऱ्या मुलालाही



फटक्यांची शिक्षा भोगायला लागली. फटके मारुन घेतल्यानंतर दुसरा भाऊ ही हवालदिल होऊन जेव्हां घरी परतला, तेव्हां तिसरा धाकटा भाऊ फारच नाराज झाला आणि म्हणायला लागला, ''संगीत विद्वानाच्या दोन मुलांना राजाने मूर्ख व नालायक ठरवले, लोकांसमोर त्यांची फजिती केली. या असल्या मूर्ख राजाला चांगला धडा शिकवल्या-खेरीज मी थांबणार नाही. जर मला असं करता आलं नाही तर मी संगीत विद्वानाचा मुलगा म्हणून नांव सांगणार नाही.'' असं म्हणून वीणा, मृदंग व सनई घेऊन तो राजधानीच्या दिशेने चालूं लागला.

राजधानीला तो पोंचला आणि एका निवांत ठिकाणीं जाऊन बसला. त्याने वाद्यें काढली आणि वाजवायला सुरवात केली. आपले सारे लक्ष त्याने या वादनावर केंद्रित केले. सारी जनता मोठ्या उत्सुकतेने त्याचे वादन ऐकत होती. सतत तीन दिवस वीणा वाजवल्यामुळें त्याच्या बोटांतून रक्त ठिबकायला लागले. ही बातमी राजापर्यंत पोंचली. मंत्र्यांना बरोबर घेऊन राजा लगेच त्या ठिकाणीं आला. राजाला पाहून त्या तिसऱ्या भावाने उठून राजाला प्रणाम केला. राजाने त्याला विचारले, ''तू कोण आहेस? इथें कां आला आहेस?'' तिसऱ्या मुलाने नम्रपणें सांगितले. ''महाराज, पर्वताच्या पायथ्याशीं भैरव गांव आहे. मी त्या गांवात राहातो. माझ्याच वयाचा एक मुलगा आमच्या गांवात दुसऱ्या गांवातून येत असे आणि आमच्याशी खेळत असे. एक दिवस ताडाच्या झाडाची कच्ची फळें खायची त्याला इच्छा झाली. ती फळें काढायला म्हणून मी तलवार हातांत घेतली. तोही माझ्याबरोबर आला. ते उन्हाळ्याचे दिवस होते. कडक उन होते. गांवातून बाहेर पडल्यावर त्या उन्हांत थोडा गारवा मिळावा म्हणून त्याने तलावांत



एक डुबकी मारली. पण बराच वेळ झाला तरी तो बाहेर आला नाही. मी घाबरलो. मी कमरेला तलवार बांधली आणि तलावांत उडी मारली. खूप खोलवर मी गेलो. तिथें तळाशी गेल्यावर पाहिले तर एक विचित्र सर्प त्याला गिळत होता. क्षणाचाही विलंब न करता मी तलवारीने त्या सर्पाची खांडोळी केली व आपल्या मित्राचे रक्षण केले. त्याने कृतज्ञता व्यक्त केली आणि त्याच्या घरीं येण्याचा आग्रह धरला. त्याच्या घरी जायला मला डोंगर दऱ्यांतून व अरण्यांतून जावे लागले. अखेरीस तो मला एका डोंगराच्या बाजूला घेऊन घेऊन गेला. तिथें एक गुहा होती. मी गुहेत पाहिले तर तिथें एक जादुगारीण आपले केस खांद्यावर मोकळे सोडून एका दगडावर कांहीतरी घासत होती. तिचे डोळे दिव्याप्रमाणे चमकत होते. चेहरा वेडावांकडा होता. माझा मित्र तिच्याजवळ गेला. त्याला बघितल्यावर जादुगारणीने लगेच त्याला प्रेमाने जवळ घेऊन



त्याचा मुका घेतला ''कुठे गेला होतास बाळा? यायला किती रे उशीर केलास! तुला डोंगरातल्या पालींची रसभाजी फार आवडते ना? बघ, आज मी तीच भाजी केलीय.'' तिच्या मुलाने माझी ओळख आपल्या आईशी करुन देताना म्हटले, ''आई, हा माझा जिवलग दोस्त आहे. आज केवळ ह्याच्यामुळेंच माझे प्राण वांचले आहेत.'' त्यानंतर त्याने आपल्या आईला जे कांही अगोदर घडलं होतं ते सर्व सांगितलं. जादुगारणीने मोठ्या आवेशाने डुलतडुलत कांहीतरी लेप आपल्या हातांत घेतला. तो भिंतीवर फांसला आणि उंचस्वरांत ती मंत्रपठण करूं लागली. ज्या भिंतीवर तो लेप फांसला होता, त्या भिंतीचे एका आरशांत परिवर्तन झाले. त्या आरशांत ज्या तलावांत तिचा मुलगा बुडाला होता तो तलाव तिला दिसला. तिथें तो सर्प मरून पडला होता तेही तिला दिसलं. ते दृश्य पाहून ती संतापाने बेभान झाली, आणि तिने पुन्हां आणखी एक मंत्र पुटपुटत म्हटला. तलावांत मरून पडलेला तो सर्प आता जवळच येऊन पडला; ते पाहून जादुगारीण आनंदाने 'फुलून गेली. माझी पाठ थोपटत ती म्हणाली, ''शाबास बाळा, शाबास! तू सांपाला नव्हे, तर माझी कट्टर शत्रू असलेल्या एका जादुगारिणीला मारून टाकलं आहेस. तिला मारायचा मी खूप वेळां प्रयत्न केला. पण मला यश मिळाले नाही. इतक्या दिवसांच्या माझ्या प्रयत्नानंतर तूच तिला मारूं शकलास आणि त्याबरोबर माझ्या मुलाचे प्राणदेखील तू वांचवले आहेस. त्याबद्दल प्रेमाची भेट म्हणून ही चमत्कारी वीणा, मृदंग व सनई मी तुला देते आहे. जर तू ही वीणा चांगल्या प्रकारें वाजवलीस तर तिच्या प्रभावामुळें दोन युवक प्रकट होतील आणि मृदंग व सनई वाजवून ते स[...]ना आश्चर्यचकित करतील.

''त्या जादुगारिणीने दिलेली वीणा मी गेले तीन दिवस सतत वाजवतो आहे, पण आजपर्यंत तरी ते दोन्ही युवक अद्याप प्रकट झालेले नाहीत. मला वाटतं, त्या जादुगारणीने मला फसवलं.''

त्याचे बोलणें ऐकून राजा जोराने हंसायला लागला व म्हणाला, ''अरे वेड्या, जादुगारणीने तुला फसवलं असं म्हणणं बरोबर नाही. तिने काय म्हटलं होतं ते तुला आठवतं ना? तिने म्हटलं होतं कीं तू वीणावादन उत्तम प्रकारें केलंस तर तिच्या प्रभावामुळें दोन युवक प्रकट होतील. तुलाच वीणा चांगली वाजवायला येत नसेल म्हणून तू उलट जादुगारणीवर आरोप करतो आहेस. आता मीच स्वतः वीणा वाजवून दाखवतो आणि मग दोघे युवक कसे प्रकट होतील आणि चांगल्या तऱ्हेने सनई व मृदंग कसे वाजवतील ते तू बघतच राहा.'' एवढं म्हणून राजाने ती वीणा आपल्या हातांत घेतली आणि तिच्या तारांवर बोटे



फिरवून त्याने झंकार सुरुं केला.

बराच वेळ वीणावादन करून शेवटी राजा थकला, पण ते दोन युवक कांही आले नाहीत.

राजा वैतागला आणि म्हणायला लागला, ''मी संगीतसम्राट आहे, तरीदेखील कांही प्रभाव पडत नाही. ही वीणा एखादी असामान्य वीणा असावीसे वाटते आहे. माझ्यापेक्षां जर ऐखादा श्रेष्ठ संगीतकार असेल तर तोच ही वीणा वाजवील. दसऱ्याचा उत्सव होईल त्यावेळेस मी एक नवी स्पर्धा ठेवीन आणि जो वादक त्या दोन युवकांना प्रत्यक्ष आणूं शकेल, त्याला मी एक अनमोल बक्षिस देईन.'' असं सांगून राजाने ती वाद्यें आपल्याबरोबर नेली. दुसऱ्याच दिवशी राजाने या स्पर्धेची घोषणा केली.

थोड्याच दिवसांनंतर दसऱ्याचा उत्सव जवळ आला. राजाने शेवटच्या दिवशी वीणावादन स्पर्धा ठेवली. अनेक वीणावादकांनी प्रयत्न केले, पण ते दोन युवक कांही आले नाहीत. अखेरीस संगीतकाराचा तिसरा मुलगा मंचावर बसलेल्या राजाला प्रणाम करीत म्हणाला, ''राजन, ज्यादिवशी आपण या स्पर्धेची घोषणा केलीत, त्या दिवसापासून मी एका विद्वानाकडून वीणावादनाचे शिक्षण घेऊ लागलो. माझे वादन आता खूप सुधारले आहे. मला वाटतं कीं मी आता ह्या वीणेला हात लावण्यास योग्य झालो आहे आणि चांगल्याप्रकारें वाजवूं शकेन. जर आपण अनुमती दिलीत तर मी प्रयत्न करीन.'' राजाने कुत्सितपणें हंसून म्हटले, ''हो हो, जरूर कर कीं! प्रयत्न अवश्य कर बरं!'' राजाच्या बोलण्यांत पुरेपूर उपहास भरला होता.

तिसऱ्या मुलाने वीणेसमोर बैठक मांडली आणि आपल्या इष्टदेवतेची प्रार्थना केली. नंतर त्याने वीणा तारा छेडून वीणा वाजवायला सुरवात थोड्याच वेळानंतर संगीतकाराचा पहिला व दुसरा मुलगा पौराणिक वेशभूषा करुन तिथे आले आणि मृदंग व सनईच्याजवळ बसले. ती दोन्ही वाद्यें हळुवारपणें हाताळून त्यांनी वाजवायला सुरवात केली. तिथें उपस्थित असलेल्या जनसमुदायाने आनंदाने टाळ्या वाजवायला सुरवात केली. संगीताची ती सभा अतिशय श्रवणीय आणि प्रेक्षणीय होती. श्रोते तल्लीन होऊन त्या गानमाधुर्यात जणूं कांही स्वतःला हरवून बसले होते. अनेकांचे डोळे मिटलेले होते. जेव्हां त्यांनी डोळे उघडले तेव्हां त्यांना वीणावादक फक्त वीणा वाजवीत असलेला दिसला व दुसरे दोघेजण नाहीसे झाले होते. ''राजाने जाहीर केल्याप्रमाणें त्याचे भव्य स्वागत केले आणि त्याच्या पित्याची रोगचिकित्सा करण्याचीही व्यवस्था केली.





# शांताचा उपाय

नरेंद्र एक देखणा युवक होता. त्याची महत्वाकांक्षा होती की सर्वांनी त्याला महान समजावे व त्याची भरपूर प्रशंसा करावी. त्यासाठी त्याने पुकळ धन कमावले. परंतु असे धनाढ्य लोक खूप होते. तोदेखील त्यांच्यापैकीच एक होता. त्यामुळें ना त्याला कोणी महान समजले, ना कोणी त्याची प्रशंसा केली.

मग त्याने ठरविले की कांहीतरी साहसपूर्ण काम करावे. परंतु असे साहसवीर देखील अनेक होते, त्यांची त्याच्यापेक्षा जास्त साहसी कृत्यें करून दाखविली होती. नरेंद्रला समजेना कीं महान बनण्यासाठी आता काय करावे?

शांता नरेंद्रची दूरची नातलग होती. तिचे नरेंद्रवर खूप प्रेम होते. तिला जेव्हां नरेंद्रची विचारसरणी समजली. तेव्हां तिने त्याला म्हटले. ''महानता अशी मागे लागून मिळत नसते. ती आपोआप यावी लागते. तू माझ्याशी विवाह केलास तर मी तुला महान बनवून दाखवीन.''

नरेंद्र हंसला व जराशा हेटाळणीच्या सुरांत म्हणाला, ''असं आहे तर! हे बघ शांता, माझंदेखील तुझ्यावर प्रेम आहे व तुझ्याशी विवाह करण्याची माझीसुद्धा इच्छा आहे. तू म्हणतेस की तू मला महान बनवू शकतेस, तर लग्नापूर्वीच हे काम करून दाखव ना! असं झालं तर आपला विवाहदेखील लवकर होऊ शकेल !''

''ठीक आहे तर! मी तुला एक योग्य उपाय सुचवते. पण तो तुला सांगण्यापूर्वी तू मला एक वचन दे की तू माझ्याशीच विवाह करशील. दुसऱ्या कुणाशीही तू विवाह करता कामा नयेस,'' शांता म्हणाली.

नरेंद्रने मागचा पुढचा कांहीही विचार न करता उत्तर दिले, ''तू असा विचार तरी कसा करू शकतेस कीं मी दुसऱ्या कुणाशी विवाह करेन? मी आता याक्षणीं तुला वचन देतो आणि तुझी शपथ घेतो.''

- चक्रवर्ती -

''शपथ वगैरे घ्यायची कांही गरज नाही. एक काम कर. साऱ्या गांवभर प्रचार कर कीं तुझे माझ्यावर प्रेम आहे. आणि कुठल्याही परिस्थितींत तू इतर कुणा मुलीशी लग्न करण्याचा प्रश्नच येत नाही,'' शांता म्हणाली.

नरेंद्र चिडून म्हणाला, ''तुझा माझ्यावर विश्वासच नाही म्हणून तू असे बहाणे देत आहेस''.

त्याच्या उत्तराने दुखावलेली शांता म्हणाली, ''असं कां म्हणतोस तू? मी तुला जो उपाय सांगणार आहे जो तू गांवभर जो प्रचार करशील त्यावरच अवलंबून आहे. माझं ऐक, माझ्यावर विश्वास ठेव. एक महिनाभर असा प्रचार चालू ठेव. पुढच्या महिन्यांत आपल्या देशाची राजकन्या आपल्या गांवाबाहेरील जंगलात वनविहारासाठी येणार आहे. त्यावेळी तिच्याबरोबर राहून असे कांहीतरी साहसपूर्ण कृत्य करून दाखव, ज्यामुळे ती तुझ्यावर प्रसन्न होईल. अन् ती नकीच तुला कांहीतरी मागायला सांगेल,'' बोलता बोलता शांता थांबली.

नरेंद्रची उत्सुकता वाढली. त्याने शांताला सविस्तर योजना सांगायची विनंती केली. शांता पुढे सांगू लागली, ''राजकुमारी तुझ्यासमोर विवाहाचा प्रस्ताव ठेवेल. पण तुला त्याला पूर्ण विरोध करावा लागेल. लोकांना जेव्हां हे समजेल तेव्हां ते तुझी खूप स्तुती करतील कीं नरेंद्र शांतावर जिवापलिकडे प्रेम करतो व म्हणून त्याने राजकन्येचा विवाहाचा प्रस्तावसुद्धा धुडकावून लावला. अशा रीतीने तू खूप नांव कमावशील, व प्रसिद्ध होशील''.

हे सर्व सांगून झाल्यावर शांता म्हणाली, ''या



जगांत त्यागापेक्षा महान इतर कुठलेही कार्य नाही. म्हणून तू माझा हा उपाय अंमलात आण''.

''मला वाटत नाही कीं इतक्या लहानशा गोष्टीने माझे कांही फार मोठे नांव होईल, किंवा मला खूप प्रसिद्धी मिळेल. तरीपण तुझा हा उपाय अनोखा आहे. तू सांगितलेस तसे मी करीन'' नरेंद्र दीर्घ श्वास घेत म्हणाला.

दुसऱ्याच दिवशी गांवात बातमी पसरली की नरेंद्र शांतावर जिवापलीकडे प्रेम करतो व इतर कुठल्याही स्त्रीकडे डोळा वर करूनदेखील पहात नाही.

शांता एक दिवस नरेंद्रला भेटून म्हणाली, ''उद्याच राजकुमारी आपल्या गांवाबाहेरील जंगलात येणार आहे. तू तुझे सर्व चातुर्य पणाला लाव व आपला उपाय अंमलात आण. तू एक



तलवारपण जवळ बाळगशील तर बरे होईल''.

शांताचे काका राजदरबारांत काम करीत. त्यामुळे त्यांच्यामार्फ राजपरिवाराशी संबंधित सर्व कुटुंबाला बातम्या शांताच्या कुटुंबाला ठाऊक होत असत. नरेंद्रलासुद्धा ही गोष्ट माहीत होती. त्यामुळे काहीही संशय न येता तो दुसऱ्या दिवशी जंगलात गेला.

थोडया दूरवर गेल्यावर त्याला एका स्त्रीच्या आर्त किंकाळया ऐकू आल्या. ''वांचवा! वांचवा!!''

नरेंद्र धावतच तिकडे गेला. एक गलेलठ्ठ मिशीवाला माणूस एका सुंदर युवतीला तलवार दाखवून धमकावत होता. नरेंद्रने तावडतोब म्यानातून तलवार काढून परजली व त्याच्यावर तुटून पडला. थोडावेळ दोघांचे तुंबळ युद्ध झाले. अखेर तो मिशीवाला नरेंद्रसमोर टिकाव धरूं शकला नाही व त्याने तिथून पळ काढला.

''पराक्रमी वीरा, योग्यवेळी येऊन तू माझा बचाव केलास. मी या देशाची राजकुमारी आहे. माझे नांव शशिरेखा आहे, ''त्या स्त्रीने स्वतः चा परिचय दिला व ती या जंगलात कशासाठी आली होती तेही तिने त्याला सविस्तर सांगितले.

आपली कहाणी सांगून झाल्यानंतर राजकुमारी त्याला म्हणाली, ''तो मिशावाला माणूस आमच्या सैन्यांत मोठा खड्गवीर म्हणून प्रसिद्ध आहे. तू माझे रक्षण करण्यासाठी इतक्या मोठया वीराशी सामना केलास. ज्या रीतीने तो इतका घाबरून पळून गेला, त्यावरून हेच सिद्ध होते की तू त्याच्यापेक्षा अधिक पराक्रमी वीर आहेस. तू देखणा आहेस, साहसी आहेस, पराक्रमी आहेस. उद्या मी तुझ्या घरी रथ पाठवीन. तू माझ्याशी विवाह कर. या देशाचा राजा हो आणि त्याचे सदैव रक्षण कर.''

नरेंद्रचा चेहरा फिका पडला. शशिरेखा दिसायला तर सुंदर होतीच, शिवाय ती देशाची राजकुमारी सुद्धां होती. त्याने विचार केला, ''हे माझे भाग्यच नाही तर दुसरे काय आहे?''

त्याने आपल्या व शांताच्या प्रेमासंबंधी तिला कांहीही सांगितले नाही. महान बनण्याचे त्याचे स्वप्न पूर्ण होणार होते, त्यामुळे तो बेहद खूष होता. शिवाय तो देशाचा राजादेखील बनणार होता. अत्यंत आनंदाने तो राजकन्येला म्हणाला, ''तुझे शब्द माझ्यासाठी काळया दगडावरची रेघ आहेत. तू जे म्हणशील तसेच होईल''.

मग नरेंद्र घरी परतला. रात्री तो स्वप्नें पाहातच झोंपी गेला. स्वप्नांत तो सिंहासनावर विराजमान झाला होता आणि लोक त्याला प्रणाम करीत होते.

दुसऱ्या दिवशी नरेंद्रच्या घरासमोर एक रथ येऊन थांबला. त्या रथामधून तो मिशावाला आणि शशिरेखा, दोघे उतरले. ते सरळ घराच्या आतच आले. त्यांना पाहून नरेंद्रच्या वडिलांना अत्यंत आश्चर्य वाटत होते. इतक्यांत तो मिशावाला माणूस त्यांना म्हणाला, ''आम्ही तुमच्या मुलासाठी विवाहाचा प्रस्ताव घेऊन आलो आहोत.'' आश्चर्य चकित होऊन नरेंद्रच्या वडिलांनी त्यांना विचारले, ''महाशय, प्रथम आपण कोण आहात ते सांगण्याची कृपा कराल का?''

''ज्या शांतावर तुमच्या मुलाचे निरतिशय प्रेम आहे, त्या शांताचा मी काका. मी राजदरबारात नोकरी करतो. या गांवात प्रथमच आलो आहे. या मुलीचे नाव शशिरेखा आहे व ती माझी मुलगी आहे. शांताच्या सांगण्यावरून हिने तुमच्या मुलाची परीक्षा घेतली. तुमचा मुलगा आपण दिलेले वचन विसरुन गेला. त्याचे मन डगमगले. तरीदेखील शांता त्याच्याशीच लग्न करण्याचा हट्ट धरून बसली आहे. आम्ही हे लग्न पक्के करण्यासाठी आलो आहोत. शांताचे आईवडीलदेखील आत्ताथोडयाच वेळांत इथे पोहोचतील''.

वडिलांच्या शेजारी उभा असलेला नरेंद्र हे सर्व ऐकत होता. शरमेने त्याची मान खाली झुकली होती. त्याचदिवशी त्याचा विवाह शांताशी निश्चित करण्यात आला.

नरेंद्र शांताला एकांतात भेटला तेव्हा म्हणाला, ''तू मला सुचविलेल्या उपायाने मी महान बनणार होतो. परंतु तसे कांहीही झाले नाही. परंतु माझ्याशी विवाह करण्याची तुझी इच्छा पूर्ण करण्यात तू मात्र यशस्वी झालीस''.

शांता हंसून म्हणाली, ''बऱ्याच लोकांची समजूत आहे की धन, प्रेम, शक्ती इत्यादि गोष्टींमुळेच महानता प्राप्त होऊ शकते. परंतु खरी महानता त्याग करण्यांतच आहे. माझी इच्छा होती की तुलादेखील त्याग करण्यामागील कष्टांची कल्पना यावी. त्यासाठीच मी हे नाटक केले. इथून पुढे कधीही महान बनण्याची स्वप्नें पाहू नकोस. आपण आपले वैवाहिक जीवन सुखाने व्यतीत करू''.

आपल्या होणाऱ्या पत्नीच्या विवेकबुद्धीवर नरेंद्र प्रसन्न झाला व महान बनण्याचे खूळ त्याने डोक्यांतून काढून टाकले.





# आरुद्र वर्षा

वेंगि देशाच्या राजाचे नांव माणिक्यवर्मा होते. त्याच्या दरबारात कीर्तिसेना नांवाची एक राजनर्तकी होती. ती विलक्षण सुंदर होती. तिच्या सौंदर्याला अनुरूप असाच भरघोस केशसंभारही तिला लाभला होता. साऱ्या राज्यांत लोक म्हणत असत कीं केस असावेत तर असे!

अचानक, कां कुणास ठाऊक-परंतु तिचे केस भराभर गळूं लागले. त्यामुळें ती घाबरून गेली. तिने राजवैद्याद्वारे चिकित्सा करवली. राजवैद्याने तिला तपासले परंतु त्याचा कांहीही फायदा झाला नाही. तिचे केस गळतच राहिले.

तेव्हां राजवैद्य तिला म्हणाले ''हे बघ मुली, जेव्हां रोगाचे निदान करणे अशक्य होते, तेव्हा सर्वांनाच परमेश्वराचा आधार घ्यावा लागतो. अशावेळी केवळ तोच आपल्याला पुन्हां निरोगी करू शकतो. आपल्याच राज्यामध्ये सरपुर या गावी एक शिवमंदिर आहे. त्या शिवलिंगावर भरघोस केसांची एक बट आहे. त्यामुळे त्याचे नांवच जटालिंगेश्वर असे पडले आहे. त्याच नांवाने त्याची पूजाअर्चा होत असते. त्याची तू पूजा केलीस तर कदाचित तुझी इच्छा पूर्ण होईल व तुझे केस परत पूर्वीसारखे होतील''.

राजवैद्यांच्या सल्ल्यानुसार राजनर्तकीने त्या शिवलिंगाची प्रार्थना करून म्हटले, ''सुरपुर गांवी स्थित जयालिंगेश्वरा, तूं जर माझ्या केसांची गळती थांबवलीस तर मी तुझ्या दर्शनाला येईन व तुझ्या सभामंडपात नृत्य करीन''. अशा प्रकारे कीर्तिसेना शिवलिंगाला नवस बोलली.

राजवैद्याच्या चिकित्सेचा परिणाम म्हणा, किंवा जटालिंगेश्वराची कृपा म्हणा-राजनर्तकीचा आजार दूर झाला. तिचे केस परत पूर्वीसारखे सुंदर दिसू लागले. केस झडण्याचे पूर्ण थांबले.

आजा राजनर्तकीला आपला नवस फेडायचा होता. त्यासाठी तिने राजाची अनुज्ञा मागितली.

राजाने तिच्याकडून सर्व माहिती नीट सविस्तर विचारून घेतली व म्हणाला, ''हे खरोखरच अद्भुत आहे. अशा भक्तवत्सल जटालिंगेश्वराचे दर्शन अवश्य केले पाहिजे.''

त्यानंतर राजा आपल्या मंत्र्याकडे वळून म्हणाला, ''कीर्तीसेनेच्या नृत्यप्रदर्शनाबरोबरच आमच्यादेखील यात्रेची पूर्ण व्यवस्था करावी.''

- तपस्वी -



आता सुरपुर गांवचा चेहरामोहरा बदलून गेला. मंदिराचा कायापालट झाला. सुंदर सजावट झाली. सभामंडपात राजनर्तकीच्या नृत्यासाठी आवश्यक ती व्यवस्था त्वरेने करण्यांत आली. समारंभाच्या दिवशी राजा माणिक्यवर्मा दर्शनाला आला व त्याने रिवाजानुसार काही विशिष्ट पूजाविधी केले. त्यामुळे सामान्य जनतेला दर्शनासाठी बराच काल तिष्ठत उभे राहावे लागले.

दूरवरून दर्शनार्थ आलेली एक सुंदरी नांवाची स्त्री यामुळे चिडून गेली. ती ओरडूं लागली, ''महाराज काय आभाळांतून टपकले आहेत काय? ते महाराज असले म्हणून काय झाले? जटालिंगेश्वर स्वामींपुढे त्यांचे काय महत्व? महाराजांबद्दल आम्हालासुद्धा आदर आहे. पण तरीदेखील जटालिंगेश्वर आम्हाला जेवढा महत्वाचा आहे, तितके कांही महाराज नाही. लिंगेश्वराच्या जटेतून वाहण्याऱ्या पवित्र गंगाजलाने मी दरवर्षी भिजून निघते व सशक्त बनते. आमचे म्हातारे बैल पुन्हां तरूण होतात. ते दिवस आता येऊं घातले आहेत. आमचे बैल तरुण होतील. मला पुन्हां शक्ती मिळेल. या राज्यातील प्रजेला आम्ही अन्नधान्य पुरवू स्वामी, आम्हाला लवकर मंदिरात प्रवेश करून द्यावा''.

राजाने सुंदरीचा आरडाओरडा ऐकला व तिला मंदिरात बोलावण्याची आज्ञा दिली, तिच्याबरोबर तिचा पतीदेखील आंत आला. त्यांनी आपल्याबरोबर कांही थैल्या आणल्या होत्या. त्या थैल्यांमधून त्यांनी कापसाचे ढीग खाली ओतले. त्यानंतर 'हरहर महादेव' असा घोष करीत लिंगेश्वराला वंदन केले. त्यानंतर कापूस जाळला आणि गाभाऱ्यांतील शिवलिंगाला साष्टांग प्रणिपात केला. महाराजांनी आपल्या सैनिकांना त्या दोघांना न रोखण्याचा इशारा दिला. मग राजाने जेव्हां पूजा केली, तेव्हां त्याच्याच बरोबर त्या दांपत्याची पूजादेखील पुजाऱ्याने एकदमच स्वीकार केली.

पूजा समाप्त झाल्यानंतर राजाने सुंदरी व तिचा पती या दोघांना जवळ बोलावून घेतले व विचारले, ''महाराज होण्याच्या नात्याने आपली नेहमीची पूजा परंपरा तोडण्याची माझी इच्छा नव्हती. मला हे सर्व अजिबात आवडले नाही पण मी मौन बाळगले. उन्माद चढल्यासारखा तुझा आरडाओरडा चालला होता की मी आता पुरुष होणार, आमचे बैल पुन्हा तरुण होणार-इत्यादि इत्यादि. तुम्ही देवाच्या गाभाऱ्यात कापूससुद्धा जाळलात. हे सर्व करण्यामागे तुमचा काय हेतू होता-याचा सविस्तर खुलासा तुम्हाला तुमच्या महाराजांकडे द्यावाच लागेल,'' राजाचा आवाज चांगलाच कठोर झाला होता.

तेव्हा सुंदरीचा पती म्हणाला, ''महाराज, माझी पत्नी वेडीखुळी नाही. तिने जे म्हटले त्यांत कांहीही

वेडेपणा नाही. हा आमचा एक दरवर्षीचा परिपाठ आहे - अश्विनीपासून रेवतीपर्यंत सत्तावीस नक्षत्रांमधे सूर्याचा प्रवेश होण्यापर्यंतच्या पर्जन्यवृष्टीचे आम्ही मोजमाप करतो. विशेषतः मृग ते विशाखा नक्षत्रांपर्यंतच्या बारा नक्षत्रांच्या दरम्यान जो पाऊस होणे योग्य वा अयोग्य, त्या पर्जन्यवृद्धीच्या आधारे शेतीच्या फायदा वा नुकसानाचे अंदाज बांधले जातात. यंदा चांगला पाऊस झाला आहे. मृगाच्या पावसाने म्हाताऱ्या बैलांमध्ये देखील स्फूर्ती आली व त्यांनी जोरदारपणे नांगर चालवला. शंकराच्या जटांमधून अवखळपणे वाहणाऱ्या गंगेप्रमाणे आर्द्रा नक्षत्रांत झालेल्या पावसांत भिजलेल्या माझ्या पत्नीने पुरुषाप्रमाणे शेतीत कष्ट केले. माझ्या पत्नीने जे काही उल्लेख केले ते सर्व आर्द्रा व मृगाच्या पावसाशी संबंधित आहेत. तिने आपल्यासमोर चवताळून जे वेड लागल्यासारखे वर्तन केले, त्याच्याबद्दल मी आपली क्षमा मागतो."

महाराज माणिक्यवर्मा त्याच्या बोलण्याने शांत झाले व त्याला म्हणाले, "हे सर्व ठीक आहे. पण गाभाऱ्यांत कापूस जाळण्याचे कारण काय?"

"महाराज पुष्यनक्षत्र काळांत रात्रीं नांगराच्या एका टोंकावर वीस तोळयांचा कापूस बांधून तो नांगर शेतांत ठेवला जातो. सकाळीं येऊन त्या कापसाला पिळून बघितले जाते. जर त्यातून पाणी वाहू लागले तर समजतात की त्या वर्षी चांगला पाऊस होईल. जर जास्त पाण्याचे थेंब वाहिले नाहीत तर समजतात की पाऊस यंदा फारसा चांगला होणार नाही. ही पाऊसमानाची परीक्षा करून झाली की मग आम्ही शिवलिंगाची आरती करतो. हेच आम्ही आत्ता केले." सुंदरीचा पती म्हणाला.

त्याच्या या उत्तराने संतुष्ट झालेला राजा म्हणाला, "आर्द्राच्या पावसाबद्दल मला फारशी माहिती नाही आहे. परंतु या रुद्रमंदिरामध्ये तुझ्या पत्नीने एखाद्या पुरुषाप्रमाणे महाराजांना त्यांची चूक दाखवून दिली. या पावसामधे भिजून स्त्रीदेखील पुरुषाप्रमाणे कठोर परिश्रम करण्यास योग्य होवो. दरवर्षी अशीच जोमदार पर्जन्यवृष्टी होवो आणि आपले राज्य सदा फळत-फुलत राहून त्याची सदैव भरभराट होवो."

राजनर्तकी कीर्तिसेनेच्या नृत्यसमारंभाच्या समाप्तीनंतर महाराजांनी सुंदरी व तिच्या पतीचा सत्कार केला. त्याकाळच्या वेंगि राज्यांत आर्द्राच्या पावसानंतर कमीतकमी एक दिवसतरी स्त्रिया शेतीमधे अवश्य काम करीत.







# इतिहासकार

अनेक वर्षांपूर्वी महेंद्रगिरी राज्यावर राजा पुरंदर राज्य करीत होता. राजा पुरंदर कुशल राजनीतिज्ञ तर होताच पण त्याला कला व कलाकारांविषयी विशेष आस्था होती. त्याच्या राज्यांत कला व कलाकारांचा सन्मान होत असे. संधी मिळताच विविध कलांच्या मर्मज्ञ विद्वानांचा जो यथोचित गौरव करीत असे.

एक दिवस राजा पुरंदरच्या दरबारांत एक परदेशी आला. त्याचे नांव श्रीकंठ होते. इतिहास लिहिण्या-चा त्याचा व्यवसाय होता. तो अनेक देशांमध्ये जाऊन एकेक वर्ष वास्तव्य करीत असे आणि तेथील भाषा शिकून घेऊन त्या त्या देशाचा इतिहास सविस्तर लिहून काढीत असे. अशा प्रकारे श्रीकंठने चौदा भाषा शिकून त्यांत प्राविण्य मिळविले होते व चौदा देशांचे इतिहास लिहून काढले होते. त्यानंतर तो महेंद्रगिरी राज्यांत आला होता.

इतका विद्वान पंडित आपल्या दरबारी आलेला पाहून राजा पुरंदर अतिशय प्रसन्न झाला. तो श्रीकंठला म्हणाला, "तुम्ही माझ्या राज्यांत देखील वर्षभर राहून आमच्या देशाचा इतिहास लिहून काढा. तुम्हाला हव्या त्या साऱ्यासोयी मी करून देईन".

"ठीक आहे महाराज! परंतु तुम्ही मला तुमचा जीवश्च-कंठश्च मित्र म्हणून तुमच्या सोबत राहाण्याची अनुमती द्यावी. त्यामुळे माझे काम खूप सुलभ होईल," श्रीकंठ उत्तरला.

पुरंदर राजाने ही अट मान्य केली. श्रीकंठने राजाच्या जिवलग मित्राचे पद मिळविले. मग तो राजासह हिंडण्याफिरण्यात, शिकारीला जाण्यांत, किंवा युद्धावरदेखील राजाबरोबर जाण्यांत जास्त वेळ घालवू लागला. अशा प्रकारे तो राजाच्या शासन-कौशल्याचे सूक्ष्म निरीक्षण करू लागला त्यानंतर शहरांत हिंडून सर्व प्रकारच्या लोकांबरोबर चर्चा करण्यात तो वेळ व्यतीत करू लागला. सर्व लोकांना थोड्याच काळांत त्याच्या व राजाच्या दाट मैत्रीची माहिती झाली. त्यामुळें सर्वजण त्याच्याविषयी विशेष आदरभाव दाखवू लागले.

- इंद्रनाथ केनेडिया -



नगरातील धनाढ्य लोक व व्यापारी वगैरे त्याला खास भोजनसमारंभांसाठी निमंत्रण देऊन बोलावू लागले. श्रीकंठाकडून आपला जास्त लाभ कसा होईल याचाच ते लोक विचार करीत असत.

श्रीकंठाला महेंद्रगिरीमध्ये येऊन एक वर्ष पूर्ण होत आले होते. राज्याचा इतिहासदेखील लिहून पूर्ण होत आला होता. एक दिवस राजाने तो अर्धवट लिहिलेला ग्रंथ मागवला व वाचून काढला. त्यामध्ये महेंद्रगिरी राज्यातील लोकांचे आचार, विचार, व्यवहार, राजाने जनतेच्या कल्याणार्थ केलेले कार्य, राजा व दरबारी लोकांचा परस्पर विश्वास आणि सहयोग इत्यादि गोष्टींचे सुंदर वर्णन केले होते.

परंतु एका जागी लिहिले होते - 'या राज्यातील जनता भोळीभाबडी आहे. राजा खरोखर धर्मात्मा आहे. त्याचे कर्मचारीदेखील पूर्णतया राजनिष्ठ आहेत. परंतु या राज्यातील व्यापारी व धनवान लोक भ्रष्टाचाराने जनतेला लुबाडून संपत्ती कमावत आहेत !''

राजाला हे शेवटचे शब्द आवडले नाहीत. त्याने श्रीकंठला बोलावून घेतले व म्हणाला, ''हे महान पंडित, तुमचा ग्रंथ तर अप्रतिमच आहे. त्यांत दोष दाखवायला जागाच नाही. परंतु माझ्या राज्यातील धनवान व्यापाऱ्यांचे तुम्ही स्वार्थी व भ्रष्ट म्हणून वर्णन केले आहे- ते मात्र असत्य आहे.''

''माझ्या लेखनातील चुकांबद्दल माफी असावी महाराज. ग्रंथ लिहून पूर्ण करण्यापूर्वी मी त्या सुधारून काढीन.'' श्रीकंठ म्हणाला.

राजा त्याच्या बोलण्यावर अतिशय प्रसन्न झाला. दुसऱ्या दिवशी श्रीकंठ नगरातील मोठमोठ्या व्यापाऱ्यांना व धनवान लोकांना जाऊन भेटला. तो त्यांना म्हणाला, ''राजा पुरंदर चक्रवर्ती सम्राटांना नजराणा पाठवू इच्छितात. म्हणून तुम्ही तुमच्या जवळ असलेल्या उत्तम प्रकारच्या हिरेजवाहिराची यादी बनवून द्यावी.''

अशा प्रकारे श्रीकंठने कांहीकांही जणांकडून सोनेदेखील घेतले. श्रीकंठ राजाचा जिवलग सखा असल्याचे ठाऊक असल्यामुळे सर्वांनी लाखो रुपयांच्या किंमती वस्तू निश्चिंतपणें त्याच्या हवाली केल्या. श्रीकंठने जी वस्तूंची यादी बनवली त्यावर सर्वांच्या सह्यादेखील घेतल्या.

दुसऱ्या दिवशी सकाळीच शहरभर बातमी पसरली की काल रात्रीच श्रीकंठ राज्यांतून पळून गेला. हे ऐकून ते सर्वजण राजाकडे आले. ज्यांनी ज्यानी आदल्या दिवशी श्रीकंठकडे सोने-हिरे इत्यादि दिले होते, ते सर्वजण यादी घेऊन आले होते.



आपापली यादी राजाला दाखवून ते म्हणाले ''महाराज, आम्हाला वाचवा! आपल्या जिवलग मित्राने आपले नांव सांगून आम्हाला सर्वांना पूर्णपणे लुबाडले आहे. आपण धर्मात्मा आहात महाराज! कृपया आपण आमचे नुकसान भरून द्यावे''.

राजाने विचार केला की त्याने तर व्यापारी व धनाढ्य लोकांकडून सोने-हिरे इ.वसूल करण्याचा आदेश श्रीकंठला कधीच दिला नव्हता. श्रीकंठ स्वतः हून सर्वांना लुबाडून पळून गेला असावा, असा विचार करून त्याने खजिनदाराला बोलावले व कोणाकोणाचा किती नुकसानभरपाई द्यावयाची आहे, त्याची यादी बनवून देण्यास सांगितले.

खजिनदाराने सर्वांच्या याद्या गोळा करून हिशेब केला. तेव्हा त्याच्या लक्षांत आले कीं इतकी संपत्ती खजिन्यांत नव्हतीच. हे ऐकून राजा चिंतातुर झाला.

इतक्यात श्रीकंठ एक भलीमोठी थैली घेऊन तिथे येऊन पोहोचला. ती थैली व एक यादी राजाच्या हातांत देऊन म्हणाला, ''मी ज्यांच्या ज्यांच्याकडून ज्या ज्या वस्तू घेतल्या होत्या. त्यांची ही यादीपण बनवली होती. या यादीप्रमाणे आपण ज्याला त्याला त्यांच्या वस्तू परत कराव्यात''

श्रीकंठला बघताक्षणीच सर्व फिर्यादी धावत गेले. राजा कांही बोलायच्या आधीच सर्वांनी त्याचे पाय धरले व म्हणू लागले, ''महाराज, आम्ही तुम्हाला दिलेल्या याद्या जर चुकीच्या असतील, तर कृपया आम्हाला माफ करावे. आम्ही जेव्हां ऐकले कीं श्रीकंठ पळून गेला तेव्हां अधिक पैशाच्या हव्यासापोटी आम्ही खोट्या याद्या बनवून त्या तुम्हाला सादर केल्या''.

राजाने त्यांना त्यांच्या चीजवस्तू परत करण्यास ठाम नकार दिला व सर्वांना रिकाम्या हाती परत पाठवले. श्रीकंठने आणलेली थैली राजाने घेतली व खजिन्यांत जमा करण्यास खजिनदाराला कर्माविले.

त्यानंतर राजा श्रीकंठला म्हणाला, ''हे महापंडित, तम्ही तुमच्या ग्रंथात जे लिहिले आहे ते चुकीचे नाही, हे सिद्ध करण्यसाठी तुम्हाला बरेच श्रम घ्यावे लागले''.

''मोठ्या लोकांबद्दल अशा गोष्टी लिहायच्या म्हणजे एवढे कष्टतरी घ्यावेच लागतात, महाराज! ही देखील एक कला आहे !'' श्रीकंठ उत्तरला.

त्यानंतर राजाने त्यास भरपूर इनाम दिले व श्रीकंठ दुसऱ्या देशाला निघून गेला.





# मला काय मिळेल?

रामचंद एक व्यापारी होता. तो अत्यंत कंजूष होता आणि पैशाचा फार लोभी होता. स्वार्थ म्हणजे काय त्याचं तो एक जिवंत उदाहरण होता. कांहीतरी फायदा झाल्याशिवाय तो कोणतंही, कोणाचंही, काम करीत नसे.

त्याच्या घरांत चमन हा माडेकरू होता. लहानमोठी कामें करुन तो थोडीफार कमाई करीत होता. नुकताच तो दुसऱ्या गांवातून येऊन इथें राहायला आला होता.

एक दिवस रामचंद जेव्हां दुकानातून घरी परत आला, तेव्हां त्याने पाहिलं कीं चमनची मुलगी कल्याणी रामचंदच्या घरांतून बाहेर येत होती.

त्याने कल्याणीला विचारलं, "काय काम होतं ग पोरी?" "नारळ सोलायचे होते म्हणून तुमच्या घरांतली कोयती हवी होती. ती घेऊन गेले आणि आता परत द्यायला आले होते." कल्याणीने सांगितलं.

रामचंदने प्रेमळपणें तिला म्हटलं, "तू हे बरोबर केलं नाहीस हं बाळ. कोयती परत दिलीस पण ती वापरण्याबद्दल मला एक नारळ दिला असतास तर बरं झालं असतं."

कल्याणी चटकन आपल्या घरांत गेली, एक नारळ घेऊन आली आणि तिने तो रामचंदला दिला.

तिसऱ्या दिवशी रामचंद दुपारीं जेवायला घरी आला तेव्हां कल्याणीला त्याच्या घरी येताना त्याने पाहिले.

"कोणत्या कामासाठी आली आहेस कल्याणी?"

"आज सण आहे ना? आईला मिठाई बनवायला कढई हवी होती. तुमच्या घरून घेऊन गेले होते. आता स्वयंपाक झालाय, म्हणून कढई परत द्यायला आले मी!" कल्याणीने हंसतहंसत उत्तर दिले.

"कढई परत दिलीस पण ती वापरल्याबद्दल माझ्यासाठीं काय आणलं आहेस तूं?" रामचंदने विचारलं.

कल्याणीला वाटलं, आपलं कांहीतरी चुकलं. ती तडक आपल्या घरांत गेली आणि एका थाळींत दोनतीन पदार्थ घेऊन आली. रामचंदने खुर्षीतच त्या पदार्थांचा आस्वाद घेतला.

आनंदाने कल्याणीची पाठ थोपटत त्याने तिला म्हटले, "हे बघ बाळ, यापुढें केव्हांही तू माझ्या घरांतून कांही वस्तू नेलीस तर त्याच्याबद्दल मी कांही विचारण्यापूर्वींच तू कांहीतरी देत जा. मला त्याच्यामुळें फार आनंद वाटेल.

कल्याणीने हंसून मान डोलावली व ती घरी गेली.

एका आठवड्यानंतर जेव्हां रामचंद दुसऱ्या गांवी जाऊन परत येत होता, तेव्हां त्याने कल्याणीला त्याच्या घरांतून बाहेर पडताना पाहिले. "कल्याणी, कांही परत द्यायली आली होतीस ना?" त्याने हंसतच तिला प्रश्न केला.

"होय काका, नुसतंच परत द्यायला नाही तर तुम्ही सांगितल्याप्रमाणें उरलेलं कामदेखील मी न सांगता पूर्ण केलं." कल्याणीने उत्तर दिले.

"काय घेऊन गेली होतीस?" रामचंदने विचारलं.

"उंदीर पकडायचा पिंजरा घेऊन गेले होते. आमच्या घरांत फार उंदीर झाले आहेत ना! खूप त्रास होतो. कांही उंदीर पकडलेसुद्धा. आता पिंजरा नेला म्हणून कांहीतरी तुम्हाला द्यायला तर हवंच ना! म्हणून पिंजऱ्यात पकडलेले दोन उंदीर घेऊन आले नि तुमच्या घरांत सोडले. पिंजरा तुमच्या मुलाजवळ परत दिला. काका, तुम्ही जे सांगितलं होतं ते मी मुळींच विसरले नाही हां!"

रामचंदला गरगरल्यासारखे झाले. क्षणभर त्याच्या तोंडून शब्द फुटेना. परंतु या घटनेनंतर हळूंहळू त्याचा स्वभाव बदलायला लागला. तेव्हांपासून त्याने "मला काय मिळेल" हा स्वार्थी विचार सोडून दिला. आणि आता तो भला माणूस म्हणून ओळखला जातो.

- ईश्वर -





# मायासरोवर

फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. अमरावती नगराच्या राज्याच्या कार्यालयांत कुलशेखर नांवाचा एक राजकर्मचारी होता. जयशील हा त्याचा एकुलता एक मुलगा होता. बाळपणीच त्याची आई वारली. म्हणून राजशेखरने जयशीलला अतिशय लाडाकोडांत वाढवले होते. किशोरवयांत सर्व विषयांचे शिक्षण घेताघेता जयशीलने क्षत्रियाला आवश्यक असे युद्धविद्येचे शिक्षणदेखील घेऊन प्राविण्य मिळवले होते.

त्याच कार्यालयांत जयशीलने काम धरावे व राजाच्या कृपादृष्टीस पात्र व्हावे अशी राजशेखरची इच्छा होती. म्हणून तो मुलाला घेऊन राजाकडे घेऊन जाणार होता. पण तेवढ्यांत अचानक राजशेखरचे निधन झाले.

आता जयशील एकटा पडला. वाईट संवयी असलेल्या कांही तरुणांशी त्याची मैत्री जुळली. वडिलांची संपत्ती बघताबघता त्याने खर्च करून टाकली. तो जुगार खेळूं लागला आणि रात्रंदिवस जुगारी अड्ड्यावरच वेळ घालवूं लागला.

वडिलांच्या मृत्यूनंतर चारपांच महिन्यांच्या आंतच त्याची सारी धनदौलत नष्ट झाली. आता त्याची अवस्था फारच केविलवाणी झाली होती. एकदा तर तीनचार दिवस जेवणखाण न करता तो जुगारखान्यांत पडलेला होता. बाहेर रस्त्यावर यायची त्याला लाज वाटूं लागली. कारण दाढीही जरा वाढली होती आणि कपडे फारच कळकट दिसत होते.

त्याची ही दुर्दशा पाहून देवशर्मा नांवाच्या त्याच्या मित्राला दया आली. तो म्हणाला, ''जयशील, जे झालं ते झालं! तूं आपल्या हाताने ही स्वत:ची दुर्दशा ओढवून घेतली आहेस. तुला माहीत नसेल कीं जुगार माणसाला कुठल्याकुठे नेऊन सोडतो ते! या गर्तेत जेव्हां कुणीही पडतो, तो त्यांतून कधीही वर उठूं शकत नाही. तू सुशिक्षित आहेस. स्वत:ला संभाळ. गेल्या दिवसांचा विचार करून दु:ख करीत बसण्यांत



कांहीच अर्थ नाही.'' असा उपदेश त्या मित्राने केला.

थोडा वेळ जयशील गप्प बसला आणि विचार करीत राहिला. नंतर त्याने विचारले, ''मित्रा देवशर्मा, एक खरा मित्र या नात्याने तू मला योग्य सल्ला दिला आहेस. याच्यापुढें मी काय करावं याचा निर्णय मला लौकरच घेतला पाहिजे.''

देवशर्मा कांहीतरी बोलणार होता तेवढ्यांत बाहेर गडबडीचा आवाज येऊं लागला. राजाच्या घोडदळाचे प्रमुख कृपाणजित आणि त्यांचे चार सैनिक त्या द्यूतगृहांत शिरले आणि तिथें असलेल्या लोकांना चाबकाने मारायला लागले.

जयशीलला हा अन्याय सहन झाला नाही. त्याने नम्रपणें त्यांना विचारले, ''आपण असं कां करीत आहात? हा तर अधर्म आहे, धडधडीत अन्याय आहे.''

''एक जुगारी मला न्याय-अन्यायाचा उपदेश करतो आहे, हित-अनहित शिकवतो आहे! वा रे वा, किती विचित्र गोष्ट आहे. ही !'' असं म्हणून कृपाणजितने जयशीलला देखील चाबकाने मारले.

जयशीलला फटका लागल्याबरोबर तो संतापला. चिडून जाऊन त्याने जवळची एक काठी उचलली आणि कृपाणजितल्या डोक्यावर जोराने हाणली. कळवळून कृपाणजितने तलवार काढण्यासाठीं म्यानावर हात ठेवला. पण तितक्यांत जयशीलने त्याच्या कमरेंत जोराने लाथ मारली. कृपाणजित वेदनेने ओरडला आणि उठून उभा राहिला. जयशीलच्यासमोर आपला कांही टिकाव लागणार नाही हे त्याच्या लक्षांत आले. तो आपल्या घोड्यावर स्वार होऊन पळून जायच्या विचारांत होता. जयशीलही सावध होताच. तोही चटकन कृपाणजितच्या घोड्यावर त्याच्यामागें चढून बसला. एका हाताने त्याने घोड्याचा लगाम पकडला आणि दुसऱ्या हाताने कृपाणजितचे केस घट्ट पकडले. एकीकडे आपल्या गुडघ्यांनी तो कृपाणजितला ढुशा देत होता. संवयीनुसार घोडा राजवाड्यासमोर जाऊन उभा राहिला.

त्याच वेळेला राजा गच्चीवर उभा राहून मंत्र्यांशी विचारविनिमय करीत होता. त्यांनी सेवकाला बोलावले आणि आज्ञा दिली, ''त्या दारूड्यांना इथें आणून हजर करा.''

सेवक कृपाणजित व जयशीलला घेऊन राजाच्यासमोर आले. राजाने आपल्या घोडदळाच्या प्रमुखाला ओळखले व म्हटले,



''जित, तू माझ्या घोडदळाचा प्रमुख आहेस. तू घोड्यावर बसून कोणते कौशल्य दाखवीत आहेस?'' प्रश्न विचारताना राजाचा स्वर चढला होता.

कांहीही न लपवता, जे घडलं ते सारं कृपाणजितने राजाला सांगितलं. सारी हकीकत ऐकून घेऊन राजाने रागाने विचारलं, ''जित, तुझ्या भित्रेपणामुळें माझी संपूर्ण सेना बदनाम झाली आहे. तू त्यांचा अपमान केला आहेस. मी तुला हद्दपारीची शिक्षा देतो आहे. तुझी तलवार इथेंच ठेव आणि तावडतोब या राज्याच्याबाहेर जा.''

कृपाणजितने जमिनीवर तलवार ठेवली आणि खाली मान घालून तो तिथून निघून गेला. त्यानंतर जयशीलकडे भेदक नजरेने बघत राजाने म्हटलं, ''अरे जुगाऱ्या, मी तुला देहदंडाची शिक्षा देतो आहे. तुला कांही त्यापूर्वी सांगायचं असलं तर सांग.''

जयशील निराशेत बुडला होता. सांगण्यासारखं त्याच्याजवळ कांहीच नव्हतं. म्हणून त्याने मोठ्या दीनवाण्या स्वरांत सांगितलं, ''महाराज, आपण मला मृत्यूची शिक्षा दिली आहे, तेव्हां आता सांगण्यासारखं माझ्याजवळ कांहीही उरलं नाही.''

''तुला आपल्या प्राणांची भिती नाही वाटत?'' आश्चर्यवाटून राजाने विचारलं.

''दारिद्र्याच्या भितीसमोर कसली आलीय प्राणांची भिती?'' जयशीलने उत्तर दिले.

त्यावेळेला मंत्र्यांनी मधेच हस्तक्षेप करीत म्हटले, ''महाराज, हा तरुण आपल्या कार्यालयांत काम



करणाऱ्या दिवंगत कुलशेखरचा एकुलता एक पुत्र आहे. त्याच्यावर आपण दया करावी.''

''ठीक आहे, मी त्याची देहदंडाची शिक्षा कमी करतो. पण त्यानेही माझे राज्य सोडून गेले पाहिजे.'' राजाने आदेश दिला. राजाला प्रणाम करून जयशील मागे फिरणार तेवढ्यांत राजा पुढें म्हणाला, ''ही घे, कृपाणजितने इथें ठेवलेली तलवार तूं आपल्या हातांत ठेव. एका आठवड्याच्याआंत तू माझ्या राज्याच्या सीमेबाहेर गेला पाहिजेस. समजलं ना?''

ते नगर सोडण्यांत जयशीलने उशीर केला नाही. तो अरण्यमार्गाने जाऊं लागला. त्याने सात दिवस रानावनांतून प्रवास केला आणि अरण्यांतली फळें खाऊन आपले पोट भरले. त्यानंतर सूर्यास्ताच्यावेळीं तो एका दुसऱ्या देशाच्या राजधानीजवळ जाऊन पोंचला.



त्या रात्रीं, जयशील एका वडाच्या झाडाखाली झोंपी गेला. थोड्याच वेळांत त्याला अगदी गाढ झोंप लागली. मध्यरात्रीं त्याला कोल्हेकुई ऐकूं आली म्हणून तो जागा झाला. थोड्या अंतरावर झाडांच्यामधें मंद उजेड दिसत होता. त्याला धूरही दिसला. चकित होऊन जयशील त्या दिशेने निरखून पाहायला लागला, तेवढ्यांत 'बांचवा! महाकाल मला आता मारणार आहे'' अशी आर्त हांक ऐकूं आली.

जयशील लागलीच उठला आणि त्याने तलवार उपसली. जिकडून तो आर्त स्वर येत होता, त्या बाजूला तो पळतपळत गेला. ते एक स्मशान होते. दोनतीन प्रेतांना अग्नी दिलेला होता. त्यांच्या ज्वाळांच्या उजेडांत त्याने काळी वस्त्रें धारण केलेली एक व्यक्ती पाहिली. त्याचे केस विखुरलेले होते आणि तोच ओरडत पळून जात होता. अंगभर शुभ्र वस्त्रें पांघरलेली आणखी एक व्यक्ती त्याचा पाठलाग करीत होती व म्हणत होती. ''थांब, थांब! महाकालचा हा सेवक कालकाल पाहूनच थरथर कांपणारा तू, महाकाललाच ललकारण्याचा प्रयत्न करतो आहेस?''

जयशीलने त्या कालकालला थांबवले आणि बेडरपणें म्हटले, ''तू कुणीही अस, मी तुला घाबरत नाही. पण कुणाच्याही मागे लागून त्याला मारण्याचा प्रयत्न करताना पाहात बसणे हे मला सहन होत नाही. तसं तू केलंस तर मी तुला निश्चितच अडवीन.''

त्याचे बोलणें ऐकूनच कालकाल विकटपणें हंसायला लागला आणि म्हणाला, ''तुझ्या धैर्याला मी दाद देतो. पण माझं खरं रूपदेखील तू ज्ञाता बघ.'' असं म्हणून त्याने पांघरलेले पांढरे वस्त्र काढून फेंकून दिले.

कालकालचे ते रूप अति भयंकर होते. त्याच्या शरीराचा रंग काळाकुट्ट होता. त्याच्या डोळ्यांतून ज्वाळा बाहेर पडत होत्या. तोंडातून आग बाहेर पडत होती. त्याने भयानक गर्जना केली.

क्षणभर जयशील स्तंभित झाला. पण त्याने लगेच स्वतःला सांवरले आणि कालकालच्या छातीकडे आपली तलवार रोखत त्याने म्हटले, ''अरे दुष्टा, तुझ्या विकृत आकाराकडे पाहून कांही मी घाबरणार नाही. पळून जाणाऱ्या व्यक्तीला तू मारणारा आहेस. तूही अट्टल भित्राच आहेस.''

कालकाल जरा मागे सरला आणि म्हणाला, ''तरुणा, तुझे धाडस पाहून मला कौतुक वाटते.



अमानवी शक्तींना केवळ महासत्वही आपल्या कह्यांत ठेवूं शकतात. आता ज्याने मला आवाहन केलं होतं, तो सिद्धसाधक अल्पसत्व आहे. अशाला नामशेष करायलाच हवं.'' असं म्हणत तो पुढेंपुढें जायचा प्रयत्न करायला लागला.

जयशीलने आपली तलवार त्याच्या छातीसमोरच धरली. त्यामुळें त्याला पुढें जाता येईना व तो वळून मागे पाहात सिद्धसाधकाला शोधूं लागला. तितक्यांत कालकालने आपल्या छातीवरची तलवार ढकलली.

परंतु जयशील कांही त्याला तसाच जाऊं देणार नव्हता. त्याने झटकन कालकालच्या गळ्याचा नेम धरुन तलवार फेंकली. त्या वारामुळें त्याचे मस्तक धडावेगळे झाले, आणि दूर जाऊन पडले. दुसऱ्याच क्षणीं ते मस्तक पडलेले होते ते उठले आणि जोराने हंसत म्हणूं लागले, ''जयशील, तू महावीर आहेस यांत संदेह नाही. माझ्या रक्ताने तुझी तलवार भिजली आहे. म्हणजे आता तुझी तलवार अमोघ शक्तीशाली व महिमामयी झाली आहे असा अर्थ होतो. जा, जे तुला साधायचंय, ते निर्वेधपणे साध.''

त्याचे बोलणें ऐकून जयशील स्तब्ध झाला. त्याच्या आश्चर्याला सीमा नव्हती. तो त्या तुटलेल्या मस्तकाजवळ गेला आणि ते त्याने हलवून पाहिले. आता ते निर्जीव झाले आहे हे त्याच्या लक्षांत आले. जो मेला होता, तो निश्चितच बलाढ्य होता. त्याच्या कानांत आणि नाकांत सोन्याची आभूषणें होती. त्याच्या गळ्यांत घट्ट बांधलेली बोराएवढ्या मण्यांची माळ होती. जयशीलने त्याला नीट न्याहाळून पाहिले.



त्याने तलवार म्यान केली आणि बांचवा म्हणणाऱ्या काळ्या वस्त्रधारी माणसाला तो शोधूं लागला. त्याला तो आसपास कुठेही दिसेना. कुठे गेला असेल? भितीने तो या झाडांच्याजवळ मूर्च्छित होऊन तर पडला नसेल ? असा विचार करीत जयशील ज्या वटवृक्षाखालीं झोंपी गेला होता, त्या वृक्षाजवळ पोंचला.

त्या झाडाच्या पारंब्यावर बसलेली घुबडें चित्कारत होती. दूरवर कोल्हेही ओरडायला लागले. जयशीलला वाटलं कीं आता कांही आपल्याला झोंपता येणार नाही. शिवाय त्याला फारच तहान लागली होती.

''रात्रीचा तिसरा प्रहर संपला असावा असं वाटतंय. जवळपास सरोवर असलं तर पाणी पिईन, स्नान करीन आणि तसाच तडक नगरांत जाईन. कपडे फाटके आहेत अन् खूप मळकेही



आहेत. तरीसुद्धां माझ्या कमरेची ही तलवार आणि तिचे नक्षीदार म्यान पाहून लोकांना वाटेल कीं मी कुणा कुलवंत घराण्यांतला आहे. जर कुणी मला विचारलंच तर मी सांगेन कीं अरण्यांत वाघाशी सामना झाला आणि मी त्याला मारलं." असे विचार मनांत घोळवत जयशील तिथून निघाला. ते भयावह स्मशान ओलांडून तो पुढें जात राहिला. थोड्या दूर अंतरावर त्याला एक लहानसे घर दिसले. घरांत दिवा तेवत होता. प्यायला पाणी मागून तहान भागवायचे त्याने ठरवले. त्याने हांक दिली, "महाराज, मी एक वाटसरू आहे. प्यायला थोडे पाणी मिळेल कां?"

घराचे दार लागलीच उघडले. हातांत दिवा घेऊन एक म्हातारी बाहेर आली आणि म्हणाली, "बाळ, अंधार पडण्यापूर्वीच एखाद्या धर्मशाळेंत झोंपायला जायचंस. इतक्या रात्रीं कसला प्रवास करतो आहेस? आंत ये; पाणी पी."

जयशील आंत गेला. दिव्याच्या प्रकाशांत म्हातारीने त्याच्याकडे लक्षपूर्वक पाहिले. आश्चर्य प्रकट करीत ती म्हणाली, "मला वाटलं कीं तीर्थयात्रेला निघालेला कुणी वृद्ध मनुष्य असशील. हे रे काय? इतक्या लहान वयांत एक तलवार कमरेला बांधून तू या अरण्यांत कशाला फिरतो आहेस?"

पाणी पिऊन जयशील म्हणाला, "पाणी पाजून तुम्ही माझे प्राण वांचवले आहेत. घरांत दुसरं कुणी नाही असं वाटतंय."

"होय बाळा, आणखी कुणी नाही. मला मूल झालं नाही. वर्षभरापूर्वी माझे पति वारले. ते राजाच्याकडे काम करीत होते. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या वेतनाच्या तिसरा भाग मला राजाकडून उदरनिर्वाहासाठी मिळतो. त्याच्या आधाराने मी माझे दिवस काढते आहे." म्हातारीने सांगितले.

"आई, या प्रांतात मी नवखा आहे. इथे जवळ असलेल्या नगराचे नांव काय आहे? राजाचे नांव काय?" जयशीलने चौकशी केली.

एक दीर्घ उसासा टाकीत म्हातारी उद्गारली, "या नगराच नांव आहे हिरण्यपुर. राजाचं नांव आहे, कनकाक्ष ! तो अगदी धर्मात्मा, प्रजेचा हितकर्ता आहे. प्रजेचे हित हेच त्याचे ध्येय आहे. पण एका महिन्यापूर्वी कुणीतरी राजपुत्र व राजकन्येचे अपहरण केले आहे. त्या दिवसा-पासून राजा खूपच काळजींत आहे व आजारीच पडला आहे."

जयशील विचारांत पडला. आता आजारी राजाकडे तरी नोकरी मागायला कसे जाता येईल? त्याने आपला विचार बदलला आणि राजाच्या



अडचणींचाच तो उत्सुकतेने विचार करूं लागला.

"आई, हे काम एखाद्या शत्रूराजाने केलें असावं. त्याने राजपुत्र व राजकन्येला पळवून नेलं असेल. माझा तर्क ठीक आहे ना?" जयशीलने विचारलं.

"जर असं असतं ना तर मग काळजी नव्हती रे! कनकाक्ष राजाने शत्रूला मारून टाकलं असतं आणि आपल्या दोन्ही मुलांना त्याने परत आणलं असतं. लोकांना तर असं वाटतंय कीं त्याचं अपहरण करणारा कुणीतरी राक्षस किंवा यक्ष असावा." म्हातारीने सांगितलं.

त्याबद्दल ती आणखी कांहीतरी सांगणार होतीच तितक्यांत बाहेर कांहीतरी गडबड सुरुं झालेली ऐकूं आली. त्या कोलाहलांत एक माणूस रडक्या सुरांत सांगत होता." अहो, स्मशानांत माझ्या वडिलांचे मस्तक छाटणारा याच बाजूला आला होता. ते पाहा, मध्यरात्री या ब्राम्हण म्हातारीच्या घरांत दिवा जळतोय. तिने त्या खुनी माणसाला पाहिलंय कां ते तरी तिला विचारून पाहा!"

"तूं तर स्मशानाचा पहारेकरी आहेस ना? बडबड बंद कर आधी! ज्याचं मस्तक त्या महावीराने छाटलंय, तो तर कालकाल होता. आपण भुताप्रेतांचा गुरु असल्याची प्रौढी तो सांगत असे. असल्या साऱ्या गोष्टींची मला माहिती आहे ना!" एकजण नाराजीने बोलत होता.

दोघांना दटावत तिसरा बोलूं लागला, "तुम्ही दोघेजण गप्प बसा पाहूं. स्मशानाचा मेलेला पहारेकरी पुन्हां जिवंत कसा झाला, याचा शोध घेण्याचं काम मंत्रीमहाशयांनी माझ्यावर सोंपवलेलं आहे. मी नगराचा रक्षक आहे, कळलं कां? तेव्हां मला अडवूं नका कुणीही!"

जयशीलने त्यांची बोलणीं ऐकली. त्याने म्हातारीला सांगितलं, "आई, मला पकडायला नगर रक्षक आणि त्यांचे सैनिक आलेले दिसत आहेत. मी इथें थांबलो तर चालेल, कीं मी मागच्या दारांतून निघून जाऊं?"

म्हातारीने कांही उत्तर देण्यापूर्वीच नगररक्षक जोरजोराने दरवाजा वाजवायला लागला व म्हणूं लागला, "कोण आहे आंत? ताबडतोब दार उघडा बघूं!"

(अपूर्ण)



# दलनायक

दुर्गापूरचा राजा आणि शेजारचा शत्रूराजा यांच्यात लढाई सुरू होती. डोंगराच्या घाटींत रस्त्यावर एक मोठा दगड पडला. त्यामुळें रस्त्यांतली वाहतूक बंद झाली. दुर्गापूरचे सैनिक तो दगड हलवण्याचें प्रयत्न करीत होते. जरी ते आपले पूर्ण बळ वापरीत होते, तरी त्यांना दगड हलवता येत नव्हता. त्यांचा दलनायक जरा अंतरावर उभा होता. त्यांच्यावर नाराज होऊन तो ओरडला, ''इतकेजण आहात, पण उपयोग काय? एक दगड रस्त्यांतून हलवता येत नाही तुम्हाला? लवकर तो बाजूला सरकवा. राजाचा रथ कोणत्याही क्षणीं इथून आता जाईल. नालायक लेकाचे!''

त्यावेळेस तिथून एक घोडेस्वार जात होता. क्षणभर थांबून त्याने तिथले हे संभाषण ऐकले. तो प्रसंग पाहून तो घोडेस्वार त्या दलनायकाला म्हणाला, ''त्या दहा सैनिकांबरोबर तूही हात लावलास तर तो दगड हलवण्याचा प्रयत्न पुन्हां करता येईल कीं!''

''मी? मी तर ह्यांचा दलनायक आहे!'' दलनायकाने मोठ्या आढ्यतेने सांगितले.

त्याचे उत्तर ऐकून तो घोडेस्वार खाली उतरला आणि त्या सैनिकांच्याजवळ गेला. सैनिकांना प्रोत्साहन देत तो म्हणाला, ''चला रे सारे, मी अकरावा आलोय ना आता? चला, आपण पुरी शक्ती लावून हा दगड नक्कीच वाटेतून बाजूला ढकलूं शकूं.''

थोड्याच वेळांत सर्वांनी मिळून तो दगड हलवला. घोडेस्वार खूष होऊन पुन्हां आपल्या घोड्यावर स्वार झाला आणि त्याने दलनायकाला सांगितले, ''जर पुन्हां कधी रस्त्यांत पडलेल्या मोठ्या दगडांना हलवायची जरूर पडली तर आपल्या सेनापती वीरवर्माला निरोप पाठवून बोलाव!'' असं म्हणून तो वेगाने घोडा दौडवीत पुढे निघून गेला.

त्याचे बोलणे ऐकल्यानंतर दलनायक आणि सैनिकांना कळलं कीं तो दुसरातिसरा कुणी नसून खुद्द दुर्गापूरचा सेनापती वीरवर्माच होता.

–मनजीत सिंग



### नव्या वेताळ कथा

# स्वार्थी

निश्चयी राजा विक्रम पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने ते प्रेत झाडावरून खाली काढले व आपल्या खांद्यावर घेतले. निमूटपणें तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, ''राजन्, मी तुला अनेकवेळां सांगतो आहे कीं स्मशानामधें क्रूर जनावरें आहेत, भुतेंप्रेते आहेत आणि ती केव्हांही तुला त्रास देऊं शकतील. तुझ्या जीवाला त्यांच्यापासून धोका आहे. परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं तू माझ्या सांगण्याकडे लक्ष देत नाहीस. मी तुझा शुभचिंतक आहे हे तुला आता कळलं असेलच. तू संकटांच्या गर्तेत सांपडलेला आहेस ते मला पाहावत नाही. इतके कष्ट सहन केल्यानंतर जेव्हां तुला समजेल कीं ज्या व्यक्तीसाठी तू इतके कष्ट झेलतो आहेस, ती



व्यक्ती किती स्वार्थी आहे, विलासी आहे, लंपट आहे, त्यावेळेस तू निराश होणं साहजिकच आहे. माझी एकमात्र इच्छा आहे कीं आता तरी तू विचार बदलावास. म्हणून मी तुला स्पंदनदास नांवाच्या एका कवीची कहाणी सांगतो. लक्ष देऊन ऐक.'' आणि वेताळाने पुढील कहाणी सांगितली.

स्पंदनदास हा दुर्गापूरला राहात होता. तो तरुण होता आणि तऱ्हेतऱ्हेच्या कविता ऐकवण्यांत मोठा हुशार होता. मग ती कविता माणसांवर असो, जनावरांवरची असो, झाडांवरची असो किंवा दगडावरची असो! लोकदेखील त्याच्या कविता मोठ्या आवडीने ऐकत असत. व आनंदाने त्याला यथाशक्ती देणगी देत असत. अशा तऱ्हेने त्याचे आयुष्य आरामांत चालले होते. त्या गांवात त्याचे एक मोठे घर झाले. चार एकरांची शेती झाली आणि दहा हजार रुपयांची रोख रकम त्याने जमवली. त्याला वाटलं कीं आता इतकी सोय करुन ठेवलीय तर आपण आता लग्न करावे आणि सुखासमाधानाने संसार करावा. पण त्यावेळेस त्या प्रदेशांत दुष्काळ पडला.

दोन वर्षे त्या भागांत पाऊस पडला नव्हता. श्रीमंत मंडळींच्यावर त्याचा फारसा कांही परिणाम झाला नाही. त्यांच्याजवळ असलेल्या संपत्तिमुळें त्यांचे दिवस नेहमीसारखेच चालू होते. परंतु गरिबांची अवस्था मात्र कठीण होती. त्यांच्याजवळ कांहीच उरलं नव्हतं. अन्नाची नि पाण्याची कांहीही सोय नव्हती. ते गांव सोडून दुसरीकडे जायचा विचार करूं लागले. जगन नांवाचा एक तरुण दूरच्या प्रांतांतून हिंडून आला आणि गांवकऱ्यांना सांगू लागला, ''आता या गांवात आपल्यासाठी काय राहिलंय? आपल्याला राहायला योग्य असे फत्तेपूर नांवाचे गांव मी पाहून आलोय. तिथें काम करून आपण आपलं पोट भरूं शकूं.'' पण गांवातल्या वयस्कर मंडळींना त्याची विचारसरणी फारशी पटली नाही. त्यांना गांव सोडण्याची कल्पना पसंत नव्हती.

त्यांनी सांगितलं, ''तू सांगतो आहेस ते ठीक आहे, पण आम्हाला गांव सोडायची इच्छा नाही. स्पंदनदासच्या कविता ऐकल्याशिवाय आम्हाला चैन पडत नाही. तेव्हां एका अटीवर आम्ही गांव सोडून तुझ्याबरोबर येऊं. स्पंदनदासला तू आपल्याबरोबर येण्यास सांग, त्याचे मन वळव, मग आपण सारे बरोबर जाऊं.''

ही कल्पना जगनने स्पंदनदाससमोर मांडली आणि त्याला वस्तुस्थिती सांगून जगन म्हणाला, ''तू देखील चल आमच्याबरोबर. गांवातले लोक तुझ्याशिवाय गांव सोडून जायला तयार नाहीत.''

जगनचे बोलणें ऐकून स्पंदनदासचे मन भरून आले, तो लगेच गांवचा प्रमुख राजा चौधरी यांना भेटला आणि म्हणाला, ''आपण कांहीतरी करावं. गांवकरी गांव सोडून जायचा विचार करीत आहेत.'' त्यावर चौधरीने आपली असमर्थता व्यक्त करून



म्हटले, ''आपल्या दुर्दशेबद्दल मी महाराजांना अगोदरच कळवलंय, पण त्याचा कांही उपयोग झाला नाही. ज्यांना जायची इच्छा आहे, त्यांना जाऊं द्या ना! त्यांना थांबवण्यासाठीं आमच्याकडे कांहीच मार्ग नाहीं.''

स्पंदनदास गप्प बसला नाही. तो सरळ जगनकडे गेला आणि त्याला म्हणाला, ''आपण सगळे मिळून दोनशे जण आहात. तुमच्यासाठीं प्रत्येकाला रोजच्या पोटपूजेसाठीं म्हणून मी दररोज एकूण दोनशे रूपये देत जाईन, मी एकटा हा सारा खर्च उचलीन. म्हणजे कुणीही गांव सोडून जायची वेळ येणार नाही.''

त्याची सूचना ऐकून जगन आश्चर्यचकित झाला, व म्हणाली, ''तुझा दिलदारपणा फारच मोठा आहे रे! पण तू किती दिवस आमचं असं पालन पोषण करूं शकशील?''

''मी दोन दिवस साऱ्या गांवात फिरत राहीन. लोकांचे हाल स्वत: पाहीन, त्यांच्या कष्टप्रद जीवनावर कविता लिहीन, त्या कविता महाराजांना ऐकवीन. त्या ऐकल्यानंतर महाराजांचं मन जरूर हेलावेल. जर माझ्या कवितांमधे ही शक्ति नसेल तर मी कविता करण्याचा छंद सोडून देईन. मी समजेन कीं मी कवी नव्हेच! मी गांवात पुन्हां पाऊल ठेवणार नाही.''

आपल्या विचारानुसार स्पंदनदास दोन दिवस गांवात खूप हिंडला. लोकांची वाईट अवस्था पाहून त्याला स्फूर्ति आली आणि त्याने फारच छान कविता लिहील्या. त्यांत जनतेच्या हालअपेष्टांचे अतिशय हृदयद्रावक वर्णन होते. कठोर मनाच्या लोकांचे मतही पालटले असते, इतकी त्याची कविता प्रभावी होती. त्या कविता घेऊन तो राजधानीला गेला. रस्त्यांत त्याने मन हेलावणारी आणखी कांही दृश्यें पाहिली. त्यामुळें स्फुरण चढून त्याने आणखी कांही मनाला भिडणाऱ्या कविता लिहील्या.



जेव्हां तो महाराजांच्या दरबारांत जाऊं लागला, तेव्हां पहारेकऱ्यांनी त्याला अडवले. स्पंदनदासने त्यांना सांगितले, ''मी विष्णुभक्त आहे. राजा हा साक्षात् विष्णूचा अवतार असतो. जय विजय प्रमाणें तुम्ही मला आंत जाण्यापासून कां अडवत आहात? मी जर तुम्हाला शाप दिला तर तुम्ही पुढच्या जन्मीं राक्षस व्हाल. मग काय ते तुम्हीच ठरवा.'' त्याने कवितेतून त्यांना साद घातली.

पहारेकऱ्यांना त्याचा मोठेपणा व महत्व पटले आणि त्यांनी लगेच आंत जाऊन राजाला ही बातमी दिली. राजाने त्याला आदरपूर्वक आंत आणण्याची आज्ञा दिली.

स्पंदनदास दरबारांत आला, त्याने आपला परिचय दिला आणि दुर्गापूरच्या गांवकऱ्यांची दुर्धर अवस्था वर्णन करणारी आपली एक कविता त्याने ऐकवली. ते काव्य ऐकून राजा व दरबारांत उपस्थित असलेल्या सर्वांचे डोळे पाणावले.

थोड्याच वेळांत राजाने स्वत:ला सांवरले

ही गोष्ट राजाला सांगून वेताळाने प्रश्न केला, ''राजन, दुर्गापूरच्या ग्रामस्थांचा स्पंदनदास अतिशय लाडका होता, त्याच्याविषयी त्यांना आदर वाटत होता, दुष्काळाच्या वेळीं त्यांनी हट्ट धरला कीं जर स्पंदनदास त्यांच्याबरोबर दुसऱ्या गांवी गेला नाही, तर ते कोणत्याही परिस्थितींत गांव सोडायला तयार नव्हते. स्पंदनदासने आपल्या काव्यांत गांवाची कठीण परिस्थिति इतकी छान रंगवून मांडली होती कीं राजाचे मनदेखील द्रवले. राजाने गांवाला मदत केली आणि त्यांना वांचवले. इथपर्यंत सारं कांही ठीक आहे. पण जेव्हां गांवी परत जाण्याचा जगनने हट्ट केला, तेव्हां स्पंदनदासने त्याला सरळ नकार दिला. आणि राजाच्या दरबारांतच राहाण्याचा आपला निर्णय सांगितला. ही गोष्ट मला फार खटकली. मला वाटतं कीं तो फार स्वार्थी बनला होता. सुखोपभोगांसाठीं त्याने असं केलं असं तुला नाही वाटत? राजकवी म्हणून त्या स्थानावर राजधानींत राहाण्याचा त्याने निर्णय घेतला, याच्या पाठीमागे मला तर फक्त त्याचा स्वार्थ व महत्वाकांक्षाच दिसते. त्यासाठी त्याने दुर्गापूरच्या लोकांचे प्रेम व आदर यालाही महत्व दिले नाही. अशी व्यक्तीला स्वार्थी नाही तर दुसरे काय म्हणायचे? माझ्या शंकेच समाधानकारक उत्तर तुला माहीत असूनही जर तू मौन पत्करलेस तर तुझ्या मस्तकाची शंभर शकलें होऊन इकडे-तिकडे विखुरली जातील.''

त्यावर राजा विक्रमार्काने उत्तर दिले, ''साधारणतः कवीमंडळी आपली कल्पनाशक्ती आणि भाव यांच्या बळावरच कल्पनासृष्टींत विहार करीत राहातात. त्यांच्या कवितेचा प्रभाव, त्याचा परिणाम हे श्रोत्यांच्या मनावर अवलंबून असतं. स्पंदनदास-च्या कवितामुळें ग्रामवासी मंत्रमुग्ध होत असत. या काव्यामुळें यापेक्षां जास्त कांही गांवात होऊं शकलं नाही. परंतु त्याच कविता जेव्हां राजाने ऐकल्या, तेव्हां त्याचे फळ फारच निराळे झाले. त्या काव्यगायनाने केवळ कवीच्या गांवाचीच नव्हे, तर इतर दुष्काळग्रस्त गांवांची कठीण अवस्था राजाला कळली व त्यावर उपाययोजना झाली. हे प्रखर सत्य समजल्यानंतर स्पंदनदासला कळलं कीं आपली कविता केवळ आपल्या गांवच्या लोकांना आनंद देण्यापुरती नसून इतर गांवांच्या लोकांनाही आनंद देऊं शकेल. हा हेतू ध्यानांत घेऊन त्याने राजधानींतच राहायचा निर्णय घेतला. खरोखर जर विचार केला तर त्याच्या या निर्णयांत त्याचा स्वार्थ नसून परमार्थ आहे. सुखांचा उपभोग घेण्यासाठीं त्याने हा निर्णय घेतला असे समजणें चूक आहे.''

राजाचे मौन भंग झाल्यामुळें वेताळ शवासहित अदृश्य झाला व पुन्हां झाडावर जाऊन बसला.

**(श्री रामकमल यांच्या रचनेवर आधारित)**



ही गोष्ट राजाला सांगून वेताळाने प्रश्न केला, ''राजन, दुर्गापूरच्या ग्रामस्थांचा स्पंदनदास अतिशय लाडका होता, त्याच्याविषयी त्यांना आदर वाटत होता, दुष्काळाच्या वेळीं त्यांनी हट्ट धरला कीं जर स्पंदनदास त्यांच्याबरोबर दुसऱ्या गांवी गेला नाही, तर ते कोणत्याही परिस्थितींत गांव सोडायला तयार नव्हते. स्पंदनदासने आपल्या काव्यांत गांवाची कठीण परिस्थिति इतकी छान रंगवून मांडली होती कीं राजाचे मनदेखील द्रवले. राजाने गांवाला मदत केली आणि त्यांना वांचवले. इथपर्यंत सारं कांही ठीक आहे. पण जेव्हां गांवी परत जाण्याचा जगनने हट्ट केला, तेव्हां स्पंदनदासने त्याला सरळ नकार दिला. आणि राजाच्या दरबारांतच राहाण्याचा आपला निर्णय सांगितला. ही गोष्ट मला फार खटकली. मला वाटतं कीं तो फार स्वार्थी बनला होता. सुखोपभोगांसाठीं त्याने असं केलं असं तुला नाही वाटत? राजकवी म्हणून त्या स्थानावर राजधानींत राहाण्याचा त्याने निर्णय घेतला, याच्या पाठीमागे मला तर फक्त त्याचा स्वार्थ व महत्वाकांक्षाच दिसते. त्यासाठी त्याने दुर्गापूरच्या लोकांचे प्रेम व आदर यालाही महत्व दिले नाही. अशी व्यक्तीला स्वार्थी नाही तर दुसरे काय म्हणायचे? माझ्या शंकेच समाधानकारक उत्तर तुला माहीत असूनही जर तू मौन पत्करलेस तर तुझ्या मस्तकाची शंभर शकलें होऊन इकडे-तिकडे विखुरली जातील.''

त्यावर राजा विक्रमार्काने उत्तर दिले, ''साधारणतः कवीमंडळी आपली कल्पनाशक्ती आणि भाव यांच्या बळावरच कल्पनासृष्टींत विहार करीत राहातात. त्यांच्या कवितेचा प्रभाव, त्याचा परिणाम हे श्रोत्यांच्या मनावर अवलंबून असतं. स्पंदनदास-च्या कवितामुळें ग्रामवासी मंत्रमुग्ध होत असत. या काव्यामुळें यापेक्षां जास्त कांही गांवात होऊं शकलं नाही. परंतु त्याच कविता जेव्हां राजाने ऐकल्या, तेव्हां त्याचे फळ फारच निराळे झाले. त्या काव्यगायनाने केवळ कवीच्या गांवाचीच नव्हे, तर इतर दुष्काळग्रस्त गांवांची कठीण अवस्था राजाला कळली व त्यावर उपाययोजना झाली. हे प्रखर सत्य समजल्यानंतर स्पंदनदासला कळलं कीं आपली कविता केवळ आपल्या गांवच्या लोकांना आनंद देण्यापुरती नसून इतर गांवांच्या लोकांनाही आनंद देऊं शकेल. हा हेतू ध्यानांत घेऊन त्याने राजधानींतच राहायचा निर्णय घेतला. खरोखर जर विचार केला तर त्याच्या या निर्णयांत त्याचा स्वार्थ नसून परमार्थ आहे. सुखांचा उपभोग घेण्यासाठीं त्याने हा निर्णय घेतला असे समजणें चूक आहे.''

राजाचे मौन भंग झाल्यामुळें वेताळ शवासहित अदृश्य झाला व पुन्हां झाडावर जाऊन बसला.

**(श्री रामकमल यांच्या रचनेवर आधारित)**



# चलाख चिमणा

चिमणीताईने आपल्या चिमुकल्या छोट्या चिमणरावाकडे जरा काळजीनेच पाहिले. बाकीची सगळी पिल्लें उडायला शिकून बाहेर धान्य टिपायला गेली होती. फक्त हाच छोटा घरट्यांत थांबला होता. त्याचे मोठे गोल डोळे अतिशय निरागस आणि निष्पाप वाटत होते. चिमणीला वाटलं कीं ह्याला कांही स्वत:ची काळजी घेता येणार नाही.

तिने एक उसासा टाकला. ती शक्य तितका त्याच्यासाठीं प्रयत्न करणार होती आणि चिमणरावानेही जमेल तितकं करावं असं तिला वाटलं.

''चल रे बाळा!'' तिने त्याला प्रेमळपणे साद घातली, ''आता तुला उडायला शिकायचंय कीं नाही?'' ''होय आई'' आपले डोळे गरगर फिरवीत



त्याने उत्तर दिले आणि तिच्यामागून तो चालायला लागला.

त्याने रोज थोडे अंतर उडण्याचा सराव केला आणि तो चटकन तरबेज झाला. एकट्याने त्याने साऱ्या गांवातून चक्कर देखील मारली.

चिमणीताईला खरंच आनंद झाला. आता छोट्यालासुद्धां उडता येऊं लागलं कीं! पण त्याला या जगाची रहाटी कशी समजणार? तिला चिंता वाटू लागली. तिने त्याला कांही व्यावहारिक सल्लामाहिती देण्याचे ठरवले म्हणजे या अफाट दुनियेंत त्याचा निभाव लागला असता.

''आता तुझी देखभाल तू स्वत:च करायचीस. पण त्यापूर्वी मी तुला कांही अनुभवाचे बोल सांगणार आहे.'' तिने सांगितले. ''तू जर शेतांत असलास आणि जर तुला एखादा पुरुष किंवा मुलगा हातांत धनुष्यबाण किंवा गोफण घेऊन येताना दिसला, तर ताबडतोब उडून दूर जायचं!''

''हो, आई'' चिमणरावाने मान डोलावली ''कुणी जर खाली वांकून काम करीत असेल किंवा त्यांच्या हातांत कांही नसेल तर त्यांना भ्यायचं कांही एक कारण नाही.'' चिमणीताई पुढें सांगू लागली.

''पण जर त्यांच्या खिशांत दगडबिगड असला तर...?'' चिमणरावाने विचारले.

क्षणभर गप्प झालेली चिमणीताई म्हणाली, ''माझ्यापेक्षां तुला जास्त माहिती आहे. कीं रे! तू चांगला जगशील. जा पळ आता, माझ्या चिमण्या पांखरा!''





# गणेश पुराण

## ३. शंकराशी युद्ध

तारकासुराचा निरंकुश अत्याचार चालूच होता. त्याच बरोबर त्रिपुरासुर नांवाच्या तीन राक्षसांनी तपश्चर्या करून वर प्राप्त केले व आकाशात भ्रमण करीत फिरणारी तीन नगरे निर्माण करून त्रिलोकावर राज्य करण्याच्या हेतून ते तिन्ही लोकांवर चालून गेले. त्यांनी उल्कावृष्टी करून सुंदर हिरव्यागार नगरांना आग लावली आणि त्रिलोक विध्वंस करण्यासाठी कंबर बांधली. त्या राक्षसांचा शेवट करण्याची शक्ती एकट्या शंकरात होती. म्हणून सर्व देव शंकर-पार्वतीच्या अंत:पुरासमोर आले आणि शंकराला सांकडे घालून प्रार्थना करू लागले. शंकराला देवांचे ते सांकडे ऐकून आंतल्या आंत जळफळाट झाल्यासारखे वाटले. त्रिपुरासुरांनी जो मारणहोम प्रारंभिला होता त्याची गोष्ट ऐकून शंकराला त्वेष चढला व त्रिशूलावरची धूळ वगैरे झाडून शंकराने तो धारण केला. नंतर त्याने आपले अनुयायी नंदी, भृंगी, व सर्वांना बरोबर घेतले आणि त्रिपुरासुरांचा संहार करण्यासाठी निघाला.

त्याच वेळी आणखी एक राक्षस केसाळ हत्तीचे रूप घेऊन त्रिलोकाला त्रस्त करण्यासाठी निघाला. त्याला गजासुर हे नाव होते. तसा तो शंकराचा फार मोठा भक्तच होता. स्वत: शंकराशिवाय इतर कोणाच्याही हस्ते त्याला मरण येणार नाही, असा वर त्याने मिळविला होता.

नारदाने त्याला भेटून त्याला सल्ला दिला की त्याने शंकराला आपल्या हृदयांतच कायमचे ठेवून घेतले तर त्याचे हित होईल. गजासुराला तो सल्ला पटला व त्याने उग्र तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न केले. शंकर त्रिपुरासुरांच्या वधासाठी निघाला होता



आणि तो गजासुराच्या इच्छेप्रमाणे गजासुराच्या हृदयांत वास करून राहू लागला.

"शंकर गजासुराच्या हृदयांतच राहू लागला तर त्रिपुरासुरांचा वध कसा होणार? पार्वतीच्या मनाचे समाधान तरी कसे होणार? शंकरपार्वतीच्या पोटी जन्मलेल्या मुलाच्या हातीच तारकासुराचा वध होणार!" असे म्हणत सर्व देव हताश होऊन बसले असतां नारद म्हणाला-"शंकर म्हणजे वाढते लिंगच की नाही!" ती सूचना देवांना कळली. देव गजासुर होता तेथे जाऊन शंकराचे स्तोत्र गाऊ लागले.

गजासुर शंकर भक्तच होता. तो सुद्धा शंकराचे स्तोत्रगान ऐकून डोलूं लागला. शिवलिंग स्तोत्र चालू असता वाढू लागले, इतके की शेवटी गजासुर उभा चिरला गेला. शंकर बाहेर आला. गजासुराने डोळे मिटताना म्हटले-"देवा! मी तुझ्यावर भरंवसा केला होता आणि तू हे काय केलेस रे?" तेव्हां शंकर म्हणाला-"गजासुरा! शिवभक्तीचे एक उदाहरण म्हणून तुझी कीर्ती रहावी यासाठी गजमुख सर्वदा माझ्याजवळ राहील व मी नेहमी गजचर्मच धारण करीन." असे सांगून शंकराने गजासुराला कैलासलोक दिला.

शंकराने पृथ्वीचा रथ केला. चंद्रसूर्यांना त्या रथांची चाके केली, चारही वेदांना रथाश्व केले. ब्रह्मदेवाला सारथी केले, मेरु पर्वताचा धनुष्य केला आणि विष्णूला बाण केले. नंतर आपले अनुयायी नंदी, शृंगी, भृंगी वगैरे प्रथम गणांना बरोबर घेऊन त्रिपुरासुरावर स्वारी करायला निघाला. तेहतीस कोटी देव सपरिवार शंकर त्रिपुरासुरांचा संहार कसा करतो, पहायला पाठोपाठ निघाले.

घरात पार्वती एकटीच होती. तिला प्रत्येक क्षण वर्षासारखा वाटत होता.

अशा समयी नारद येऊन पार्वतीला म्हणाला-"मुली पार्वती! शंकराने तुझ्याशी लग्न केले तेव्हांपासून तारकासुर तुला कसा त्रास द्यायचा याच विचारात आहे. तुझ्यावर कोणत्या प्रकारचे संकट येईल सांगणे कठीण आहे. त्या तारकासुराला वज्रदंताची मदत आहे. वज्रदंत भयंकर मायावी आहे. म्हणून तू फार काळजीपूर्वक राहिले पाहिजेस, बरं का!" नारदाने पार्वतीला या शब्दात सावध करून ठेवले.

पार्वती काळजीत पडली. चांगले न्हाऊन घेतले तर कदाचित् मनाचा ताप कमी होईल असे पार्वतीला वाटले.

पार्वतीने तेल लावून डाळीचं पीठ व इतर उबटनाची द्रव्यें अंगाला चोळून लावली व अंगाचं



उबटन काढून एक गोळी केली व त्या गोळीचा एक बाहुला केला व तो पाहून तिला आनंद झाला. तिने तो बाहुला खाली ठेवून जरा नजर फिरविली असेल नसेल, त्या बाहुल्यात बदल होऊन गोड बोबडे बोलणारा एक मुलगा तिला दिसला. "कोण रे बाळा तू?" पार्वतीने गोड शब्दात विचारले.

"तुझ्या लावण्याच्या उबटनाची गोळीच नाही का ग आई मी ! मी तुझाच मुलगा पुत्रगणपती!" तो मुलगा म्हणाला. पार्वतीने त्या मुलाला उचलून त्याचे मुके घेतले व त्याच्या हातात एक अंकुशाचा दांडा दिला व म्हणाली- "बाळा रे! तू कीडमुंगीलाही आंत येऊ देऊ नकोस!" असे सांगून त्या मुलाला घराच्या सिंहद्वाराबाहेर उभे केले.

"आई, पण तू कांही खायला नाही देणार का?" त्या मुलाने माता पार्वतीला विचारले. पार्वतीने लगेच पिठी मळून तिचा मोदक करून त्या मुलाला दिला.

पार्वतीला पळवून नेले तर आपल्याला प्राणभय रहाणार नाही, असा विचार करून तारकासुराने वज्रदंताला पार्वतीचे अपहरण करून आणायला पाठविले. वज्रदंताचे दांत म्हणजे वज्रालचे सुद्धां चूर्ण करणारे होते. त्याने उंदराचे रूप धारण केले आणि डोंगर उकरून काढीत तो निघाला. म्हणून त्याला मूषकासुर हे ही नांव मिळाले. पार्वतीचे अपहरण करण्यासाठी त्याने कर्णी व गोकर्णी नांवाच्या आपल्या दोघां अनुयायांना पाठविले.

ते दोघे सिंहद्वाराजवळ गेले व चोर दृष्टीने पहात सिंहद्वारासमोर अंकुशाचा गदादंड धारण करून पाहारा देत असलेल्या मुलाला म्हणाले- "येरे आपण खेळूं या!"



तो बालक, जणूं कांही त्यांच्याकडे न पाहिल्यासारखा हंसत म्हणाला-"थोडे खाऊन घ्या रे!" असे म्हणत त्याने दोन मोदक त्यांच्या अंगावर फेकले. ते त्यांच्या डोक्यांना इतक्या जोराने लागले की त्यांची डोकी गरगर फिरल्यासारखी झाली. पुत्रगणपतीने त्यांना बोलाविले व दरडावून म्हणाला-"आपले कान स्वतःच्या हाताने पिळून घ्या आणि थोबाडीत मारून घेऊन मग कोठे ते जा!" त्यांनी त्याप्रमाणे केले व वज्रदंत राक्षसाकडे धावत गेले आणि धांपा टाकीत झालेला वृत्तांत सांगितला.

वज्रदंताने जोराने हुंकारून मूषक रूप धारण केले आणि सिंहद्वाराच्या खालून बीळ करून तो आंत जाऊ लागला. पुत्रगणपतीने कमरेच्या करगोटयाचा फांस करून त्या मूषकावर टाकला. तो पाश मूषकासुराच्या ठीक गळयांतच जाऊन



पडला. मूषकासुर 'किचकिच' करीत असतां त्याच्या डोक्यावर दोन ठोसे दिले आणि त्याची शेपटी धरून त्याला गरगर फिरवून दूर फेकून दिले.

चित्रगणपतीने दूर फेकून दिलेला तो मूषकासुर स्वस्वरूपात सरळ त्याच्या राज्यांतल्या अंतपुरासमोर धाडदिशी जाऊन पडला. त्याची बायको धवला फार मोठी भक्तीण होती. तिने आपल्या डोक्याचे कुंकू शाश्वत रहावे म्हणून देवीची आराधना करून तसा वर प्राप्त केला होता. धवला धावत पतीजवळ गेली व त्याचे सांत्वन करून तिला तसा वर प्राप्त असल्याचे तिने सांगितले. नंतर तिने पार्वतीच्या वाटेला कधी न जाण्याचेही पतीला बजावून सांगितले.

त्रिपुरासुरांचा संहार करून पार्वतीला जाऊन भेटण्याच्या हेतूने घाईघाईने शंकर घरांत जाऊ लागला तेव्हां त्या बालकाने शंकराला अडविले. शंकर चकितच झाला त्याने त्या बालकाला करड्या स्वरांत विचारले-"कोण रे तू?"

तो बालक खदखदां हसत म्हणाला-"मी का? आईचा मुलगा! तू आंत कीडमुंगीलाही येऊं देऊं नकोस, असे माझ्या आईने मला सांगितले आहे!"

"मी परमेश्वर आहे!" शंकर म्हणाला.

"मला कोणत्याही देवाची फिकीर नाही. माझी आई प्रकृती स्वरूपिणी आहे. आईच्या आज्ञेचे पालन करणे, एवढे एकच कर्तव्य मला माहीत आहे!" तो बालक म्हणाला.

त्रिपुरासुराचा वध करून शंकर परतला. त्याच्या थोडे पाठीमागून नंदीभृंगी शंकराच्या पराक्रमाचे स्तोत्र गात येत होते. शंकराचा 'जयजयकार' करीत तेहतीस कोटीदेवही येत होते. ते थक्क होऊन शंकराचा एका लहानशा बालकाशी वाद चालू असलेला ऐकू व पाहू लागले.

"अरे, तुला देवबीव काही माहीत नाही म्हणतो आहेस! सृष्टीचे मूल कारण परब्रह्म आहे! तोच देव होय!" शंकर म्हणाला.

"तू एवढा मोठा दिसतो आहेस, परंतु तुला कांहीच माहीत नाहीसे दिसतं आहे! आदिशक्तीने सर्व विश्वाची आणि त्रिमूर्तींची सृष्टी केली!" असे म्हणत तो बालक सांगू लागला:-

"आदिशक्तीने आपले रूप लावण्य खर्ची घालून ब्रह्मदेव, विष्णू व महेश यांची सृष्टी केली. तिने आपल्या लावण्यातील रक्तवर्ण, नीलवर्ण व शुभ्रवर्ण कांतीने अनुक्रमें तिघांची सृष्टी केली. ब्रह्मदेव कीं विष्णू, दोघांनी देवीने त्यांना आज्ञा





केली, त्या आज्ञेचे उल्लंघन केले. तेव्हां देवीने आपला तिसरा डोळा उघडून त्यांना भस्म करून टाकले. महेश हा आज्ञाधारक मुलगा होता. त्याने देवीजवळ तिचा तिसरा डोळाच मागितला. देवीने तो काढून त्याच्या कपाळावर चिकटविला. त्याने लगेच तो उघडून तिला भस्म केले. ती जळत असता अग्नीच्या ठिणग्या व निखारे उडू लागले व त्यांची तेजस्वी मंडळे दिगंतात व्यापली. राखेने सर्व विश्व व्याप्त झाले. देवी पूर्ण रूपे भस्म झाल्यावर पुन्हां स्वस्वरूपात प्रगट झाली. म्हणून तिला महामाया, महाशक्ती ही नांवे प्राप्त झाली. तिने शंकराची स्तुती करून त्याला सृष्टीचा लय करण्याची शक्ती दिली. ब्रह्मदेव व विष्णूला तिने त्यांच्या भस्मस्थितीतून बोलाविले व ते पुन्हां स्वस्वरूपात प्रगट झाले. देवीने तिची जी राख उरली होती तिचे तीन भाग केले व सरस्वती, लक्ष्मी आणि उमाची सृष्टी केली. सरस्वती ब्रह्मदेवाची, लक्ष्मी विष्णूची आणि उमा शिवशंकराची अर्धांगी करून देऊन देवी अंतर्धान पावली.

"तू सांगितलीस ती केवळ कपोल कल्पित कथा आहे!" शंकर म्हणाला.

"मी सांगितली ती तू केवळ कपोल कल्पित कथा म्हणत असशील तर परब्रह्मदेव वगैरे तू म्हणालास तो कोरा वेदांतच होता! ही सर्व सृष्टी देवाच्या पोटी जन्माला आली असे म्हणण्याऐवजी आदिशक्तीच्या पोटी जन्माला आली असे जास्त खरे वाटत नाही का?" त्या बालकाने विचारले. तो म्हणाला, ते तेथे हजर असलेल्या पुरुषांनी ऐकले

आणि त्यांची तोंडे उतरली. एकटा विष्णू त्याचे कौतुक केल्यासारखा स्मित करू लागला. तेथे ज्या देवी व इतर स्त्रिया होत्या त्यांच्या तोंडावर स्मित झळकू लागले.

शंकर संतापून म्हणाला- ''तुला पाहून तर तू अगदी अबोध बालक दिसतोस! शहाण्यासारखा दारावर आडवा न राहता बाजूला सरक पाहू!'' रागाला दाबून ठेवलेल्या आवाजात शंकर म्हणाला. ''माझ्या जीवांत जीव असेपर्यंत तुला मी आंत जाऊ देणार नाही!'' तो मुलगा म्हणाला. शंकराने टाळी वाजवून आपल्या प्रमथगणांना खूण केली.

बालक हसत म्हणाला- ''मला अबोध बालक म्हणून तू मोठा कल्पेचा आव दाखविला होतास आणि माझ्यावर बल प्रयोग करायला आपल्या प्रमथगणांना पाठवीत आहेस, हे बरोबर आहे का? बरं तर ठीक आहे, मी गणाधिपती आहे!'' असे म्हणत त्या बालकाने हातातल्या अंकुशाने जमिनीवर प्रहार केला. भूमी दुभंगल्यासारखी होऊन पुत्रगणपतीचेच रूप असलेले सहस्रावधी पुत्रगणपती जमीन फोडून वर आले व त्यांनी आपापल्या अंकुश, गदा, पाश व शूल वगैरे शस्त्रास्त्रांनी नंदी, शृंगी, भृंगी व चंडीश्वर आदिकांना, गुरांना हांकून पळवून लावतात असे पळवून लावले. ते पाहून इतर प्रमथगण वाट फुटेल तिकडे पळून गेले. पुत्रगणपतीचे गणही अदृश्य झाले.

शंकराने रौद्र रूप धारण केले आणि त्रिशूल हाती धरला. बालकाने अंकुशाच्या दांड्याने त्रिशूलावर प्रहार करताच त्रिशूल 'ख..पण!'' असा आवाज करीत जमिनीवर आदळले. बालक खदखदा हसत म्हणाला-''माझ्या आईने माझ्या हातांत दिलेला दंड हातांत असेपर्यंत तुला कांही करता येणार नाही. तुझ्या मनांत जे कांही करावयाचे आहे ते निर्विघ्नपणे व्हावे यासाठी मी पूर्णपणे तयार आहे, बघ! त्यानंतर जे कांही व्हावयाचे असेल ते माझी आई पाहून घेईल!'' असे म्हणत त्याने आपल्या हातातला अंकुश, गदा इत्यादी दूर फेकून दिले. शंकराने आपले त्रिशूल उचलून बालकाच्या कंठावर फेकले. तत्क्षण बालक ''आई!'' अशी मोठ्याने हाक मारीत असतां त्याचे डोके उडून आकाशांत उडाले व प्रकाशाचा झोत अखिलब्रह्मांडात फेंकीत अंतरिक्षात लीन झाले.







# भविष्यवाणी

चंद्रगिरीचा राजा चतुरवर्मा नेहमी हंसत असायचा आणि दुसऱ्यांनाही हंसवत राहायचा. त्याला वाटायचं की जीवन क्षणभंगुर आहे. कोणत्याही क्षणीं माणसाचा मृत्यू होऊं शकेल. माणूस कांही या भूमीवर अमरपट्टा घेऊन आलेला नाही. म्हणून त्याने येणारा प्रत्येक क्षण आनंदाने घालताना, त्याला नेहमी नव्यानव्या गोष्टींमधें रस वाटत असे.

एक दिवस संध्याकाळच्या वेळीं राजा व राणी बागेमधें फिरत होते. अचानक राजाने राणीला म्हटलं, ''ही झाडें आणि फुलें आपण रोजरोज पाहात असतो. त्यांत कांहीही नाविन्य नसतं. तू मला कांहीतरी असं सांग, कीं त्यांत कांहीतरी नवं असेल.

राजाचे हे बोलणें ऐकून राणी हंसतच म्हणाली, ''तुम्हीही कांहीतरीच बोलता आहात हं! दररोज नवीन कांहीतरी मी कुठून आणूं? नि काय सांगू?''

राजा विचारांत पडला. थोड्या वेळाने तो म्हणाला, ''तर मग आपण असं करूं या! आत्ता आपण इथल्या माळ्याच्याबरोबर जरा वेळ गप्पा मारूं या! जराशी निराळी गंमत होईल.'' झाडांना पाणी घालीत असलेल्या माळ्याला त्याने बोलावले.

माळी धांवतच तिथे आला. राजासमोर तो हात जोडून उभा राहिला. राजाने आपल्या गळ्यांतला मोत्यांचा हार माळ्याला दिला. अचानक बक्षीस मिळालेला हा हार पाहून माळ्याला काय वाटतंय ते जाणून घेण्याची राजाला इच्छा होती. पण माळ्याने त्यावर कांहीच प्रतिक्रिया दर्शवली नाही. त्याने निमूटपणें तो हार आपल्या कपड्यांत नीट गुंडाळून लपवला आणि तो जाण्यासाठी निघाला.

त्याचे हे वर्तन पाहून राजा चकित झाला. त्याने माळ्याला विचारले, ''अरे, मी तुला कांहीही कारण नसताना हा किंमती हार दिला. तरीही तुला आनंद वाटलेला दिसला नाही, किंवा आश्चर्य वाटलेले दिसले नाही. असं कां?''

''महाराज, मला अगोदरच माहिती होतं कीं आज ना उद्यां आपण मला हा हार देणार म्हणून !'' माळ्याने उत्तर दिले.

- नरेंद्र ठकर -



त्याच्या या बोलण्याचे आश्चर्य वाटून राजाने त्याला विचारले, "तुला अगोदरच हे माहिती होतं? हे कसं शक्य आहे? तुला कुणी सांगितलं हे?"

"ही एका मुनीवर्यांची भविष्यवाणी आहे, महाराज." माळ्याने खुलासा केला. तो पुढे सांगू लागला. "चार दिवसांपूर्वी मी पूर्वेकडच्या डोंगरातल्या माझ्या गांवी गेलो होतो. गांवकऱ्यांनी मला सांगितलं कीं तिथें एक मुनीश्वर आले आहेत आणि त्यांनी सांगितलेलं भविष्य तंतोतंत खरं ठरतं! मी त्या मुनींच्या दर्शनाला गेलो. मला बघून त्यांनी आपल्या हातांतला दंड वर उचलला आणि म्हणायला लागले," तू मोठा भाग्यवान आहेस बाबा. लौकरच महाराज तुला एक किंमती हार देणार आहेत."

हे सांगून माळी पुढें म्हणाला, "महाराज, आपण जेव्हां मला बोलावणं पाठवलंत ना, तेव्हांच मी समजलो कीं आपण मला हार देणार आहात."

त्याचे बोलणें ऐकून राजा थक्क झाला. राणीने मोठ्या आतुरतेने राजाला सांगितलं "चला, आपणही या मुनीवर्यांचं दर्शन करूं या."

राजा कांही बोलणार त्यापूर्वीच माळी म्हणाला, "ते स्त्रियांना दर्शन देत नाहीत."

हे ऐकून राणी जरा काळजींत पडली आणि तिने राजाला सांगितलं, "या महर्षी मुनीवर्यांचे विचार कधीकधी आपल्यासारख्या सर्वसाधारण माणसांना समजत नाहीत. मी नाही जाऊं शकत तरी काय झालं? आपण त्यांचे दर्शन घ्यायला अवश्य जावं."

राजाला कांही राणीचा विचार फारसा पटला नाही. तो म्हणाला, "देवी! आपलं भविष्य जर आपल्याला अगोदर कळलं तर आयुष्यांत कांही मजाच राहाणार नाही."

"आपण असं कां मानता? आपले जीवन आपण जास्त चांगल्याप्रकारें व्यतीत करूं शकूं कीं! आपण जायलाच हवं!" राणीने हट्ट धरला.

राणीचं मन राजाला मोडवेना. दुसऱ्याच दिवशी रथांत बसून तो मुनीवर्यांच्या दर्शनाला गेला. पण संध्याकाळीं राजा जो परतला तो काळजीयुक्त चेहरा करुनच आला. त्याच्या चेहऱ्यावर चिंता स्पष्ट दिसत होती. राणीने कितीवेळां तरी त्याचे कारण विचारले. परंतु राजाने मौन पाळले होते. कांहीही उत्तर त्याने द्यायचे टाळले.

"आपण माझ्यापासून कांहीतरी लपवत आहात. त्या मुनीवर्यांनी काय सांगितलंय ते सांगा. माझी शपथ आहे, आपण सांगितलंच पाहिजे."



राजाचा हात आपल्या मस्तकावर ठेवीत राणीने निर्धाराने सांगितले.

तेव्हां राजाने जे घडलं ते हळू आवाजांत सांगितलं. राजाच्या पायांतली रत्नखचित पादत्राणें पाहून मुनीवर्यांनी म्हटले, "राजन्, लौकरच तुमची अगदी दयनीय स्थिती होणार आहे. इतकेंच नव्हे तर तुमच्या पायांतली पादत्राणें देखील राहाणार नाहीत. पादत्राणांसाठी तुम्हाला दुसऱ्यांच्यासमोर हात पसरावा लागेल. एक भिल्ल तरुण येऊन पुन्हां तुमचा मुकुट मस्तकांवर ठेवील."

मुनीवर्यांची भविष्यवाणी ऐकून राजाचा भितीने थरकांप झाला. त्याला वाटलं कीं त्याच्या पायाखालची जमीनच सरकते आहे. कांहीही न बोलता, तो मुकाट्याने परत फिरला.

"देवी! मुनींच्या भविष्यवाणीवरून मला तर असं वाटतंय कीं एखादा पराक्रमी राजा आपल्या राज्याबर आक्रमण करणार असावा बहुतेक! आपला पराजय होईल आणि आपल्याला अरण्यांत अनवाणी फिरावं लागेल असं दिसतंय! आता तो भिल्ल तरुण आपल्याला केव्हां भेटेल आणि आपले राज्य केव्हां परत आपल्याला मिळेल ते तर सांगता येत नाही." राजाने मोठ्या दुःखी आवाजांत सांगितलं.

हे ऐकून तर राणीची अवस्था फारच कठीण झाली. काय करावं ते तिला कांही सुचेना. ती म्हणाली, "आपण त्या मुनीवर्यांना विचारायचं तरी, कीं या संकटांतून बाहेर येण्याचा एखादा उपाय आहे कां म्हणून? आपल्याला पूजाअर्चा, जपजाप्य, असं कांहीतरी करावं लागेल. परत एकदा आपण त्यांच्याकडे जावं आणि विचारून यावं."

दुसऱ्याच दिवशीं राजा पुन्हां मुनींना भेटायला निघाला. वाटेतल्या अरण्यांत त्यावेळेला एक वाघ एका हरिणाचा पाठलाग करीत होता. वाघ रथाच्या समोर नेमका आला. वाघाला पाहून घोडा घाबरला



आणि रथाला खेंचत खेंचत जवळच असलेल्या चिखलाच्या खड्ड्यांत रथासकट पडला. राजा रथांतून खाली चिखलाच्या दलदलींत पडला रथाच्या सारथ्याने घोड्याला आवरायला खूप प्रयत्न केला, पण त्याला ते जमले नाही. उलट तोंच दुसऱ्या बाजूला जाऊन पडला.

राजाची पादत्राणें दलदलींत रुतली. त्यांतून तो बाहेर आला आणि अनवाणीच पुढें चालूं लागला. रस्त्यांत कांटे विखुरले होते. ते बाजूला करीत तो त्याजवळ आला. त्याने सारथ्याची पादत्राणें घेतली आणि पायांत चढवली.

त्याच वेळेला एक भिल्ल तरुण आपले धनुष्यबाण घेऊन तिथून जात होता. झाडांच्या बुंध्यात राजाचा मुकुट त्याला दिसला. त्याने तो उचलला आणि आपल्या दुशेल्याने तो स्वच्छ पुसला. राजाच्या मस्तकावर तो मुकुट त्या तरुणाने ठेवत विचारले, "महाराज, आपल्याला कुठे लागलं बिगलं तर नाही ना?"

प्रहरभरांतच सारथ्याने रथ सरळ केला आणि राजाच्यासमोर आणून उभा केला. राजा रथांत बसला आणि म्हणाला, "आता आम्हाला मुनीवर्यांकडे जायचं नाही. सरळ राजवाड्याकडे चल."

अंधार पडायच्यावेळीं राजा राजवाड्यांत पोंचला. राजाचे कपडे चिखलाने लडबडलेले पाहून राणीने कांपऱ्या आवाजांत विचारलं, "हे काय झालंय? आपल्या वस्त्रांवर ही घाण कशी उडली?" राजाने सारी कहाणी सविस्तर सांगून राणीला म्हटले, "खरोखरच मुनीवर्यांची वाणी तंतोतंत खरी ठरली. त्यांनी म्हटलं होतं. अगदी तस्संच झालं. पण भविष्याचा विचार करीत मी उगीचच अनेक अनावश्यक कल्पना मनांत घोळवल्या आणि त्याचा विचार करताना मला ज्या मानसिक यातना झाल्या, त्यांचे वर्णन करणेंही अशक्य आहे. भविष्य माहीत नसल्यामुळेंच जीवनांत आनंद आहे. तेच सर्व सुखांचे कारण आहे."

राणीनेही याला दुजोरा देत म्हटले, "ही लहानशी गोष्ट कळायला हवी म्हणून आपल्याला किती यातना सहन कराव्या लागल्या आहेत! मीही किती उतावीळ झाले होते उगीचच!" असं म्हणून तीही हंसायला लागली.







# नोकराने शिकवलेला धडा

देवशास्त्री अनेक वर्षे शिक्षक होते. ज्या दिवशीं ते सेवानिवृत्त झाले. त्या दिवशी त्यांच्या सत्कारासाठीं एक सभा झाली. त्यांत प्रत्येक वक्ता त्यांच्या अफाट ज्ञानाबद्दल त्यांची भरपूर प्रशंसा करीत होता. देवशास्त्र्यांइतकी ज्ञानी, बुद्धिमान व्यक्ती आसपासच्या प्रांतात कुणीही नव्हती. आपली स्तुती ऐकून शास्त्रीबुवा फारच खूष झाले.

संध्याकाळी घरी परत आल्यानंतर त्यांना मिळालेली शाल व पुष्पहार त्यांनी आपल्या पत्नीला, सावित्रीला दाखवीत म्हटले, "सावित्री, मी एक ज्ञानी, बुद्धीमंत, प्रकांड पंडित आहे यांत संदेह नाही. पण बराच काळ माझ्या मनांत एक शंका घर करुन बसली आहे. मी एवढा बुद्धिमान असून माझ्या वर्गांत इतके कमी विद्यार्थी कां असतात?"

"कदाचित तुम्ही त्यांना चिंचेच्या फोकाने मारत असाल" सावित्रीने म्हटले. "छे छे, असा विचारदेखील मी कधी करत नाही. मी कधीही चिंचेचा फोक किंवा काठी वापरलेली नाही." देवशास्त्रींनी ठांसून सांगितलं.

"मग तुमच्या भरघोस मिशा पाहून तर मुलं घाबरत नाहीत ना? तुमच्या घाबरवणाऱ्या मिशा पाहिल्या कीं मला आपल्या लग्नानंतर मी तुम्हाला प्रथम पाहिलं त्याची आठवण येते. मी तर भेदरून गेले होते अगदी!" सावित्रीने हंसतहंसत सांगितलं.

नोकरींतून निवृत्त झाल्यानंतर शास्त्री आपल्या गांवी राहायला गेले. कारण आता शहरांत राहाणें म्हणजे तितका खर्च त्यांना झेंपला नसता. त्यांच्याजवळ कांहीं अशी फार मोठी रक्कम शिल्लक नव्हती की त्याच्या जोरावर उरलेले दिवस आरामांत चालवता आले असते! सकाळपासून संध्याकाळपर्यंत घरांत बसून त्यांनी पुस्तकें वाचायचा सपाटा लावला आणि वाचनांत वेळ घालवायला सुरवात केली.

त्यांचा हा दिनक्रम पाहून एक दिवस सावित्री त्यांना म्हणाली, "नुसतं ज्ञान जमवीत बसण्यांत



काय फायदा? ते ज्ञान इतरांच्यात जर वाटलंत तर त्याचं सार्थक होईल. असं म्हणतात कीं ज्ञान ही अशी एक संपत्ती आहे, जी कितीही वांटली तरी कमी होत नाही. या गांवात अनेक प्रौढ अशिक्षित लोक आहेत. त्यांना तुम्ही शिकवा आणि कांहीं उपयोगाच्या गोष्टी सांगा! त्याने गांवात तुमचा मान राहील आणि थोडंफार पुण्यही पदरीं पडेल.''

देवशास्त्र्यांना सावित्रीचें हे बोलणें पटलें. ते स्वतः अशिक्षित लोकांच्या घरी गेले आणि त्यांनी सांगितलं कीं विजयादशमीपासून कांहीही पैसे न घेता ते सर्वांना फुकट शिकवतील.

विजयादशमीचा दिवस उजाडला. रात्रीचे भोजन केल्यानंतर ते पुस्तकें घेऊन शाळेंत गेले. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे तिथें फक्त एकच माणूस बसलेला होता. गांवच्या मोठ्या ठाकुरांचा नोकर रामू!

गांवकऱ्यांनी दाखवलेली उपेक्षा बघून देवशास्त्री फार दुःखी झाले. लोक उशीरां येतील असं समजून ते मोठ्या आशेने त्यांची वाट पाहात बसले. पण जेव्हां कुणीच आलं नाही, तेव्हां त्यांनी रामूला सांगितलं, ''तुला एकट्यालाच मी कशाला शिकवत बसूं? मी निघतो!''

पण रामूने शास्त्रीबुवांना थांबवलं आणि म्हटलं, ''गुरुजी, जरा माझं म्हणणं ऐका. मी जेव्हां गुरांना चारा घालायला जातो, तेव्हां जरी तिथें एकच वासरुं असलं तरी त्याचं चारापाणी केल्याशिवाय परत येत नाही. त्या वासराला मी जरुर चारा देतो.''

त्याच्या बोलण्यांतला मतितार्थ शास्त्रींच्या लक्षांत आला. शिकायचा त्याचा उत्साह पाहून ते खूष झाले. माणसाच्या जीवनांत शिक्षणाला किती महत्व आहे ते त्याला पटवून दिलं. व अनेक विषयांची तोंडओळख करून दिली. त्यांनी त्याला



अक्षरें लिहायला शिकवली आणि तृप्त होऊन ते घरी परत आले.

दुसऱ्या दिवशीं रात्रीचे जेवण उरकून बरीचशी पुस्तकें घेऊन ते शाळेंत पोंचले. पण रामू कांही आज आलेला नव्हता. ते पाहून त्यांना खूप आश्चर्य वाटलं. ते नाराज झाले आणि रामू कां आला नाही ते पाहायला मोठ्या ठाकुरांच्या घरीं गेले.

बाहेरच्या ओट्यावर रामू झोंपला होता. शास्त्रींनी त्याला उठवले आणि विचारले, ''अरे अभाग्या, एकाच दिवसांत शिकून तुझं मन संतुष्ट झालं? काल मोठ्या फुशारक्या मारीत होतास कीं एकच वासरुं असलं तर काय झालं, त्याला चारापाणी करायला हवंच म्हणून? मी तुझ्या बोलण्यावर विश्वास ठेवला, तुझं म्हणणं खरं मानलं आणि काल तुला मी किती तरी गोष्टी सांगितल्या, कितीतरी विषय शिकवले. पण आज तर तू त्या बाजूला फिरकलादेखील नाहीस.'' त्यांनी आपली नाखुषी सरळसरळ व्यक्त केली.

रामूने विनयपूर्वक हात जोडून म्हटलं, ''गुरुजी, मला माफ करा. मी तर म्हटलं होतं कीं एकट्या वासरालादेखील मी चारा भरवीन. त्याच्या तोंडात चारा कोंबीन असं म्हटलं नव्हतं.''

त्याच्या बोलण्याचा शास्त्रींच्या मनावर खोल परिणाम झाला. चाबकाचे फटकारे मारावेत त्याप्रमाणें त्याचे बोल त्यांना झोंबले. आत्ता त्यांच्या लक्षांत आलं कीं त्यांच्या वर्गात इतके कमी विद्यार्थी कां असत ते! शिकवणारा कितीही हुशार असला, खूप शिकलेला असला आणि मोठा विद्वान असला, तरी देखील समोरच्या विद्यार्थ्याची कुवत, ग्रहणशक्ती पाहूनच त्याला कसं आणि किती शिकवता येईल याचा अंदाज त्या शिक्षकाला असायला हवा. तरच शिकणाऱ्याला त्यांत रस वाटेल, समोरचा विद्यार्थी शिकण्यांत उत्सुकता दाखवेल आणि त्याला शिकायची इच्छा होईल. त्याला जितके समजते, झेंपते, तेवढेच त्याला शिकवायला हवे.

देवशास्त्रींना आपल्या शिकवण्यांतली त्रुटी त्याक्षणीं समजून चुकली. त्यानंतर मात्र गांवातल्या अनेक प्रौढ, वयस्कर अशिक्षित मंडळींना त्यांनी साक्षर केले. शास्त्रींच्या फावल्या वेळाचा त्यांनी असा सदुपयोग केला.





# अहंकार

बावला गांवात शिवज्ञान पंडित राहात होते. ते केवळ अतिशय उच्च श्रेणीचे पंडितच नव्हे, तर ते महाज्ञानी होते. त्यांच्या गांवातले सारे लोक व आजूबाजूच्या गांवातले सारेजण त्यांचा आदर करीत. त्यांच्या घरांत गहन विषयावर सदैव चर्चा होत असत.

पार्वती ही त्यांची एकुलती एक मुलगी होती. तीही विदुषी होती. कोणत्याही विषयाचे सूक्ष्म आकलन इतरांच्यापेक्षां तिला चटकन समजत असे. कांही दिवसानंतर तीदेखील घरांत चालणाऱ्या चर्चांमधे भाग घेऊं लागली. आपल्या विद्वत्तेने आणि हजरजबाबी वाणीने तिने मोठमोठ्या विद्वान पंडितांना हरवले होते.

शिवज्ञान पंडितांनी कधीही आपल्या विद्वत्तेची प्रौढी मिरवली नाही. ते नेहमी म्हणत कीं माझं ज्ञान अपुरं आहे. अजून पुष्कळ शिकण्यासारखं आहे. परंतु पार्वतीचे म्हणणें होते कीं तिला सारं कांही माहिती आहे. तिने प्राविण्य मिळवले नाही, असा कोणताही विषय नव्हता. वृद्ध पंडित, ज्ञानी मंडळी जेव्हां आपसांत एखाद्या गंभीर प्रश्नावर चर्चा करीत, तेव्हां ती हस्तक्षेप करुन वादविवादांत भाग घेई व त्यांच्या शंकांचे निरसनदेखील करीत असे. तिची ही वृत्ती दिवसेंदिवस बळावत चालली. चर्चा चालूं असताना जर कुणा पंडिताचे प्रतिपादन अपूर्ण झाले तर ती ते पूर्ण करीत बसे. आणि त्यानंतर मात्र त्याच्या अर्धवट ज्ञान व पांडित्यावर त्याला टोमणे मारीत असे किंवा त्याचा उपहास करीत असे.

लहान वयांत तिचा हा प्रौढी मिरवण्याचा गुण दिसत होता, तरी तिच्या वडिलांनी त्याच्याकडे फारसे लक्ष दिले नव्हते. त्यांनी विचार केला कीं वय वाढेल तसा तिचा स्वभाव बदलेल आणि तिचा अहंगड कमी होईल. तरीदेखील शिवज्ञान पंडितांनी लेकीला दोनतीन वेळा सांगून पाहिलं कीं मोठ्यांच्या चर्चेमध्यें लहान मंडळींनी हस्तक्षेप करणें योग्य नाही. कदाचित त्या श्रेष्ठ मंडळींचा त्यामुळें अवमान होऊन ते रुष्ट होण्याची शक्यता असते.

त्यावर ती वडिलांना प्रत्युत्तर करी, ''पांडित्य किंवा ज्ञानाचा वयाशी काय संबंध आहे? वय वाढलं असलं तरी त्याचा अर्थ असा नाही, कीं त्यांना सगळं कांही समजतं! मूर्ख माणूस हा नेहमीच मूर्ख असतो.'' कधीकधीं तिच्या मनांत येई कीं तिच्या हुशारीचं, बुद्धिमत्तेचं लोक कौतुक करीत ते वडिलांना आवडत नसावं!

आता पार्वती सतरा वर्षांची झाली होती. तरीही तिचा अहंकार तसाच कायम होता. शिवज्ञान पंडित सर्वज्ञ होते, परंतु आपल्या मुलीचा हा स्वभाव कसा सुधारावा हे कांही त्यांना समजत नव्हतं. ते गोंधळून गेले होते. त्यांनी आपली ही व्यथा आपल्या मित्रांजवळ व्यक्त केली.

नवरात्राच्या उत्सवाचे दिवस होते. राजवाड्यावर पंडितांच्या चर्चासत्रांचा कार्यक्रम होणार होता. शिवज्ञान पंडितांनाही त्याचे निमंत्रण होते. त्यांच्या अनुपस्थितीत या चर्चा त्यांच्या घरीं होत असत. आणि पार्वती नेहमी प्रमाणें त्या चर्चांत आपले अनाहूत विचार सांगत होती.

एक दिवस ते पंडित आपापसांत एका विचित्र विषयावर चर्चा करीत होते. पार्वती त्यांची बोलणीं लक्षपूर्वक ऐकत होती. ते आपसांत बोलत होते कीं जुन्या तळ्याच्या कांठी असलेल्या मंडपात कुणीतरी कांहीबाही लिहीलंय. परंतु कुणालाही ते वाचणें जमत नाही आणि प्रत्येकजण ते पाहून मान खाली घालून परत फिरतो आहे. हे ऐकताच पार्वती म्हणाली, ''मी वाचीन ते! किती का कठीण असे ना, कुणीही जरी लिहील असलं तरी मला जर ते वाचता आलं नाही तर मला शिवज्ञान पंडितांची मुलगी म्हणवून घेण्याचा कांहीही अधिकार नाही!'' तिच्या बोलण्यांत अहंकाराचा दर्प पुरेपूर दिसत होता.



२५ वर्षांपूर्वी चांदोबांत प्रसिद्ध झालेली गोष्ट

मंडपात लिहीलेला मजकूर पार्वती वाचायला जाणार आहे, ही बातमी सबंध गांवात लगेच पसरली. गांवातले सर्व लोक मंडपाकडे आले. पार्वती आली आणि भिंतीवरचा पडदा बाजूला सारुन वाचूं लागली.

"जे करुं शकतील त्यांनीच याचे मनमोकळेपणे जाहीर वाचन करावे. या तलावांत दहा फुटापर्यंत चिखलगाळ भरलेला आहे. मी लगेच कुदळ आणि टोपली घेऊन जाईन, नि सरळ तिथला सारा चिखल स्वत: काढीन. आपण सर्वजण याला साक्षीदार आहात."

तिने वाचन पूर्ण केले आणि कुणीतरी तिच्या-समोर एक कुदळ आणि मोठी टोपली आणून ठेवली.

ती चकित होऊन म्हणाली, "हे काय?" तेव्हां तिथें हजर असलेले लोक म्हणाले, "आता गाळ काढ!"

"मी तर म्हटलं होतं कीं मी फक्त वाचीन. मी तसं करीन असं कांही म्हटलं नव्हतं." तिने समर्थन केलं.

"आम्ही सगळेजण इतके कां अशिक्षित आणि मूर्ख आहोत, कीं हे आम्हाला वाचता येईना? त्याच्यांत स्वच्छ लिहीलंय कीं जो हे वाचून दाखवील, त्याने त्यांत लिहील्याप्रमाणें ते काम केलं पाहिजे! तू तर कांही विचार करण्यापूर्वीच वाचायला सुरवात केलीस. आता घे ती टोपली नि कुदळ, आणि कर काम सुरुं! आपला शब्द तुला आता पाळायलाच हवा." गांवातल्या ज्येष्ठ मंडळींनी म्हटलं.

पार्वतीला रडूं कोसळलं. तिच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा लागल्या. तेव्हां कांही ज्येष्ठ व्यक्तींनी तिला उपदेश करीत म्हटलं, "वाटेल तेव्हां आपली हुशारी दाखवायची जरूर नसते. योग्य वेळेला, जरुर असली तरच हुशारीचा वापर करायचा असतो."

शिवज्ञान पंडित परत येईपर्यंत पार्वतीच्या स्वभावांत पूर्ण परिवर्तन झालं होतं. तिचा अहंकार नाहीसा व्हावा म्हणून त्यांच्या मित्रांनी केलेल्या या प्रयत्नाबद्दल जेव्हां त्यांना कळलं तेव्हां ते फार प्रसन्न झाले. पार्वतीचा अहंकारी स्वभाव बदलला हे पाहून त्यांना फारच आनंद वाटला.















# राक्षसाचे पुण्यकार्य

संपत्तीच्या शोधांत असलेला दुष्काम हिंडत हिंडत दंडकारण्यात पोंचला. तिथें एका राक्षसाने त्याला कैद केले. भीतीने तो थरथर कांपू लागला.

राक्षसाने त्याला धीर दिला व त्याची समजूत घालताघालता आपली कहाणी सांगितली. ''कित्येक वर्षांपासून मी फक्त माणसें आणि प्राणी खातो आहे. आणि अगदी निकृष्ट जीवन जगतो आहे. एकदा एक ऋषिवर मला भेटले. मी त्यांना माझे दु:ख सांगितले. मी त्यांना नम्रतापूर्वक सांगितले कीं मला या राक्षसजन्मांतून मुक्ती द्या आणि मला मनुष्य जन्म प्रदान करावा. ऋषींनी माझी प्रार्थना ऐकली आणि मला आश्वासन दिले कीं जर मी कांहीतरी पुण्यकार्य केलं तरच मी मनुष्यजन्म घेण्यास योग्य ठरेन अशी शक्यता आहे.''

आपली कथा सांगून राक्षसाने दुष्कामला म्हटले, ''तुला पाहून मला असं वाटायला लागलंय कीं पुण्यकार्य करण्याचा समय अगदीं जवळ येऊन ठेपला आहे. माझी शक्ती अमोघ आहे. बोल, तुला काय हवंय?''

दुष्कामला वाटलं कीं आता त्याला निश्चितच संपत्ती मिळेल. ती संपत्ती कुठे सांपडेल ते राक्षसाला विचारायचं त्याने ठरवलं.

''खरं सांग, संपत्तीशी तुला कसलं देणंघेणं आहे? जर तू खोटं बोललास तर मी दाखवीन ती संपत्ती कांही तुझ्या नजरेस पडणार नाही.'' राक्षस म्हणाला.

दुष्कामने उत्तर दिलं, ''संपत्ती मिळाल्यानंतर मी श्रीमंत होईन. त्या धनाचा उपयोग करून मी शक्तिशाली मल्ल योदध्यांचे पालनपोषण करीन. जे जे मला विरोध करतील, माझे म्हणणें ऐकणार नाहीत, त्या सर्वांना मी पिटून काढीन आणि त्यांचा पाणउतारा करीन. ज्या विशालाक्षीवर माझं प्रेम आहे. तिच्याशी मी विवाह करीन.''

''इतक्या लहानशा गोष्टीसाठी संपत्तीची आवश्यकता कां आहे? मल्ल योद्धे कशाला हवेत रे? ज्या विशालाक्षीवर तुझे प्रेम आहे, तिचे मन

- महेश गामा -

गोड बोलून मी वळवीन, आणि तुझ्याशी लग्न करायला तिला राजी करीन.'' राक्षस म्हणाला.

''परंतु ज्याचा पहिला विवाह झालेला आहे अशा पुरुषाशी विवाह करण्यास विशालाक्षी तयार होणार नाही. माझी दुसरी पत्नी बनण्यास ती कदापि होकार देणार नाही.'' दुष्कामने उत्तर दिले.

त्यावर आश्चर्य व्यक्त करीत राक्षस म्हणाला, ''मग तुझ्या पहिल्या पत्नीचे काय झाले? ती आता कुठे आहे?''

राक्षसाच्या या प्रश्नाने दुष्काम गोंधळून गेला. त्याने चाचरत सांगितले, ''मी ग्रामदेवीसाठी तिचा बळी दिला. मला एका मांत्रिकाने सांगितलं होतं कीं असं केल्यामुळें माझ्या घरांत पैशाचा पाऊस पडेल. पण तसा पाऊस कांही पडला नाही. जेव्हां शिपायांना हे कळलं, तेव्हां ते माझ्या पाठीमागें लागले. त्यांच्याकडून सुटका व्हायलादेखील मला धन हवंच आहे. म्हणून मला ती संपत्ती दाखवाच.''

''मनुष्याला पुनर्जन्म देण्याची शक्ती माझ्यांत आहे. मी तुझ्या पत्नीला पुनर्जन्म देऊं शकेन. तुझ्या साऱ्या काळज्या दूर होतील. मी बरोबर सांगतोय ना? असं करूं कां मी?'' राक्षसाने विचारले.

''जर माझी पत्नी जिवंत झाली तर मला विशालाक्षीशी विवाह करता येणार नाही.'' दुष्कामने सांगितलं.

''अरे दुष्टा, तू मनुष्य वाटत नाहीस. माझ्या-सारख्या राक्षसापेक्षांही तू जास्त वाईट, अधम, पापी आणि नीच आहेस. तुला चांगला मानव बनवण्याचा मी फार प्रयत्न केला होता. चांगल्या मानवाला मदत करणें हे पुण्यकार्य समजले जाते. पण आता मला स्पष्ट कळून चुकलंय, कीं आजदेखील मला हे पुण्यकृत्य करता येणार नाही. आणखी एक दिवसाची वाट पाहाण्यासाठी मी आता तुलाच खाऊन टाकतो आणि माझी भूक भागवतो.'' असं म्हणून राक्षसाने दुष्कामला उचलून आपल्या तोंडात टाकलं.

दुसऱ्याच क्षणीं ते ऋषीवर तिथे आले व म्हणाले, ''दुष्कामसारख्या वाईट माणसाला संपवून तू पुण्यकार्यच केलेलं आहेस. अशा तऱ्हेने नकळत तू इतर कितीतरी चांगली कृत्यें केली आहेस. पण आज जे तू केले आहेस, ते सर्वांत उत्तम पुण्यकृत्य आहे. आता तुला राक्षसजन्मांतून मुक्ती मिळाली आहे. लवकरच तुला मनुष्यजन्म मिळेल. तू धन्य आहेस.'' असं म्हणून ऋषी अंतर्धान पावले.







# माया सरोवर

## 2

*(जयशील झोंपला होता. मध्यरात्रीं त्याला कुणाचा तरी केविलवाणा आवाज ऐकूं आला तेव्हां तो जागा झाला. स्मशानांत एका विचित्र आकाराच्या व्यक्तिचे शिर त्याने धडावेगळे केले. नंतर तो एका जवळच्या घरांत गेला. तिथें एक म्हातारी स्त्री राहात होती. जेव्हां तो तिच्याशी बोलत होता तेव्हां हिरण्यनगरचा शिपाई दोघांजणांबरोबर तिथें आला आणि दार ठोठावूं लागला. त्यानंतर...)*

म्हातारी दाराजवळ आली. ती थबकली व तिने जयशीलला विचारले, ''बाळ, तू कांही अपराध केला आहेस कां? शिपायांपासून बचाव करण्यासाठीं म्हणून तर तू इथें आसरा घ्यायला आला नाहीस ना?''

''आई, मी असा कोणताही अपराध केलेला नाही. जगण्यासाठीं, आपले पोट भरण्यासाठीं मी इकडेतिकडे हिंडतो आहे. मी नोकरी शोधतो आहे.'' जयशील म्हणाला.

म्हातारीने त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवला. तिची खात्री पटल्यानंतरच तिने दरवाजा उघडला.

नगररक्षकाने दारांत थांबून विचारले, ''आजीबाई, स्मशानाचा पहारेकरी आणि एक सिद्धसाधक यांच्यात भांडण झाले. ते भांडण सोडवण्यासाठीं मला इथें यावं लागलं. तुझ्या घरांत एखादा तरुण शिरला आहे कां? त्याच्या कमरेला तलवार लटकते आहे!''

जयशील लागलीच पुढे आला. त्याला पाहताच स्मशानाच्या पहारेकऱ्याचा मुलगा ओरडायला लागला, ''हा बघा, यानेच माझ्या वडलांचे मस्तक छाटले होते.'' त्यावर सिद्धसाधक नाराज होऊन म्हणाला, ''अरे मूर्खा, तुझ्या वडलांना मेलेले कां समजतो आहेस? ते तर जिवंत आहेत. एकदा मेलेला माणूस कधी जिवंत होतो तरी कां? या तरुणाने आपल्या



अद्भुत तलवारीने ज्याला मारलं, ते तुझे वडील नव्हते तर तो काल होता. तुझ्या पित्यावर त्याचे वशीकरण झाले होते. त्याच्या तोंडूनच हे रहस्य मला समजले आहे.''

नगररक्षकाने त्या दोघांना दरडावले आणि जयशीलच्या दिशेने वळून तो कांही बोलणार, तितक्यांत जयशील त्याला सांगायला लागला, ''महाशय, माझं नांव जयशील आहे. मी अमरावती नगराचा रहिवासी आहे. स्मशानांत एका विचित्र आकाराच्या व्यक्तीने माझ्यावर झडप घालण्याचा प्रयत्न केला. स्वतःचा बचाव करण्यासाठी मी त्याचे डोके उडवले, आणि ते कार्य मला नाईलाजाने करावे लागले.''

''तू कालचे नव्हे, तर माझ्या पित्याचे डोके उडवले होतेस. जेव्हां मला समजलं कीं पहाटे त्यांना मारलं गेलं, तेव्हां मी त्यांना स्मशानांत घेऊन आलो. जेव्हां मी लांकडे आणायला बाहेर गेलो होतो, तेव्हां कुणा देवतेच्या कृपेने ते पुन्हां जिवंत झाले. जेव्हां मी परत येत होतो तेव्हां मी तुला त्याचं डोकं छाटताना प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांनी पाहिलंय.'' स्मशानाच्या पहारेकऱ्याच्या मुलाने कडवट स्वरांत सांगितले.

''अरे पोरा, ते प्रेत कुणाचं आहे तेदेखील मी पाहिलं नव्हतं. मी आपल्या मंत्रशक्तीने त्यांत कालला आवाहन केले होते. तेव्हां त्या शवांत प्राण शिरला. कालशी मी सामना करूं शकलो नाही आणि मी पळून जाऊं लागलो, तेव्हां या तरुणाने कालचे शिर धडापासून अलग केले आणि माझे रक्षण केले.'' सिद्धसाधकाने संतापून सांगितले.

नगररक्षक हंसून जयशीलला म्हणाला, ''तू आपलं नांव जयशील सांगितलंस ना? हे दोघे चारपांच तास या गोष्टीवर विनाकारण वितंडवाद करीत बसले आहेत. माझं डोकं उठवलंय यांनी! तूं ज्याचं डोकं उडवलंस तो कोण आहे हे त्यांच्या अजून लक्षांत येत नाही. मला वाटतं याच्यामागे कांहीतरी रहस्य आहे. याचा निर्णय मंत्रीच करतील. चला, तुम्ही तिघेही माझ्याबरोबर चला.'' आणि तो तिघांनाही घेऊन निघाला.

जेव्हां ते राजवाड्याच्याजवळ येऊन पोंचले तेव्हां मंत्रीही त्यावेळेस राजवाड्यांत शिरत होते. नगररक्षकाने त्यांना सर्व कांही सविस्तर सांगितले.

सारी हकीकत लक्षपूर्वक ऐकल्यानंतर मंत्र्यांनी थोडा वेळ विचार करून म्हटले, ''वैद्य व नातेवाईक यांची खात्री होती कीं स्मशानाचा पहारेकरी मेलेला आहे. तेव्हां तो पुन्हां जिवंत होणे अशक्य आहे. सिद्धसाधकाच्या म्हणण्यानुसार त्याच्या शरीरांत कुणा कालने प्रवेश केला असावा. कांहीही असो, तो जिवंत झाला आणि हिंडूफिरूं लागला. तेवढ्यांत एका प्राण्याचे शिर



या युवकाने छाटले. याचा अर्थ असा होतो कीं हा तरुण खुनी आहे, पण...'' एवढं बोलून मंत्री थांबला.

या 'परंतु' चा फायदा घेऊन जयशील म्हणाला, ''महोदय, आपले संरक्षण करण्याच्या उद्देशाने जर शत्रूला मारले, तर तो गुन्हा कसा होईल?''

''हो, हो, तुझा हा युक्तिवाद अगदी बरोबर आहे.'' मंत्री म्हणाला. त्याला वाटलं, चला, आपल्या डोक्यावरचा भार तर उतरला.

त्यांना मंत्र्याने तिथेंच थांबायला सांगितलं आणि राजाला भेटण्यासाठीं तो एकटाच निघाला. त्या वेळेला कनकाक्ष राजाशी सेनाध्यक्षांचा मुलगा मंगलवर्मा बोलत होता. मंत्र्याला पाहाताच राजा म्हणाला, ''महामंत्री, राजकुमार व राजकुमारीचा तपास करण्याची परवानगी मंगलवर्मा मागतो आहे. तुमचं काय मत आहे?''

''महाराज, मी जयशील नांवाच्या एका तरुणाला भेटलोय. तो फारच धाडसी व पराक्रमी आहे. त्याच्याजवळ अद्भुत व अलौकिक शक्ती आहेत. त्याच्या तलवारीत अमोघ शक्ती भरलेली आहे हेही मला समजलंय.'' मंत्री म्हणाला.

मंत्र्याचे बोलणें ऐकून राजा विचारांत पडला. मंगलवर्मा मात्र मनांतल्या मनांत मंत्र्यावर नाराज झाला. त्याला आपली नाराजी लपवता आली नाही. तो कटु स्वरांत बोलूं लागला, ''हा जयशील कुलीन वंशातला आहे कां? जो राजपुत्र व राजकुमारीला शोधून काढील त्याला महाराजांनी अर्धे राज्य देण्याची घोषणा केली आहे. तो या योग्यतेचा तरी आहे कां?''

या विसंगत प्रश्नावर चिडून जाऊन मंत्री



म्हणाला, ''युवराज व युवराणींचं अपहरण करणारे मानव आहेत, दानव आहेत कीं देवता आहेत, याचीच माहिती अजून आपल्याला मिळालेली नाही! अशा विषम परिस्थितींत त्यांना शोधून आणण्याची हिंमत जो दाखवतो, तो निश्चितच शक्तिशाली, पराक्रमी व योग्य असेल. अशा शूर वीराला अर्धे राज्य देणे अवश्य उचित आहे. तो याला लायक आहे.''

''त्याच्या तलवारीची शक्ती अमोघ व अद्भुत आहे, पण कशावरून? ती तलवार मला एकवार दाखवा. मी तिची पारख करीन.'' मंगलवर्माने म्हटले.

त्याच्या म्हणण्याला दुजोरा देत कनकाक्ष राजा म्हणाला, ''मंत्रीजी, जयशीलच्या तलवारीची परीक्षा करण्याची संधी मंगलवर्माला द्यायला हवी. जर खरोखरीच ती तलवार शक्तीने भारलेली आहे असं सिद्ध झालं, तर या तरुणाला



इनाम दिलं जाईल व आपल्या दरबारांत नोकरी देण्याची व्यवस्थादेखील केली जाईल.''

''कोणत्या प्रकारची परीक्षा महाराज?'' मंत्र्याने विचारलं.

''आमच्या वनसंग्रहालयाच्या अधिकाऱ्यांना सांगा कीं दोन वाघांना पिंजऱ्यात बंदिस्त करून घेऊन या. या अमोघ शक्तिशाली तलवारीने मंगलवर्मा या वाघांशी सामना करेल.'' कनकाक्ष राजाने सांगितलं.

मंत्र्याने सांगितल्यावर जयशीलने आनंदाने आपली तलवार मंगलवर्माकडे सोंपवली. लवकरच पिंजऱ्यांत बंद केलेले वाघ मैदानांत आणले गेले. या मैदानाच्या चारी दिशांना उंचउंच भिंती होत्या. अधिकाऱ्यांनी मंगलवर्माला सावधान केले आणि वरून पिंजऱ्याचे दरवाजे खोलले. राजा, मंत्री व जयशील वरती बसून लक्षपूर्वक पाहात होते. दोन्ही वाघ जोरजोराने गुरगुरायला लागले, आणि मंगलवर्माच्या दिशेने पुढें येऊं लागले.

सेनापतीचा मुलगा असल्यामुळें मंगलवर्मा खड्गयुद्ध व धनुर्विद्यांत पारंगत होता. पण जेव्हां त्याने पाहिलं कीं दोन्ही वाघ जबडा पसरून त्याच्या दिशेने येत आहेत, तेव्हां तो भिऊन गेला.

वरती बसून हे दृश्य पाहात असलेल्या जयशीलला वाटलं कीं किमान आपला प्राण वांचवण्यासाठी तरी मंगलवर्मा तलवारीचा उपयोग करील. पण भेदरलेला मंगलवर्मा थिजल्यासारखा उभा राहिला होता, भीतीने गारठला होता. त्याला प्रोत्साहन देण्याच्या उद्देशाने जयशीलने ओरडून सांगितलं, ''मंगलवर्मा, तुझ्या हातांतली तलवार आहे ना, तिच्यांत अमोघ शक्ती आहे. भिऊं नकोस. त्या तलवारीने वाघांच्यावर वार कर.''

दुसऱ्याच क्षणीं एक वाघ मंगलवर्मावर चालून आला आणि आपल्या पंजाने खांद्यावर एक फटका मारला. जखमी मंगलवर्माला वाटलं कीं आता आपला मृत्यू अटळ आहे. त्याने धैर्य एकवटून ती तलवार वाघाच्या पोटांत खुपसायचा प्रयत्न केला; परंतु घाबरल्यामुळें त्याच्या हातांतून तलवार जमिनीवर गळून पडली.

सिद्धसाधकाने संकटाचा अंदाज जाणला. तो जोराने ओरडायला लागला, ''वीर युवक जयशील!''

जयशीलने टाळ्या वाजवत त्या दहा हात उंचीच्या भिंतीवरून चपळाईने मैदानांत वाघांच्यासमोरच उडी घेतली व जमिनीवर पडलेली तलवार त्याने उचलून हातांत पकडली.

कनकाक्ष राजाने जयशीलच्या साहसाबद्दल आश्चर्य व्यक्त करीत म्हटले, ''वा, काय हे धाडस! अशा तरुणाला मदत केली तर आपण युवराज व युवराज्ञीला जरूर शोधून काढूं शकूं.''



तेवढ्यांत पायाने जमीन उकरत जयशील जाणूनबुजून चार पावलें मागे गेला. एका वाघाने त्याच्या दिशेने चाल केली. संधी साधून जयशील एक पाऊल पुढें आला आणि त्याने आपली तलवार वाघाच्या छातींत खुपसली.

वाघ तडफडत जमिनीवर कोसळला. आपल्या मित्राची ही असहाय अवस्था पाहून दुसरा वाघ भ्यायला व मागेमागे जाऊं लागला. पिंजऱ्याचे दार उघडेच होते त्यांत जाऊन तो बसला.

वरुन कनकाक्ष राजाच्याबरोबरच्या सर्व प्रेक्षकांनी आनंदाने टाळ्यांचा कडकडाट केला.

तो आवाज ऐकून इतका वेळ डोळे घट्ट मिटून बसलेल्या मंगलवर्माने डोळे उघडले. मेलेल्या वाघाकडे व पिंजऱ्यांत पडलेल्या दुसऱ्या वाघाकडे पाहून त्याने एक प्रदीर्घ श्वास घेतला, आणि वरती बघून तो कनकाक्ष राजाला म्हणाला, ''महाराज, निश्चितच ही तलवार अद्‌भुत व अमोघ आहे. दुर्दैवाने माझ्या हातांतून ती निसटली. म्हणून तिच्या शक्तीचा निर्णय मला करता आला नाही. आणि हे काम जयशीलने करून दाखवलं.''

''तू बरोबर बोललास, मंगलवर्मा! तुझं दैव बलवत्तर म्हणूनच केवळ तूं वाचलास!'' मंत्री धर्ममित्र निश्वास टाकीत म्हणाला.

''मी अगोदरच तुम्हाला सांगितलं होतं. खुद्द कालनेच या तलवारीला आशिर्वाद दिला होता. माझी मदत जर याबरोबर होऊं शकली तर जयशील विश्वविजयी होईल.'' सिद्धसाधकाने सांगितलं.

''पण इतकी अद्‌भुत शक्तिशाली तलवार हातांत असूनदेखील मंगलवर्माला कांहीच करता आले नाही.'' राजाने आपली शंका व्यक्त केली.

मंत्री धर्ममित्राने वरुन वांकत जयशीलला सांगितले, ''जयशील, आता ये वर लौकर! तुझ्या साहसावर आम्ही फारच खूष झालो आहोत. आमच्या सेनापतीच्या मुलाचे प्राणदेखील तू





वांचवले आहेस. त्याबद्दल तुझे हार्दिक अभिनंदन व तुला धन्यवाद!''

जयशीलने उत्तर दिले, ''महाराज, प्रथम वाघाच्या पिंजऱ्याचे दार बंद करायला सांगा जर मी वरती आलो तर इथें मंगलवर्मा एकटा पडेल. त्याच्याजवल शस्त्रही नाही! उगीच नसतं संकट कशाला ओढवायचं?''

त्यावर सिद्धसाधक मोठ्याने हंसला आणि म्हणाला, ''मंगलवर्माच्या हातांत हत्यार असतं तरी काय उपयोगाचं? असल्या तरुणांच्या हातांत इंद्राचे शस्त्र जरी पडले तरी ते निरर्थकच ठरायचं!''

मंत्र्याने हात पुढे पसरले आणि जयशीलने त्यांचा आधार घेत वरती चढला. वर पोंचल्यावर लागलीच सिद्धसाधकाने त्याला प्रेमाने मिठी मारली व तो म्हणाला, ''तू फारच धैर्यवान आहेस. तुझ्यासारख्या निर्भय पुरुषाला पाहून भीतीदेखील मागल्यामागें पळून जाईल. काळला आपल्या अधीन करण्यासाठीं मला तुझ्या मदतीची आवश्यकता लागेल. त्याचबरोबर राजपुत्र व राजकुमारीला शोधून परत आणण्याचं सामर्थ्य फक्त तुझ्यांतच आहे. त्यामुळें महाराज व महाराणींची समस्या सुटेल आणि ती दोघे या चिंतेतून मुक्त होतील.''

त्यानंतर ते सर्वजण खाली उतरले आणि त्यांनी राजाच्या बरोबर राजवाड्यांत प्रवेश केला. इतका वेळ प्रवेशद्वारापाशी उभा असलेला पहारेकऱ्याचा मुलगा मोठ्याने ओरडून सांगू लागला, ''महाप्रभू, माझे वडील मेल्यानंतर पुन्हां जिवंत झाले आहेत. तरीसुद्धां ज्याने माझ्या वडलांना मारुन टाकलं, त्याच्याकडून मला मोबदला मिळवून द्या.''

धर्ममित्र मंत्र्याने त्याच्याकडे वळून पाहिले आणि त्याला आश्वासन देत तो म्हणाला, ''तुझे वडील मेले होते त्याबद्दल तू आता काळजी करूं नकोस. याच्यापुढें नगरांतल्या सर्व स्मशान-भूमींचा तू मुख्य पर्यवेक्षक आहेस. तुला आत्ता जे वेतन मिळत आहे, त्याच्या दसपट वेतन यापुढें मिळायला लागेल. उगाच ओरडत बसूं नकोस नि आता इथून निघून जा.''

''प्रभू, आपले उपकार मरेपर्यंत कधी विसरणार नाही बघा. एका बाजूला वडलांच्या मृत्यूचे दुःख होतंच, पण त्यांनी जिवंत होऊन पुन्हा त्यांचा मृत्यू झाला त्याचं जास्तच दुःख झालं होतं. जर ते जिवंत असते तर माझी ही पदोन्नती पाहून त्यांना आनंद झाला असता'' असं म्हणत, डोळे पुसत, तो तिथून निघून गेला. तो गेल्यानंतर राजा, मंत्री, जयशील व सिद्धसाधक दरबारांत पोंचले.



कनकाक्ष राजा सिंहासनावर बसून विचार करीत होता. थोड्या वेळानंतर त्याने मंत्र्याला विचारले, ''महामंत्री, आता आपण काय करावे? युवराज व राजकन्येला शोधण्याचे आत्तापर्यंतचे सारे प्रयत्न निष्फळ ठरले आहेत. अशा परिस्थितींत ही मोहीम धाडसी व शक्तिशाली जयशीलवर सोंपवली तर ठीक होईल नाही कां?''

जयशीलकडे पाहून मंत्री कांही बोलणार होता तितक्यांत सिद्धसाधकने आवेशपूर्ण स्वरांत म्हटलं, ''उत्तम होईल महाराज. आपल्या मुलांना परत आणण्यासाठी केवळ साहस आणि शक्ती ही पुरेशी नाहीत. त्यांच्या जोडीला अलौकिक ज्ञान असणंदेखील अत्यंत आवश्यक आहे. म्हणून जयशीलच्या बरोबर जाण्याची मलाही परवानगी द्यावी.''

जयशीलला सिद्धसाधकाचा हा प्रस्ताव आवडला नाही. म्हणून त्याने विनयपूर्वक म्हटले, ''महाराज, माझी एक विनंती आहे.''

''हो, हो, अगदी निःशंकपणें सांग, तुझा विचार ऐकण्यास आम्हीही उत्सुक आहोत.'' राजा म्हणाला.

''महाराज, माझा देश सोडून मी इकडे नोकरीच्या शोधांत आलो आहे. जर मला एखादी नोकरी मिळाली तर फार बरं होईल. मी आपला सदैव आभारी राहीन.'' जयशीलने सांगितलं.

कनकाक्ष राजाने मांत्र्याकडे पाहिलं व जयशीलला मंत्री म्हणाला, ''जयशील, महाराज आपल्या दरबारांत तुला अवश्य नोकरी देतील. तू आत्तापासून त्यांच्या सेवकांपैकी एक आहेस. आणि राजाज्ञेचे पालन करणें हे सेवकाचे सर्वप्रथम कर्तव्य असते.''

''निस्वार्थ! मी आपले कर्तव्य पार पाडण्यासाठीं सिद्ध आहे. महाराज जी आज्ञा देतील. तिचे मी पालन करीन. जयशीलने नम्रपणें सांगितले.

त्याच्या उत्तरामुळें प्रसन्न झालेला मंत्री धर्ममित्र म्हणाला, ''जयशील, महाराजांची अशी आज्ञा आहे कीं तू युवराज व राजकन्येला शोधून आण आणि या कामाला शक्य तितक्या लवकर सुरुवात कर.''

तितक्यांत तिथें राजाचा एक सेवक तिथें आला, व एक मोत्यांचा हार व एक तुटकी तलवार दाखवत सांगू लागला, ''महाराज, ज्या झाडाखाली युवराज व राजकुमारी नाहीसे झाले, तिथें एका भिल्लाला या वस्तू मिळाल्या. त्याचे डोके ठिकाणावर नसावेसे वाटते. आणि तो वेड्यासारखा वरळतो आहे.'' (अपूर्ण)



# संन्यासाची इच्छा

रामनारायण आपली पत्नी व दोन मुलें यांच्याबरोबर सुखासमाधानांत राहात होता. पण अचानक त्याच्या मनांत संन्यास घेण्याची इच्छा निर्माण झाली. पत्नीने हरतऱ्हेने त्याला समजावण्याचा प्रयत्न केला. पण त्याने तिचे कांही एक ऐकले नाही.

''संन्यास घेण्याची वृत्ती सर्वांच्यात असतेच असं नाही. तुझी मुलें अजून फार लहान आहेत. तू संन्यास घेऊं नकोस.'' अनेक लोकांनी त्याला सल्ला दिला, पण रामनारायण कांही आपला हेका सोडीना.

एके दिवशी रामनारायणने घर सोडून जाण्याची तयारी केली, तेव्हां त्याची बायको त्याला म्हणाली, ''वाटेंत भूक लागेल, थोडा रात्रीचा भात उरलाय, तो बांधून देते. तो घेऊन जा.''

रामनारायण भात घेऊन निघाला. वाटेंत जेव्हां त्याला भूक लागली, तेव्हां एका झाडाच्या सांवलीत त्याने भाताची पोटळी उघडली. पण त्यांत भुस्सा भरलेला होता. रामनारायणला आपल्या बायकोचा फारच राग आला. तो तडक घरी परत गेला आणि बायकोला खूप रागावला. ''अहो, संन्याशाच्या मनांत सांसारिक इच्छा आणि कौटुंबिक बंधन नसावे. त्याच्या मनांत तर मनोनिग्रह असला पाहिजे!'' पत्नीने त्याची समजूत घातली. आणि मग काय, रामनारायणने संन्यास घ्यायची आपली इच्छाच सोडून दिली !





राजा विक्रम व वेताळाच्या नव्या कहाण्या

# राजाचा वानप्रस्थ

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरून त्याने शव खाली उतरवले. ते आपल्या खांद्यावर घेतले आणि स्मशानाची वाट धरली. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटले, ''तू जिवावर उदार होऊन या भयंकर स्मशानांत एकटाच चालला आहेस. ही भुताप्रेतांची भूमी आहे. इथें असे जाणें अतिशय धोक्याचे आहे. तुझे हे वर्तन पाहून तुझे ध्येय काय असेल याबाबतीत मला शंका येऊं लागली आहे. माझ्या दृष्टीने तर हा निव्वळ मूर्खपणा आहे. कधीकधी अत्यंत हुशार माणसेंदेखील अशक्य परिस्थितींत अडकतात. आपण काय करतो आहोत आणि आपण काय



करायला हवे हे त्यांच्या लक्षांतच येत नाही. उदाहरण म्हणून मी तुला सत्यकीर्ती नांवाच्या राजाची गोष्ट सांगतो. ती ऐकता ऐकता तुझा थकवाही दूर होईल.'' आणि वेताळाने सत्यकीर्तिची पुढील गोष्ट सांगितली.

फार पूर्वीची कहाणी आहे ही! सत्यकीर्ति हा वराल देशाचा राजा होता. तो एक उत्तम राज्यकर्ता होता. राज्याचा कारभार अतिशय कुशलतेने तो सांभाळत होता. प्रजाजनांचा तो आवडता होता. त्याच्या राजवटींत प्रजा फारच सुखी होती, शांततापूर्ण आयुष्य घालवीत होती. त्याचे वय जसे वाढत गेले, तशी राजकारणाची त्याची आसक्ती कमी होत चालली. त्याला विश्रांतीची गरज जाणवायला लागली. आपण राज्यकारभारांतून मुक्त झालो तर चांगलं होईल असं त्याला वाटायला लागलं.

सत्यकीर्तिला चार मुलगे होते. चौघेही विद्वान, बुद्धिमान व शूरवीर होते. राजाने मंत्रीगण व इतर सरदारांबरोबर विचारविनिमय करून थोरला मुलगा रामभद्र याला राज्याभिषेक केला व राज्यशासनाचे सारे कामकाज त्याच्यावर सोंपवले.

यापूर्वी दोन वर्षे अगोदरच महाराणीचे देहावसान झाले होते. आता मात्र राजा सत्यकीर्ति गृहस्थाश्रमांत एकटाच राहिला. त्याने भक्तीमार्गाकडे आपले मन वळवले आणि त्यावरच सारे लक्ष केंद्रित केले. तरीदेखील त्याचे ध्यान सैरभैर होत होते. आपले मन असे चंचल कां आहे, भक्तीमार्गात आपले चित्त पूर्णपणे समरस कां होत नाही याची चिंता त्याला खात होती. त्याने ह्यावर भरपूर विचार केला आणि ठरवले कीं उरलेले आयुष्य साधूसंन्यासी यांच्या संगतीत घालवायचे, आश्रमांत राहायचे आणि मुक्तीचा मार्ग शोधायचा! आपल्या मनांतले विचार राजाने बृहस्पती भट्ट नांवाच्या एका पंडिताला सांगितले. हा पंडित राजाकडे रोजच येतजात असे.

राजाच्या मनांतले विचार ऐकून बृहस्पति भट्ट फारच खूष झाला. तो म्हणाला, ''आपण अगदी योग्य विचार ठरवला आहे. सांसारिक व्यापांतून बाहेर पडण्यासाठीं साधू-संन्यासी यांच्या संगतीत राहाणें उत्तम व श्रेयस्कर आहे. अध्यात्म व जीवनांतल्या मोहांतून मुक्ती मिळवण्यासाठीं हाच खरा मार्ग आहे.''

तरीदेखील राजा थोडा वेळ विचार करीत राहिला. आपल्याशीच तर्कवाद करीत तो बृहस्पती भट्टाला म्हणाला, ''आपण ठीक सांगितलेत. जन्मापासून मी सुखी, आरामशीर आयुष्य जगलो आहे. संन्यासी जीवन अतिशय कठीण असतं. आश्रमाच्या कठोर नियमांचं पालन करावं लागतं. आहारावर नियंत्रण ठेवावं लागतं. मला हे सारं जमेल कीं नाही याची भिती वाटते. या परीक्षेत मी अपयशी तर होणार नाही ना?''

त्यावर बृहस्पती किंचित हंसून म्हणाला, ''महाराज, आपण मुळीच घाबरूं नका. पहिले कांही



दिवस हे काम कठीण वाटेल खरं पण नंतर त्याची संवय अंगवळणीं पडेल. आणि मुक्तीच्या मार्गाकडे आपले ध्यान केंद्रित होऊं लागेल. आपण निःसंशय सफल व्हाल, असा मला गाढ विश्वास आहे.''

राजावर भट्टच्या बोलण्याचा परिणाम झाला. तरीही त्याचा स्वतःवर पूर्ण विश्वास नव्हता. म्हणून तो म्हणाला, ''एक काम करूं या. आपल्या राजधानीजवळच्या चंपकवनांत कार्तिकेय नांवाचा संन्यासी तपस्येंत मग्न आहे. तिथें मी कांही दिवस राहीन. तिथल्या अनुभवाने मी तिथें राहायला योग्य आहे कां नाही, याची मला खरीखुरी कल्पना येईल.''

बृहस्पती भट्टालाही राजाचा हा विचार पटला. त्याने संमती दिली आणि राजाने आपल्या प्रवासाची सारी तयारी स्वतः केली. पित्याच्या या यात्रेला चारी मुलांनी प्रथमच आपला विरोध दर्शवला.

तेव्हां राजाने त्यांना समजावीत म्हटले, ''जर मला तिथें राहाणें जमले नाही तर मी अवश्य परत येईन.'' पित्याचे हे आश्वासन ऐकल्यानंतर चौघेजण निमूट बसले.

राजा सत्यकीर्तिने एक सेवक व एका दासीला बरोबर घेतले आणि तो चंपकवनांत पोंचला. संन्यासी कार्तिकेयाच्या झोंपडीजवळच राजासाठी एक सुसज्ज झोंपडी बांधून तयार होती. त्यांत मऊ बिछाना असलेला पलंग होता. जवळच एका मेजावर निरनिराळी फळें ठेवली होती. सात्विक साध्या आहाराचे पदार्थ झांकून ठेवले होते. कोपऱ्यांत छोटे देवघर होते. त्यांत अनेक देवी देवतांची चित्रें मांडलेली होती. त्याच्याजवळच रुद्राक्षांची गुंफलेली माला आणि चित्रासनही ठेवलेले होते.

सत्यकीर्तिने त्या सेवक व दासीने सर्व व्यवस्था उत्तम प्रकारे ठेवल्याबद्दल त्यांची प्रशंसा केली.

रात्रीचे भोजन झाल्यानंतर राजाने विश्रांति घेतली आणि सकाळीं तो कार्तिकेयच्या दर्शनासाठी बाहेर पडला. जवळ गेल्यानंतर त्याला दिसले कीं



एका आम्रवृक्षाखाली कार्तिकेय संन्यासी ध्यान लावून बसलेला आहे.

त्याच्या तपस्येंत भंग होऊं नये म्हणून राजा निमूटपणें दूर गेला व एका चौथऱ्यावर बसून राहिला. बरेच प्रहर उलटले, पण कार्तिकेय ध्यानस्थ होता. राजा चौथऱ्यावरून उतरला आणि आजूबाजूच्या वनराईकडे लक्षपूर्वक पाहूं लागला. थोड्या वेळानंतर पाठीमागून 'राजा' अशी हांक ऐकू आली. त्याने मागे वळून पाहिले.

तिथें त्याला मंदस्मित करीत मागे उभा असलेला कार्तिकेय दिसला. सत्यकीर्तिने मान झुकवून त्याला प्रणाम केला. कार्तिकेयने त्याला 'सुखी भव' असं म्हणून आशिर्वाद दिला व पुढें म्हटले, ''या, आपण या चौथऱ्यावरच बसूं या.'' दोघेही तिथे बसल्यानंतर प्रसन्नमुद्रेने कार्तिकेयाने विचारले, ''तुमचे सारे सेवक परत गेले कां?''

हा प्रश्न ऐकून सत्यकीर्ति जरा वरमला आणि त्याने खालच्य स्वरांत म्हटले, ''पर्णकुटींत



माझ्यासाठीं आवश्यक त्या सुविधांची त्यांनी व्यवस्था केली आणि ते राजधानीला परत गेले. स्वामीजी, आता माझ्याबरोबर फक्त एक सेवक आणि एक सेविका आहे. जेव्हां वानप्रस्थाश्रमांतले जीवन जगायची मला संवय होईल, तेव्हां ही दोघेजणदेखील परत जातील. आपल्याला माहीत आहेच कीं माझे जीवन नेहमीच सुखासीन तऱ्हेने गेलेले आहे, राजा होतो ना मी!'' आणि त्याने तिथे राहायला येण्याचे कारण सविस्तर सांगितले.

कार्तिकियाने राजाचे कथन लक्ष देऊन ऐकले, व नंतर विचारले, ''म्हणजे त्याचा असा अर्थ झाला कीं इथें येऊन तुम्हाला बराच वेळ झाला, होय ना? तितका वेळ काय करीत होतात? कंटाळा तर आला नाही ना?''

सत्यकीर्तिने जरा नरमाईच्या स्वरांत म्हटले, ''हो, जरा कंटाळलो खरा! पण नंतर उठून या चंपकवनांतली झाडें झुडुपें बघत होतो. इथली वनराई पाहताना माझ्या मस्तकांत अनेक विचार उचंबळत होते.''

''ते कोणते विचार होते ते जरा मला कळेल कां?'' कार्तिकियाने विचारले.

''स्वामीजी, या चंपकवनांत फळाफुलांनी लगडलेले अनेक वृक्ष आहेत. औषधी उपयोगाची अनेक लहानमोठी झुडुपें, वेली व रोपटीही भरपूर आहेत. मला वाटलं कीं राजवैद्य भीष्माचार्यांना इथें बोलावून घ्यावं आणि यापैकी किती वृक्षवेली व रोपें औषधी आहेत ते जाणून घ्यावं. आजारांवर प्रतिबंधक उपाय म्हणून नवी औषधे बनवण्याचं कामदेखील त्यांच्यावर सोपवावं असं मला वाटतंय.'' सत्यकीर्तिने सांगितलं.

सगळं ऐकल्यानंतर कार्तिकेयाने गंभीर आवाजांत सांगितलं, ''राजन्, तुम्ही ज्ञानी आहात. मी जे कांही ऐकलंय, त्यावरून स्पष्ट आहे कीं तुम्ही सकल शास्त्रांमधें पारंगत आहात. केवळ डोळे मिटून ध्यानधारणा करण्याने आणि जपजाप्य केल्यानेच मुक्ती मिळते असं थोडंच आहे?''

सत्यकीर्तिने कांहीही उत्तर न देता मौन पत्करले. तेव्हां कार्तिकेय पुन्हां बोलू लागला, ''हे पहा राजन्, तुम्ही तडक राजधानीला परत जावे आणि आरामांत आयुष्य कंठावे. राजा या नात्याने आपले विचार उपयोगांत आणावेत. त्यामुळें प्रजाजनांचे कल्याण होईल. चंपकवनाच्या बाबतीत जे तुमचे दूरदर्शी विचार आहेत, ते उत्तम आहेत.''

सत्यकीर्तिने कांहीही न बोलता कार्तिकेयाच्या पायांना स्पर्श करून वंदन केले. त्यांच्या परवानगीने तो तिथून निघून गेला. दुसऱ्याच दिवशीं तो राजधानीला परत गेला.

ही गोष्ट सांगून वेताळाने राजा विक्रमार्कास विचारले, ''राजन्, कार्तिकेय संन्याशाने सत्कीर्तिला सर्व शास्त्रांत पारंगत आहेस असे म्हटले होते. वानप्रस्थाश्रम आणि तपस्या करण्यासाठी राजाला जो उपदेश त्याने करायला हवा होता, तो न करता राजधानीला परत जाण्याचा सल्ला दिला. माझ्या दृष्टीने हे काम न्यायाला धरून व तर्काशी सुसंगत असे वाटत नाही. संन्यासी सर्वस्वाचा त्याग करीत असतात. आणि त्याबद्दल त्यांना एक वेगळाच अहंकार असतो. म्हणून त्याने राजाला परत जायचा सल्ला दिला. परंतु, निदान सत्यकीर्ति राजाने तरी संन्याशाला विनंती करायला हवी होती; किमान तपस्या करण्याची अनुमती मागायला हवी होती. असं करण्याऐवजी संन्याशाने सांगितल्याबरोबर दुसऱ्या दिवशी राजा आपला राजधानीला निघून गेला. हा त्याचा निव्वळ अविचारीपणा नव्हे कां? आता त्याला वानप्रस्थ ही मिळाला नाही किंवा तपश्चर्येचे पुण्यही प्राप्त करता आले नाही! जीवनांतल्या समस्यांपासून मुक्त होण्याची त्याची आकांक्षा तशीच राहिली, नाही कां? माझ्या या शंकांचं उत्तर तुला माहीत असूनही तू गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील.''

तेव्हां विक्रमार्काने उत्तर दिले, ''आर्योक्ति अंशी आहे, कीं मानव सेवा हीच माधव सेवा आहे. सत्यकीर्ति दीर्घकाळ मानवाच्या सेवेत गुंतलेला होता. परंतु वृद्धापकाळ जवळ आल्यामुळें थकलेल्या शरीराला राज्यकारभाराचा भार वाटू लागला. म्हणून त्याने राज्यत्याग करायचा निश्चय केला होता. तो तेव्हां वानप्रस्थ व तपस्या यांचाच विचार करीत होता. यांच्यामुळें मुक्ती मिळेल असा त्याचा समज होता. परंतु हा त्याचा गैरसमज होता, अज्ञान होते. कार्तिकेयाने त्याचा स्वभाव ओळखला. राजा सदैव प्रजेचे हित पाहाणारा, त्यांची काळजी घेणारा असा धर्मशील राज्यकर्ता होता. त्यामुळें जरी तपस्या करण्यासाठीं, अनुग्रह घेण्यासाठी तो चंपकवनांत गेला तरी तिथें दिसणाऱ्या झाडांझुडुपांच्या औषधी उपयोगाबद्दलच तो विचार करीत बसला. आपली कामें करण्यासाठीं त्याने दोन सेवक बरोबर ठेवले होते, कारण त्याची त्याला संवय होती. संन्यासी बनणें, सर्वस्वाचा त्याग करणें, तपस्येंत लीन होणे, ही कामें हळूंहळूं, एकामागोमाग एक, अशी करायची नसतात. ही सर्व एकदमच करायची असतात. नाहीतर ते शक्य होत नाही. कार्तिकेयाने राजाची प्रवृत्ती ओळखली होती. म्हणून त्याने सत्यकीर्तिला राजधानींत परत जाण्याचा आदेश दिला व पुन्हां राज्यकारभारांत लक्ष घालण्यास सांगितले. सूक्ष्मग्राही सत्यकीर्तिला संन्याशाच्या बोलण्यांतला मतितार्थ समजला. त कांहीही न बोलता तो दुसऱ्याच दिवशी परत गेला. इतकंच घडले होतं. आता याच्यांत जर तुला कार्तिकेय संन्याशी अहंकारी वाटला किंवा राजा अज्ञानी आहे असं वाटलं तर मी म्हणतो कीं ही तुझीच चुकीची विचारसरणी आहे. तुझे अज्ञान प्रकट होते आहे.''

राजाचे मौनभंग करण्यांत यशस्वी झालेला वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला. **(सुभद्रादेवीच्या रचनेवरुन)**



# खास बातम्या

## अंतराळाचे तिकीट




आंतरराष्ट्रीय अंतराळ स्थानकाला भेट देण्यास दुसरा यात्रिक बहुधा एप्रिलमधे जाईल. दक्षिण आफ्रिकेचा धनवंत उद्योगपती, मार्क शटलवर्थ, याने २ कोटी डॉलर्स या प्रवासाच्या तिकीटासाठी दिले आहेत. वर्षापूर्वी जेव्हां अमेरिकेच्या डेनिस टिटोने या स्थानकाला भेट दिली, तेव्हां नासाचे अधिकारी फारसे खूष नव्हते. पण आता मात्र २८ वर्षांच्या तरुण शटलवर्थला या प्रवासासाठी आवश्यक ते प्रशिक्षण देण्यास नासाचे अधिकारी तयार झाले आहेत. मार्क रशियाला जाऊन रशियन रॉकेटमधें प्रथम बसणार आहे. या कालावधीत, अंतराल यात्रिकरूंसाठी 'व्हिसा' चे खास नियम ब्रिटनने तयार केले आहेत. धूम्रपान, मद्यपान करणारे व मादक द्रव्यांचे सेवन करणाऱ्या मंडळींना हा व्हिसा मिळणार नाही. ठणठणीत प्रकृती व इंग्लिश भाषेचे चांगले ज्ञान, या दोन गोष्टी आवश्यक आहेत.

## मंगळावर संगीत



बीगल - २ हे मंगळावर जाणारे अवकाशयान, जेव्हां २३ डिसेंबर २००३ या दिवशीं या लोकग्रहावर उतरेल, तेव्हां ब्रिटिश पॉप बँड 'ब्लर' यांनी रचलेली धून सॅटेलाईटवरुन प्रसारित होईल. या बँडचे संगीत हे 'जगावेगळेच' आहे असा त्यांच्या चाह-त्यांचा अभिप्राय आहे. या चमूने हे मत खरे करुन दाखवायचे ठरवलेले दिसते आहे. 'बीगल उतरलाय' या नावाचे संगीत त्यांनी रचले आहे. ते मात्र मंगळावरच्या व पृथ्वीवरच्या लोकांना एकाचवेळीं ऐकू येईल.



# गणेश पुराण

पुत्रगणपतीची किंकाळी ऐकून पार्वती घाबरून पळत आली. डोकं कापलेल्या स्थितीत मुलाला पाहून ती शंकराकडे डोळे वटारून पहात म्हणाली-"काय केलेत हे? आपल्या मुलाच डोकं उडवलंत? पुत्रवध केलात!" असे म्हणत जमिनीवर पडलेल्या मुलाच्या देहाला कवटाळून ती शोक करू लागली.

तोंपर्यंत चकित होऊन सर्व पहात असलेल्या गर्दीतून एकदम समुद्राचा गंभीर घोष व्हावा तसा कलकलाट ऐकू येऊ लागला. मोठा अपराध केलेल्यासारख्या शंकराकडे सर्व पाहू लागले. शंकराला तर काय बोलावे व काय करावे ते सुचेना भीतभीत शंकराने विचारले- "मला कांहीच माहीत नसतां माझा मुलगा म्हणतेस? कसा झाला हा?"

पार्वतीने तिच्या अंगाचा मळ उटणाबरोबर निघाला, त्याची गोळी करून बाहुला कसा केला व त्याचा पुत्रगणपती कसा झाला, ते सांगितले. तेव्हां शंकर म्हणाला-"म्हणूनच तो 'आई', 'आई' असे बडबडत होता खरा. तू तो आपला दोघांचा मुलगा म्हणालीस, तो माझा मुलगा कसा काय झाला?"

तो प्रश्न ऐकून पार्वतीच्या तोंडावाटे शब्द उमटत नसलेला पाहून विष्णूने ब्रह्मदेवाला खूण केली. ब्रह्मदेव पुढे येऊन म्हणाला-"शंकराने पार्वतीचा हात धरला तेव्हांच शंकराचे तेज पार्वतीच्या देहात सर्वत्र व्याप्त झाले. तेव्हांपासून शंकर पार्वतीच्या देहात अंतर्लीन होऊन तिचे अर्धांग झाला, म्हणून पुत्रगणपती हा शंकराचा-सुद्धा मुलगा आहे!" चतुर्मुख



ब्रह्मदेवाने आपल्या चारही तोंडांनी सर्व स्पष्ट सांगितले.

शंकर स्तब्ध उभा असतां पार्वती आपल्या बाळाच्या देहावर पडून रडत होती. त्याच वेळी आकाशवाणी झाली- ''उत्तर दिशेला डोके करून झोंपेत असलेल्याचे डोके कापून माझ्या धडाला चिकटवा. मी पुनर्जीवित होऊन उठेन.'' तो पुत्रगणपतीचा आवाज होता.

सर्व देवांनी व शंकराच्या प्रमथगणांनी सारी पृथ्वी चाळून काढली तरी उत्तरेकडे डोके करून झोपलेली एकही व्यक्ती दिसली नाही. आणखी हुडकत शोधत जात असतां सह्याद्री पर्वतातल्या बिल्ववनांत हत्तीचे एक पांढरेशुभ्र पिलूं उत्तरेकडे डोके करून शंकराला शरण गेल्यासारखें उपडें पडलेले दिसले.

ते हत्तीचे पिलू म्हणजे देवलोकांतील इंद्राचा हत्ती ऐरावत याचेच पिलू होते. एकदां इंद्र आपले वाहन ऐरावत हत्तीवर बसून येत असतां, ऐराव-ताचा मुलगा गजेंद्र हत्ती इंद्राला पाहूनही आपल्या नादांत दुर्लक्ष करून पुढे जाऊ लागला. इंद्राला त्याचा राग आला व म्हणाला-''माझ्या वाहनाचा हा पोरगा, आणि याला इतका गर्व चढला आहे काय?''

तेव्हां गजेंद्र शांतपणे म्हणाला- ''माझे बाबा आपले कर्तव्यपालन करीत आहेत. म्हणून तू मला कमी लेखण्याचं कांहीच कारण नाही!''

''अरे, हत्तीच्या कारट्या! मी देवेंद्र आहे!'' इंद्र गर्वोक्तीने म्हणाला.

''होय, तर मी गजेंद्र आहे! आणखी कोणी नागेन्द्र आहे व खगेन्द्रही आहे! असे कित्येक इंद्र आहेत! शंभर यज्ञ केले कीं इंद्र पदवी प्राप्त होते. म्हणून कोणी तपश्चर्या करूं लागला कीं तुला भीती वाटते. तरी इंद्रपद फार मोठं आहे, हे तू मोठ्या अभिमानाने का सांगत फिरतो आहेस?'' गजेंद्राने इंद्राला विचारले.

इंद्र संतापून शाप देत म्हणाला-''तुझं डोकं तुटून पडो!''

गजेंद्र हंसत म्हणाला- ''शंकराच्या आज्ञेशिवाय मला मुंगीसुद्धा चावणार नाही! त्या तुटून पडलेल्या माझ्या डोक्यासमोर तुला मान वांकवावी लागेल!''

गजेंद्र कसा त्रिकालज्ञानी आहे हे माहीत नसल्यामुळे इंद्राने गर्वांध होऊन म्हटले- ''तर तर मग तू त्या शिवशंकरावरच विश्वास ठेवून जमिनीवर पडून रहा!'' असा गजेंद्राला शाप देऊन इंद्राने त्याला स्वर्गातून पृथ्वीवर ढकलले. गजेंद्र



सह्याद्री पर्वतावर पडून नित्य शंकराचं स्मरण करीत, शंकराचं निवासस्थान कैलासपर्वत उत्तर दिशेला आहे तिकडे डोके करून झोपे.

देव गजेंद्राचे डोके कापून घेऊन गेले. ते डोके शंकराने मुलाच्या धडाला चिकटवून ठेवताच पुत्रगणपती 'गजानन' होऊन हंसतमुखाने उठून उभा राहिला.

''माझ्या लाडक्याला हत्तीचे तोंड? मला नाही बघवत!'' म्हणत पार्वतीने डोळे मिटून घेतले.

तेव्हां गजमुख कर्णमधुर स्वरात म्हणाला- ''आई! तूं इतकं मनाला कां लावून घेतेस? जे व्हायचं होतं ते सर्व निर्विघ्नपणे पार पडलं नाही का? त्या दिवशी तुम्ही दोघांनी भिंतीवर हत्तीचं चित्र पहात असतां मला पाहिलंत ते आठवत नाही का? तोच मी विघ्नेश्वर!''



पार्वतीला स्वप्न पडल्यासारखं ते दृश्य डोळ्यासमोर उभं राहिलं. शंकरालासुद्धा तो विघ्ननाश आठवला.

''विघ्ननाशा! तू आमचा मुलगा म्हणून अवतार धारण केला आहेस का? म्हणून कां तू माझ्याशी वाद घालून युद्ध करण्यासाठी दंड ठोकून उभा राहिला होतास आणि मला राग यावा म्हणून प्रयत्न केलास? आतां मला तुझी सर्व अद्भुत लीला कळली.'' शंकर म्हणाला.

''नाहीतर तू गजासुराला दिलेले वचन पुरे होईल हे कसे वाटले तुला?'' या शब्दांत गजाननाने शंकराला आठवण करून दिली.

शंकर म्हणाला-''चांगली आठवण करून दिलीस. मी गजचर्मसुद्धा कमरेला बांधून घ्यायचे आहे. गजमुख माझ्या मुलालाच तर आहे!''

त्यानंतर शंकराने गजचर्म आणून कंबरेला बांधून घेतले.

शंकर नम्रपणे म्हणाला-''विघ्नेश्वरा! तू आपले विश्वरूप दाखव!''

तेव्हां विघ्ननाश गजानन आकाशाएवढा वाढला व त्याला पांचमुखे दिसू लागली. पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या पंचमहाभूतांचे हिरवा, श्यामल, लाल, शुभ्र व निळा रंग अनुक्रमे त्या पांचही मुखांना होते. त्या डोक्यांवर नक्षत्रे फुलांसारखी शोभत होती. गजाननाचे गोल व विशाल पोट चकचकीत, लखलखीत होते, व आकाशाची बरोबरी करीत होते. त्याच्या अनेक हातांत अंकुश, परशु, पाश व कलशाबरोबर ब्रह्मा विष्णू व महेश या त्रिमूर्तींची शंख, चक्र, गदा, पद्म, डमरू, त्रिशूल, वज्रायुध, जपमाला, कमंडल, वीणा, तलवार, शक्तीचा भाला वगैरे आयुधे व



वस्तू होत्या. त्याचे रूप पाहण्यासाठी माना वर करून पाहणाऱ्यांचे डोळे त्याच्या तेजासमोर दिपून गेले व ते मान वाकवून उभे राहिले. सर्वांना एक अनिर्वचनीय आनंद वाटला. सरस्वती वीणा हातांत घेऊन गणपतीला आवडणारा भूपराग वाजवू लागली. त्यानंतर नारदाने भैरव राग मधून मधून म्हणत सर्व वातावरण निनादित केले. त्या आनंदात शंकराने आनंदतांडव नृत्य सुरू केले.

इंद्रासह कोटिकोटि देवांनी माना वाकवून गजाननाचे वंदन केले. तेव्हां इंद्राच्या कानावर "त्या डोक्यासमोर तुला आपली मान वांकवावी लागेल!" हे गजेंद्राने म्हटलेले वाक्य वारंवार आदळल्यासारखे झाले. पुत्रगणपतीच्या धडावर बसविलेले डोके गजेंद्राचेच आहे हे इंद्राला माहीत होते. इंद्र कान धरून तीन वेळ उठाबशा काढून त्रिवार आपल्या थोबाडीत मारून घेऊन मनांत म्हणाला-"गजेंद्रा! तूच खरा त्रिकालज्ञानी, मी अज्ञानी; माझ्या गर्वोक्तीबद्दल मला माफ कर!" सर्व देवांनी इंद्राचे अनुकरण करून गजाननाला नमस्कार केला.

विश्वरूप धारण केलेल्या अवस्थेत असलेल्या गजाननाला शंकर म्हणाला- "विघ्नेश्वरा! तुझं हे रूप पाहून यांत अनेक विशेष अर्थ आहेत, असे आम्हां सर्वांना वाटत आहे. ते सर्व कळावेत असे कुतूहल आम्हांला होत आहे!"

विघ्ननाश म्हणाला-"शिवभक्तांचा मेळावा म्हणजेच हे विश्व होय. सर्व विश्वाचे मातापिता असे हे जे पार्वती परमेश्वर आहेत, त्यांचा मी मुलगा आहे त्यांना मी पुष्पांजली वाहातो!" असे म्हणत गजानन हात जोडून गप्प झाला.

तेव्हां ब्रह्मदेव पुढे येऊन म्हणाला- "मत्स्यावतार धारण करून विष्णूने सोमकासुराचा बध केला आणि वेदांचे रक्षण केले. पूर्णचंद्रासारखी मृदुशांत कांती धारण करून विघ्नेश्वराने साक्षात् दर्शन देऊन ते वेद मला दिले. मला ज्ञान व सिद्धी प्राप्त झाली. त्यावेळी विघ्नेश्वराविषयी अनेक गोष्टी मला कळल्या. संकल्प सिद्धीला मूळ कारण विघ्नेश्वर आहे हे ओळखून मी विघ्नेश्वराचे स्मरण करून प्रथमपासून पुन्हां सृष्टीची रचना करू शकलो.

"विघ्नेश्वर हा विराट स्वरूप आहे. तो व्याप्त होतो म्हणूनच तो 'विष्णु' म्हणवितो. आकाश, वायु, तेज, आप व पृथ्वी या पंचमहाभूत गणांचा तो अधिपती असल्या कारणानेच विघ्ननाश हा महागणाधिपती झाला! लक्ष्मी व सरस्वतीचे निवासस्थान, अशी तुझ्या पंचमुखांतील दोन





मधली मुखे आहेत. त्या पंचमुखांना पंच महाभूतांचे प्रतीक पांच रंग आहेत.

"हत्तीचे डोके हे मेधा व शक्ती दोन्हीचे प्रतीक आहे. पोट मोठे आहे एवढ्यावरच भागत नाही. आवश्यक मेधा सुद्धा असली पाहिजे, हा त्याचा अर्थ होय! नव नवीन पक्वान्ने पडत असतात व जुनी पचून जात असतात. त्यांचा असा अर्थ घ्यावयाचा असतो की अनंत आकाशात नक्षत्रमंडळें ग्रह, उपग्रह, गोल, लोक, जसे भरलेले असतात तसे हे लंबोदर होय. हा लबकरच एका छोट्याशा उंदरावर बसून फिरणार आहे. म्हणजे सूर्यचंद्रादी ग्रह, महामंडळें शून्य आकाशांत आपली गती न सोडतां नियमितपणे फिरत राहणार, व झूल व अलंकार घालून हत्तीची अपूर्व अशी स्वारी निघते, तसे संपूर्ण ज्ञान विज्ञान सजून निघाले आहे असे म्हणावयाचे. विश्वविज्ञानाचे प्रतीक म्हणजेच विघ्नेश्वर. तो विज्ञानेश्वर नामेच ओळखला जातो.

"अखिल विश्वाचा अधिनेता व नियंता आहे तो. म्हणून अंकुश धारण करतो. बौद्धिक शक्तीचा विघ्नेश्वर गुरू आहे. बुद्धिभ्रम होऊ नये यासाठी माहूत हत्तीला काबूत ठेवतो, तसा हा अंकुश हा मनोनिग्रहाचे प्रतीक आहे. प्रत्येक प्राणी व पदार्थ आपापल्या पायरीवर, जागेवर, नैसर्गिक नियमाने बांधलेला आहे, याचे चिह्न म्हणून विघ्नेश्वराच्या हातांत पाश आहे. परिपूर्णता ही कधी कमीजास्त होत नसते, याचे चिन्हस्वरूप त्याने हातांत कलश धारण केला आहे. परशूने तो विघ्नांना छिन्नभिन्न करून टाकतो. सर्व विश्व हे नादात्मक आहे. चराचर सृष्टीतील कोट्यावधी आवाज ऐकू पडावेत यासाठीच त्याने आपले एवढे मोठे कान ठेवले आहेत. हत्तीचे डोळे जसे बारीकसारीक वस्तू

देखील पाहतात, तसे विघ्नेश्वराचे डोळे बारीक असले तरी सूक्ष्मदर्शी आहेत. त्या डोळ्यांना परमाणुपासून तो ब्रह्मांडापर्यंत सर्वनित्य दिसत असते. त्याचे वक्रतुंड हे सर्व वांकड्यांना तुकडे तुकडे करून सरळ करणारे आहे. कोणतीही वस्तू कोठेही असो, सोंड सरळ किंवा वांकडी होऊन त्या वस्तूपर्यंत पोचते.

''अन्नधान्याच्या समृद्धीला विघ्ननायकच अधिनायक आहे. तो भोजनप्रिय आहे, शरीर स्वास्थ्य चांगले म्हणून बौद्धिक बल संपूर्ण आहे. फळफळावळ, पक्वान्ने, पालेभाज्या वगैरेंना कधी नकार न देता तो स्वीकारतो. भाद्रपद महिन्यांत हत्तीसारखे ढग येतात व त्याच्या सोंडेसारखी मुसळाधार वृष्टी होते. मेघगणाचा नायक गण-नायक होय! विघ्नेश्वराने अवतार धारण केला तो याच भाद्रपद महिन्यात. भाद्रपद शुक्ल चवथीला जे विघ्ननाश गणाधिपाची पूजा करतात त्यांना संकल्पसिद्धी लाभते व विघ्नांना तोंड देण्यास स्फूर्ती व प्रसंगावधान लाभते.

''आपल्या दांतांची लेखणी करून ती उचलल्याशिवाय विघ्नेश्वराने आपल्या हातांत पंचमवेद म्हणविण्यालायक महाभारताचे लेखनकार्य केले ते चिरस्थायी होणार. विघ्नेश्वरांचा महिमा वर्णन करून सांगणे माझ्या सारख्याला साध्य नाही. कोणतेही कार्य प्रारंभ करण्यापूर्वी विघ्नेश्वराचे स्मरण करून व त्याची पूजा करून सुरू केले पाहिजे. 'शुभमस्तु!' अशी अभयमुद्रा धारण करूनच तो बसला आहे. महागणपति हा सर्वांचे प्रथम आराध्य दैवत आहे!'' असे सांगून ब्रह्मदेव मौन झाला.

तेव्हां शंकराने सर्वांकडे एकदां पाहिले व म्हणाला- ''ब्रह्मदेव म्हणाला ते सर्वांनी ऐकलंत ना? विघ्नेश्वराची सर्वांत आधी पूजा केली पाहिजे!''

सर्वांनी होकारार्थी त्रिवार माना हलविल्या. नारदाने पुन्हां आपल्या वीणेवर भूप राग वाजवायला सुरवात केली तर सरस्वतीने तदनुरूप रागिणी गायला सुरवात केली. त्या वातावरणात पार्वती विघ्ननायकाला नमस्कार करुं लागताच विराट रूप धारण केलेला विघ्ननायक म्हणाला- ''आई! आई! नको!'' आणि लगेचविराट स्वरूप सोडून बालगणेश होऊन आईच्या पायांना मिठी मारून उभा राहिला.







# मेहनतीचे फळ मधुर असते

बऱ्याच वर्षांपूर्वींची गोष्ट आहे. एक लहानसे गांव होते. त्यांत एक कष्टाळू शेतकरी राहात होता. त्याचा परिवार मोठा होता. त्याचे मातापिता, पत्नी, चार मुलें व एक धाकटा पांगळा भाऊ एवढी माणसें त्याच्या घरांत होती. ती सर्वजण खूप मेहनत करीत असत. शेतकरीदेखील सर्वांनी भरपूर काम करावे म्हणून त्यांना प्रोत्साहन देत असे. तो नेहमी म्हणायचा कीं मेहनतीचं फळ नेहमीच मधुर असतं.

त्याच्या शेतालगत एक मोठे आंब्याचे झाड होते. त्याच्या सांवलीत बसून तो दुपारचे जेवण करीत असे. शुभ प्रसंगी या आंब्याच्या पानांचे तोरण बांधून तो घराची सजावट करत असे. त्या झाडाची फळें दर हंगामात सारे कुटुंब मोठ्या आनंदाने चाखीत असे. आम्रवृक्ष त्या शेत-कऱ्यासाठी फारच उपयुक्त होता.

त्या आम्रवृक्षावर एक वनदेवी राहात होती. खूप वर्षे ती त्या झाडावर होती. शेतांतल्या पिकांतून शेतकऱ्याला जो कांही थोडा फायदा होत होता, त्यामुळें त्याच्या कुटुंबाची परिस्थिती हळूंहळूं सुधारत होती; तरीसुद्धां तो शेतकरी खूपच कष्ट करीत होता. वनदेवी हे सारं बघत होती.

एक दिवस वनदेवीने शेतांत काम करणाऱ्या या कुटुंबाच्या सर्व सभासदांच्याकडे लक्षपूर्वक पाहिले. तिच्या मनांत विचार आला, ''गरीबी असली कीं सर्वांनाच खूप कष्ट करावे लागतात. पण या शेतकऱ्याची परिस्थिती सुधारली, तरीदेखील तो आराम करायचे मनांत आणीत नाही. सुखाचा उपभोग घेण्याची कल्पनाही याच्या मनांत येत नाही. आणखी पैसा कमवण्याची इच्छा त्याला कधी होत नाही कां?''

आपल्या मेहनतीच्या कमाईतून त्याने शेजारचं एकरभराचं शेत विकत घेतलं. वनदेवीला अगोदरच हे माहीत होतं.

पहिला पाऊस पडल्यानंतर एक चांगला

- प्रदीप चौहान -



दिवस पाहून शेतकऱ्याने शेत नांगरायला सुरुवात केली. त्याची कष्टाळू वृत्ती पाहून वनदेवीच्या मनांत त्याच्याविषयीं दया उत्पन्न झाली.

त्या दिवशी संध्याकाळीं जेव्हां तो घरी परत जायला निघाला, तेव्हां वनदेवी त्याच्यासमोर प्रकट झाली आणि तिने त्याला आपली ओळख सांगितली. ती त्याला म्हणाली, "मी इतकी वर्षे पाहाते आहे कीं तू खूपच कष्ट करीत असतोस. उन्हापावसांत तू आपल्या कामांत दंग असतोस. तुझे कष्ट पाहून मला खरोखरच तुझी दया येते. बघ, तुला जितकी संपत्ति हवी असेल तितकी मी देईन. तू स्वतः मेहनत करणें सोडून दे आणि मजूर लावून शेतीचं काम करून घे."

शेतकऱ्याने वनदेवीला वंदन केले आणि विचारले, "जर माझे कष्ट तुला पाहावत नसतील तर मजुरांचे कष्ट तरी तू कसे पाहाशील? तीदेखील माझ्यासारखी माणसेंच आहेत. होय कीं नाही?"

त्याचा प्रश्न ऐकून देवी नाराज झाली नाही. ती म्हणाली, "ते सर्वजण आपलं पोट भरण्यासाठी मेहनत करतात. त्यांना कष्ट करावेच लागतात. पण मला शंका आहे कीं तुला कष्ट करण्यांतच सुख मिळत राहाते. म्हणूनच मला तू आवडतोस. बोल, किती धन हवंय?"

शेतकऱ्याने आणखी एकवार देवीला नमस्कार करून म्हटले, "मी कष्ट करतो, अपार मेहनत करतो, म्हणून तू माझ्यावर प्रसन्न आहेस. मला संपत्ति देऊन तुझ्यापासून दूर करायचा तुझा विचार आहे कां? नाही देवी. तुझा आशिर्वाद मला संपत्तीसमान आहे. मला धनसंपदा नको आहे." एवढं म्हणून तो तिथून निघून गेला.

दोन दिवसानंतर जेव्हां तो शेतकरी शेतांत नांगर चालवत होता, तेव्हां नांगराचा फाळ कशावरतरी आपटल्याचा आवाज आला. त्याने तिथें उकरून पाहिले तर तिथें एक पितळेचा हंडा सांपडला. त्यांत सोन्याचांदीच्या मोहरा भरलेल्या होत्या.

त्याने तो हंडा खांद्यावर घेतला आणि तो आंब्याच्या झाडापाशीं आला. त्याने वनदेवीला हांक मारुन बोलावले. "देवीमाते" असं तो दोनतीन वेळा जोरजोरांत ओरडला.

दुसऱ्याच क्षणीं देवी प्रत्यक्ष येऊन म्हणाली, "तूं मला बोलावलंस? सांग, काय झालंय?"

शेतकऱ्याने हंड्यातल्या मोहरा दाखवून म्हटले, "हे तुझंच काम आहे ना?"



देवीने म्हटलं, "काय बोलतो आहेस तूं? मला तर कांहीच माहिती नाही."

शेतकऱ्याने हंसून म्हटले, "इतकी वर्षें मी हे शेत करतो आहे. या शेताचा कानाकोपरा मला ठाऊक आहे. तुझी एवढीच इच्छा आहे ना, कीं मी मजुरांकडून काम करवून घेऊं आणि स्वतः इतकी मेहनत करूं नको म्हणून? ठीक आहे, तसंच होईल" तो हंडा घेऊन शेतकरी तिथून निघून गेला.

दुसऱ्या दिवशी त्याच्याबरोबर दहा मजूर आले. त्यांना पाहून देवीला फारच आनंद झाला. परंतु तिचा आनंद फार वेळ टिकला नाही. जे मजूर कामासाठी आले होते, त्यापैकीं फक्त दोघेच काम करायला लायक दिसत होते. बाकीचे म्हातारे होते. कांही ना कांही व्याधीमुळें विकलांग दिसत होते.

शेतकऱ्याने प्रत्येकाला वेगवेगळे काम नेमून दिले. तोही त्यांच्याबरोबर काम करूं लागला. दुपारीं शेतकऱ्याच्या बायकोने सर्वांसाठी जेवण आणले. त्याच वृक्षाच्या सांवलीत सर्वांनी मिळून भोजन केले.

नंतर घटकाभर सर्वांनी एकमेकांना आपापल्या सुखदुःखाच्या कथा सांगितल्या. शेतकऱ्याने त्यांची दुर्दशा पाहून त्यांना योग्य तो सल्ला सांगितला.

"एक गोष्ट नेहमी लक्षांत ठेवा. परमेश्वराने मानवाची ही सृष्टी कांही आपण रिकामटेकडेपणाने बसण्यासाठी निर्माण केलेली नाही. भरपूर कष्ट केल्यानंतर सुखासमाधानाने राहाण्यासाठी केलेली आहे. जोपर्यंत आपण जिवंत आहोत, तोपर्यंत



जेवढी मेहनत आपल्याला करता येईल तेवढी आपण केलीच पाहिजे."

दिवस मावळण्यापूर्वी मजुरांनी काम थांबवले. शेतकरी जवळच्याच एका झोंपडीत शिरला. वनदेवी देखील त्याच्या पाठोपाठ झोंपडीच्या आंत गेली.

शेतकऱ्याने त्या पितळी हंड्यातून कांही चांदीच्या मोहरा काढला आणि मजुरांना योग्य मजुरी दिली.

"या शेतकऱ्याने मजुरी देताना कंजूषपणा केला नाही. पण मग या लुळ्यापांगळ्या लोकांना तो काम करायला कां घेऊन आला असावा?" वनदेवीला प्रश्न पडला होता.

मजूर परत गेल्यानंतर शेतकऱ्याने देवीला बोलावून सांगितले. "पाहिलंस ना? तुझ्या

इच्छेनुसार मी शेतांत काम करायला मजूर घेऊन आलो. आणि त्यांना कामाला लावले. आता तू खूष आहेस ना?''

''मी आणि प्रसन्न? मी कशाला प्रसन्न राहीन रे? तू तर क्षणभरदेखील बसला नाहीस. मग ह्या मजुरांना आणायचा कसला आलाय फायदा?'' देवीने विचारले.

''तू अगदी बरोबर विचारलं आहेस. आज जे शेतांत काम करायला आले होते ना, ते अत्यंत आळशी नि कामचोर लोक आहेत. म्हणून त्यांच्यावर काम पूर्णपणे मी सोंपवलं नाही. त्यांच्याजवळ राहून, मी त्यांच्याकडून काम करवून घेतलं. तू जे धन मला दिलं आहेस, त्यांतून मी त्यांना योग्य तितकेच वेतन दिले. आता सांग, आता तरी तू खूष आहेस ना?'' त्याने हंसतहंसत देवीला विचारले.

त्यावर वनदेवी म्हणाली, ''तुझे बोलणें ऐकल्यानंतर मी खरंच संतुष्ट झाले आहे. देवतांच्यात माझ्यासारखी मानवी, व मानवजातीत तुझ्यासारखी देवतुल्य मंडळी असतात, हे पाहून मला फारच आनंद झाला आहे. तू असाच राहा आणि अशीच सत्कृत्यें करीत राहा. तुला हवे असेल तेवढे धन मी तुला देत राहीन.''

देवीचे हे बोलणें ऐकून शेतकऱ्याने हात जोडून तिला विनंती केली व म्हणाला, ''माते, कृपा करून असं मात्र करूं नकोस. विनासायास मिळणारं धन, फुकटांत मिळणारी संपत्ती कुणालाही लाभत नाही. मी जे नवे शेत खरेदी केलंय, त्याच्यांत जर उत्तम पीक आलं तर मजुरांच्या श्रमाची मजुरी मी माझ्या कष्टाच्या कमाईमधूनच देईन. तेव्हां या मजुरांच्याबरोबरीने मीही काम करीत राहीन आणि आणखी जमीन खरेदी करीन. तू फक्त या आम्रवृक्षावर बसून मला सदैव आशिर्वाद देत राहा. यापेक्षां जास्त कांही मला नको.''

देवीने त्याचे बोलणें लक्षपूर्वक ऐकले. त्याच्या चेहऱ्यावरचा आत्मविश्वास व स्वाभिमान पाहून तिला फारच आनंद झाला.

''ठीक आहे. कष्टाचे फळ नेहमीच मिळते. जो मेहनत करतो त्याला नेहमीच सुख मिळत राहाते.'' असं स्वत:शीच म्हणून तिने शेतकऱ्याला आशिर्वाद दिला व ती अंतर्धान पावली.







# बजरंगाचे साहस

बजरंग बलरामपुरमधे राहात होता. त्या दिवशी तो नेहमीसारखा शांत नव्हता. रागाने त्याचा चेहरा फुलून निघाला होता. त्याने एक तलवार काढली आणि दगडावर तो ती पाजळूं लागला. गेले कित्येक दिवस तो आणि वीरबाहू यांच्यामधे शेतीच्या कामावरून होणारा वाद आता विकोपाला गेला होता. वास्तविक बाब अगदी किरकोळ होती. पण बघताबघता त्याला भांडणाचे स्वरूप आले. त्यावेळीं बजरंगने संतापाच्या भरांत म्हटले, ''अरे वीरबाहू, जर मी तुझ्या पोटांत तलवार खूपसून तुला मारले नाही, तर माझे नांव बजरंग नव्हेच! तुला ठाऊक आहे ना, मी या प्रांतातल्या प्रसिद्ध भीमाच्या कुळांतला आहे!'' अशी प्रतिज्ञा करून तो घरीं परतला.

बजरंग तलवारीला धार लावीत होता आणि एकीकडे तोंडाने वीरबाहूला यथेच्छ शिव्या देत होता. या गोष्टीचा बभ्रा गांवभर झाला. कांही लोक हे पाहायला त्याच्या घरासमोर जमले. गांवातल्या दोघातिघा वडीलधाऱ्या मंडळींनी बजरंगाला म्हटले, ''अरे, तुमची दोघांची शेते एकमेकांला लागून आहेत. दोघांनाही एकामेकांची मदत लागेल ना कधीतरी! दोघांच्यात उगीच तेढ कशासाठी ठेवायची? तुझा राग विसरून जा.''

पण बजरंगाने त्यांच्याकडे सरळ दुर्लक्ष केले, आणि हातांत तलवार घेऊन तो वीरबाहूच्या घराकडे निघाला. हा तमाशा पाहात गांवातली पोरेंटोरेंही मागोमाग जाऊं लागली. जेव्हां ते वीरबाहूच्या घरासमोर गेले, तेव्हां त्यांना कळलं कीं तो घरांत नसून शेतावर गेलेला आहे. बजरंगाने जोराने तलवार हलवली आणि पुन्हां वीरबाहूला शिव्या देतदेत तो शेताकडे निघाला. तोपर्यंत गांवातले आणखी कांही लोक तिथे गोळा झाले.

शेताच्या बांधावर बसलेला वीरबाहू दांत घांसत होता. हातांत तलवार घेतलेल्या बजरंगाला त्याने पाहिले. पण तो जरासादेखील हलला नाही कीं कांही बोलला नाही. त्याला त्याचं कांहीच वाटलं नाही. त्याने एकवार बजरंगाकडे पाहिलं आणि पुन्हां वळून तो आपल्या कामांत गुंतला.

- समीर मिश्रा -

बजरंगाने हातांतली तलवार हवेंत फिरवली, आणि लांबलांब टांगा टाकीत तो वीरबाहूच्याजवळ आला व मोठ्याने ओरडत म्हणूं लागला, "अरे, तूं मला अजून नीटपणें पाहिलं नाहीस असं दिसतंय. माझ्या हातांत ही तलवार आहे; बघ जरा नीट! ही मी तुझ्या पोटांत खुपशीन आणि तुझा कोथळाच बाहेर काढीन, सांगतोय तुला!" असं म्हणून त्याने तलवार वर उचलली.

जमलेल्या लोकांना वाटलं कीं बजरंग कांही पोकळ बढाई मारीत नाही आहे, आणि तो खरोखरच वीरबाहूला मारेल. लोकांनी बजरंगाला पकडलं आणि ते त्याला दूर घेऊन गेले.

इतकं सगळं होऊन देखील वीरबाहू थोडासुद्धां बधला नव्हता. तो जागच्याजागी बसला होता. त्याने आपली बैठक बदलली नाही किंवा बजरंगाकडे पुन्हां वळून पाहिले नाही. तेवढ्यांत श्याम नांवाचा एक माणूस वीरबाहूच्याजवळ येऊन म्हणाला, "काय करतो आहेस तूं? एका बाजूला बजरंग तलवार घेऊन तुला मारायला येतोय आणि तू चूप बसला आहेस! कांहीही झालं नाही हे खरं, पण तू त्यांच्याकडे पुन्हां वळूनदेखील बघितलं नाहीस. वा, तुझ्या हिंमतीला दाद दिलीच पाहिजे."

एकीकडे बजरंग लोकांकडून आपली सुटका करुन घेण्यासाठी धडपडत असताना म्हणाला, "सोडा मला, आज वीरबाहूच्या जिंदगीचा शेवटचा दिवस आहे. मी त्याची खांडोळी करणार आहे."

लोकांशी झटापट करीत असलेल्या बजरंगाकडे पाहून वीरबाहूने श्यामला म्हटलं, "श्याम, आता मी तुला एक गंमत दाखवतो ती बघ हं! तू तिथें जा आणि ज्या लोकांनी त्याला पकडून ठेवलेलं आहे,





त्यांनी जाऊन हळूंच सांग कीं त्याला सोडून द्या."

वीरबाहू बजरंगाला सोडवण्यासाठी कां सांगतो आहे, ते कांही श्यामच्या लक्षांत आलं नाही. श्यामला वाटलं कीं बजरंग जोरजोराने ओरडत आहे, शिवीगाळ करतो आहे, मारण्याची धमकी देतो आहे आणि हवेंत तलवार फिरवतो आहे. वीरबाहूला आपल्या स्वतःच्या प्राणांचीदेखील पर्वा नाही कां? हे कसलं असलं अचाट धैर्य? असा विचार मनांत घोळवत तो बजरंगाला पकडून धरणाऱ्या लोकांच्याजवळ गेला. आता काय होईल ते पाहाण्याची त्यालाही उत्सुकता होतीच. त्यांच्यापैकीं एकाला त्याने खुणेने बोलावलं आणि त्याला सांगितलं, "बजरंगाला सोडून द्या!"

झालं, बजरंगाला त्यांनी सोडून दिलं. अकस्मात ही घटना घडली आणि बजरंग तोंडघशी पडला. वीरबाहूला आपली तलवार दाखवत एकेक पाऊल मोजूनमापून टाकत बजरंग वीरबाहूच्या दिशेने जाऊं लागला.

पण यावेळेला त्याला पकडायला कुणीही पुढे येईना. हे जेव्हां त्याच्या लक्षांत आलं, तेव्हां तो जागच्याजागीच उभा राहिला. वीरबाहूला संबोधून तो म्हणाला, "अरे वीरबाहू, तुझ्या आयुष्याचे अजून कांही दिवस शिल्लक आहेत. म्हणून तू वांचलास. इतक्या लोकांच्यासमोर तुला मारून मला तुरुंगाची हवा खायची नाहीय, किंवा फांसावर चढायचं नाही. असला मूर्खपणा कांही मी करणार नाही. आज नाही, तर पुन्हां कधीतरी नक्की तुला मी पाहून घेईन. त्यावेळेला तुला कुणी नाही वाचवूं शकणार बरं! तुझं मरण माझ्या हातूनच होणार आहे हे विधीलिखित आहे" असं म्हणून तो परत फिरला आणि तिथून निघून गेला.

तो गेल्यानंतर वीरबाहूने तिथें उभे असलेल्या लोकांना म्हटलं, "तुम्ही सर्वांनी पाहिलंत ना, तुम्ही जसं त्याला सोडून दिलंत, तशी तो घाबरून निघून गेला. त्याला ठाऊक होतं कीं तुम्ही त्याला माझ्यावर हल्ला करण्यापासून रोखाल.

मला नुसती तलवार हवेंत परजून त्याने घाबरवण्याचा प्रयत्न केले. मारण्यासाठी येणारा माणूस आपल्याबरोबर लोकांचे लटांबर घेऊन कां येत असतो? भुंकणारे कुत्रे चावत नाहीत, आणि चावणारे कुत्रे भुंकत नाहीत. बरोबर आहे ना माझं? ही म्हण या ठिकाणीं अगदी चांगली लागूं पडते."

त्याचे बोलणें ऐकल्यानंतर वीरबाहूच्या धैर्याचे कारण त्यांच्या लक्षांत आले.





# रडवणारा

दुसऱ्यांना आशा लावून झुलवायचं आणि नंतर त्यांना रडवायचं, ही विकासची संवय होती. त्यांत त्याला खूप आनंद वाटत असे. एकदा जेव्हां तो गल्लींतून जात होता, तेव्हां एका भिकाऱ्याने हात पसरून त्याला म्हटले, ''महाराज, मी उपाशीं आहे. दोन दिवस कांहीही खायला मिळाले नाही. एखादा रुपाया द्या. मी पोटभर तरी जेवेन.''

विकासने त्याला नखशिखान्त न्याहाळून म्हटले, ''तू मला महाराज म्हणून पुकारलंस. पण मला तर तूच महाराज वाटतो आहेस. तुझा चेहरा किती तेजस्वी आहे. माझं ऐक. मी जसं सांगीन, तसं केलंस तर तुझी गरिबी दूर होईल. तुला उपाशी राहावं लागणार नाही. कोणाच्यासमोर हात पसरायची वेळ येणार नाही. माझ्याबरोबर येशील?''

भिकारी त्याच्या पाठोपाठ गेला. विकास त्याला सरळ आपल्या घरीं घेऊन गेला आणि त्याला नवे कपडे त्याने घालायला दिले. नंतर त्याला घेऊन दुसऱ्या एका घरी गेला. तिथल्या घरमालकाला विकासने म्हटले, ''खुद्द महाराज वेष पालटून इथें आलेले आहेत. तुम्हा लोकांच्या अडचणी, दुःखें त्यांना जाणून घ्यायची आहेत.''

तो घरमालक खरोखरच अडचणींत सांपडला होता. ही संधी मिळाल्यावर त्याने आपल्या अडचणींचा पाढा म्हणायला सुरवात केली. विकास त्याला म्हणाला, ''उद्यां सकाळीं गांवाबाहेरच्या उजाड धर्मशाळेंत तू ये. तिथें तुला हवं तेवढं धन महाराज स्वतः देतील.''

त्यानंतर विकासने भिकाऱ्याला आणखी एका घरी नेलं. त्या घरमालकाला सैनिकांनी विनाकारण तुरुंगात टाकलं होतं. आणि सुटकेसाठी ते शंभर मोहरा मागत होते.

विकासने सांगितलं, ''तुम्ही सर्वजण उद्यां

सकाळीं गांवाबाहेरच्या धर्मशाळेंत या. महाराज तुमची समस्या चटकन सोडवतील.''

त्या गांवात एक कवी होता. आपले काव्य राजाच्या दरबारांत ऐकवण्याची त्याची तीव्र इच्छा होती. एक म्हातारी आपल्याच वयाच्या राजमातेला पाहायला उत्सुक होती. असे कितीतरी लोक गांवात होते. विकास त्या सर्वांना भेटला. विकासने त्या सर्वांना उजाडताच त्या धर्मशाळेंत येण्यास सांगितलं.

संध्याकाळ झाली तेव्हां विकासने भिकाऱ्याला आपल्या घरी नेले. त्याला दिलेले कपडे परत घेतले आणि तो म्हणाला, ''जा, आता जाऊन भीक माग.''

''उद्यां तू गांवाबाहेरच्या ओसाड धर्मशाळेंत पहांटेच ये बरं कां! मग बघच, तिथें काय काय होईल ते! खरी मजा येईल. हंसूनहंसून पोट दुखायची वेळ येईल.'' विकासने त्याला सांगितलं.

दुसऱ्या दिवशी विकास सकाळीं धर्मशाळेंत गेला. आणि तिथले दृश्य पाहून चकितच झाला. खुद्द महाराज तिथें जातीने हजर होते. आदल्या दिवशी विकासने ज्या ज्या लोकांना शब्द दिला होता. त्या त्या लोकांची इच्छा महाराजांनी पूर्ण केली होती.

विकासच्या आता लक्षांत आलं कीं तो भिकारी म्हणजे दुसरा तिसरा कुणी नसून स्वतः महाराजच होते. तो लगेच महाराजांच्या पाया पडला आणि क्षमा मागून म्हणूं लागला, ''महाराज, माझ्यामुळें गांवातल्या कितीतरी लोकांचे भले झाले आहे. आता आपण माझ्यावर ही कृपा करावी.''

''ठीक आहे, आजपासून तू कैदी बनून गांवातल्या मध्यावर असलेल्या मातीच्या भिंतीच्या घरामधे राहाशील. गांवात कुठलीही समस्या उद्भवली कीं तुला सांगण्यात येईल आणि तुझ्यामार्फत त्या समस्येचे निराकरण केले जाईल. पण लक्षांत ठेव, तू नेहमीच आमचा कैदी राहशील.''

''महाराज, आपण मला ही असली कसली शिक्षा देत आहात?'' विकासने दीनवाण्या स्वरांत विनवले. ''मी तरी काय करणार? तुझ्यासारख्या लोकांना रडवण्यांत मला मजा वाटते ना!'' महाराज हंसतहंसतच म्हणाले.







# माया सरोवर

## 3

*(जयशीलने सेनाध्यक्षाचा पुत्र मंगलवर्मा यास वाघापासून वांचवले. कनकाक्ष राजाने त्याची प्रशंसा केली आणि मंत्र्याच्या सल्ल्यानुसार त्याने आपल्या कार्यालयांत त्याला नोकरीही दिली. जेव्हां राज्याच्या कामासंबंधी मंत्री सविस्तर माहिती सांगत होते. तेव्हां एक सैनिक एक तुटकी तलवार आणि मोत्यांचा एक हार घेऊन तिथें आला.)*

सैनिकाने आणलेली ती तुटकी तलवार आणि मोत्याचा हार पाहून कनकाक्ष राजा व धर्ममित्र मंत्री आश्चर्यचकित झाले. मंत्र्यांनी तो हार लक्षपूर्वक पाहिला आणि तो म्हणाला, ''महाराज, हा हार युवराणींचा तर नाही ना? आणि ही तुटकी तलवार आपल्या युवराजांची तर नव्हे ना?''

राजानेही त्या दोन्ही वस्तू लक्षपूर्वक न्याहाळून म्हटले, ''युवराज व युवराणी जिथून नाहीसे झाले, त्या झाडाजवळच या वस्तू मिळाल्या, असं जर यांनी सांगितलं नसतं तर मलाही यांचा विश्वास वाटला नसता.''

''आपण आत्ताच युवराणींची मुख्य सखी मल्लिका हिला बोलावून घेऊं या. जरी तलवारीबाबत तिला कांही सांगता आलं नाही तरी किमान मोत्याच्या हाराबद्दल तरी ती नक्कीच कांहीतरी सांगू शकेल.'' मंत्री धर्ममित्राने सुचवले.

राजाचा आदेश मिळाल्यावरून एक सेवक मल्लिकाला तिथें घेऊन आला. आपली युवराणी नाहीशी झाल्यापासून ती फारच दुःखी होती.



मोत्याचा हार कोणत्या जागी मिळाला ते कांही राजाने तिला सांगितलं नाही. तिला हार दाखवून राजा म्हणाला, "अंत:पुरांतल्या स्त्रियांपैकी कुणाचा तरी हार हरवलाय. हा घेऊन जा आणि जिचा तो असेल तिला देऊन टाक."

मल्लिका त्या हाराकडे नीट लक्ष देऊन निरखत होती. ती एका जागी थांबून उद्गारली, "महाराज, हा हार युवराणींचा आहे. जेव्हां आम्ही अरण्यांत विहार करायला गेलो होतो, तेव्हां त्यांनी हा हार घातला होता."

हा हार युवराणींचाच आहे या शंकेला जेव्हां मल्लिकानेदेखील दुजोरा दिला. तेव्हां दु:खावेगाने राजाचे मन कळवळले. मल्लिकाला आणखीही कांही विचारायचे असूनही राजाला विचारता येईना. त्याचे डोळे भरून आले, गळा दाटून आला आणि मान खाली घालून तो स्तब्ध राहिला.

राजाची ही दयनीय अवस्था पाहून मंत्र्याने मल्लिकास विचारले "मुली, असले मौल्यवान हार कितीतरी श्रीमंत स्त्रिया वापरतात. हा हार युवराणींचाच आहे म्हणून तू इतकं खात्रीपूर्वक कसं सांगू शकतेस?"

त्या हारांतले दोन मोती दाखवून मल्लिका म्हणाली, "हे दोन खराब झालेले मोती आपण पाहा ना! एकदा युवराणी माझ्यावर नाराज झाल्या आणि हा हार त्यांनी माझ्यावर फेंकला. त्यांचा नेम चुकला आणि हा हार झाडावर आदळला. तेव्हां हे दोन मोती थोडे खराब झालेले होते." मल्लिकाच्या बोलण्यावरून तो हार युवराणी कांचनमालाचाच आहे हा विश्वास पक्का झाला. तेव्हां ती तुटकी तलवारदेखील युवराजाचीच असावी असे सर्वांना वाटले.

राजाने मंत्र्याला विचारले, "ज्या भिल्लाला या वस्तू मिळाल्या होत्या, तो आता कुठे आहे?" ज्या सेवकाने हार व तलवार आणली होती, तो लगेच म्हणाला, "त्याची मानसिक स्थिती ठीक नाही. तो आपल्या प्रश्नांची उत्तरें नीट देऊं शकणार नाही. "दोन पायांच्या मगरी" असं म्हणून तो किंचाळतो आहे."

हे ऐकूनच सिद्धसाधक चकित झाला व पुढें म्हणाला, "महाराज! महाकालच्या परिवारांतले भूतगण कधीकधी विचित्र वेषांत आपल्याला दिसतात. त्या भिल्लाला देखील कांहीतरी भूतबाधा झाली असावी. त्याला आपल्या ताब्यांत घेतलं पाहिजे आणि त्याच्याकडून खरी गोष्ट काढून घेतली पाहिजे. मी त्याला सारं कांही विचारून घेऊं शकेन असा मला पूर्ण विश्वास आहे. मला व जयशीलला त्यासाठीं अरण्यांत जाण्याची अनुमती आपण द्यावी."

राजाने तशी संमती दिली. सिद्धसाधक व जयशील एका सेवकाला घेऊन अरण्यांत शिरले व मोठ्या पारंब्या असलेल्या वटवृक्षाजवळ पोंचले. तिथें अद्याप कांही भिल्ल होते. त्यांनी या भिल्लाला दोरीने बांधून ठेवलेला होता. त्यांच्यामधे एक भूतवैद्य होता. तो 'हाम फट, हाम फट' म्हणत ओरडत होता आणि त्या भिल्लावर भस्म फेंकीत होता.

हे दृश्य जयशील, सिद्धसाधक व सेवक यांनी पाहिले. सिद्धसाधकाने आपली लाठी वर उचलली आणि भूतवैद्याला थांबण्यासाठी खूण केली.

भूतवैद्याने सिद्धसाधकाला गुरगुरताना पाहिले आणि तो त्याच्यावर तुटून पडणार, तेवढ्यांत राजसेवक त्याला थांबवत म्हणाला, "थांबा, हे राजाच्या दरबारांतले मांत्रिक आहेत."

एक पाऊल पुढें टाकीत सिद्धसाधकने म्हटलं, "अरे, तू तर नीच ग्रहोपासक आहेस. माझ्या या मंत्रदंडाने मी तुझी एक काडी बनवून, तुला हवेंत उडवून लावीन, समजलं?"

भूतवैद्य भीतीने थरथर कांपू लागला. भेदरलेल्या भिल्ल तरुणास सिद्धसाधक म्हणाला, "अरे भीम भिल्ला, पहा, दोन पायांच्या ज्या मगरीने तुला घाबरवून सोडले होते, तिच्या छातींत या शूराने तलवार खुपसली आणि मारून टाकले. आता तुला भिण्याचे कांही एक कारण नाही. चल, उठून उभा राहा. जयशीलने जी तलवार मगरीच्या छातीत खुपसली होती, ती ही तलवार आहे बघ!" असं



म्हणत साधकाने जयशीलच्या म्यानांतून तलवार काढली आणि दाखवली.

भिल्ल तरूण लगेच उठून उभा राहिला आणि म्हणाला, "महोदय, आपण दोन पायांच्या मगरीला खरंच मारलंत? मग तिचं शव कुठे आहे?"

सिद्धसाधकाने बेधडक सांगितले, "अरे, जेव्हां मनुष्य मरतो तेव्हां त्याचं शव होतं. जेव्हां पिशाच मरतं तेव्हां त्याचं कुठे शव बनतं कां? आता मला सांग, ती तुटकी तलवार आणि मोत्यांचा हार तुला कुठे मिळाला?"

भिल्लाने घसा साफ करीत म्हटले, "महोदय, मी जेव्हां शिकारीसाठीं आमच्या वस्तींतून निघालो, तेव्हां या वृक्षाच्या फांद्यातून एक रानकोंबडा बांग देत होता. मी त्याच्यावर बाण सोडला, तो त्याच्या पंखात अडकला. त्या रानकोंबड्याला उडता येईना व तो तडफडत एका



झुडुपांत पडला. मी तिथें त्याला शोधायला गेलो'' असं म्हणत तो सिद्धसाधक आणि जयशील, यांना एका गर्द झाडींत घेऊन गेला आणि म्हणाला, ''महोदय, याच झाडींत मला मोत्यांचा हार व तुटकी तलवार मिळाली.''

भिल्ल तरुणाचे बोलणें पूर्ण होण्याच्या आंतच सिद्धसाधकाने झाडींत वाकून पाहिले आणि एक उडी मारत तो मागे वळला व म्हणाला, ''जयशील, या महारण्याच्या मध्यें, या काटेरी झाडीत, एक प्राचीन तालपत्र ग्रंथ आहे. जय महाकाली!'' असं म्हणून त्याने झाडींतून ताडपत्रांचा एक ग्रंथ काढला.

तो ग्रंथ पाहून सिद्धसाधक एकदम उत्साहित झाला आणि त्याच्या चेहऱ्यावर एक निराळीच चमक दिसूं लागली. तो त्या ग्रंथाची एकएक पानें उचलून उलटायला लागला. ते लक्षपूर्वक ती पानें बघत होता. शेजारीं जयशील उभा आहे हे देखील तो ग्रंथ वाचताना सिद्धसाधक विसरला. त्याची ही अवस्था पाहून जयशील चकित झाला होता. सिद्धसाधक स्वतःशीच बोलूं लागला, ''ही कुठली भाषा आहे? कुठल्या लोकामधले नागरीक ही भाषा बोलतात? ही ताडपत्रें नाहीत, ही बरीच मोठी आहेत. बहुतेक कमलपत्रांपासून केलेली असावीत.''

जयशीलने साधकाकडून ती पत्रें घेतली आणि एकवार ती नीट पाहून तो म्हणाला, ''भिल्लाने वर्णन केलेल्या दोन पायांच्या त्या मगरीने ही इथें टाकली असतील.''

''हो, हो, असंच झालं असेल'' असं म्हणत त्या भिल्ल युवकाकडे वळून साधकाने विचारलं, ''पण दोन पायांचा तो मगर इथें कशाला आला होता?''

''झाडींत जो रानकोंबडा पडला तो बाहेर ओढून काढण्यासाठी मी खाली वांकलो. पाठीमागून आवाज आला. म्हणून मी मागे वळून पाहिलं तो मगरीच्यासारखी एक महाकाय आकृती मागे उभी होती. मी घाबरून ओरडलो आणि शुद्ध हरपून खाली कोसळलो,'' भिल्ल तरुणाने सांगितलं.

जयशीलने भिल्लाच्या पाठीवरून हात फिरवत विचारले, ''तू ज्या रानकोंबड्यावर बाण मारला होतास. तो कोंबडा कुठे आहे?'' भिल्ल तरुण कांहीतरी उत्तर देणार त्यापूर्वीच भूतवैद्याने दांतओठ खात म्हणाला ''पर्वतदेवी त्याला उचलून घेऊन गेली असेल. सकाळच्या प्रहरीच याने त्या कोंबड्याला मारून मोठा अपराध केला आहे.''

जयशीलने नाराजीच्या सुरांत सिद्ध साधकास म्हटले, ''इथें सगळे मूर्ख आणि नालायक लोक एकत्र



जमलेले दिसताहेत. या डोंगरदऱ्यांत, आपल्याला कमीतकमी एक आठवडाभर तरी हिंडायला लागणार आहे. त्या दोन पायाच्या मगरीचा छडा आपण लावलाच पाहिजे.''

''तूं ठीक सांगतो आहेस, जयशील. ज्याने हा ताडपत्रांचा ग्रंथ इथें टाकला आहे, त्यानेच युवराज व युवराणींचं अपहरण केलं असलं पाहिजे. म्हणजे बहुधा तो अवश्य कुणीतरी राक्षस असेल. किंवा यक्ष, गंधर्व, किन्नर यांच्यापैकी एखादा असेल.'' सिद्धसाधकाने आपली शंका व्यक्त केली. त्यानंतर दोघेही जवळच्याच पर्वताच्या दिशेने जाऊं लागले. त्यांच्याबरोबर आलेल्या राजसेवकाने विचारले, ''महोदय, मला परत फिरण्याची अनुमती आपण द्यावी. महाराजांना काय निरोप सांगायचा?''

सिद्धसाधक म्हणाला, ''महाराजांना हे शुभवर्तमान सांग. ज्या वटवृक्षाजवळच त्यांची मुलें नाहीशी झाली, तिथेंच एक महान ग्रंथ सांपडला आहे. त्या ग्रंथाच्या मदतीने आम्ही युवराज व युवराणींचा लौकरच शोध काढूं, दुष्ट लोकांचा संहार करूं आणि युवराज व युवराणीला राजवाड्यावर सुखरूप घेऊन येऊं.''

सिद्धसाधकाच्या बोलण्यावर जयशील स्वतःशीच हंसत होता. नंतर ते घनदाट अरण्याने वेढलेल्या पर्वताकडे जाऊं लागले. त्यावेळीं पर्वताच्या पायथ्याच्या एका खेड्यांतले सारे गांवकरी आपापल्या झोंपड्यांतून बाहेर आले आणि घाबरून आरडाओरडा करीत होते. कारण त्याच दिवशी सकाळीं त्यांच्या ज्वारीच्या शेतांत एक विचित्र घटना घडली.

त्यांच्या शेतांत एका जागी मचाण होतं.



शेतांची राखण करण्यासाठीं चौदा वर्षांचा एक मुलगा त्या मचाणावर बसला होता. त्याने शेताच्या दिशेने एक हत्ती येताना पाहिला. त्याला ठाऊक होतं कीं गोफणीने दगड मारला तरी हत्तीला पळवून लावणें अशक्य होतें. पण तो मुलगा मोठा शूर होता. हत्तीने शेतांत घुसून पिकाची नासाडी होऊं नये. म्हणून कांहीतरी प्रयत्न करायचे त्याने ठरवले. त्याने गोफणीला एक टोंकदार दगड लावला आणि हत्तीवर नेम धरून त्याने तो दगड गोफणीने मारला.

तो दगड नेमका हत्तीला लागला. जखम झाली तर साधारणपणें हत्ती चींची करतो. परंतु तसं झालं नाही. त्या मुलाने पाहिलं. तर एक विचित्र आकार हत्तीच्या पाठीवर होता तो उभा राहून म्हणाला, ''ए पोरट्या, दगड मारतो आहेस काय? मला कोण समजलास रे तूं?'' आणि त्याने एक भयंकार हुंकार दिला.



तो भीतीदायक हुंकार ऐकून मुलगा लटलट कांपू लागला. त्याचे शरीर घामाने डबडबले. त्याला मचाणावरून खाली उतरायचं होतं पण त्याला उतरता येईना. तो तिथेंच खिळल्यासारखा उभा राहिला.

कांही क्षणांतच हत्ती मचाणाच्याजवळ येऊन पोंचला. तो हत्ती नेहमीसारखा हत्ती वाटत नव्हता. त्याचं सारं शरीर माशासारख्या खवल्यांनी झांकलेलं होतं. हत्तीच्या पाठीवर जो बसलेला होता त्याने मगरीच्या डोक्यासारखं शिरस्त्राण घातलं होतं. त्याचं शरीर मगरीच्या कातड्याने झांकलेलं होतं.

तो विचित्र आकारवाला त्या मुलाच्याजवळ आला आणि अभयहस्त दाखवत तो म्हणाला, "घाबरूं नकोस. मी जे सांगतो ते कर. गांवात जा आणि माझ्यासाठीं चांगलं भोजन घेऊन ये. त्याचबरोबर गांवात जर कुणी चांगला शल्यवैद्य असेल तर फारच उत्तम! ही बघ, इथें माझ्या पोटांतून एक तुटलेली तलवार आहे ती बाहेर काढायची आहे. असं करता आलं तर तुम्हाला दोघांना मी उत्तम इनाम देईन" तो धाप लागल्यासारखा बोलत होता.

तो मुलगा भेदरलेला होताच. तरीदेखील त्याने हे बोलणें ऐकून घेतलें. तो खाली उतरायला घाबरत होता. जेव्हां त्या विचित्र आकारवाल्याच्या हे लक्षांत आलं. तेव्हां त्याने त्याची कंबर पकडून त्याला जमिनीवर उतरवलं.

जेव्हां त्याचे पाय जमिनीला टेकले तेव्हां त्या मुलाच्या जीवांत जीव आला. जणू यमदूतांपासून आपली सुटका झाली आहे असंच त्याला वाटलं. वाऱ्याच्या वेगाने, तो शेतातून पळत सुटला, व गांवात पोंचला.

निंबाच्या पारावर गांवकरी गप्पाटप्पा करीत होते. जोरांत ओरडत पळत येणाऱ्या या मुलाकडे पाहून त्यांना वाटलं कीं शेतांत रानडुक्कर घुसलं असावं किंवा हरणांचा कळपच आला असावा. त्यांनी त्या मुलाला विचारले, "अरे, असा कां पळतो आहेस? काय झालं?"

त्या मुलाला दम लागला होता. त्याने श्वास घेत सारी हकीकत सांगितली. त्याच्या बोलण्यावर कुणीही विश्वास ठेवला नाही. कांहीलोकांना वाटलं कीं त्याचं डोकं फिरलं आहे. जेव्हां तिथे आलेल्या गणाचारीने गांवच्या पाटलाकडून सविस्तर कथा ऐकली तेव्हां तो म्हणाला, "या मुलाने जे कांही सांगितलंय, त्यांत कांही आश्चर्य वाटण्यासारखे कांही नाही. जेव्हां माझ्यावर भूत सवार होतं तेव्हां असले पाण्यांतले हत्ती, मगरमनुष्यच नव्हे तर दोन



डोक्यांचे सिंह आणि दहा तोंडाची माणसेंही मला दिसतात."

"हे बघ, प्रथम आपण काय करायला हवं ते अगोदर सांग. आपल्या सर्वांचा नाश करण्यासाठीं तर तो एखादी योजना बनवत नसेल ना?" गांवच्या पाटलाने आपली शंका व्यक्त केली.

आता याच्यावरच सगळेजण चर्चा करूं लागले. एकाने म्हटलं, "बघा, त्याच्या शरीरामधें तुटकी तलवार आहे. खायच्या पदार्थांबरोबर तो एका वैद्यालाही घेऊन यायला सांगतो आहे. आपण चरकाचारी वैद्याला जर आपल्याबरोबर घेऊन गेलो तर ठीक होईल."

हे ऐकून चरकाचारी वैद्य घाबरून गेला. तो म्हणाला, "काय? मी त्या विकृत आकाराच्या राक्षसाची चिकित्सा करूं? हे काम एखादा कुशल शल्यविशारदच करूं शकेल. त्याच्यासाठीं आपल्या गांवातला नारायण न्हावी आहे ना, त्याला आपण पाठवूं या म्हणजे बरं! राक्षसाच्या पोटांतली तलवार त्याने बाहेर काढली कीं मी संजीवनीसारखी प्रभावी औषधे देईन आणि वाहणारे रक्त थांबवीन."

दोघेजण लगोलग गेले आणि त्यांनी नारायण न्हाव्याला पकडून आणले. तो लटपटत म्हणाला, "मी आणि हे काम? छे, छे, माझ्याच्याने नाही होणार हे! त्याच्या पोटांतली तलवार मला बाहेर काढता येणार नाही."

तो वेड लागल्यासारखा इकडेतिकडे बघत पळून जायचा प्रयत्न करूं लागला.

आजूबाजूच्या लोकांपैकीं दोन धष्टपुष्ट पुरुष पुढें झाले. आणि त्यांनी नारायण न्हाव्याला घट्ट धरून ठेवलं. गांवच्या पाटलाने करड्या आवाजांत सांगितलं, "हे बघ, त्याची शस्त्रक्रिया करता येते कीं नाही, ते आपण नंतर ठरवूं. अगोदर सगळेजण मिळून तिथे जाऊं. आपल्याबरोबर तलवारी, कुऱ्हाडी, भाले वगैरे घेऊन चला. हा पोरगा जे सांगतोय ते कितपत खरं आहे ते तिथें गेल्यानंतरच कळेल."

लोक तलवारी, भाले, कुऱ्हाडी वगैरे हत्यारें घेऊन निघाले. हत्यारे घेऊन येणारा हा जमाव पाहिल्यानंतर हत्तीवर बसलेल्या त्या विचित्र आकाराच्या व्यक्तीने हत्तीला अंकुश टोंचला. हत्तीने आपली सोंड उंचावली आणि ओरडतच तो गांवकऱ्यावर चालून येऊं लागला.

**(अपूर्ण)**



# पाण्याची भिती

जनगांवाच्या चारी बाजूला शेती होती. त्या गांवाला लागूनच एक तलाव होता. गांवकरी त्यांत पोहायला शिकत असत. त्यांना वाटायचं कीं कधी पूर आला, किंवा जरूर पडली तर पोहायची विद्या उपयोगी पडेल.

या गांवात गोविंद नांवाचा चाळीस वर्षांचा एक शेतकरी होता. तो उंचनिंच होता, चांगला सहाफूट उंच होता. त्याला अजिबात, पोहायला येत नव्हते. जर त्याला कुणी 'पोहायला शीक' असे म्हटले तर तो उत्तर द्यायचा, "मला पाण्याची खूप भिती वाटते. मी सहाफूट उंच आहे. मी कांही बुडणार नाही कुठल्याही नाल्यांत किंवा तलावात ! मला काय जरूर आहे पोहायला शिकायची?"

एक दिवस तो संध्याकाळीं शेतांतून घरी परत येत होता. पावसाळा होता. तो तलावाच्या कांठाकांठाने चालत होता. तेवढ्यांत जोराचा पाऊस सुरूं झाला. अंधारून आल्यामुळें नीट वाट दिसेना. अचानक गोविंदाचा पाय घसरला आणि तो तलावांत पडला. तो विचार करूं लागला, "बाप रे, हे काय झालं आता? मला तर पोहायला येत नाही. आता मी निश्चितच बुडणार" आणि तो गटांगळ्या खाऊं लागला.

तेव्हां त्याला एकदम आठवलं कीं पुष्कळ दिवस तलाव आटलेला होता. तेव्हां तो बुडण्याइतके पाणी तलावांत खचितच नसणार! हे लक्षांत येताच त्याने उभा राहाण्याचा प्रयत्न केला. त्याचे पाय जमिनीला लागले. आपल्या वेडगळपणाबद्दल त्याला लाज वाटली. तो मनांतल्या मनांत विचार करूं लागला, "किती मूर्ख आहे मी! जिथें खोल पाणी नाही, तिथेंही मी बुडेन कीं काय म्हणून घाबरलो होतो. भीतीमुळें जीव घाबरा झाला होता. आता मात्र पोहायला शिकलेच पाहिजे."

- काशीराम





राजा विक्रम व वेताळाच्या नव्या कहाण्या

# देवीमाता

निश्चयाचा पक्का विक्रमार्क परत एकदा त्या झाडाजवळ गेला. त्याने प्रेत खाली उतरवले आणि तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला. तेव्हां प्रेताच्या आंत लपलेल्या वेताळने विचारलं. "राजन, जगांत असे लोक असतात कीं ज्यांना आपले कार्य पूर्ण होणार नाही, त्यांत कांहीतरी विघ्न येईल अशी सतत भिती वाटत असते. असे लोक कोणत्याही कार्याच्या पूर्तिवर विश्वास ठेवत नाहीत. त्यांच्यात निश्चयाचा अभाव असतो. पण तुझी गोष्ट निराळी आहे. तू त्यांच्यासारखा नाहीस. तरीदेखील या रात्रींच्या वेळीं तुला स्मशानांत कष्ट झेलताना पाहून मला तुझे खरोखर आश्चर्य वाटते, आणि तुझी कींव येते.



मला तुझे हे करणें जरादेखील पसंत नाही. मी असं पाहिलंय कीं कधीकधी विवेकी माणसें, ज्यांचे भक्त असतात, ज्यांची ते आराधना करतात, त्यांच्याचमुळें त्यांना यातना सहन कराव्या लागतात. उदाहरण म्हणून मी तुला अंगद नांवाच्या एका मुनीची कहाणी सांगतो. म्हातारपणामुळें त्याची तार्किक दृष्टी व विवेकबुद्धि भ्रष्ट झाली होती. त्याचबरोबर मी तुला या मुनीवर विश्वास ठेवणाऱ्या विश्वेश्वरचीही गोष्ट सांगेन.'' आणि बेताळाने अंगद मुनींची गोष्ट सांगायला सुरवात केली.

रत्नगिरी नगरांत रत्नगुप्त नांवाचा एक महाभाग रहात होता. रत्नावती ही त्याची धर्मपत्नी होती. दोघेही परोपकारी व दैववादी होते. बऱ्याच वर्षांनंतर त्यांना एक मुलगी झाली. तिचे नांव होते अन्नपूर्णा. तिचे पालनपोषण त्यांनी मोठ्या लाडाने केले होते. ती मुलगी म्हणजे त्यांचं सर्वस्व होती. ती पांच वर्षांची असताना अकस्मात एका अनोख्या रोगाने आजारी पडली.

ती जे खातपीत होती ते तिला पचत नव्हते. तिला कांही खावेसेही वाटत नव्हते. दररोज सकाळसंध्याकाळ तिला भयंकर डोकेदुखी सुरुं होई. त्या वेदनांमुळें ती कण्हत असे. कित्येक वैद्यांनी उपचार केले, पण कांही फरक पडला नाही. दुसरा कांही उपाय सुचेना म्हणून तिचा पिता रत्नगुप्त जवळच्या अरण्यांत गेला. त्याने आपली व्यथा अंगद नांवाच्या मुनीला सांगितली.

अंगदने थोडा वेळ ध्यान केले आणि नंतर डोळे उघडून तो म्हणाला, ''तुझी मुलगी जन्मल्यानंतर तुमचे तिच्यावर प्रमाणाबाहेर प्रेम आहे. तुम्ही देवभक्तीलाही विसरून गेलात. तुमच्या मुलीचा आजार म्हणजे परमेश्वराकडून तुम्हाला एक सूचनाच मिळालेली आहे. तिच्यांत परमेश्वर भक्ती जागवा. तिला समजावून सांगा कीं मातापित्यापेक्षां परमेश्वर श्रेष्ठ आहे.''

रत्नगुप्तने अंगदाच्या उपदेशानुसार केले. त्या दिवसापासून अन्नपूर्णा भगवानाची श्रद्धायुक्त अंतःकरणाने पूजाअर्चा करूं लागली. तिला जे कांही जेवण देत, ते देवाचा प्रसाद आहे असं समजून ती खाऊं लागली. हळूंहळूं तिचा आजार कमी होत गेला. परंतु ध्रुवबाळ, भक्त प्रल्हाद यांच्यासारखी ती सारा वेळ परमेश्वरचिंतनात मग्न राहात होती. भक्तीरसांत रंगून जात होती.

हे पाहून रत्नगुप्ताचा जीव कळवळत असे. आता देवाची भक्ती हा अन्नपूर्णेचा आजार झाला, ती जेव्हां मोठी झाली तेव्हां ती म्हणूं लागली, ''माझे जीवन परमेश्वराच्या चरणीं समर्पित आहे. मी लग्न करणार नाही.''

रत्नगुप्ताने तिला खूप समजावले, रागावून



पाहिले, पण ती आपला निर्णय बदलणारी नव्हती. जेव्हां त्याचे सारे प्रयत्न थकले, तेव्हां तो पुन्हां अंगदाजवळ गेला आणि त्याने आपले दुःख उगाळले. आपल्या घरी येण्याचे निमंत्रण त्याने अंगदाला दिले.

अंगद अन्नपूर्णाला म्हणाला, ''प्रत्येक माणसांत परमेश्वर असतो. तुला परमेश्वर पाहायचा आहे ना? तुझे मातापिता ज्या माणसाला तुझ्याकरता पसंत करतील, त्याच्यांतच तू परमेश्वर पाहा. आपल्या पतीची सेवा कर. परमेश्वर तुझ्यावर प्रसन्न होईल आणि तुला संतानप्राप्तीचा वर देईल. त्या संतानाला परमेश्वर आपला अंश प्रदान करील.''

प्रत्येक स्त्रीला माता होण्याची इच्छा असते. ही तिची सहजभावना असते. अन्नपूर्णाने अंगदमुनींचा सल्ला मानला. वैभव नांवाच्या एका श्रीमंत व्यापारी तरुणाशी तिचा विवाह झाला. एका वर्षाच्या आंत त्यांना एक सुंदर मुलगा झाला. अन्नपूर्णाला वाटलं कीं तिच्या मुलाच्या रुपाने देवानेच तिच्या घरी जन्म घेतला आहे. पतीपत्नींनी त्याचं नांव ठेवलं विश्वेश्वर!

विश्वेश्वरला एका बाजूने आईचे वात्सल्य व प्रेम मिळत होते आणि दुसऱ्या बाजूने भक्तीयुक्त वातावरणांत तो वाढत होता. त्यांच्या घरांत रोज देवाची पूजा होत होती. लहान वयांतच त्याच्या मनांत विरक्ति उत्पन्न झाली. देवाच्या दर्शनासाठीं तो व्याकुळ झाला होता. मोक्षाचा मार्ग तो शोधूं लागला. आपला मुलगा इतरांपेक्षां निराळा आहे, त्याचे वागणें प्रौढ आहे, हे पाहून अन्नपूर्णाला फार वाईट वाटायला लागले.

पत्नीचे दुःख समजल्यानंतर वैभवने तिला समजावून सांगितले, ''तूच आपल्या मुलाच्या मनांत इतकी देवभक्ति भरवली होतीस. तुझ्यामुळेच तर तो



इतका कट्टर देवभक्त झाला आहे. आता निदान त्याला देवापासून दूर ठेवायचा प्रयत्न तरी कर.''

पतीचे हे मत अन्नपूर्णाला पटले. दुसऱ्याच दिवशीं तिने आपल्या मुलाला कठोर आवाजांत सांगितले, ''हे तुझं खेळण्याचं वय आहे. आजपासून देवाची पूजा करायचे थांबव आणि इतर मुलांप्रमाणें खेळ, हिंडणे, अभ्यास, वाचन, लेखन याकडे लक्ष दे.''

विश्वेश्वरला आपल्या मातेची आज्ञा पाळणें जमले नाही. तो ज्याला ज्याला आपली मनीषा सांगूं लागला, ते सर्वजण अन्नपूर्णाचीच बाजू घेऊन बोलायला लागले. विश्वेश्वरला आता त्या घरांत राहायची इच्छा नव्हती. तो अरण्यांत गेला. आणि एका झाडाखाली बसून तपस्या करुं लागला. त्या अरण्यांत कोणत्याही हिंस्र श्वापदाने त्याच्यावर हल्ला केला नाही. त्याच्या आईचे अपार प्रेम किंवा त्याच्यामधला दैवी अंश, यापैकीं कुणीतरी त्याचे

रक्षण केले. कोणताही विषारी सर्प त्याला शिवण्याचे धाडस करूं शकला नाही. त्याला जेव्हां भूक लागे, तेव्हां डोळे मिटून तो ध्यान करी. प्रार्थनेनंतर त्याला आपोआप फळें पुढ्यांत येऊन पडत.

विश्वेश्वरचे रुप आता बदलले होते. त्याच्या आजूबाजूला काय चालले आहे याची त्याला शुद्ध नव्हती. जेव्हां तो घर सोडून आला होता तेव्हां तो दहा वर्षांचा होता. अरण्यांत त्याने अखंड दहा वर्षे तपस्या केली. तरीही त्याला परमेश्वराचे दर्शन घडले नाही.

एके दिवशी प्रातःकाळीं विश्वेश्वर नदीवर स्नान करीत होता. त्यावेळेस एक शिकारी हरणाचा पाठलाग करीत तिथे आला. विश्वेश्वरला बघून तो आश्चर्य व्यक्त करीत म्हणाला, "परमेश्वरा, त्या दिवशीं तू ज्या तऱ्हेने अर्जुनाला दर्शन दिलेस, त्याच तऱ्हेने आज मलाही दर्शन दिलेस? मी किती भाग्यवान आहे!" आणि त्याने श्रद्धापूर्वक हात जोडले. विश्वेश्वर पाण्यांतून बाहेर आला आणि म्हणाला, "आपण कोण आहात ते मला माहीत नाही. पण आपण माझ्यापेक्षां वयाने नक्कीच मोठे आहात. मी आपल्याला प्रणाम करतो." त्यावर शिकाऱ्याने म्हटलं, "आपल्या चेहऱ्यावर सूर्याचे तेज आहे, गळ्यांत सर्पहार आहे, तेव्हां नुसताच प्रणाम नव्हे तर मी आपले चरणस्पर्श करुन वंदन करतो आहे. असं म्हणून त्याने तिथेंच साष्टांग नमस्कार घातला.

विश्वेश्वर स्तंभित झाला. त्याने आपले मस्तक व गळा चांचपून पाहिला, त्यांत कांही फरक जाणवला नाही. कोणताही बदल जाणवला नाही म्हणून तो कांहीतरी बोलणार तेवढ्यांत शिकारी म्हणाला, "वा वा, स्वामींनी माझ्यावर अनुग्रह केला आणि ते अंतर्धान पावले. या पृथ्वीवर या घटकेला माझ्यासारखा भाग्यवान दुसरा कुणीही नाही." जणूं कांही विश्वेश्वर तिथें नव्हताच असे शिकाऱ्याचे बोलणें चालणें होते. त्यानंतर शिकारी तिथून निघून गेला.





"मी आणि परमेश्वर? माझ्यांत तर भगवान आला नसेल ना? मला तो दिसत नाही पण इतरांना मात्र तो माझ्यांत दिसतो आहे हे नवलच!" विश्वेश्वर विचारांत पडला. त्याची मनस्थिती मोठी विचित्र झाली. त्याने बराच वेळ विचार केला व त्यानंतर सत्य काय आहे ते जाणून घेण्यासाठीं त्याने पुन्हां नागरिकांत मिसळण्याचे ठरवले. खरं काय होतं ते इतर लोकच बरोबर सांगू शकूले असते!

जेव्हां तो रत्नगिरीच्या दिशेने जायला लागला तेव्हां वाटेंत अंगदमुनी समोरुन येताना त्याला दिसले. ते आता वयस्कर झाले होते आणि म्हातारपणाची सारी लक्षणें त्यांच्यात स्पष्ट दिसून येत होती. बोलताबोलता अंगदमुनींना समजलं कीं तो परका माणूस रत्नगिरीला जातो आहे. अंगदानी म्हटलं, "बाळ, पूर्वी वर्षांतून एकवेळ कां होईना, पण परमेश्वराचं दर्शन होत होतं. रत्नगिरी मधें अन्नपूर्णा नांवाची एक पतिव्रता स्त्री आहे. विश्वेश्वर नांवाचा तिला एक उत्तम पुत्र आहे. एका देवीने मला स्वप्नांत येऊन सांगितलं कीं विश्वेश्वरचे दर्शन केले कीं माझ्या या समस्येचे निराकरण होईल. म्हणून तेव्हांपासून दरवर्षी मी रत्नगिरीला जाऊन विशेश्वरला भेटून येतो आहे. पण माझी समस्या कांही सुटलेली नाही. तू जातोच आहेस तर विश्वेश्वरला सांग, कीं हल्लीं माझी प्रकृति तितकीशी ठीक नसते. म्हणून आता त्याची भेट घेणं शक्य होणार नाही. जर कांही निरोप असेल तर मला अवश्य पाठव म्हणून सांग."

अंगदाच्या बोलण्याने विश्वेश्वरचा संभ्रम जास्तच वाढला. त्याने अंगदला सविस्तर हकीकत सांगितली आणि म्हटले, "दहा वर्षे मी अरण्यांत



तपश्चर्या करतो आहे आणि आपण म्हणता आहात कीं दरवर्षी आपण माझ्या घरीं मला भेटता आहात! हे कसे शक्य आहे?"

त्यावर अंगदने विश्वेश्वरकडे चौकसपणें पाहिलं आणि म्हटले, "माझी दृष्टि अधू झाली आहे, म्हणून मी तुला नीट ओळखले नाही. तुझ्या घरीं मी तुला इतकी वर्षें भेटतो आहेच रे! आता सारं कांही माझ्या ध्यानांत येतंय. तुझ्या मातेने तुझ्यांत परमेश्वर पाहिला आणि तू तिला सोडून दिलंस. आपल्या भक्ताच्या मनाला क्लेश होऊं नयेत असं परमेश्वराला वाटलं, म्हणून तुझे रूप धारण करून परमेश्वर तिथें राहातो आहे. मीही किती मूर्ख आहे बघ! तुझ्या घरीं जाऊन भगवानाचं दर्शन घेत होतो, परंतु त्यातलं सत्य मात्र मला अपरिचित राहिलं. शिकाऱ्याच्या रूपांत परमेश्वर तुझ्याकडे आला आणि तुला घरीं परत जाण्यासाठीं त्याने उद्युक्त केले. दहा वर्षांच्या तपस्येनंतर तुला परमेश्वराने दर्शन

दिले. आता तू घरी जा. परमात्म्यालादेखील मुग्ध करणाऱ्या मातृप्रेमापासून तू दहा वर्षे पारखा झाला आहेस. मातेमधेंच देव बघ आणि उरलेलं आयुष्य घालव.''

कांहीही न बोलता विश्वेश्वरने अंगद मुनींना साष्टांग नमस्कार केला आणि तो वेगाने घराकडे निघाला.

ही कथा सांगितल्यानंतर वेताळाने आपला संशय प्रकट करीत म्हटले, ''राजन्, विश्वेश्वरच्या जीवनाचे ध्येय होते, तपश्चर्या करून परमेश्वराचे दर्शन करणें! त्यासाठी त्याने सर्व शारिरिक सुखें व मातृप्रेम, यांचा त्याग केला आणि तपस्या करण्यासाठीं तो अरण्यांत निघून गेला. सदैव परमेश्वराचे चिंतन करीत बसणाऱ्या विश्वेश्वरला अंगदाने सांगायचं कीं तुझी आई हेच तुझे दैवत आहे, हे विसंगत वाटत नाही? याच्यात मला तरी कोणत्याही प्रकारचे धार्मिक चिंतन व तर्कशुद्ध दृष्टि दिसत नाही. या असंबद्ध विचारसरणीचं कारण अंगदाचं म्हातारपण आहे कीं अस्वस्थ मन आहे? माझ्या या शंकांचं उत्तर माहीत असूनदेखील जर तू गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील.''

विक्रमार्कने उत्तर दिले, ''भगवान करूणामयी आहेत. त्यांच्या मनांत आले कीं भक्ताला दर्शन द्यावे कीं ते कोणत्याही स्वरुपांत दर्शन देतात. हे रहस्य विश्वेश्वरला समजलं नाही. जेव्हां विश्वेश्वरने अंगदाला अरण्यांत घडलेली घटना सविस्तर सांगितली. तेव्हां अंगदाला त्याला समजावून सांगावं लागलं कीं शिकाऱ्याच्या रुपांत प्रत्यक्ष परमेश्वरानेच त्याला दर्शन दिलं होतं आणि साहजिकच त्याची तपस्या फळाला आली. हे सत्य उलगडल्यानंतरदेखील जर विश्वेश्वर अरण्यांत तपस्याच करीत बसला असता किंवा पुन्हां तिथें गेला असता तर तो त्याचा मूर्खपणा ठरला असता, आणि तो गोष्ट अविचारी आणि अनुचित ठरली असती.

याकारणाने अंगदमुनींनी त्याला हिताचा उपदेश केला, कीं त्याने आपल्या आईच्या रुपांतच आपल्या दैवताचे दर्शन करावे. हे अंगदच्या धार्मिक व आध्यात्मिक परिपक्व बुद्धीचे लक्षण आहे. म्हातारपणाशी किंवा मानसिक अस्वस्थतेशी त्याचा काडीमात्र संबंध नाही.''

राजाचे मौनभंग करण्यांत वेताळ सफल झाला आणि म्हणून ते प्रेत घेऊन तो पुन्हां अदृश्य झाला आणि पुनश्च झाडावर जाऊन बसला.

**(आधार : 'वसुंधरा' यांची रचना)**





# अरण्यांतला विचित्र यजमान



हजारों वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ही! दोन राक्षस भाऊभाऊ होते, इल्वल आणि वातापि! त्यांचे घर अरण्यालगत होते, पण गांवापासून जरा लांबच! दोघेही अतिशय लोभी होते. दुसऱ्यांची संपत्ति ते एका अभिनव पद्धतीने हडप करीत असत.

त्यांच्या इच्छेनुसार त्यांना कोणताही आकार धारण करता येत असे. इल्वल एका सात्विक यजमानाचे रूप धारण करी आणि अरण्यांतल्या वाटेवर फिरत राही. फिरते व्यापारी किंवा राजाच्या दरबारी जाणारे ब्राम्हण त्या वाटेवर त्याला भेटत. थकलेल्या या प्रवाशांना तो आपल्या घरीं थोडा विश्राम करायला यायची विनंती करीत असे. त्याचा सोज्वळ चेहरा, आणि दयाळू वाणी पाहून कुणीही त्याच्यावर अविश्वास दर्शवित नसे. ते आनंदाने त्याच्या पाठोपाठ जात. बाहेरच असलेल्या तळ्यांत त्यांना स्नान करायला तो सांगी. नंतर त्यांना पडवींत थोडा वेळ विश्रांति घ्यायला तो सुचवत असे. कारण त्यांच्यासाठीं खास सुग्रास भोजन त्याला बनवायला तर वेळ हवा ना!

ते भोजन खास निश्चित असायचे. ते भोजन एका विलक्षण कोंकराच्या मांसापासून केलेले असे. इल्वलचा धाकटा भाऊ वातापि हा कोंकराचे रूप घ्यायचा. इल्वल भावाला मारुन, कापून त्याचे भोजन बनवीत असे. विश्रांति घेणाऱ्या पांथस्थांना यांतले कांहीच ठाऊक नव्हते. ते आनंदाने भोजनाचा आस्वाद घेत जेवीत.

जेवण झाल्यावर इल्वलला अचानक आपल्या धाकट्या भावाची आठवण येई.

''वातापि, अरे वातापि, कुठे आहेस रे तू?''

# खास बातम्या

## आरशाची मदत



लखनौ 'झू' च्या अधिकाऱ्यांना काळजी वाटत होती. सनी व चिना हे दोन महाकाय चिंपांझी रुसले होते, गंभीर मुद्रा करुन बसले होते. येणाऱ्या मंडळींकडे पाहून हंसायचे नाही असेच त्यांनी ठरवलेले होते. कारण एकच - त्या दोघांना वेगवेगळ्या पिंजऱ्यांत ठेवले गेले होते. वरिष्ठांनी विचार केला आणि शेवटी उत्तर सांपडले. त्यांनी एक अभिनव प्रयोग करायचे ठरवले आणि मोठ्या आकाराचे आरसे पिंजऱ्यांत लावले. चिंपूनाना जेव्हां झोंपून उठले तेव्हां त्यांना एका नवा मित्र आपापल्या पिंजऱ्यांत भेटला. ह्यांनी डोके खाजवले कीं तो खाजवायचा. ह्यांनी डावा पाय वर उचलला, तर तो उजवा पाय उचलायचा. हे दोघे तोंड भरुन हांसले, तर त्यांच्याकडे पाहून हा नवा मित्रदेखील हंसायचा! त्यांना खूप गंमत वाटली. त्यांचा रुसवा संपला, राग गेला आणि 'झू' पाहायला येणाऱ्या मंडळींना हे दोघे पूर्वीसारखेच आनंदी दिसायला लागले.

## पाळीव कीं धोकादायक?



ब्रिटिश कोलंबियामधल्या केलौना गांवात कूप्स कुटुंब राहाते. त्यांनी पाळलेले एक जनावर सरकारी बालसुरक्षा खात्याला धोकादायक वाटते आहे. कारण हे जनावर म्हणजे साडेसोळा फूट लांबीचा 'बोझ' नांवाचा एक अजगर आहे. या घरांत नऊ मुलें आहेत, आणि सर्वांत लहान फक्त दोन वर्षांचे आहे. बोझ या घरांत गेली पांच वर्षे राहातो आहे. पण अधिकाऱ्यांना मुलांच्या सुरक्षिततेची काळजी वाटते. म्हणून मुलांना तरी दुसरीकडे राहूं द्या किंवा बोझला पाठवा अशी त्यांची सूचना आहे. परंतु कुटुंबप्रमुख कूप्स म्हणतात कीं बोझ प्रेमळ आहे. मुलांचे शाळकरी मित्र येतात व त्याच्या अंगावरुन न घाबरता हात फिरवतात.



# गणेश पुराण

पार्वती मोठ्या कष्टाने आपले सगळे दुःख विसरली व मुलास कडेवर उचलून घेवून तिने त्याची दृष्ट काढली. शिवाने हात पसरवून त्याला जवळ बोलाविले. 'शंकर आपल्याला परत काहीतरी करील' या कल्पनेने घाबरुन अडखळत पावले टाकणाऱ्या गणेशाच्या बालचेष्टांचे सर्वांनाच कौतुक वाटले.

''बाबा, गणेशा! तू पुत्ररूपाने आम्हाला लाभलास म्हणून आम्ही धन्य झालो! चिरंजीव हो!'' असे म्हणून शंकर त्याला कडेवर घेऊन लाड करुं लागले तो गणेशाने खाली उडी मारली व ''बाबा! काय हे बोलणे? मी तुमचा मुलगा, म्हणून मीच धन्य आहे!'' असे म्हणून आपल्या लांब सोंडेने पार्वती-परमेश्वराच्यां पायांना विळखा घातला व आपल्या डोळ्यांना स्पर्श करुन नमस्कार केला. नंतर विष्णूला नमस्कार केला.

विष्णूने ''ये हो लाडक्या भाच्या! असे म्हणत जवळ घेतले व 'कल्याणमस्तु!' असा आशीर्वाद दिला. तेव्हां विष्णूच्या कांतीमुळे गणपतीचा रंग नीलाकाशासारखा भासला. विष्णु व गणेश यांच्यांत काही तरी साम्य निश्चितच आहे असे सर्वांना वाटले. ''हा मामाच्या वळणावर आहे बरं का!'' असे सर्वजण म्हणूं लागले. गणेशाने ब्रह्मदेवाला नमस्कार केला. ''प्रथम पूजेचा मानकरी होशील हो लंबोदरा!'' असे म्हणत ब्रह्माने त्याचा गालगुच्चा घेतला.

त्यानंतर गणेशाने लक्ष्मी व सरस्वतीला नमस्कार केला. त्या दोघींनी त्याला एकदम कडेवर घेवून एकेका गालाचा मुका घेतला, व म्हणाल्या-



"आम्ही सास्वासुनांचा दुरावा सुखाने सोडून, अशाच याच्या दोहों बाजूस उभ्या राहातो!"

नंतर पार्वतीकडे बघून म्हणाल्या- "आपण तिघी ज्या त्रिमाता म्हणवितो, त्यांची मूळ जन्मदात्री एकच असून ती आदिशक्ती होय, असे पुत्र विनायकाने सांगितले आहे. त्यानंतर आपण परत वेगवेगळया रूपाने जन्मलो. क्षीरसमुद्रांतून लक्ष्मी, ब्रह्माच्या वाचेतून वाणीरूपाने सरस्वती, व पूर्वी दक्षकन्या सती व आतां हिमालयाची कन्या पार्वतीच्या रूपाने उमा, अशा रीतीने अवतरलो आहोत. जयलक्ष्मीच्या रूपाने सिद्धी व विद्यावतीच्या रूपाने बुद्धी या दोघीही विनायकास अनुरूप अशा वधू आहेत. मग गणेशाचा थाट काय विचारतां?" असे म्हणाल्या.

लक्ष्मी म्हणाली- "लक्ष्मीदायक अशा गणेशावर विश्वास ठेवणाऱ्यांकडे मी स्थिर व अचल रूपाने राहीन! सिद्धीस्वरूपिणी जयलक्ष्मी माझाच अंश आहे. ती विनायकाची भावी पत्नी होईल."

सरस्वती म्हणाली- "गणेश हा ज्ञानदाता व सकल शास्त्रांचा स्वामी आहे. मुलांच्या अक्षराभ्यासाच्या आधी मुलांकडून हळदीचा गोळा करवून, त्या गणपतीची आधी पूजा करवून, नंतर गणेशाच्या परिपूर्ण स्वरूपाचे द्योतक म्हणून त्या गोळ्याभोवती एक वर्तुळ काढून, नंतर मुलांकडून श्रीगणेशाचा कित्ता गिरवावा. माझा अंश असलेली विद्यावती, बुद्धीस्वरूपिणी ही विनायकाची नायिका म्हणून शोभेल!".

तेंव्हा गणेश रडवेला चेहरा करून सगळ्यांना उद्देशून म्हणाला-"पाहिलीत मोठ्यांची रीत कशी असते ती! लग्न करून स्वतः सोसलेल्या यातना मुलांनी सुद्धा सोसाव्यात म्हणून घाईच करतात, पण सुखाने राहू देत नाहीत. त्यांतल्या त्यात आयांना तर फारच घाई."

यावर विष्णु म्हणाले-"नाही रे बाबा! सुंदर चांदण्या पूर्णचंद्राची जशी सेवा करतात तशी आणिमादि अष्ट ऐश्वर्याचे मूळ असलेल्या अष्टसिद्धी ज्या आठजणी आहेत, त्या तुझी सेवा करीत असताना बघण्याची मला घाई झाली आहे".

"ओ हो! असे कां? तर मग तूं जेव्हा कृष्णावतार घेशील ना, तेव्हां अष्ट महिषीं समवेत आनंदाचा उपभोग घेशील बरं!" असे गणेश म्हणाला.

त्यावर विष्णु मंदस्मित करीत म्हणाला-"तुझा शब्द अटळ असला तरी तुला मात्र दहा वधूंशी लग्न करावेच लागेल. ते टाळता यायचे नाही."

"तसे असेल तर 'विघ्नेश्वराच्या लग्नाला सतराशे विघ्ने' या म्हणीप्रमाणे मलाच विघ्ने





उपस्थित करणे भाग पडेल." असे गणपती म्हणाला.

"सतराशेच काय, पण कोटी विघ्नं आडवी आली तरी विघ्नेश्वराचे लग्न कांही थांबविता येणार नाही!" असे ब्रह्माच्या स्वरांत स्वर मिळवून सर्वजण म्हणाले.

तेव्हां नारद पुढे येऊन म्हणाला-"विज्ञानेश्वरा! वाचाळतेमध्ये मलाही तू मागे सारलेस, परंतु विवाह टाळणे कुणाला बरे जमले आहे? मला हा भवसागर तरणे जमले नाही म्हणूनच ना, मी असा मुनी होऊन भटकतोय! ज्ञानेश्वरा! विवाह व उद्योग हे पुरुषाचे लक्षण होय. म्हणूनच ना पुरुषोत्तम म्हणविणारे हे प्रमुख आदिदेव विवाह करून सृष्टि, स्थिती व लयादी उद्योग करीत आहेत. त्यांच्यापुढे तूं व मी ते काय?"

"ओहो! तुला लग्नाचे वेड लागलेले दिसते! तूं तर स्वयंवराच्या तयारीला लागलेला दिसतोयस!" असे गणपती म्हणाला.

"त्रिकालज्ञानी तो मीच म्हटले तर अनंत-कालज्ञानी तूं! तुझ्याशी विवाद मला शक्य आहे काय? वाक्पटुतेत तुझ्या नंतरच माझा क्रम लागेल. सर्वांचे नशीबच तुझ्या हाती आहे. तुला विस्मरून कुठलेही ज्योतिष-पांडित्य फळाला येत नाही. आपण दोघेही उत्तम बोलभांड आहोत. बोलूंच लागलो तर अनंतकाळही पुरणार नाही. तं पूर्णज्ञानी आहेस. माझ्यासारखे कमलाच्या पानावरील पाण्याच्या थेंबाप्रमाणे अलिप्त रहातात. तूं मायेलाही अतीत आहेस. म्हणून सिद्धी, बुद्धी व अष्टसिद्धी तुला वरतील; तेंव्हा 'श्रीरस्तु', 'शुभमस्तु', 'शीघ्र कल्याण सिद्धिरस्तु!' असे मला सुद्धां म्हणून घेऊं दे". असे म्हणत नारदाने वीणेवर कल्याण राग छेडला व सामराग आळवून सौराष्ट्र रागांत मंगलगीते गाइली.

सर्व देव आपापल्या स्थानी परतले. गणपती व पार्वतीला बरोबर घेवून शंकर सुद्धा आपले निवासस्थान असलेल्या कैलासास गेला. नारद मात्र हळूं हळूं वज्रदंताकडे जाण्यास निघाला.

पूर्वी बाल-गणपतीने शेपटी धरून गरगर फिरवून फेकून दिल्यामुळे दुखावलेल्या वज्रदन्तीच्या अंगाचा ठणका अजून कमी झाला नव्हता. धवला पतीची सेवा करीत होती. नारदास आलेला बघून "आणि कसली भानगड उभी करतो की काय हा!" असे म्हणत ती आत निघून गेली.

मूषकासुरास उद्देशून "तुझा ज्याने पराभव केला तो गणपती आतां विघ्नेश्वर रूपाने वाढतो आहे. आणि..."असे म्हणत नारद थांबला.



पराभवाग्नी चेतविला जाऊन खिजलेल्या स्वराने "मग काय करूं म्हणतोयस नारदा?" असे वज्रदन्त म्हणाला.

"वरदाता ब्रह्मा असतांना काळजी कसली? वज्राला वज्रानेच कटविले पाहिजे. पराभवाचा सूड घे. गणपतीने विघ्नेश्वर नाम धारण केले आहे. तो गजानन आहे हेही लक्षांत घे म्हणजे झाले!" असे म्हणून शांतपणे नारद निघून गेला.

महाश्वेता असे नामान्तर झालेल्या धवलेने कितीही सांगितले, तरी तिचे न ऐकता वज्रदन्त तिला म्हणाला-"महाश्वेता! तुझ्या पातिव्रत्याची पुण्याई म्हणून मला मनः शांती तरी लाभूं दे". असे म्हणून वज्रदन्त निघून गेला व घोर तपश्चर्या करून त्याने ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतले.

"काय हवे आहे?" ब्रह्मदेवाने विचारले.

"विघ्नाला आकार देऊन त्याला माझ्या आज्ञेंत राहण्यास सांगा!" असा वर मूषकासुराने मागून घेतला. ब्रम्हाने विघ्नाला बोलाविले व मूषकासुरापुढे उभे केले. त्याला कांहीहीं दिसले नाही. ब्रह्मदेवाने त्याला सूक्ष्म दृष्टी दिली. साध्या दृष्टीस दिसणार नाही, इतके बारीक व सूक्ष्म कृमी सारखे काळेकुट्ट विघ्न त्याला दिसले.

मूषकासुराने आश्चर्याने "हे काय! या काळ्या ठिपक्याचे मी काय करूं?" असे ब्रह्मदेवाला विचारले.

त्यावर हंसून ब्रह्मा म्हणाला-"विघ्न प्रचण्ड भुतासारखे असते असे तुला वाटले, परंतु विघ्नबीज हा डोळ्यांना न दिसणारा असा सूक्ष्म अणु असतो. सूक्ष्म जंतुमुळे जशा भयंकर व्याधी पसरतात, तसेच हे असते. अनर्थ ओढविणारे हे विघ्नकारण कितीही लहान असले, तरी कुठलीही भयंकर आकृति धारण करून सर्वनाश करूं शकते. हे इच्छारूपी असते. कुठलेही रूप घेवून अनर्थ करणें हेच ह्याचे काम! काय करायचे असेल ते कर!" असे म्हणत ब्रह्मा अदृश्य झाला.

"महागजासुराचे रूप घेवून विघ्नेश्वराचा नाश कर!" अशी आज्ञा मूषकासुराने त्या विघ्नास दिली.

विघ्नाने हत्तीचे शरीर, हत्तीचे पाय, भयंकर असे छोटे डोके, मोठे दातांचे सुळे, निखाऱ्यासारखे लाल डोळे, असे गजासुर शरीर धारण करुन, महापर्वतासारखी तलवार तळपवीत, आकाशाकडे उड्डाण केले.

इकडे कैलासात गणपती मोठ्या कोडकौतुकांत मोठा झाला. आई-वडिलांची परवानगी घेवून विश्वकर्म्याने त्याच्यासाठी निर्माण केलेल्या भवनाकडे जाण्यास निघाला. वाटेत सशरीर असा





मदन त्याला सामोरा आला. त्याला बघून विनायकाने आश्चर्याने विचारले-"कधी न दिसणारा तूं मला दिसतो आहेस, काय बरं नवल - विशेष | तुझ्या सम्मोहिनीचा प्रयोग मजवर करूं नकोस बरं ! मी अजून अजाण आहे".

नम्रतेने डोके बांकवीत मन्मथ म्हणाला- "गजेन्द्रानना! तूं माझ्या बाणांना सुद्धां अतीत आहेस. मला 'ज्या वेळीं दिसावे असे वाटेल त्या वेळी शरीर धारण करून दिसता येईल' असा वर शिवाने दिलेलाच आहे. आपणा दोघांमध्ये साम्य आहे. जवळीक ही आहे. म्हणून दिसलो झालो! तूं नंदीवाहन अशा शिवाचा मुलगा आहेस, तर मी गरूडवाहन विष्णूचा मुलगा आहे. मला शिवाने भस्म करुन पुन्हा जगविले तर तुझा शिरच्छेद करून तुला परत जगविले. माझे वाहन पोपट तर तुझे वाहन उंदीर. मनाला चंचल व्हायला लावणारे पुष्पांकुश हे माझे आयुध, तर मनोनिग्रह देणारे पाशांकुश तुझे आयुध, तुझा धाकटा भाऊ कुमारस्वामी याचा जन्म व्हावयास हवा आहे. पार्वती-परमेश्वरांच्या परस्पर अनुरागाचे तेजच कार्तिकस्वामीचा अवतार घेवून जन्मावयास हवे आहे. तारकासुराचा नाश व्हायला हवा आहे. म्हणूनच तर देवतांनी मला भस्म करविले; कैलासावर जात आहे. आज्ञा असावी".

"मन्मथा! म्हणूनच मी कैलास सोडून जात आहे. तुझे काम तूं निर्विघ्नपणे पार पाड. तुला विजय प्राप्त होईल". असे गणपती म्हणाला.

मन्मथ अदृश्य होऊन शिव-पार्वती असलेल्या कैलासमंडपांत प्रविष्ट झाला.

गणपती आपल्या भवनाकडे गेला. सिंहद्वाराजवळील स्फटिकाच्या वेदीवर आरामात बसून परिसरांतील सृष्टी-सौंदर्य आनंदाने न्याहळू लागला. हिमगिरीची रजतशिखरे घासून पुसून पैलू पाडल्या प्रमाणे सांध्य प्रकाशाच्या तेजाने चकाकत होती. हिम-प्रपातांचे मंद-गंभीर सरगम ऐकू येत होते. अशा प्रशांत समयी "विघ्नेश्वर म्हणविणारा तो कुठे आहे?" अशी भयंकर गर्जना दिशा दुभंगीत प्रतिध्वनित झाली.

महागजासुराच रूप धारण केलेले ते विघ्न गजाननापुढे उभे ठाकले, तेव्हां धरणीसुद्धां कंपित झाली. "मी महागजासुर आहे. तूं गजवदन असशील तर मी गजकाय आहे. तुला मारण्याकरिता आलोय!" असे म्हणत गजासुराने चित्कार केला.

विघ्नेश्वराने बहिऱ्यासारखे भोळेपणाने त्याच्याकडे पाहिले व म्हणाला- "उसाचे कांडे तुकडे करून खावेसे वाटतेय. जरा हा परशू पाजळून देतोस कां? तुला मी मोदक देईन". असे म्हणत परशू त्याच्या दिशेने फेकला. गजासुर पाय तुटल्यामुळे पर्वतासारखी कोसळला. वर चढून विघ्नेश्वर तांडव करीत त्याचे मर्दन करीत असता- "महाप्रभो! मी विघ्न आहे. ब्रह्मदेवाने दिलेल्या वरामुळे महागजासुराचे रूप घेऊन आलो. चांगली अद्दल घडली! मला क्षमा करा." असे विघ्न ओरडले.

"मी विघ्नविनाशक आहे, हे तूं विसरलास वाटते! ते कांही असले तरी तूं आता मायारूपी गजासुर आहेस. तुझी शकले करणे भागच आहे. तुझे हे तुकडे तुझे व माझे विस्मरण झालेल्यांना त्रास देतील. तूं कालिया नाग होऊन कालिंदीच्या डोहांत लपून बैस. बालकृष्ण तुझे मर्दन करील. त्याचे पाय तुझ्या डोक्यावर पडून तुझा उद्धार होईल. जातीवंत सर्पांच्या फडेवरील विष्णुपादुकेचे चिह्न तुमचा प्रथम अलंकार म्हणून शोभून दिसेल!" असे म्हणून गणपतीने परशू हाती घेवून त्या विघ्नाचे तुकडे-तुकडे केले. ते रेणु दश दिशांत व्याप्त होऊन अदृश्य झाले. विघ्न परत अणुरूपांतच राहिले.

देवतांनी विघ्नेश्वरावर पुष्पवृष्टी केली.

(क्रमशः)







# मानव धर्म

विष्णुशर्मा नांवाचे एक पंडित विष्णुपूर गांवात राहात होते. गांवातल्या लहानशा गुरुकुलात ते गांवकऱ्यांच्या मुलांना शिकवीत असत. ज्ञानशर्मा हा त्यांचा एकुलता एक पुत्र होता. तो गणितांत फार हुशार होता. म्हणून त्याला राजाच्या दरबारांत नोकरी मिळाली आणि तो आता राजधानींत राहायला गेला.

विष्णुशर्मा शिक्षक होते, म्हणून त्यांनी आपली वडिलार्जित शेती करण्याचे काम राजनाथ नांवाच्या शेतकऱ्यावर सोंपवले होते.

राजनाथला एक मुलगा होता. त्याचं नांव होतं सुबुद्धि; नांवाप्रमाणेच तो बुद्धिमान होता. गांवातल्या गुरुकुलांतच तो शिकला.

एके दिवशी ज्ञानशर्मा आपली पत्नी व मुलांसह आईवडिलांना भेटायला गांवी आला. तो राजदरबारांत मोठ्या पदावर अधिकारी होता. म्हणून तो चारपांच नोकर, घोडागाडी, असा लवाजमा घेऊन आला होता. सुबुद्धिने जेव्हां त्याचे हे वैभव पाहिले तेव्हां त्यालाही दरबारांत नोकरी मिळवली पाहिजे असे वाटू लागले. आपल्या मनांतली ही गोष्ट त्याने आपल्या मातापित्याला सांगितली.

मुलाची इच्छा ऐकून राजनाथ व रमादेवी गप्प बसले. आपल्या मुलाची समजूत घालताना राजनाथ म्हणाला, "बेटा, शेती करणें ही आपल्या घराण्याची परंपरा आहे. तुझं आता शिक्षण घेण्याचं वय आहे आणि शिक्षण हे अत्यंत आवश्यक आहे, म्हणून मी तुला गुरुकुलांत शिकवलं. प्रत्येकाला जर नोकरी करायची इच्छा असली तर या भूमातेची देखभाल कुणी करायची? तुझा विचार बदल आणि शेतीचे काम करीत इथेंच आमच्याबरोबर राहा."

रमादेवीनेही मुलाला समजावले. ती म्हणाली, "बाळा, तुला सोडून आम्ही कसे राहू शकूं? तुला नोकरी मिळाली तर तू आम्हाला सोडून दूर निघून जाशील. या धरती मातेवर आमची श्रद्धा आहे.

- मार्कंडेय -



तुझ्याबरोबर आम्हाला येणें कसे जमेल?''

आईवडिलांची विचारसरणी सुबुद्धिचे मन वदलूं शकली नाही. मध्यरात्री त्याने एका पिशवींत कपडे भरले. धान्य विकून जी कांही थोडीफार रकम जमली होती, त्यांतले थोडे पैसे घेऊन तो नोकरीच्या शोधांत निघाला.

पहांट होताहोता तो एका गांवाच्या वेशीजवळ पोंचला. त्यावेळेस त्याच्याच वयाचा एक तरूण ताडाच्या झाडावरुन काढलेली ताडी मडक्यांत भरुन खाली उतरला. त्याने सुबुद्धिला प्रेमळपणें विचारले, ''कुठे जातो आहेस रे भाऊ?'' सुबुद्धिने त्याला चिडूनच उत्तर दिले, ''तू तर ताडी विकतोस, सात वाईट व्यसनांपैकीं ते एक आहे. तुला माझ्याशी काय काम आहे? मी कुठेही जात असेन, त्याची तुला कशाला रे पंचाईत?''

त्यावर तो तरुण हंसला नि म्हणाला, ''माझ्या हातांतले हे ताडीचे मडकें पाहून तुला इतकं चिडायला कशाला हवं? माझं नांव आहे कुश. मीही सुशिक्षित आहे. मला वाटलं होतं कीं नोकरी करुन मला साऱ्या सुखांचा उपभोग घेता येईल आणि मला मान सन्मान मिळतील. पण प्रत्येक माणसावर कांही जबाबदाऱ्या असतात. मला त्याची जाणीव नव्हती. मी घर सोडून निघून गेलो. माझे आईवडील दुःखाने रडूनरडून आंधळे झाले. हे मला कळलं तेव्हां मी घरी परतलो. आता मला फक्त त्यांची खुशी हवी आहे. दुसरं कांही एक नको. त्यांत मला फार संतोष मिळतो आहे. तुझ्या आईवडलांना जर तुझी जरूरी असेल तर त्यांच्यासाठी तूं घरी परत जाणंच चांगलं, नाही कां?''

हे बोलणं ऐकून सुबुद्धि हतबुद्ध झाला. स्वतःला सांवरत त्याने म्हटलं, ''तुझ्या बोलण्यांत सचाई, कळकळ आहे हे खरं. परंतु मनांतल्या इच्छा नदीच्या पुरासारख्या असतात. आता हा प्रवाह रोखणं माझ्या हाती राहिलेलं नाही.''

सुबुद्धिला आपल्या आईवडिलांची खूप आठवण यायला लागली. त्याच्या मनांत काळजी निर्माण झाली. दुपार होईपर्यंत तो चालत राहिला. तोपर्यंत त्याला भूक लागली. एका गांवाजवळच्या झोंपडीत तो गेला. त्या झोंपडीच्या मधोमध एक उतारवयाचा मनुष्य बसला होता. त्याच्या चारी बाजूंना जडीबुटीची औषधें विखुरलेली होती. तो एक जाडजूड ग्रंथ वाचत होता.

सुबुद्धिच्या पावलांचा आवाज ऐकून त्या इसमाने वर पाहिले, व तो म्हणाला, ''भर उन्हांतून



तू आला आहेस. कुठे जायचे आहे तुला?'' सुबुद्धिने त्याला आपली कहाणी सांगितली.

त्यावर त्या माणसाने म्हटले, ''माझं नांव गुरूनाथ आहे. माझं दुसरं कुणीही नाही. जेव्हां मी जीवनाबद्दल विरक्त झालो, तेव्हां एका सिद्ध व्यक्तीने मला इथें आणले. त्यांनी रचलेल्या या वैद्यकग्रंथामधल्या औषधांबद्दल मी जास्त माहिती वाचतो आहे. सध्यां मी आंधळ्यांच्या औषधींबद्दल अभ्यास करतो आहे. हा त्या सिद्धांचाच आश्रम आहे. ते पहांटेच उठून बाहेर गेले होते. आता कोणत्याही क्षणीं ते परत येतील.''

घटकाभरांतच ते आश्रमांत परत आले. सुबुद्धिची माहिती समजल्यानंतर त्यांनी त्याच्या भोजनाची व्यवस्था केली.

त्यानंतर सिद्धांनी सुबुद्धिला सांगितले, ''तुला रस्त्यांत जो कुश भेटला होता, त्याने तुला जीवनातले एक महान सत्य सांगितले आहे. तो तरुण कुश खरोखरच फार चांगला आहे. त्याने आपल्या आईवडलांच्या सेवेतच आनंद मानला. आपल्या वंशपरंपरागत व्यवसायाचे महत्व त्याने ओळखले. हा मानवधर्म आहे आणि तो योग्य तऱ्हेने कुश पाळतो आहे. त्यांत जो खरेपणा आहे, तो मी दाखवून देईन. चला, आपण कुशच्या घरीं जाऊं या.''

सिद्ध, गुरुनाथ व सुबुद्धि त्या तरुण कुशच्या घरी गेले त्यावेळीं तो आपल्या आंधळ्या आईवडिलांस महाभारत वाचून दाखवीत होता. त्याने त्या तिघांचे आदरपूर्वक स्वागत केले.

सिद्धने कुशला सांगितले, ''तू आईवडिलांची



सेवा करतो आहेस ते स्तुत्य आहे. या सुबुद्धिने तुझ्याविषयीं सारे कांही मला सांगितले आहे. तुझ्या आईवडिलांचं अंधत्व दूर करण्यासाठीं मी एक औषधी मुळी आणली आहे. त्या दोघांना पुन्हां दृष्टी प्राप्त व्हावी म्हणून तुम्ही प्रार्थना करता करता, त्यांच्या डोक्यावर हा लेप लावा.'' असं म्हणून त्याने प्रथम गुरुनाथला ती औषधी दिली.

गुरुनाथने ती औषधी आदरपूर्वक डोळ्यांना प्रथम लावून म्हटले, ''सिद्ध गुरुवर्यांच्या सांगण्यानुसार मी हे औषध तयार केले आहे. इतक्या दिवसांनंतर या औषधीचा प्रभाव किती होतो आहे याची परीक्षा घेण्याची आता वेळ आलेली आहे.'' नंतर त्याने कुशच्या आईवडिलांना सांगितले, ''आपल्याला जर दिसायला लागले तर माझ्या जन्माचे सार्थक झाले असे मी समजेन.'' नंतर गुरुनाथने त्या

औषधाचा प्रयोग त्यांच्या डोळ्यांवर केला व लेप लावला.

कांही वेळ थांबून पाहिले तरी त्या औषधाचा प्रभाव कांही दिसेना. सिद्धने हे काम आता सुबुद्धिवर सोंपवले.

सुबुद्धि म्हणाला, "मी घरांतून निघून आलो आहे खरा! पण त्याचा अर्थ माझे माझ्या आईवडलांवर प्रेम नाही असा नव्हे. माझी खात्री आहे कीं ह्या औषधामुळें तुम्हा दोघांची दृष्टी परत मिळेल." असं म्हणून त्यानेही त्या औषधाचा लेप त्या दोघांच्या डोळ्यांवर लावला.

तरीसुद्धां कांही उपयोग झाला नाही. सिद्धने हंसून म्हटलं, "हे पहा, गुरुनाथला कुणी नातलग नाहीत. तरीदेखील मोठेपणा मिळवण्याची त्याची महत्वाकांक्षा आहे, नांव कमावण्यासाठी तो आसुसलेला आहे. श्रीमंत होण्याच्या इच्छेने, वैभवाच्यामागे वेड्यासारखा लागून, सुबुद्धि घरांतून निघून आला हे. न सांगता आल्यामुळें त्याने आपल्या मातापित्याच्या मनाला धक्का दिला आहे. आता हा तरुण कुश आपल्या आईवडिलांना औषध लावून त्यांचं अंधत्व दूर करूं शकतो कां ते आपण पाहूं या." असं म्हणून त्याने ती औषधी त्या तरुणाच्या हातांत ठेवली.

कुशने सिद्धला वाकून नमस्कार केला आणि म्हटले, "ज्या मातापित्याने जन्म दिला, त्यांची सेवा करणें हा मी माझा परमधर्म मानला. त्यांच्या इच्छेनुसार जीवन व्यतीत करणें हा माझा आदर्श आहे. माझ्या दृष्टीने हाच उत्तम मानवधर्म आहे. आणि यावर माझा अटळ विश्वास आहे." हे बोलून त्याने आपल्या मातापित्याच्या डोळ्यांवर त्या औषधाचा लेप लावला.

थोड्याच वेळांत कुशच्या आईवडिलांना हळूंहळू अंधुक दिसूं लागले. कांही वेळानंतर त्यांना सारं कांही स्पष्ट दिसायला लागलं. हा चमत्कार पाहून सारेजण चकित झाले. सुबुद्धिने सिद्धला प्रणाम करून म्हटले, "आता मला समजलं कीं वृद्ध मातापित्यांना आनंद देणें हाच सर्वोत्तम मानवधर्म आहे." आणि तो विष्णुपूरला परत गेला. आपल्या मातापित्यांच्या इच्छेनुसार तो त्यांच्याजवळ आनंदाने राहूं लागला.








# माहीत आहे - माहिती नाही!

मंगलपुरी राज्यावर मायवर्मा नांवाचा राजा राज्य करीत होता. जेव्हां त्याचा मंत्री मरण पावला, तेव्हां राजाने लगेच नव्या मंत्र्याची नेमणूक केली नाही. मंत्र्याचे काम राजा स्वतःच पाहायला लागला.

त्याने ऐकलं होतं कीं राजाने जनतेच्या सुखदुःखाची काळजी अवश्य केली पाहिजे. म्हणून दोन अंगरक्षकांना बरोबर घेऊन, वेष पालटून तो जनताजनार्दनांत मिसळत असे. परंतु राजा कांही फारसा बुद्धिमान किंवा चतुर नव्हता.

एकदा राजा असाच वेषांतर करून हिंडत असताना एका घरांत नवराबायकोचा वादविवाद मोठ्या आवाजांत चालला होता.

"शी, शी, काय केलंस तू हे? जर मला अगोदर सांगितलं असतंस कीं 'माहिती नाही' तर मीच ते करून टाकलं असतं." नवरा म्हणाला.

"तुम्हाला काय माहिती आहे हो? सगळं कांही 'मला माहित आहे' असं नेहमी म्हणत असता तुम्ही! पण जेवढं माझ्या छोट्या मुलाला कळतं, तेवढं देखील तुम्हाला माहीत नसतं." पत्नी म्हणाली.

"बडबड बंद कर. तुला म्हणायचे ते म्हण. हे असलं लहान कामदेखील मला करता येणार नाही कां? तुला काय वाटलं? संधी मिळाली तर या राज्याचा सारा कारभार चालवायची अक्कलदेखील मला आहे! समजलं?" नवरा रागाने म्हणाला.

हे ऐकताच राजाने पुढचे बोलणें न ऐकताच परत महालाकडे पावलें वळवली. दुसऱ्या दिवशी राजाने एक घोषणा केली. त्या नव्या राजाज्ञेनुसार राज्यांतल्या कोणत्याही नागरिकाने 'मला माहिती आहे' असं म्हणायचं नाही. जर कुणी तसं म्हटलंच तर त्याला कडक शिक्षा दिली जाईल असा नवा कायदा सुरुं झाला.

झालं! शिक्षेच्या भीतीने प्रत्येक गोष्टीचे उत्तर 'माहिती नाही' असं मिळायला लागलं. या नव्या

कायद्याचा सर्वांना फार त्रास होऊं लागला. पण त्याची लौकरच संवय झाली.

कांही दिवसांनंतर त्या राज्यांत दोन विदेशी माणसें आली. त्यांच्या लक्षांत आलं कीं कुणालाही कोणताही प्रश्न विचारला, तरी ते 'आम्हाला माहिती नाही' असंच उत्तर देत. कांही लोकांना एकत्र बघून त्या दोघांनी विचारलं, "तुम्ही लोक प्रत्येक बाबतींत 'माहिती नाही' असं उत्तर कां देता?"

"माहिती नाही बुवा! आम्हाला खरंच कांहीही माहिती नाही. तुम्ही जे प्रश्न विचारता आहात, त्या एकाचंही उत्तर आम्हाला माहिती नाही" पुन्हां त्या लोकांनी हेच उत्तर दिलं.

ते परदेशी पाहुणे मनोमन नाराज झाले. "हा कसला विक्षिप्त देश आहे! कुणालाही कांहीही विचारा, हेच सांगतात - "आम्हाला माहिती नाही!"

त्याच वेळेला वेष पालटून राजा गर्दीत उभा राहून हा संवाद ऐकत होता. लोकांचे व त्या परदेशी प्रवाशांचे बोलणें राजाने ऐकले.

म्हणून दुसऱ्या दिवशी राजाने दुसरा कायदा अंमलात आणला. "कोणत्याही परिस्थितींत राज्यांतल्या नागरिकांनी 'माहीती नाही' असं म्हणायचं नाही. जो तसं म्हणेल त्याला कडक शिक्षा होईल.

त्या दिवसापासून त्या राज्यांत 'माहिती आहे' किंवा 'माहीत नाही,' हे दोन शब्द कुठेही ऐकू येईनासे झाले, लोकांच्या तोंडाला जणूं कांही कुलूपच लावलं गेलं होतं.

त्या परदेशी प्रवाशांमुळें हे झालं आणि त्यांचं व्यापाराचं सारंच काम ठप्प झालं. ते राजाच्या दर्शनासाठी दरबारांत गेले आणि त्यांनी राजाला एक पत्र दिलं. त्यांत लिहीलं होतं.

'महाराज, आम्ही दुसऱ्या देशांतून आलेले





प्रवासी आहोत. आपल्या कायद्यामुळें सर्व नागरिकांनी आपली तोंडे जणूं बंद केलेली आहेत. आम्ही परदेशी आहोत म्हणून हा कायदा आमच्या कामांत अडथळा बनला आहे. हा कायदा लागूं करण्याचे आपले कांही कारण जरूर असेल. जर आपण ते कारण आम्हाला सांगितलंत, तर सध्यांची परिस्थिती सुधारण्याचा प्रयत्न आम्ही अवश्य करूं."

राजाने त्या दोघांना बोलावून त्यांना त्या जोडप्याचा संवाद सांगितला.

राजाचे बोलणें ऐकून ते परदेशी म्हणाले, "पण त्या जोडप्याने ही गोष्ट कोणत्या संदर्भांत म्हटली होती? ते माहीत असणं आवश्यक आहे."

राजाने वेषांतर केले व त्या दोघा परदेशी प्रवाशांना बरोबर घेऊन तो त्या जोडप्याच्या घरीं गेला. त्या घरच्यामालकाला त्यांनी जवळ बोलावून विचारले, "कांही दिवसांपूर्वी तुम्ही आपल्या पत्नीला सांगितलं होतंत कीं तुम्हाला सारं कांही माहीत आहे, अगदी राज्यकारभार सांभाळण्यापर्यंत सारं कांही! आठवतंय कां?"

"अहो, मला माझ्या घराचा कारभारदेखील नीट पाहाता येत नाही. मी कसला राज्याचा कारभार पाहाणार? ही गोष्ट मी कायदा येण्यापूर्वीं म्हटली होती हे खरं! त्या दिवशी माझ्या बायकोने स्वयंपाक बिघडवला होता म्हणून रागावून मी तिला तसं बोललो होतो. ज्या बाईला कांहीच नीट येत नाही आणि उलट येताजाता 'तुम्हाला कांहीच माहिती नाही' असं सांगत सुटली तर मला काय वाटेल? राग नाही कां येणार? त्या भरांत मीही कांहीबाही बोललो होतो." तो पुरुष म्हणाला.

"ऐकलंत महाराज? सामान्य लोक कांहीतरी बोलले तर आपण ते फारच गंभीरपणे घेतलं होतंत, पण त्याच्यामुळें संपूर्ण राज्यांतल्या प्रजेला किती त्रास झाला आहे ते आपण पाहिलंत कां? राज्यकारभारांत आपल्याला सल्ला देणारे मंत्री आपल्याकडे नाहीत कां?" परदेशीने विचारले.

"माझा मंत्री निधन पावला. अजून नव्या मंत्र्याची मी नेमणूक केलेली नाही. तुम्ही दोघेजण मंत्री बनून मला मदत कराल कां? तुम्ही दोघेही चांगले आहात व हुशार आहात." राजाने म्हटले.

ते दोघेजण कबूल झाले आणि त्या राज्यांत कायमचे रहिवासी झाले. त्यानंतर राज्यांतली प्रजा सुखाने नांदू लागली व कारभारही सुरळीत चालू राहिला.





# चोर दामोदर

कोसल राज्यांतल्या एका नगरांत दामोदर नांवाचा एक चोर रहात होता. तो तरुण होता. चोऱ्या करण्यांत पटाईत होता. कसलेही कुलूप असो, तो अगदी सहजपणें ते कुलूप फोडत असे. मांजरा-सारखा चोरपावलाने तो चालत येई. कोणत्याही प्रकारचा आवाज तो होऊं देत नसे. कितीही गुडुप अंधार असला तरी कोणती वस्तू कुठे ठेवलेली असेल याचा त्याला बरोबर अंदाज असे. ही त्याची खासियत होती.

चोरीच्या कलेतले त्याचे हे कौशल्य पाहून दुसऱ्या चोरांपैकी ज्यांना मुली होत्या, त्या चोरांना हा जांवई हवा असे वाटत होते. त्याला विचारलं कीं दामोदर त्यांना उत्तर देई, "राजाचा खजिना लुटायचे माझे ध्येय आहे. जोपर्यंत मी हे काम करूं शकत नाही, तोपर्यंत मला लग्न करायचे नाही."

ज्या चोरांच्या टोळींत दामोदर सामील होता, त्यांत सूरनंदन हा प्रमुख होता. एक दिवस अचानक दामोदरला सूरनंदनची मुलगी गौरी दिसली. ती फारच सुंदर होती. इतकी देखणी मुलगी आजपर्यंत दामोदरने पाहिलीच नव्हती. तो एकदम तिच्या प्रेमांत पडला. कोणत्याही परिस्थितींत तिच्याशीच लग्न करायचे, असा त्याने निश्चय केला.

त्याला वाटत होतं तितकं राजाचा खजिना लुटण्याचं काम कांही सोपं नव्हतं. कदाचित अनेक वर्षे लागली असती आणि त्यांत त्याला यशही मिळणं कठीण होतं. आणि तेवढ्या काळांत दुसऱ्या कुणीतरी गौरीशी विवाह केला तर? या बाबतीत दिरंगाई करून चाललं नसतं. म्हणून दामोदर गौरीच्या पित्याला भेटायला गेला.

सूरनंदन त्याला विचारणार होता कीं कोणत्या कामासाठी आला आहेस; पण त्यापूर्वीच दामोदरने त्याला नमस्कार करून म्हटले, "माझं नांव दामोदर आहे. चोरीच्या कलेंत माझी बरोबरी करणारा कुणीही नाही हे सर्वांना माहीत आहे. आजपर्यंत चोरी करण्याच्या अपराधासाठीं मी कधी पकडला गेलो नाही." गौरीच्या पित्याने विचारले, "मी तुझ्याबद्दल ऐकलेलं आहे. पण तू हे सांग कीं तू इथें कोणत्या कामासाठी आला आहेस?"

- किशोर राठी -

दामोदरने अडखळत सांगितलं, "मला लग्न करायचं आहे" एवढं बोलून तो गप्प झाला.

त्याच्यावर सूरनंदनने हंसून म्हटलं, "तुझी इच्छा चांगली आहे आणि आता तुझं वयही लग्नाला योग्य असंच आहे. या कामांत तुला माझी कांही मदत हवी आहे कां? मुलगी पसंत केली आहेस कां? कोणाची मुलगी आहे?"

सारा धीर एकवटून यावेळी दामोदरने सांगितलं, "आपली मुलगी गौरी मला फार पसंत आहे. तिच्याशी लग्न करण्याची माझी तीव्र इच्छा आहे."

हे ऐकून सूरनंदन चकितच झाला. त्याने विचारले, "म्हणजे तू माझ्या मुलीला ओळखतोस तर! आता सौंदर्यात तिची बरोबरी करणारी दुसरी कुणी मुलगी नाही. पण मी तुला हे सांगितलंच पाहिजे कीं ती अतिशय फटकळ आहे आणि हुशारही आहे. तिला हा आपला चोरीचा धंदा मुळींच आवडत नाही. तुला जांवई करून घ्यायला मलाही आवडेल. हा संबंध जुळून आला तर मला आनंद होईल. पण तिचे मत काय आहे तेही विचारलं पाहिजे. होय ना?" असं म्हणून तो घरांत गेला आणि गौरीला बाहेर घेऊन आला. गौरीने आपल्या वडिलांनी सांगितलेली माहिती ऐकली. ती दामोदरला म्हणाली, "तुम्ही चोरी करण्यांत फारच निष्णात आहात असं मीही ऐकलंय. पण तुम्हाला चोरी करताना मला स्वतःच पाहिलं पाहिजे. माझी कोणतीही वस्तू तुम्ही चोरून घ्या. पण मला ते समजता कामा नये. तरच आपल्या लग्नाचे पुढें पाहाता येईल."

"हा तर माझ्या हातचा सोपा खेळ आहे!" असं सांगून दामोदर तिथून निघून गेला.

दोन दिवसानंतर शेजारच्या गांवी असलेल्या जत्रेला गौरी गेली. दामोदरला जेव्हां हे कळलं तेव्हां



तो वेष पालटून तिथें जत्रेला गेला. एका टोपल्यांत त्याने तऱ्हेतऱ्हेच्या बाहुल्या घेतल्या आणि त्या विकण्याचे नाटक तो करूं लागला. गौरी जत्रेंतल्या खास गोष्टी तन्मयतेने बघत होती. दामोदरने दबल्या पावलांनी तिचा पाठलाग केला. गौरीने गळ्यांत चंद्रहार घातला होता. तो चोरायचा आणि आपण यांत किती बाकबगार आहोत हे तिला दाखवायचे, असा दामोदरचा विचार होता.

एका ठिकाणी कांहीतरी वस्तू पाहाण्याच्या मिषाने गौरी खाली वाकली. दामोदरने मोठ्या शिताफीने तिच्या गळ्यांतला चंद्रहार काढून घेतला. गर्दी बरीच होती, म्हणून ही गोष्ट कुणालाच कळली नाही.

दुसऱ्या दिवशी दामोदर सूरनंदनच्या घरी गेला आणि गौरीला बाहेर बोलावून त्याने विचारले, "तुझा चंद्रहार चोरला गेला म्हणून तुला खूप वाईट वाटलं असेल. जत्रेंत तुझ्या नकळत मीच तुझा

चंद्रहार चोरला होता. आता मी किती कुशल चोर आहे हे तुला समजले आहे ना?''

त्यावर गौरी मोठ्याने हंसून म्हणाली, ''जत्रेंत तुम्ही बाहुल्या विकायला घेऊन आला होता ना? तिथेंच तुम्ही माझा चंद्रहार चोरलात. ही गोष्ट मला कळलीच होती. तेव्हां आता तुम्ही भुरट्या चोऱ्या करण्याच्या लायकीचे देखील नाहीत हे दिसलं. आणि तुम्ही माझ्या गळ्यांतून जो हार चोरलात तो नकली आहे!''

तिचे बोलणें ऐकून दामोदर स्तंभित झाला. त्याच्या हातांतून चंद्रहार जमिनीवर पडला आणि तो तडक मागे वळून तिथून निघून गेला.

गौरीने दोनतीन दिवस त्याची वाट पाहिली. जेव्हां तो आला नाही, तेव्हां ती स्वतः त्याच्या घरी गेली. दामोदर खाटेवर डोळे मिटून पडला होता. गौरीने जोरांत टाळी वाजवली आणि म्हटले, ''झोंपला आहात कीं राजाचा खजिना लुटण्याची योजना बनवता आहात?''

दामोदर उठून बसला व तिला म्हणाला, ''राजाचा खजिना लुटणार आणि मी? अग, तुझा चंद्रहार तुझ्या नकळत चोरणें मला जमलें नाही, तेव्हां राजाचा खजिना मी कसला लुटणार? आता माझ्या लक्षांत आलंय कीं मोठ्यामोठ्या चोऱ्या, दरोडे घालण्याची हुशारी माझ्यांत नाही. लहानसहान चोऱ्या केल्यामुळें मी स्वतःला मोठा चोर मानायला लागलो. हा माझा भ्रम होता.''

हे ऐकून गौरी खुषींत आली व म्हणाली, ''जरी चोर हुशार असला तरीदेखील त्याचा प्रत्येक दिवस धोक्याचाच असतो. हा घाणेरडा व्यवसाय आहे.''

''मग पोटापाण्यासाठीं दुसरं काय करायचं?'' दामोदरने दुःखी स्वरांत म्हटलं. गौरीने त्यावर प्रेमळपणें उत्तर दिलं, ''इथून दोन कोस अंतरावर माझे मामा राहातात. ते शेतकरी आहेत. कष्ट करतात आणि मग आरामांत राहातात. आपण ही चोरांची टोळी सोडून देऊं आणि तिथें स्वाभिमानाने राहूं. मेहनतीच्या कमाईवर जगूं, सुखाने संसार करूं!''

क्षणभर विचार करून दामोदर म्हणाला, ''तुझं म्हणणं बरोबर आहे. तुझा उपाय मलाही पटतोय. पण याला तुझे वडील कबूल होतील कां?''

''इथें येण्यापूर्वीच मी त्यांना सर्व कांही सांगितलं होतं आणि नंतरच मी इथें आले.'' गौरी म्हणाली.

आता दामोदर गौरीच्याबरोबर सासरीं जाण्यासाठीं निघाला.











जून 2002  Rs. 10/-

# चांदोबा

Sponsored by
National Foundation for India

## वसुधा

१६ पानी खास पुरवणीसह

HERO CYCLES

# अभिनंदन!

ऑक्टोबर २००१ पासुन मार्च २००२ पर्यंतच्या १ते ६ हिरो-प्रश्नावलींत विजयी झालेल्या तरुण वीरांचे 'चांदोबा' तर्फे हार्दिक अभिनंदन! या सर्व विजेत्यांना एक हिरो सायकल बक्षीस मिळणार आहे, त्यांची नांवे:

**ऑक्टोबर २००१**
*व्ही. कौसल्या*, नागपूर
*एस.आर. राहुल*, बंगलोर
*नारायण देव*, भद्राजुन, राजस्थान

**नोव्हेंबर २००१**
*डी. बृंदा*, विशाखापट्टणम,
*नेहा सिंहा*, उदयपूर कोर्ट, त्रिपुरा
*प्रणित प्रकाश मंत्री*, अमरावती

**डिसेंबर २००१**
*विरल के. दवे*, दमनगर, अमरेली जि.
*पी.व्ही. राघवेंद्रन*, होसूर
*पार्थ के. पंड्या*, वडोदरा

**जानेवारी २००२**
*एस.दीपक कुमार*, विशाखापट्टणम्
*एल. भावना*, तिरुपती
*बी.एस. यशोदा*, बंगलोर

**फेब्रुवारी २००२**
*के. श्रीराम*, कोलकाता
*शंख बॅनर्जी*, नरोत्तम नगर, अरुणाचल प्रदेश

**मार्च २००२**
*सोनम नागर*, उज्जैन
*जे. जयप्रकाश*, चेन्नई
*एम. विद्याधरी*, हैद्राबाद

## शाबास!

## ओ टि डि सि कोडीं १ ते ७ यांतील विजेत्यांनो, शाबास !




सप्टेंबर २००१ ते मार्च २००२ पर्यंत ओरिया टूरिझम डेव्हलपमेंट कॉर्पोरेशनच्या १ ते ७ प्रश्नावलींच्या विजेत्यांचे चांदोबा सहर्ष अभिनंदन करीत आहे. खालील विजेत्यांना कोणत्याही OTDC पतनिवासमधें ३ दिवस व २ रात्रींचे वास्तव्य बक्षीसादाखल मिळेल. ही सवलत कुटुंबातल्या जास्तीत जास्त चार जणांना मिळूं शकेल.

**सप्टेंबर २००१**
*परीक्षित पराग गोखले*, विरार (पश्चिम)

**ऑक्टोबर २००१**
*अनिल अजिताब*, भुवनेश्वर

**नोव्हेंबर - २००१**
*देवी प्रसाद नंदा*, जाजोपूर

**जानेवारी २००२**

**फेब्रुवारी २००२**
*के. अविनाश*, विशाखापट्टणम

**मार्च २००२**
*आर्य विभासकुमार*, जयपूर

**डिसेंबर २००१**
*सोमेश मिश्रा*, चिदंबरम

**सर्वांचे, मन:पूर्वक अभिनंदन**




# माया सरोवर

## 4

*(वडाच्या विशाल वृक्षानजीक सिद्धसाधकाला एक जुना तालपत्राचा ग्रंथ मिळाला. परंतु राजपुत्र व राजकन्येबद्दल कांहीही समजले नाही. ते जवळच्याच अरण्याच्या दिशेने निघाले. त्यावेळीं त्या प्रदेशांतल्या गांवकऱ्यांनी एक विकृत आकाराचा प्राणी आपल्या ज्वारीच्या शेतांच्या दिशेने जाताना पाहिला, तो हत्तीवर बसला होता आणि हत्तीने त्यांच्यावर चाल करावी म्हणून त्याला टोंचत होता.)*

आपल्या दिशेने येत असलेला हत्ती आणि त्याच्यावर बसलेला मगरीच्या आकाराचा प्राणी पाहून गांवकरी भिऊन थरथर कांपायला लागले. तेवढ्यांत त्या विकृत आकारवाल्याने हत्तीला त्यांच्याजवळ आणले, व तो किंचाळत ओरडूं लागला, "मला घाबरून जो पळेल, त्याच्याखेरीज मी कुणालाही कांहीही त्रास देणार नाही." त्याचे बोलणें ऐकून गांवकऱ्यांच्या जिवांत जीव आला. त्याचा आकार कसा का असेना, तो शेवटी माणूसच आहे हे समजल्यावर ते जरा सांवरले.

स्तब्ध उभे राहिलेल्या गांवकऱ्यांना उद्देशून तो विकृत आकारवाला म्हणाला, "तुमचा मुख्य कोण आहे? तो मचाणावर मुलगा होता, तो तुमच्याच गांवातला आहे ना? मी त्याला सांगितलं होतं कीं, माझ्यासाठीं जेवण आण आणि येताना बरोबर एका बैलालाही घेऊन ये! पण तुमच्या लाठ्या आणि तलवारी पाहून असं वाटतंय कीं तुम्ही मला मारण्यासाठीं इथें आला आहात!"

गांवकऱ्यांना वाटलं कीं विकृत आकाराचा असला तरी हा शेवटी आहे एक आपल्यासारखाच माणूस! मुख्य गांवकऱ्याने हात जोडून त्याला प्रणाम केला व म्हटले, "आम्हाला क्षमा करावी. मचाणावरच्या मुलाने आपल्याविषयीं आम्हाला सारे कांही सांगितले. पण त्याने तर अजब हत्ती



आणि अद्भुत माणूस असे वर्णन केल्यामुळें आमचा गैरसमज झाला. आम्हाला वाटलं कीं हत्तींचा कळपच आमची ज्वारीची शेतें उध्वस्त करायला शेतांत घुसला आहे.''

हत्तीवर बसलेल्या त्या मगरीच्यासारख्या विकृत आकारवाल्याने रागाने म्हटले, ''अरे ओ मुख्या, जे बोलायचं ते सोडून इतर वटवट कशाला करतो आहेस? सांग, माझ्यासाठीं तुम्ही भोजन आणि एक वैद्य आणला आहेत कीं नाही?''

त्याच्या नाराज स्वरामुळें घाबरलेला मुख्य एक पाऊल मागे सरला आणि म्हणाला, ''पण महाराज, आपल्यासाठीं तर माझ्या घरीं आत्ता जेवण बनवलं जातं आहे. आता राहिली वैद्याची गोष्ट! आम्ही एकच नव्हे, तर दोनदोन वैद्य घेऊन आलो आहोत.''

त्या मगरीच्या आकारवाल्याने आपल्या पोटांत टोंचणारी तलवार पुन्हां एकदा चांचपून पाहिली. नंतर तो हळूंहळूं कण्हत म्हणाला, ''तो वैद्य आहे तरी कुठे?''

गांवाचा प्रमुख हुशार होता आणि धूर्तदेखील; हातांतला सोटा वर उचलून त्याने गांवकऱ्यांना विचारलं, ''आपले चरकाचारी कुठे आहेत? वीर कुठे नाहीसा झालाय?''

चरकाचारी आणि वीर भीतीने तिथून निसटायच्या तयारींत होते. मुख्याने त्यांना पकडलं आणि त्यांना हाताने ओढत पुढे आणीत तो म्हणाला, ''पण महाराज, हे दोघेही आमच्या गांवातले वैद्य आहेत. दोघेही वैद्यकींत निष्णात आहेत. त्यांचं निदान अचूक असतं.''

दुसऱ्याच क्षणीं त्या मगरीच्या आकारवाल्याने आपल्या डोक्यावरचे शिरस्त्राण मागे सारले. त्याचे वय चाळीसापेक्षां जास्त नसावे. रंग गोरापान होता. त्याचे कुरळे केस खांद्यावर रूळत होते.

''हा तर साधाच माणूस दिसतो आहे. कोणत्या तरी राजपरिवारांतला असावा.'' शल्यविशारद वीरने शेजारी उभा असलेल्या चरकाचारीच्या कानांत खुसफूस केली.

''राक्षस कामरूपी असतात. मनांत येईल तसं रूप क्षणांत बदलूं शकतात. कांहीही असो, गुरूला मी वचन दिलेले आहे. तेव्हां मी समोरचा रोगी राक्षस असो, नाहीतर पिशाच्च, मी त्यांना जरुर तपासीन.'' चरकाचारीने सांगितले.

''मीदेखील ज्या गुरुंकडून वैद्यकी शिकलो, त्यांना मी तसेच वचन दिलेले आहे. ठीक, तुम्ही आता पुढें व्हा!'' वीर म्हणाला.



चरकाचारी हत्तीजवळ येऊन नम्रपणें म्हणाला, ''पण महाराज, आपल्याला कसली पीडा आहे? खरा रोग कोणता आहे? कृपया आम्हाला त्याबद्दल सांगावे.''

''तू आंधळा आहेस कां? तुला दिसत नाही? माझ्या पोटांत ही तलवार सारखी टोंचते आहे'' असं म्हणून त्याने पोटांत रुतलेली तलवार दाखवली.

त्यावर चरकाचारी म्हणाला, ''महाराज, हा वीर शल्यचिकित्सेंत हुशार आहे. त्याच्या बरोबरीचा जवळपास दुसरा कुणीही नाही. तो जशी तलवार बाहेर खेंचून काढील, तसा मी रक्तप्रवाह रोखण्यासाठी आणि जखम लौकर भरावी म्हणून औषधी मुळ्या, झाडपाला लावीन. त्या मी लगेच घेऊन येतो.'' एवढं सांगून चरकाचारी तांतडीने निघाला व जवळच्याच झाडींत शिरला.

त्यानंतर वीर हत्तीवर चढला आणि त्या विकृत आकारवाल्याच्या पोटांत रुतलेली तलवार नीट चांचपून न्याहाळूं लागला. ''महाराज, ही तलवार चमकते आहे. ही तर राजेशाही तलवार असेलसं वाटतं.''

मगरीचा आकारवाला जोरांत कण्हायला लागला आणि म्हणाला, ''वाटतं नव्हे, ही खरोखरच राजाची तलवार आहे. एका घमेंडखोर राजकुमाराने माझ्यावर तलवार चालवली आणि माझ्या पोटांत खुपसली. मला त्याला जिवंत पकडायचं होतं. आणि त्या प्रयत्नांत मी या संकटात अडकलो. माझे साथीदार भेकड होते, ते पळून गेले. मी लाचार होऊन माझे प्राण



वांचवण्यासाठीं या प्रदेशांत भटकतो आहे!''

त्याच्या बोलण्यावरून वीरच्या लगेच लक्षांत आले कीं ज्या राजकुमाराच्या अपहरणाबद्दल बोलले जात होते, तो राजकुमार म्हणजे हा माणूस नव्हे! मग हा अपहरण करणाऱ्यांपैकीच एक असावा. आता मनांत आलं तर ती तलवार तपासणीच्यानिमित्ताने पोटांतच फिरवून वीरला त्याला ठार मारता आलं असतं. पण त्यांत एक धोका होता. हा माणूस मेला तर बंदी असलेला राजकुमार व राजकुमारी कुठे आहेत ते समजणें मुष्किल होते. म्हणून आत्ता तरी या दुष्टाला मृत्यूपासून बांचवले पाहिजे. आणि ह्याला राजाच्या ताब्यांत दिले पाहिजे. असे विचार वीरच्या मनांत आले.

दूर उभ्या असलेल्या गांवप्रमुखाकडे वळून वीर म्हणाला, ''इथें जेव्हां ह्यांची शस्त्रचिकित्सा



पुरी होईल, तेव्हां नंतर आपण त्यांना आपल्या गांवी न्यायला हवं. अगोदर कुणाला तरी गांवात पाठवून यांच्या रहाण्याची नीट व्यवस्था करायला हवी.''

वीरने असं म्हणताच मगरीच्या आकार-वाल्या माणसाने त्याच्याकडे टक लावून पाहात म्हटले, ''काय तुझं नांव म्हणालास तूं? वीर?'' आणि त्याची मानगूट पकडली व त्याला वर उचलत म्हटले, ''मला फार वेदना होत आहेत म्हणून मी खरं ते सांगितलं आता तुम्हाला खरं काय ते सगळं समजलं असं वाटतंय! पण जर हे बिंग तू फोडलंस आणि तुझ्या गांववाल्यांना सांगितलंस तर मी इथेंच तुझे तुकडेतुकडे करून टाकीन.'' वीरने थरथर कांपत म्हटले, ''मगर महाराज, मला मारूं नका हो! मी अगदी अभागी आहे. मला मुलगा नाही. सहा मुलीच आहेत. अर्धामुर्धा वैद्य झालो आहे, आणि त्या उत्पन्ना-वर जगतो आहे. मी तलवार नीट बाहेर ओढून काढतो. तुम्हाला खूप दुखेल, पण जरा सहन करावं.''

मगरवाल्याने आता मात्र वीरला सोडून दिलं. आपल्या दोन्ही हातांनी, पूर्ण ताकदीनिशी, मगरवाल्याच्या पोटांतली तलवार वीर बाहेर ओढून काढणार, इतक्यांत झाडींतून चरकाचारीचे ओरडणें कानावर आले.'' मला वांचवा, मला वांचवा!'' त्याबरोबर दोनतीन हत्तींची आरोळीदेखील कानावर आली.

गांवाचा प्रमुख धावतच हत्तीजवळ येऊन म्हणाला, ''मगर महाराज, चरकाचारी एकदाच ओरडला व गप्प झाला. तो संकटात असावा बहुतेक! त्याला कदाचित मारलंदेखील असेल. तेव्हां त्या हत्तींनी आपल्यावर चाल करून येण्यापूर्वी आपण गांवात परत गेलो तर बरं होईल.''

''तू ठीक सांगतो आहेस. पण माझ्या उपचारांचं काय? ही तुटकी तलवार पोटांत किती दिवस मी बाळगत बसूं?'' वेदनेने तळमळत मगरवाल्याने म्हटले.

तितक्यांत चरकाचारीचे ओरडणें पुन्हां ऐकूं आले, ''वांचवा मला!'' आणि दुरून कांही रानटी हत्ती, पायाने झाडें तुडवीत या मंडळींच्या दिशेने येऊं लागले.

मगरीच्या आकारवाल्याने लागलीच आपल्या डोक्यावर ते शिरस्त्राण चढवले, आपल्या हत्तीला आज्ञा केली आणि हातांत लांबलचक त्रिशूळ घेतले. वीर हत्तीवरच बसलेला होता. तो जोरजोराने



ओरडायला लागला, ''वांचवा, वांचवा!'' त्याचा ओरडा चरकाचारीच्या ओरडण्यापेक्षां कितीतरी मोठ्या आवाजांत होता.

मगरीच्या आकारवाल्याने वीरच्या ओरडण्याकडे लक्ष न देता आपल्या हत्तीला अंकुश टोंचून हांक मारली, ''जलग्रह!''

जलग्रह जोरांत पुढे धांवू लागला. समोरून येणाऱ्या एका रानटी हत्तीला त्याने आपल्या दातांनी घायाळ केले. वेदनेने कळवळत तो रानटी हत्ती खाली पडला. ही संधी साधून मगरीच्या आकारवाल्याने आणखी एका हत्तीला गंडस्थळावरच त्रिशूल फेकून जखमी केले. वर्मी घाव लागल्यामुळें तो हत्ती जमिनीवर कोसळला. इतर हत्ती घाबरले व मागे वळले. परंतु मगरीच्या आकारवाल्याने त्यांचा पाठलाग केला व त्यांना पळवून लावले. नंतर त्याने आपल्या हत्तीला थांबवले. अचानक त्याला शल्यविशारद वीरची आठवण आली. त्याने चारी बाजूंना नजर फिरवली आणि 'वीर, वीर' असे ओरडून तो वीरला पुकारूं लागला.

मगरवाल्याच्या पाठीशीच लपलेल्या वीरने उत्तर दिलं, ''मगर महाराज, मी अजून मगरीचे शेपूट हातांत धरुन लटकलेलो आहे. आता आपण जिंकलो आहोत कीं ते जंगली हत्ती जिंकले?''

वीर जिवंत आहे हे समजल्यावर मगरीचा आकारवाला जरा शांत झाला तो म्हणाला, ''तू जिवंत आहेस तर! ठीक ठीक! असाच जलग्रहच्या पाठीवर बसून राहा. माझ्या पोटांतली ही तलवार तू केव्हां बाहेर काढणार आहेस?''

''महाराज, उगीच घाई करूं नका. लढाईच्या



धामधुमींत आपण मुख्य गोष्ट विसरला आहात. चरकाचारी इथेंच कुठेतरी ओरडत होता. तो आपल्यासाठीं औषधी मुळ्या, झाडपाला आणायला या झाडींत शिरला होता.''

''हो ना! जर एखाद्या वाघाने त्याचा बळी घेतला असला तर ही तलवार माझ्या पोटांत अशीच राहील कां? ती बाहेर काढण्यासाठी तुला शस्त्रक्रिया करता येणार नाही कां?'' मगरवाल्याने विचारलं.

त्याच्या या प्रश्नावर वीर हंसत सुटला आणि म्हणाला, ''महाराज, मी शल्यविशारद जरूर आहे, पण याचा अर्थ असा नाही कीं जखम भरून येण्याचा उपाय मला ठाऊक नाही. मी तर मुद्दामच अजाण बनून गांवात पोट भरता यावं म्हणून तिथें राहलो आहे, कारण हे उपचार करीत असताना मी माझ्या गुरुशी द्रोह करूं शकत नाही. ते त्यांचं



काम करतात नि मी माझं! त्यामुळें आमची दोघांची गुजराण होऊं शकते. आम्ही दोघे एकमेकांचे शत्रू नाही होणार. तसं झालं तर गांवकरी आम्हा दोघांपैकीं एकाला गांवातून हांकलतील.''

''अरे ए कपटी, सोड माझी शेपटी, आणि ये असा पुढें! चला, तो आचारी कुठे अडकलाय त्याला शोधून काढूं या.'' असं म्हणून मगर-वाल्याने हत्तीला पुढें जायची खूण केली.

त्यापूर्वी चरकाचारीचे ओरडणें जयशील व सिद्धसाधकानेदेखील ऐकले होते. ते दोघेजण झाडींत मिळालेले तालपत्रांचे ग्रंथ घेऊन ज्या कुणा माणसाने ते तिथे ठेवले होते त्याचा शोध घेण्याच्या प्रयत्नांत होते. त्याच वेळीं त्यांनी चरकाचारीचा आर्त आवाज ऐकला होता. त्या आवाजाच्या दिशेने ते पुढें जाऊं लागले. थोडे अंतर पार केल्यावर त्यांना ते रानटी हत्ती व मगरीच्या आकारवाल्याची झुंज चालूं असलेली दिसली.

ती पाहून सिद्धसाधक आवेशांत आला आणि आपला दंड वर उचलून तो म्हणाला, ''जयशील, याच दुष्टाने आमच्या कनकाक्ष महाराजांच्या मुलांचं अपहरण केलेलं आहे. मी अगोदरच म्हटलं होतं. कीं हा कुणीतरी यक्ष, किन्नर किंवा गंधर्व असला पाहिजे.''

तितक्यांत पुन्हां एकदा चरकाचारीचा आर्तनाद ऐकूं आला. जयशीलने लागलीच म्यानांतून तलवार उपसली व म्हटलं, ''घाबरूं नकोस, आम्ही येतो आहोत.'' आणि ते दोघेही वेगाने त्या दिशेला जाऊं लागले.

सिद्धसाधकाला नाईलाजाने जयशीलच्या बरोबर जावे लागले. चरकाचारीच्या जवळ पोंचल्यावर त्यांनी पाहिलं कीं एका अजगराने त्याला आपल्या विळख्यांत अडकवून टाकलं आहे, आणि त्याचे डोके आपल्या तोंडात धरण्याचा प्रयत्न अजगर करतो आहे.

जयशीलने एकाच उडीत त्यांच्याजवळ जाऊन अजगराच्या तोंडातून चरकाचारीचे डोकें सोडवण्याचा प्रयत्न केला. तलवारीने चरकाचारीला इजा होऊं नये याची तो काळजी घेत होता. पण अजगरही सावध होताच. त्याला बहुतेक खूप भूक लागली असावी म्हणून त्याने आपले पुरे बळ रेटून जयशीलची तलवार आपल्या डोक्यावरुन हटवली.

''जयशील, हा माणूस कांही रानटी नाही हं, चांगला शिकला सवरलेला दिसतो आहे. पण आधी त्या अजगराला तू मारून टाक.'' चरकाचाराला नीट निरखत सिद्धसाधक बोलला.

अजगराचे डोके जयशीलने आपल्या डाव्या हातांत पकडले आणि त्याला मागे खेंचून आपल्या तलवारीने त्याच्या डोक्यावर घाव घातला. त्यामुळें अजगराचे डोकें अर्धे छाटले गेले आणि तो तडफडायला लागला.

अजगराच्याबरोबर खाली पडणाऱ्या चरकाचारीला जयशीलने पकडून म्हटले, ''साधक, लवकर जाऊन पाणी घेऊन ये. हा बेशुद्ध झालाय, पण अजून जिवंत आहे.''

सिद्धसाधक धांवतच जवळच्या तलावाकडे गेला. आपल्या कमंडलून पाणी भरून तो घेऊन आला. जयशीलने चरकाचारीच्या चेहऱ्यावर पाणी शिंपडले, तेव्हां चरकाचारीने डोळे उघडले. तो म्हणाला, ''मी कुठे आहे? जिवंत आहे कीं अजगराच्या पोटांत आहे?''

''तू जिवंत आहेस. आधी हे मंत्रजल पी बघूं. तुझी भिती नष्ट होईल.'' असं म्हणून सिद्ध-साधकाने त्याला पाणी पाजले. चरकाचारी अजून भीतीने थरथर कांपतच होता त्याने विचारलं. ''तुम्ही कोण आहात? पण ते महाराज कुठे आहेत? वीर कुठे आहे?''

तो कुणाबद्दल बोलत होता ते स्पष्टच होतं. जयशीलने सिद्धसाधकाला म्हटलं, ''ऐकलंत ना ह्याचं बोलणं? त्या अद्‌भुत हत्तीवर आरुढ झालेल्या मगरीच्या आकारवाल्याबद्दलच हा बोलतोय.'' तो चरकाचारीकडे वळून म्हणाला, ''तुझं नांव काय? तू त्या मगरीच्या आकारवाल्याचा सेवक आहेस कीं मित्र?''

चरकाचारी या प्रश्नाचं उत्तर देणार होता तितक्यांत मगरीच्या आकारवाल्याने झाडीच्याबाहेर येऊन म्हटलं, ''चरकाचारी हा माझा खाजगी वैद्य आहे. तुम्ही कोण आहात? खरं सांगितलं नाहीत तर माझ्या जलग्रह हत्तीच्या पायदळी जाल. आपल्या पायांनी तो तुम्हाला दोघांना तुडवून मारील.''

जयशील आणि सिद्धसाधकाने चिडून त्याच्याकडे पाहिलं. जयशीलचा हात आपोआप तलवारीच्या मुठीवर गेला. सिद्धसाधकाने डोळे लाल करीत दंड उचलून हातांत घट्ट पकडला.

**(क्रमशः)**






भारतवीर प्रश्नावलीत भाग घ्या आणि अ…

# भारताचे वीर-९

भारतीय … आहेत - आजी व माजी. यांपैकी तुम्हाला कोणते वीर माहीत आहेत?

तीन बिनचूक उत्तरांना बक्षिसादाखल सायकली मिळतील.*

1 कसोटी सामन्यांत २९ शतकें काढून मी डॉन ब्रॅडमन यांची बरोबरी केली. मी कोण आहे?

---------------------------------------------

2 गेल्यावर्षी मी अखिल इंग्लंडची बॅडमिंटन स्पर्धा जिंकली व माझे नांव गाजले. माझं नांव तुम्हाला ठाऊक आहे कां?

---------------------------------------------

3 मला 'उडता शीख' असे प्रेमाने म्हणतात. १९६०च्या ऑलिंपिक्समधे मी ४०० मी. धांवण्याच्या अंतिम स्पर्धेत चौथा आलो होतो. तुम्ही मला ओळखता कां?

---------------------------------------------

4 जागतिक हौशी बिलीयर्ड स्पर्धामधें १९८५ सालीं मी प्रथमच भाग घेऊन सर्वांत तरुण विजेता बनलो होतो. माझे नांव सांगा.

---------------------------------------------

5 १९५३ची ज्युनियर विम्बल्डन स्पर्धा मी वयाच्या सोळाव्या वर्षी जिंकली होती. माझा मुलगादेखील माझ्या-इतकाच प्रसिद्ध आहे. मी कोण आहे?

---------------------------------------------

प्रत्येक प्रश्नाचे उत्तर दिलेल्या ओळीवर लिहा. या पांच वीरांपैकी तुम्हाला कोणता वीर आवडतो व कां? 'माझा आवडता खेळाडू वीर' यावर दहा शब्द लिहा.

..............................................................

..............................................................

..............................................................

स्पर्धकाचे नांव : ..............................

वय : .................. वर्ग : ..................

पत्ता : ..............................

पिन : .................. फोन : ..................

स्पर्धकाची सही : ..............................

पालकांची सही : ..............................

हे पान नीट कापून ५ जुलै २००२ पूर्वी पुढील पत्त्यावर पाठवा.

HEROES OF INDIA QUIZ - 9
CHANDAMAMA INDIA LIMITED
No.82, DEFENCE OFFICERS COLONY
EKKATTUTHANGAL, CHENNAI - 600 097.

सूचना :

१. ही स्पर्धा ८ ते १४ वयोगटांतल्या मुलांसाठी आहे.
२. *सर्व भाषांतून फक्त तीन विजेते निवडले जातील. विजेत्यांना योग्य उंचीच्या सायकली बक्षिस दिल्या जातील. एकापेक्षां जास्त अचूक उत्तरें आल्यास विजेत्यांची निवड "माझा आवडता वीर" या वर्णनावरून केली जाईल.
३. परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील.



राजा विक्रम व वेताळाच्या नव्या कहाण्या

# मौन योगी

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडावर चढला. त्याने झाडावरून शव खाली उतरवले आणि तो पुन्हां स्मशानाकडे जाऊं लागला. प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, "राजन, या रात्रींच्या वेळीं गडद अंधार आहे, भुतेप्रेते, विषारी सर्प, हिंस्र श्वापदें इकडेतिकडे दिसत आहेत. पण त्याची क्षिती न बाळगता तू पुढे चालतो आहेस. हे बरोबर आहे कां?

साहस, परिश्रम, निश्चय यांची पण एक सीमा असते. तू जर कुणा महात्मा किंवा महायोगी यांना मदत करायची म्हणून हे कष्ट सहन करतो आहेस कां? तर तुझी ही घोडचूक ठरेल. कारण हे लोक राजाच्या आश्रयाने राहून सुख उपभोगत असतात.



अशा संधीचा ते पुरेपूर फायदा उठवतात. ते अतिशय स्वार्थी असतात. तुला मी उदाहरण म्हणून कनकसेन राजाची गोष्ट सांगतो. गोष्ट ऐकून तुझा थकवा दूर होईल व तुझा विचारही बदलू शकेल.'' वेताळाने त्या दोघांची गोष्ट सांगायला सुरवात केली.

ममतापुरी नगर करुणा नदीच्या कांठावर होते. तिथें एक मोठे वडाचे झाड होते. त्या वृक्षाच्या छायेंत एक योगी राहात होता. लोकांना प्रथम तो वेडा आहे असं वाटत असे. पण तो वेडा नव्हता, त्याची बुद्धि भ्रष्ट झाली होती. त्याने कुणाचेही अकल्याण केले नव्हते. तेव्हां नंतर लोक म्हणूं लागले कीं हा वेडा नसून एक योगी आहे.

तो नेहमी मौन पाळी. कोणत्याही प्रश्नाला तो उत्तर देत नसे. कुणी फळें आणली तर ती तो खात असे. कांही जण तर म्हणत, कीं तो मुका व बहिरा आहे.

एकदा एक बैल त्या भागांत घुसला. आपल्या शिंगाने तो लोकांना जखमी करूं लागला. त्याला पकडायला लोक जमले व त्याचा पाठलाग करूं लागले. बैल धांवत येऊन वडाच्या झाडाजवळ आला. योगी तिथें बसलेला होता. लोक घाबरले. व ओरडूं लागले, ''योगी महाराज, पळा, पळा! नाहीतर बैल तुमच्यावर चालून येईल.''

पण योगी हलला नाही कीं डुलला नाही. बैल दमलेला होता. तो योग्याजवळ आला, दोन क्षण उभा राहिला आणि तिथेंच जमिनीवर बसला. त्या छायेंत जणूं तो विश्रांति घेत होता.

बैल खाली बसला यांत योग्याचा कांहीच प्रभाव नव्हता. पण ते दृश्य पाहून लोकांनी निराळाच अर्थ काढला. एक म्हणाला, ''हा योगी नुसता मुका व बहिराच नाही, तर तो आंधळा देखील आहे. नाहीतर धांवत येणारा बैल पाहून तो स्वस्थ कसा बसला असता?''

दुसरा म्हणाला, ''हे एक महायोगी आहेत. त्यामुळें हा उन्मत्त बैलदेखील त्यांच्यासमोर शांतपणें बसला आहे. यांच्याजवळ अद्भुत व अमोघ शक्ती आहेत. हे इथे राहिले तर आपल्या शहराला त्याचा फायदाच होईल.'' अशा रितीने त्या योग्याचे महत्व गांवात पसरले.

त्या दिवसापासून योग्याला पाहाण्यासाठीं मोठ्या संख्येने लोक येऊं लागले. येतांना ते कांही ना कांही भेट घेऊन येत. पण त्या वस्तू तो योगी स्वतःसाठी ठेवत नसे. त्याच्या दर्शनाला येणाऱ्या



इतर भक्तांना तो त्या वस्तू वाटून टाकी. योग्याच्या त्यागी स्वभावाची प्रशंसा होऊं लागली. योगी असावा तर असा त्यागी असावा, असं लोक सतत म्हणूं लागले.

कांही लोक योग्याला आपल्या समस्या सांगू लागले. पण तो कांहीही उत्तर देत नसे. समस्या सांगणाराच मग आपल्याला सोईस्कर असा त्यांतून अर्थ काढीत असे आणि नंतर म्हणे, ''हे करणं बरोबर आहे ना महाराज? असं केलं तर आमचं भलं होईल ना?''

योग्याची वागण्याची पद्धत फार विचित्र होती. असं वाटे, कीं तो ऐकतोय किंवा कधी वाटे तो ऐकतच नाही. अधूनमधून त्याचं डोकं होकार दिल्यासारखं हालतंय असं वाटे. कधीकधी नकार दिल्यासारखी मान हालतेय असंही वाटे. म्हणून लोक त्याला नंतर संकेत योगी म्हणूं लागले.

ममतापुरी व आसपासच्या गांवात योग्याची खूप प्रसिद्धी झाली. आता भक्तांची रीघ सुरुं झाली व ते किंमती भेटवस्तू देऊं लागले. कांही लबाड लोकांनी आपला फायदा करण्याचा एक नवीन उपाय शोधला. वटवृक्षाच्या चारी बाजूंना त्यांनी कुंपण घातले. जे लोक योग्याचे दर्शन घ्यायला येत, त्यांच्याकडून त्यांनी पैसे गोळा करायला सुरवात केली. ते सांगायला लागले कीं योगीबाबांच्या संमतीने एक आश्रम स्थापन होणार आहे. त्यासाठीं ते देणग्या जमवायला लागले होते. ते पैसे ते आपसांत वांटून घेत असत. शेवटी तर योग्याच्या आहाराविषयीदेखील कांही ना कांही खोटंनाटं सांगून ते पैसे उकळायला लागले. रात्रीं



योग्याला दोनतीन रोट्या फक्त खायला देत होते. तरीही योगी मौनव्रत धरुन होता. असेच दिवस चालले होते.

कनकसेन राजाला योग्याच्याबद्दल माहिती समजली कीं तो मुका, बहिरा व आंधळा आहे. हा योगी एकदा आपण पहावा असे राजाच्या मनांत आले. एक दिवस सगळे भक्तगण परत गेल्यानंतर राजा वेष पालटून तिथें आला.

योग्याच्यासमोर एका पानावर फक्त दोन लहान रोट्या होत्या. थोड्या अंतरावर एक मशाल जळत होती. त्या उजेडांत राजाला योग्याच्या डोळ्यांत अश्रू आलेले दिसले. योग्याच्या आयुष्यांत कांहीतरी दुःखद घटना घडलेली असावी असा राजाने तर्क केला.

''महाराज, मी या देशाचा राजा आहे. लोकांच्या दृष्टींत आपण मूक, बधिर आणि अंध



असालही. त्यांना आपले मन समजले नसेल म्हणून त्यांनी हे पंगुत्व आपल्यावर लादले, आहे. मला तर वाटतं कीं आपण विकलांग नसून हे लोक विकलांग आहेत. पण आता आपण कांहीतरी बोलावं अशी वेळ आलेली आहे. कृपा करुन आपण मला आपल्याबद्दल कांहीतरी सांगावं.'' कनकसेन राजाने योग्याला विनंती केली.

''महाराज, आपले बोलणें ऐकून मी आता मौनव्रत सोडायचा निश्चय केला आहे. आपणे कांही बोलण्यापूर्वीच आपण कुणी महान व्यक्ती आहात हे मी ताडलं होतं. सत्याची ताक़द विलक्षण असते. त्याच्यासमोर कोणत्याही प्रकारचे मौन किंवा असत्याचे अस्तित्व टिकत नाही.'' योग्याने गंभीर स्वरांत म्हटले.

हा योगी एक असाधारण व्यक्ती आहे हे राजाने ओळखलं. त्यांच्याविषयीं त्याच्या मनांतली आदराची भावना वाढली. योगी पुढें बोलूं लागला, ''महाराज, खरी दृष्टी तर आपल्या मनाची दृष्टी असते. म्हणून मी निश्चय केला कीं जे डोळे सत्य पाहूं शकत नाहीत, त्यांचा काय उपयोग? तेव्हांपासून मी डोळे मिटून घ्यायचे ठरवले. त्या दिवसपासून मी जे कांही या डोळ्यांनी पाहातो, त्याचा परिणाम माझ्या मनावर अजिबात होत नाही. म्हणून दृष्टी असूनदेखील मी आंधळा आहे.

''महात्मन्, जनता आपल्याला केवळ अंधच नव्हे, तर मूकबधिर आहात, असं समजते. आपल्या या वागण्याचं कांही विशेष कारण आहे कां?'' राजाने विचारलं.

''होय महाराज! माझ्या पत्नीचा एक लाडका भाऊ होता. त्याने व्यापार केला आणि सारे कांही गमावले. कर्जाच्या डोंगराखाली तो दबून गेला होता. माझ्या पत्नीला त्याची ही दुरावस्था सहन होईना. तिच्या मनधरणीवरुन मी माझ्या पांच-ऐकर शेतीमधली तीनऐकर जमीन गांवातल्या सावकाराकडे गहाण ठेवली व ती रक्कम माझ्या मेव्हण्याला दिली. त्याने मला वचन दिलें कीं तो शहरांत जाऊन व्यापार करेल आणि जो फायदा होईल त्यांतून वर्षाच्या आंत माझी जमीन सावकाराकडून सोडवेल. पण एक वर्ष पूर्ण झालं तरीही त्याने रक्कम परत दिली नाही, किंवा तोंडही दाखवले नाही. त्या दरम्यान सावकाराने माझ्यामागे तगादा लावायला सुरवात केली. दुसरा कांही मार्ग सुचेना म्हणून मी एका जवळच्या नातेवाईकाकडे जाऊन उसने पैसे मागितले. पण देण्यास त्याने नकार दिला. मी जेव्हां आठवड्या-नंतर गांवी परत



आलो, तेव्हां तो सावकार गांवातल्या पारावर बसला होता. कांही गांवकरी व पाटीलही बरोबर होते. मला पाहिल्याबरोबर त्या सर्वांनी मिळून मला बजावले कीं पंधरा दिवसांच्या आंत सारी रक्कम चुकती केली नाही तर शेताबरोबर घरावरही कबजा केला जाईल.

''महाराज, सामान्य गृहस्थाला काय किंवा देशाच्या राजाला काय, आपली प्रतिष्ठा व स्वाभिमान तितकीच महत्वाची असतात. मी घरांत पाऊल ठेवताच माझी पत्नी हंसतमुखाने समोर आली. तिला कांहीतरी सांगायची इच्छा होती. पण त्यावेळीं पारावर माझा जो सर्वांसमक्ष अपमान झाला होता, त्यामुळें मी संतापलो होतो. मी तिच्या माहेरच्या सर्वांना व भावाला यथेच्छ शिव्या दिल्या. ती रडत रडत घराच्या मागील दारी गेली. मी तिच्या जाण्याकडे दुर्लक्ष केले. मी मुकाट्याने घरांत गेलो. तर तिथे मला एक पत्र दिसलं. त्यांत तिच्या भावाने लिहीलं होतं कीं आठवडाभरांतच पूर्ण रक्कम घेऊन तो परत येणार होता.'' असं म्हणून योगी डोळे टिपूं लागला.

''तुमच्या पत्नीने मागील दारच्या विहिरींत उडी टाकून आत्महत्त्या केली. होय ना स्वामीजी?'' राजाने विचारलं ''हो तसंच झालं. ते पाहिल्यानंतर घराचे दारदेखील लोटून न घेता मी घर सोडले. असाच भटकत राहिलो. शेवटी नदीकिनाऱ्यावरच्या या वडाच्या झाडाखाली मौन धारण करुन बसून राहिलो.''

''स्वामीजी, लोक म्हणतात कीं आपण फार थोर आहात. आपल्याजवळ अद्भुत सिद्धी आहेत. हे खरं आहे कां?'' राजाच्या स्वरांत उत्सुकता पुरेपूर भरलेली होती.

''कांही लबाड, स्वार्थी आणि धोकेबाज मंडळी आहेत. ते असा खोटा प्रचार करीत असतात. आपले खिसे भरत राहातात. रात्रंदिवस



या समस्येमुळें मी त्रस्त असतो. पण मला ही समस्या सोडवता येत नाही. मी असहाय्य आहे.'' योग्याने दुःखित अंतःकरणाने सांगितले.

दुसऱ्या दिवशी जे भक्त मौनी योग्याच्या दर्शनासाठीं आले, त्यांना निराश व्हावे लागले. त्यानंतर तो योगी कुणालाही कधीही दिसला नाही. फक्त राजालाच ठाऊक होतं कीं त्याचा खासगी सल्लागार म्हणजेच तो मौनी योगी होता.

ही गोष्ट सांगून वेताळ पुढें म्हणाला, ''राजन्, दीर्घकाळ पर्यंत तो योगी आंधळा, मुका व बहिरा बनून राहिला होता. पण राजाला बघून त्याच्या डोळ्यांत अश्रू कां आले? योगी बनून तो जनतेची निःस्वार्थपणें सेवा करत होता. आणि नंतर राजाचा सल्लागार बनला. हा तर स्वार्थ आहे, जनतेची सेवा नव्हे. योग्याचे भणंग आयुष्य जगण्याचा त्याला उबग आला होता. राजाजवळ राहून सुखांत राहण्याच्या इच्छेनेच तो राजाचा सल्लागार बनला होता कां? याचं उत्तर माहीत असूनही तू मौन पत्करलेस तर तुझ्या मस्तकाची शकले होतील.''

विक्रमाकनि म्हटले, ''राजा कनकसेनाने जे प्रश्न त्याला विचारले, त्यावरून राजा ज्ञानी, विवेकी आणि जिज्ञासू आहे हे योग्याने ओळखले. त्याने स्वतःवर आंधळेपण, मुकेपण आणि बहिरेपण लादून घेतले होते, कारण त्याच्यामुळें कोणतीही एखादी वाईट गोष्ट घडूं नये असे त्याला वाटत होते. स्वार्थी व लबाड लोकांची चलाखी त्याला सहन होईना. म्हणून त्याच्या डोळ्यांत पाणी आले. ते बघून योग्याचं मन अशांत आहे व त्याला शांती हवी आहे हे राजाच्या ध्यानांत आलं. राजाच्या मनांत असतं तर तो त्या लबाड लोकांना पकडूं शकला असता. पण ती समस्या तशा तऱ्हेने सुटली नसती. त्यांना पकडले तरी दुसऱ्या प्रकारचे लबाड लोक तिथें जमले असते, आणि त्यांनी आपला फायदा केला असता. म्हणून राजाला वाटले कीं योग्याने तिथें राहूं नये आणि शांततेत जीवन घालवावे. योग्याच्या मनांत सुखासीन आयुष्याची अभिलाषा मुळीच नव्हती.''

राजाचे मौन भंगल्यामुळें वेताळ शवासहित गायब झाला आणि झाडावर जाऊन बसला.

**-महेश राठीच्या रचनेवर आधारीत**



भारतीय दंतकथा - २

# देव व मानवांच्या मदतीला मुनीवर्य



फार फार पूर्वी वृत्तासुर नांवाचा राक्षस अत्यंत महत्वाकांक्षी बनला. त्याला त्रिलोकाचे साम्राज्य हवे होते - पृथ्वी, स्वर्ग व पाताळ! देवाचा राजा इंद्र, याने त्याच्याशी दीर्घकाळ युद्ध केले. शेवटी वृत्तासुराचा वध झाला, परंतु शांतता कांही प्रस्थापित होऊं शकली नाही.

कारण वृत्तासुराशी निष्ठावंत असलेले कालकेय नांवाचे अनेक राक्षस देवांना आणि मानवांना त्रास देत असत. वृत्तासुरासारखा बलाढ्य राक्षस जेव्हां पराभूत झाला, तेव्हां हे कालकेय कुठे होते? त्यावेळेस ते सर्व पळून गेले होते. कुठे गेले ते कुणालाच माहीत नव्हते.

सुरवातीला सर्वांना वाटलं कीं ते कुठेतरी दूर पर्वतराजींत किंवा अरण्यांत गेले असावेत, आणि परत कधी कुणाला दिसणार नाहीत. पण ही कल्पना खोटी ठरली. ते रात्रीं येऊन एखाद्या वस्तीवर हल्ला करीत, घरें उध्वस्त करीत व तिथल्या मंडळींना ठार मारीत असत. खास करुन सात्विक, निरपराध व विद्वान मानवांवर त्यांचा रोख होता. त्यावरुन हे राक्षस दुष्ट व क्रूर प्रवृत्तीचे होते हे उघडच आहे. लोकांना त्रास देणें, त्यांचा छळ करणें आणि त्यांना ठार मारण्यांत या राक्षसांना आनंद होत होता. देवांना ठार मारणें कांही या राक्षसांना शक्य नव्हते. तरीदेखील देवांना ते शांतपणे राहूं देत नव्हते.

कालकेयांच्या अत्याचारांना आळा घालण्याचा



काही राजे व शूरवीरांनी प्रयत्न केला. पण कितीही प्रयत्न केले तरी त्यांना या राक्षसांचा ठावठिकाणा सांपडेना. हे राक्षस अकस्मात एखाद्या गांवात किंवा वस्तींत येऊन ठाकत. भांबावलेल्या नागरिकांना प्रतिकार करायला किंवा कुणी हल्ला केला आहे ते पाहाण्यापूर्वीच त्यांची घरे पेटलेली असत. हृदयद्रावक किंकाळ्या आणि रक्त गोठवणारी भेसूर संहारदृश्यें फक्त ऐकूं येत व दिसत. या चपळ, निर्दय व अत्यंत बलदंड अशा शत्रूच्या ताव-डींतून फारच थोडेजण सुटूं शकले होते.

पहाट होईपर्यंत ही दुष्टांची टोळी दिसेनाशी होत असे. राजाचे सैनिक त्यांचा शोध घेत होते, पण व्यर्थ!

हे राक्षस हवेंत अदृश्य होते कां? सारेजण गोंधाळून गेले होते.

अखेरीस या कोड्याचा उलगडा झाला. या राक्षसांना समुद्राच्या पोटांत शिरुन खोलवर जाऊन लपण्याची शक्ती प्राप्त झालेली होती. पृथ्वीवर धुमाकूळ घालून ते समुद्रांत उडी घेत. आणि तिथें सुखरूप लपून राहात होते.

जर त्यांचे हे विश्रांतिस्थान कुणाला कळलेच तर? पण खोल समुद्रांत शिरुन त्यांच्याशी कोण लढणार?

एकच व्यक्ती याबाबतींत कांहीतरी करूं शकली असती असं देवांना सांगण्यांत आलं. ती व्यक्ती म्हणजे अगस्त्य ऋषी! त्याच्याबद्दल तुम्हाला माहिती आहेच. विंध्य पर्वत ओलांडून तो उत्तरेंतून दक्षिण भारतांत आला होता. त्याचंही एक कारण होतं. उंच विंध्य पर्वत सूर्यावर रागावला होता. म्हणून त्याला सूर्याच्या पूर्वपश्चिम मार्गात अडथळा निर्माण करायचा होता. हे साध्य करण्यासाठीं तो उंचउंच वाढूं लागला. देवांनी व ऋषींनी "असं करूं नकोस" म्हणून त्याला सांगण्याचा प्रयत्न केला. परंतु विंध्यपर्वताने त्यांच्याकडे दुर्लक्ष केले.

हा पर्वत अगस्त्यमुनीचा शिष्य होता. सूर्यचंद्रासारख्या अंतरिक्षांतल्या प्रबळ शक्तींच्या वाटेंत अडथळा आणण्याचा प्रयत्न करणाऱ्या विंध्यपर्वतास रोखण्याची देवांनी अगस्त्याला विनंती केली.

अगस्त्याने एक आगळाच उपाय केला. तो पर्वताकडे चालायला लागला. पर्वत त्याला अभिवादन करण्यासाठीं खाली वांकला.



अगस्त्याने त्याला आशिर्वाद देऊन म्हटले, "मी परत येईपर्यंत तू असाच राहा."

गुरूचा आदेश डावलणें पर्वताला शक्य नव्हते. परंतु गुरु अगस्त्य तिकडे परत कधी वळलाच नाही. तो दक्षिणेंत जाऊन तिथेंच स्थायिक झाला. म्हणून विंध्य पर्वताचे मस्तक वांकलेलेच आहे. आणि सूर्यदेवाचा पूर्वेकडून पश्चिमेकडे जाण्याचा मार्ग निर्वेध राहिलेला आहे.

आता देवांनी पुन्हां एकदा अगस्त्य गुरुला विनंती केली. "कृपा करुन कालकेयांचा त्रास कायमचा नाहीसा करण्यासाठी आम्हाला मदत करा." देव म्हणाले. अगस्त्याने संमतीदर्शक मान डोलावली व तो समुद्राच्या दिशेने चालायला लागला. देव, राजे, वीर, योद्धे, इ. त्याच्या पाठीमागून जाऊं लागले. अगस्त्यऋषी सागराच्या किनाऱ्यावर जाऊन थांबला. त्यानंतर तो काय करणार होता? कुणालाही अंदाज करता येईना.

ऋषीवर कांही क्षण स्तब्ध झाला. नंतर त्याने आपले हात पुढें केले व दोन्ही हातांची ओंजळ केली. आणि काय आश्चर्य! समुद्राचे पाणी त्याच्या ओंजळीत एका मोठ्या धारेने येऊन पडूं लागले. आणि त्यावर अगस्त्याने काय करावे? त्याने सरळ ती ओंजळ तोंडाला लावली आणि ते सारे पाणी तो प्यायला. थोड्याच वेळांत समुद्र आटला आणि राक्षस उघड्यावर आले. साहजिकच, त्यांचा निःपात करणें देवांना सहजसाध्य झाले!

पण यांतली महत्वाची गोष्ट तुम्हाला सांगायलाच हवी! या पुराणकथांमधें एक गर्भितार्थ नेहमी असतो. यांत समुद्र म्हणजे सद्बुद्धीचे प्रतीक! ऋषीने समुद्र प्यायला किंवा त्यावर ताबा मिळवला म्हणजे त्यांच्या प्रगतीच्या आड येणारे सर्व वाईट विचार त्याने नष्ट केले, असा असूं शकेल कां? सध्यां तुम्ही फक्त ही गोष्ट लक्षांत ठेवा. कांही दिवसांनंतर तुम्ही त्यावर खोल विचार कराल आणि त्यांत दडलेले सत्य शोधून काढाल. अशा इतरही अनेक कथा आहेत!

**- बिंदुसार**



# भारताची ओळख

प्रश्नावली

शाळेंत तुम्हाला भारताचा इतिहास व भूगोल शिकवतात. इतिहासांतल्या अनेक कथा तुमच्या परिचयाच्या असतात व लक्षांत राहातात. या महिन्यांतली प्रश्नावली तुम्हाला भूगोल व भौगोलिक माहितीवर आधारलेली आहे. तेव्हां पाहा!

१. ईशान्येकडल्या टेकड्यांच्या रांगांचे नांव 'सर्पांचे निवासस्थान' अशा अर्थाचे आहे. ते नांव कोणते?
२. श्रीरंगपट्टणम हे बेट कोणत्या नदींत आहे?
३. पॉईंट पाल्मिरास हे ओरिसांतल्या कोणत्या नदीच्या मुखाशी आहे?
४. कोणत्या राज्यांत सर्वांत जास्त कालवे वा जलमार्ग आहेत?
५. स्पिटी खोऱ्यांतले एक खेडे हे जगांतले सर्वांत जास्त उंचीवरचे खेडेगांव आहे. त्याची उंची किती आहे व गांवाचे नांव काय?
६. केरळांतल्या कोणत्या तलावांत पंबा, पेरियार आणि मरीमाला नद्या मिळतात?
७. पश्चिम घाटावरचे कोणते गांव महाराष्ट्रांतले सर्वांत जास्त उंचीवरचे थंड हवेचे ठिकाण आहे?
८. जोग हा भारतांतला सर्वांत उंच धबधबा कोणत्या नदीवर आहे?
९. पाण्यांत अर्धवट बुडालेले वरुणदेवाचे मंदिर बुंदी किल्ल्यामधल्या कृत्रिम तलावांत आहे. या तलावाचे नांव काय?
१०. मध्यप्रदेशांतल्या एका राजपूत जमातीला विंध्यपर्वतावरुन नांव पडलेले आहे. या जमातीचे नांव काय?

## मे मधील प्रश्नावलीची उत्तरें

१. बहामनी सुलतान अल्लाउद्दीन १३४७.
२. १० डिग्री चॅनेल. ही अंदमान व निकोबार बेटांमधून जाते
३. कटक
४. मुंबई
५. दिल्ली
६. कोलकाटा
७. मदुराई - वैगाई नदी
८. पंबन सामुद्रधुनी



# मशालवाले भूत

कमल आपल्या कुटुंबासहित जंगली प्रदेशांतल्या रामापुरमधें राहात होता. जवळच्याच एका गांवात त्याचे नारळाचे दुकान होते.

त्या दिवशी त्याला घरी निघायला उशीर झाला. पाऊस सुरुं झाला. रोजच्या रस्त्यानेच तो निघाला पण पावसाचा जोर वाढला. तो धावतच वाटेंतल्या एका ओसाड शिवालयांत शिरला. तिथें त्याला सांप दिसले तेव्हां त्याने तसंच पावसांत भिजत घरी जायचे ठरवले.

जंगलात अंधार होता. त्याला झाडींत एक प्रकाश दिसला. तिथे तो गेला तर एका दगडावर एक म्हातारे भूत त्याला बसलेले दिसले. त्याच्या हातांत एक मशाल होती.

भुताला बघून तो भयंकर घाबरला, आणि परत फिरला. भुताने मोठ्या आवाजांत त्याला म्हटले, "घाबरूं नकोस. जवळ ये. रस्ता चुकला आहेस कां? रामापुरला जायचं असेल तर डावीकडे वळ. आणि भरतपूरला जायचं असेल तर उजवीकडे जा." असं म्हणून तो हातांतली मशाल इकडेतिकडे हलवूं लागला.

भुताचा प्रेमळ स्वर ऐकून कमलच्या जिवांत जीव आला. त्याने विचारलं, "रात्र फार झालीय. पाऊस कोसळतोय. तेव्हां या अवेळीं इथें मशाल हालवत बसून कशाला राहिला आहेस?"

त्यावर भुताला हंसूं आले. ते म्हणाले, "आता मला हवंय पुण्य! जिवंत होतो तेव्हां श्रीमंत होतो. मला कांही कमी नव्हतं. पण मी



पाहिजेस. माझ्या घरीं सोन्याचा पाऊस पाड म्हणजे भरपूर पुण्य पदरांत पडेल."

भुताने जरा वेळ विचार केला नि उत्तर दिले. "कुणाच्या स्वार्थी इच्छा मला पूर्ण करायच्या नाहीत. दुसरं कांही माग." कमल नाराजीने म्हणाला, "तर मग माझा शेजारी मंगल फारच गरीब आहे. त्याला खायला अन्न नाही. त्याला हंडाभर सोनं दे!" कमलच्या स्वरांत उपहास पुरेपूर भरला होता.

भुताला ते समजून चुकलं. ते म्हणाले, "इतक्या जोराच्या पावसांत माझी मशाल विझली नाही. म्हणजे दुसऱ्यांची इच्छापूर्ती करण्याची शक्ती माझ्यांत आहे. ठीक. तू जा नि मंगलला सांग कीं त्याच्या मागील दारच्या नारळीच्या झाडाखाली खोदून पहा. तिथे त्याला धन सांपडेल. पण जर तो त्यासाठीं अयोग्य निघाला तर मात्र तिथें सांप दिसतील."

कमल तडक घरी आला. आपल्या बायकोला त्याने ही हकीकत सांगितली आणि म्हणाला, "कांहीही असो, मंगलचे नशीब चांगले आहे!"

दुर्गानि, त्याच्या बायकोने झटकन म्हटले, "मूर्खपणा करूं नका. हे गुपित मंगलला सांगू नका हं! त्याला सांगा कीं जंगलात जा नि त्या भुताला भेट. मशालवाल्या भुताला त्याने सांगायचं कीं कमलच्या घरीं धन येऊं दे. जेव्हां

तेव्हां फार स्वार्थी होतो. कुणालाही मदत करत नव्हतो. कोणतेही पुण्यकार्य मी केले नाही. त्याचे फळ म्हणून मी भूत झालो आहे. आता तरी दुसऱ्यांना मदत करायची. थोडे फार पुण्यकार्य करायची माझी इच्छा आहे. माझी पापें धुतली गेली कीं परमेश्वर मला क्षमा करील व मला मुक्ती मिळेल."

हे भूत जुन्या विचारांचे व निश्चयी दिसते आहे असे कमलच्या मनांत आले. तो म्हणाला, "जंगलात राहून वाटसरूंना मशाल दाखवली कीं लगेच पुण्य मिळेल असं थोडंच आहे? तू तर लोकांना जगण्याचा मार्ग दाखवला



भूत त्याला आपल्या घरी धन कुठे सांपडेल त्या जागेबद्दल सांगेल, त्यानंतरच त्याच्या घरच्या खजिन्या-बद्दलचे गुपित त्याला सांगायचं! समजलं ना?"

कमलने मंगलला तसंच सांगितलं. मंगल लगोलग गेला आणि भुताला भेटून आला. त्याने कमलला सांगितलं, "भुताने सांगितलंय कीं तुझ्या स्वयंपाकघराची भिंत तोडून टाकलीस कीं तुला हंडाभर सोन्याच्या मोहरा मिळतील." "अस्सं? ठीक. तुझ्या मागील दारी नारळाचं झाड आहे ना, त्याच्या मुळांशी खण. तिथें तुला धन मिळेल." कमलने गुपित सांगितलं. कमल आणि दुर्गाने भिंत पाडली त्यामुळें ते जुने घर एका बाजूला कलले. भिंतीतून विंचू नि सांप बाहेर आले.

कमल चिडून भुताला भेटायला गेला. भूत दिसलं नाही. पण शिवालयाच्या ओवरीत एक साधू निजला होता. त्याने कमलला पाहून म्हटले, "तू भुताला शोधतो आहेस कां? मीच त्याला पुण्य कमवायला निर्मनुष्य जागीं पाठवलंय. तिथें नामस्मरण करून पुण्य मिळेल. पण तुझं त्याच्याशी काय काम आहे?"

कमलने खरी कहाणी सांगितली नि पुढे म्हणाला, "त्या भुताने मला फसवलंय. मंगलसाठीं मी धन मागितलं, ते त्याला मिळालं. आणि मला मात्र नुकसान झालंच. शिवाय आता घरही लौकरच कोसळेल."

साधुने हंसून म्हटले, "अरे, त्यांत भुताचा काय अपराध आहे? तू मंगळासाठीं धन मागितलंस, त्यांत स्वार्थ नव्हता. म्हणून ती इच्छा पूर्ण झाली. लक्षांत ठेव. स्वार्थी इच्छा कधीही पूर्ण होत नाहीत. लक्षांत आलं कां?

कमलला उमजलं कीं मेहनतीची कमाईच त्याच्या भाग्यांत लिहीलेली होती. त्याच्या मनांतला राग, निराशा मावळली आणि तो सरळ मनाने घरीं परत गेला.





# धनदाता

सर्वांना आता पटलंय कीं गणपती हा हुशार माणूस आहे. त्याला एकदम हजार रुपयांची जरूर होती. शेजारच्या गांवातला त्याचा मित्र चमन त्याला यावेळीं मदत करील असा त्याला विश्वास वाटत होता. या भरवंशावर तो चमनला भेटायला गेला. दुर्दैवाने चमन स्वतःच अनेक अडचणींत सांपडलेला होता.

"आमचा गांव मजुरांचा गांव आहे. तुझा गांव धनवंतानी भरलेला आहे. मला आश्चर्य वाटतंय कीं इथें तुला पैशाची चणचण कां असावी? या गांवात तुला कर्जाऊ पैसे देणारा कुणीही नाही कां?" गणपतीने विचारले.

चमनने निराशेने त्याला उत्तर दिले, "कां नाही? आहेत ना! इथें राहाणारा दिवाकर तर दानशूर कर्ण मानला जातो. पण तो अगदी विक्षिप्त आहे. तो कुणालाच भेटत नाही. लोकांच्यात मिसळत नाही. मनांत आलं तर तिथल्या तिथें दहा हजार रुपयेदेखील दान देऊं शकेल तो! पण कधीकधी दोनशे रुपये उसने द्यायला तो तयार नसतो. त्याचं मन समजतच नाही."

हे ऐकून गणपती चकित झाला. दिवाकरने कुणाकुणाला केव्हां कर्ज दिलंय, कुणाला द्यायचं नाकारलंय, याची सविस्तर माहिती त्याने चमनला विचारून घेतली.

सगळी माहिती सांगून चमनने त्याला विचारलं, "हे सारं तू कशासाठी विचारतो आहेस?"

"प्रत्येक माणसाच्या व्यवहार-शैलीच्या मागे कांही ना कांही सबळ कारण असतं. त्याचा नीट विचार करून कांहीतरी उपाय शोधता येईल. मला वाटतं कीं दिवाकर विक्षिप्त नसावा. मी त्याला एकदा भेटून येतो." आणि गणपती दिवाकरला भेटायला लगेच निघाला.

त्यावेळेला दिवाकर आपल्या घराच्या मागील अंगणात फुलांची रोपे पाहात होता. त्याला बागकामाची फार आवड होती. दुर्मिळ फुलांची रोपे तो जमवीत असे आणि आपल्या बागेंत ती लावीत असे. गणपती सरळ बागेंत गेला आणि त्याला भेटला. त्याने दिवाकरची मनापासून स्तुती केली आणि स्वतःची ओळख करून दिली. "अरे वा, तू आमच्या चमनचा मित्र आहेस काय? अरे तो तर माझा चांगला दोस्त आहे, माझा जवळचा मित्र आहे. त्याने तुला पाठवलं आणि तो स्वतः कां नाही आला?" दिवाकरने विचारलं.

"मी काळा गुलाब शोधतो आहे. जेव्हां मला कळलं कीं गुलाबाची ती जात तुमच्या बागेंत आहे, तेव्हां मी धांवतच इथे आलो. हो, मला या काळ्या गुलाबाची खास जरूर आहे." असं म्हणून गणपती त्या रोपाजवळ गेला.

दिवाकरने आश्चर्य व्यक्त करीत म्हटले, "या काळ्या गुलाबांचं काय खास महत्व आहे?"

गणपती त्या फुलाकडे एकटक पाहात होता. तो म्हणाला, "हे फूल दहा पुरुषांनी हातांत घ्यायचं व नंतर पाण्यांत घालून ते पाणी गरम करायचं असतं. ते पाणी प्यायलं कीं पुण्य मिळतं. कैलासपर्वताचं दर्शन केल्याचं पुण्य पदरांत पडतं."

दिवाकरने लागलीच पंचांग मागवलं आणि ती वेळ शुभंकर होती कीं नाही ते पाहिलं.

"आता हे तर नक्की कीं आपण दोघेही भाग्यवान आहोत. आजूबाजूच्या सात पुरुषांना तुम्ही बोलावून घ्या. तोपर्यंत मी चमनला घेऊन येतोच. आपण सगळे मिळून दहाजण होऊन जाऊं. पुण्यही अनायासे मिळेल." गणपतीनें मोठ्या उत्साहाने सांगितलं.

दिवाकर त्याप्रमाणें सातजणांना बरोबर घेऊन



आला. थोड्याच वेळांत काळा गुलाब पाण्यांत भातला गेला व पाणी गरम केले गेले. ते पाणी त्या दहा पुरुषांनीच नव्हे, तर त्यांच्या बायका व मुलांनीही प्यायले. सर्वांना याचा फार आनंद वाटला. त्याच वेळेला गणपती चमनच्या कानांत कुजबुजला, ''आत्ता दिवाकरकडे पांच हजार रुपयांचं कर्ज माग. हजार रुपये मला दे आणि बाकीचे चार हजार तू ठेव. संकोच करुं नकोस. ते जरुर कर्ज देतील. जर त्यांनी कर्ज नाही दिलं तर समज, कीं मीच तुला दहा हजार रुपये देणे लागतो.''

जरा संकोचानेच चमनने दिवाकरला आपली अडचण सांगितली. ''अरे, त्यांत संकोच कसला करतोस? मी तुला दान थोडंच देणार आहे? कर्ज द्यायचं आहे. तू तर असा बापुडवाणा चेहरा केला आहेस कीं तू माझ्याकडे दान मागतो आहेस. तू मला फार आवडतोस. मी तुला आपला मानतो. पांच हजारच काय, दहा हजार हवे असले तरी घे.'' दिवाकरने मोठ्या प्रेमभरल्या आवाजांत म्हटलं.

''दहा नकोत, पांच पुरे आहेत हो'' एवढं म्हणून चमनने दिवाकरकडून पांच हजार रुपये घेतले. गणपतीबरोबर तो घरी परत गेला. तिथें गणपतीला एक हजार रुपये देऊन त्याने विचारले, ''गणपती, तुझ्या पाठिंब्यामुळेंच मी दिवाकरकडे कर्ज मागू शकलो. तो नाही म्हणेल कीं काय अशी मला सतत भिती वाटत होती. पण तो नक्की कर्ज देईल हे तुला करुं ठाऊक?''

''दिवाकरला हवी होती केवळ लोकेषणा! जेव्हां लोक हजर असतात, तेव्हां त्यांच्यासमोर मागितलं तर तो कांहीही देईल. त्याला दानशूर म्हणावं ही त्याची इच्छा आहे. तू जर एकटा जाऊन विचारशील तर तो कुणाला कांहीही देत नसतो. ज्या कुणाला त्याने कर्ज नाकारलं, त्याचं हे कारण होतं. दिवाकर हुशार आहेच. पण अतिशय सावध आणि व्यवहारी आहे. लोकांच्यासमोर त्याला नकार द्यायला आवडत नाही म्हणून तो एकलकोंड्या-सारखा एकटा बसतो. त्याच्या स्वभावांतली ही गोम मला कळली आणि म्हणून मी दहाजणांच्या समक्ष तुला कर्ज मागायला सांगितलं.'' गणपतीने आपली चतुराई समजावून सांगितली.

मित्राच्या हुशारीचं कौतुक करीत चमनने त्याला शाबासकी देऊन म्हटले, ''वा, वा, तुझं कांही खरं नाही हं!''







# गणेश पुराण

''विघ्नेश्वरा! तूं गजासुराचा जो विनाश केलास, त्याची आठवण म्हणून आतांपासून, चिरकालापर्यंत गणपती-नवरात्राचा उत्सव, लोक मोठ्या समारंभाने करतील. स्वेच्छेप्रमाणे यशप्राप्त करण्यासाठी करण्यांत येणाऱ्या गणेशोत्सवांनी, आपल्या उद्योगात विजय मिळवून दिला, असे लोक मानतील. सर्व उत्सवांमध्ये गणपती-नवरात्राचा उत्सव श्रेष्ठ उत्सव मानला जाईल!'' अशी आकाशवाणी झाली.

''पार्वतीनंदना! भाचा आहेस म्हणून, माझ्यासाठी आणखी एक काम वाढवून ठेवलेस ना? चांगले आहे नाते!'' विष्णू गणपतीला म्हणाला.

''मामाचे नाते सांगून, कंस म्हणून जन्मलेल्या कालनेमीचा, मृत्यू म्हणून तू जन्म घेऊन कृष्णावतारांत कंसाचा वध करणार आहेसच! ही असली नाती सांगून आपले काम साधण्याची कला तूच शिकविली आहेस, कमलनयना!'' गणेश म्हणाला.

''विघ्नेश्वरा! तुझ्या परशूपुढे माझे चक्र ते काय! तुझे परशू फिरविण्यांतील कौशल्य पाहतांना डोळ्यांचे पारणे फिटल्याचा आनंद आला'' विष्णू म्हणाला.

''परशुरामावतार घेतांना माझा परशू घेऊन जा व गर्वोन्नत झालेल्या क्षत्रियांचा संहार करणारा हो बरे!'' विघ्नेश्वर म्हणाला.

''गजासुर रूपांतील विघ्नावर चढून त्याला तुडवीत असतांना, तुझी छोटी-छोटी पावले पुढे टाकण्याची ढब पाहून माझे भरपूर मनोरंजन झाले''. विष्णू म्हणाला.

''तसं असेल तर, वामनावतार धारण



केल्यावर बलीचक्रवर्तीला पाताळात घुसेपर्यंत पावलांनी दाबशील बरें!'' गणपती म्हणाला.

''तुझे बुद्धिसामर्थ्यदेखील मला आकर्षित करते आहे, काय करूं?'' असे विष्णू म्हणाला असता, त्यावरे ''धर्मसंस्थापनाचा खरा अर्थ जेव्हां समाज हिंसेमुळे, अनाचारामुळे, अंध-श्रद्धेमुळे, जिकीरीस आलेला असेल त्यावेळी बुद्धरूपाने मानवांना, सुव्यवस्थित समाजरचनेचा व निर्वाणमार्गाचा उपदेशक होशील ! मायादेवीच्या स्वप्नामध्ये माझा पांढरा हत्ती प्रवेश करील, व बुद्धावतारातील सिद्धार्थ रूपाची नांदी गाईल''. असे गणपती म्हणाला. विष्णूला फारच आनंद झाला.

परमाणुरूपांत असलेले विघ्न म्हणाले- ''विघ्नराजा, मी तुझा सेवक आहे. तुझी आज्ञा मला शिरोधार्य आहे. जातो आता''. असे म्हणून गणपतीची आज्ञा मानून कालिंदीच्या डोहात कालिया बनून लपून बसले. मूषकासुर उंदराच्या रूपाने प्रच्छन्नपणे लपून बसला होता. विघ्नाची झालेली दुर्दशा पाहून त्याने रागाने दांत-ओठ चावले. नंतर आळस झटकून स्वतः चे रूप धारण केले व सिंहगर्जना करीत गणपतीसमोर उभा राहिला.

गणपतीला त्याचे बलिष्ठ शरीर बघून समाधान वाटले. मूषकासुर त्याच्याकडे दुर्लक्ष करीत विषारी हास्य हंसत म्हणाला-''विघ्न तुझा सेवक असल्यामुळे, मनांत येईल ते केलेस, परंतु मी तुझा जन्मवैरी आहे. सिंहस्वप्नाचे नांव तुझ्या ऐकिवात असेलच! सिंह बनून तुझे वक्षस्थल फाडतो!'' असे म्हणून सिंहाचे रूप घेऊन त्याने त्याने भीषण गर्जना केली.

''सिंह, होय? तू तर जगन्जननीचे वाहन आहेस. तुला मी अभिवादन करीत आहे!'' गणेश म्हणाला.

सिंहाने एक डरकाळी फोडली व गणपतीवर झडप घालणार तोच, ''शिवा, शरभा!'' असे स्मरण गणपतीने केले.

सिंहासमोर, शिवाचा शरभावतार प्रत्यक्ष उभा ठाकला व मोठी गर्जना केली. शरभाला सिंहाचे शरीर, आयाळ व जबडा असून हत्तीची सोंड व दांत होते. महासर्पासारखी शेपटी असून त्याच्या टोकाला मगरीचे तोंड असून ते ज्वाळा ओकीत होते. शरभाची आयाळ अग्निशिखांप्रमाणे वर उठत होती. तोंडातून उष्ण धूर 'घप घप' बाहेर पडत होता. शरभाने आपल्या सोंडेने एक फटका मारताच सिंहाचे तोंड सुजले. सिंह शेपटी



पायांत शेपटी घालून पळूं लागला. शरभावतार अंतर्धान पावला.

विघ्नेश्वराने आपली सोंड एक योजन लांब केली व पळणाऱ्या सिंहाची कम्बर बांधून त्याला आपटले. सिंह गुरगुरत तडफडूं लागला.

देवादिक आकाशांत गोळा होऊन हे दृश्य बघत होते. ''विजय विघ्नेश्वरा! तूं धरलेला सिंह, मला पाळायची इच्छा होते आहे, जरा देशील कां?'' विष्णू म्हणाला.

''पाळतो म्हणून घेऊन, ह्याचे डोके, नखें काढून घेऊन, नरसिंहावतारांत हिरण्यकश्यपूला फाडायचा विचार आहे का? ते कांही जमायचे नाही बरें! या सिंहाची मला गरज आहे. तुझ्या नरसिंहावताराची तरतूद तुलाच करावी लागेल!'' गणेशाने उत्तर दिले.

सोंडेत धरलेल्या सिंहाला हळूच नेऊन त्याने महाश्वेतेसमोर ठेऊन दिले. महाश्वेतेने हिताचे चार शब्द सांगितले. ते न ऐकता मूषकासुर स्वतःच विघ्नेश्वराशी टक्कर घेण्यासाठी पळत सुटला होता. महाश्वेतेने देवीला आळविले. देवीने तिला दर्शन दिले. ती म्हणाली-''तुझा पती गणपतीचे वाहन बनेल व चिरंजीवी होईल; असे विधिलिखित आहे. तूसुद्धा श्वेतछत्र बनून चिरकालपर्यंत गणेशाची सेवा तुझ्या पतीसमवेत करीत राहशील!'' असे सांगून अंतर्धान पावली.

वज्रदन्ताला त्याच्या इच्छेप्रमाणे कोणतेही रूप घेता येत असे. म्हणून त्याने हत्तींनासुद्धा धरून उडता येईल अशा महागरुडाचे रूप धारण केले, व दोन हत्तींना आपल्या पायांच्या नखांनी धरून तो उडूं लागला. त्यामुळे सर्वत्र हलकल्लोळ



माजला. त्यावेळी एका झाडावर, गिधाडाचे लहान रूप घेऊन, गरूड विष्णूचे ध्यान करीत बसला होता. या कल्लोळामुळे त्याचे ध्यान मोडले. त्यामुळे संतापून त्याने त्या अजस्त्र गरुडाला चोचीने भोसकले, त्याबरोबर, महाकाय गरुडाकारातील मूषकासुर जमिनीवर कोलमडून पडला. ते पाहून ''याहूनही अधिक स्वादिष्ट असा मार खाणार आहेस! जा, लवकर जा!'' गरुड म्हणाला.

नंतर मूषकासुर विघ्नेश्वराजवळ गेला व त्याला चिडवीत म्हणाला-''तुझे दंत मोठे आहेत. कवठं दाबून खाण्यापलिकडे दुसऱ्या कशाच्याही कामाचे नाहीत. माझ्या दांतांनी मी वज्रांचे देखील पीठ पाडतो, कैलासाला पोकळ करूं शकतो, समजले कां?''

गणेशाने इकडे-तिकडे बघत स्वतःशी पुट-



भूलोकाला धापा टाकीत वळसा घालून शेवटी असहाय होऊन विनायकाजवळ आला, "मला मरणही येत नाही, तुझा दांत अंगात शिरून शिरून मरणप्राय यातना देत आहे. माझा त्रास वांचव देवा!" असे म्हणत शरण आलेल्या मूषकासुराला अभय देऊन विनायकाने दांताला मागे घेतले. तो तुटलेला दांत त्याच्या हातांतील अलंकार म्हणून शोभत होता.

"मूषका! दिसायला पिटुकला उंदीर असलास तरी महाबलवान आहेस. अनुकूल वाहनाच्या अभावी माझ्या लंबोदरामुळे मला फार त्रास होतो आहे. तुझ्यासारखे...."

संदेहामुळे अपुरे वाक्य गणपतीने सोडून दिले.

विघ्नेश्वराने केलेल्या स्तुतीमुळे चढून जाऊन "विघ्नेश्वरा, तुझ्या दाताने माझ्यातील अज्ञानाला पळवून लावले असून, टोंचून टोचून माझ्यांत ज्ञान भरले आहे. चांगला औषधोपचार घडला मला! तुझे वाहन होण्यायोग्य मी आहे असे तू मानतोस, हे माझे महद्भाग्य होय. कितीही मोठे वाहन म्हणून मला होता येते". असे म्हणत मूषकासुर हत्तीएवढ्या मोठ्या आकाराचा उंदीर बनला.

पुटल्यासारखे "निकामी असलेल्या दांतांचा, असून तरी काय उपयोग?" असे म्हणत एक दांत मोडून फेकल्यासारखा भिरकावून दिला.

तो दांत इंद्रजाल केल्यासारखा हवेमध्ये गिरक्या घेत वज्रदंताला भोसकल्याप्रमाणे टोंचू लागला. रक्ताच्या धारा वाहू लागल्या. ते न बघवून महाश्वेता मूर्च्छित होऊन पडली. वज्रदंताने छोट्या उंदराचे रूप घेतले व दगडाआड तुरुतुरु पळत जाऊन बीळ केले व त्यांत शिरला. एकच दांत उरल्यामुळे विघ्नेश्वराला एकदन्त असे नांव पडले.

तो दांतसुद्धा बिळात शिरला व त्याला मारीत मारीत त्याचा पाठलाग करूं लागला. उंदीरसुद्धा बीळ उकरीत उकरीत पाताळांत शिरला व दुसरी वाट काढीत जमिनीवर आला. शेपटीच्या मागोमाग रक्ताची धार वहात होती. संपूर्ण

त्या महाकाय उंदराच्या पाठीवर गणपतीने पाय ठेवताच, किच-किच आवाज करीत उंदीर थरथर कांपू लागला.

"बाबा रे! तू पिटुकला उंदीर बनूनच माझा भार नीटपणे वाहू शकशील. माझ्या आकारास सर्व तऱ्हेने सोयीस्कर असे वाहन, पिटुकला उंदीरच ठरूं शकेल". गणपतीने मूषकासुरास सांगितले.





मूषकासुराने नेहमीप्रमाणे उंदराचा साधा आकार धारण केला. विघ्नेश्वराला पाठीवर बसवून भरभर एक चक्कर फिरून आला, "खरंच, स्वामी! आता आपला भार वाहतोय, असं वाटत नाहीये!" तो म्हणाला.

शुद्धीवर आलेली धवला विघ्नेश्वराला पाहून म्हणाली - "देवा! माझा पती उंदीर तुझे वाहन झालेला आहे! तेव्हां श्वेतछत्र बनून मलाही तुझी सेवा करूं दे. माझ्यावर अनुग्रह कर!" ती म्हणाली.

"आई! तुझ्या श्वेतछत्राची गार सांवली माझे रक्षण करील. माझे भाग्य थोर म्हणून ती मला लाभली!" असे म्हणत विघ्नेश्वराने उंदराकडे दृष्टी वळविली व "वज्रदंता, देवीचा अनुग्रह मिळवि-लेल्या साध्वी धवलेच्या शब्दाला माघार माहीत नाही. माझे वाहन बनून रहा. माझ्याबरोबर मला जे मिळेल ते खा. तुझे मनोरंजन म्हणून देवादिदेव, नाक घासून, उठाबशा काढून, चुकले म्हणून गालांत मारून घेतील". विघ्नेश्वराने सांगितले.

"खरंच देवा! माझीही हीच इच्छा होती. मी वज्रदंत असतांना, देवांकडून माझ्यासमोर असेच करवून घेत असे. तुझे वाहन बनून मी कृतार्थ झालो". मूषकासुर म्हणाला.

धवला श्वेतछत्र बनून गणपतीच्या डोक्यावर छाया करू लागली. ती दंपती विनायकाची चिरकालपर्यंत अशीच सेवा करीत राहतील. विनायक मूषकवाहन बनला.

"एकदन्ता! मूषकोत्तम वाहना! तुझे वाहन पाहून मला तुझा हेवा वाटतो आहे! किती सुंदर वाहन मिळविलेस!" अशी विष्णूने स्तुती केली.

"तुझ्या कल्की अवतारात माझे वाहन, श्वेत-अश्व होऊन तुझे वाहन बनेल. तुला अंतरिक्ष ओलांडून ग्रहान्तरास घेऊन जाईल बरं! मानवांना

नवीन वसाहती स्थापित करून दे.'' एकदन्त म्हणाला.

''अहाहा! तुझ्या वाचासिद्धीमुळे तसेच होऊ दे!'' असे म्हणून विष्णूने आपला आनंद व्यक्त केला.

यावर नारद म्हणाला- ''विघ्नेश्वरा! आता-पर्यंत तुझ्याबरोबरच विष्णूच्या नऊ अवतारांची माहिती आम्हांला झाली. फक्त एकच उरली आहे!''

''लवकरच ती शुभमंगलाची वेळ आली म्हणजे कळेलच तेही! कसली घाई आहे?'' विष्णू म्हणाला. ''कुणाचे शुभमंगल देवा?'' नारदाने विचारले. ''आपल्याला कल्याणकारक अशा विघ्नेश्वराचेच!'' विष्णु म्हणाला. विघ्नेश्वराने संतापाने पाहिले. ''हजार विघ्ने घातल्याशिवाय गत्यंतर नाही'' निश्चयी स्वरांत तो म्हणाला.

''तेवढ्यावरच भागव, बाबा! हजार विघ्नांनंतर अर्धे विघ्नही उपस्थित करता येणार नाही बरे!'' विष्णूने सावध करीत असा इशारा दिला.

''हजार विघ्ने ती किती असणार? त्यानंतर मात्र विघ्नेश्वराचा लग्न-सोहळा पाहण्याचे भाग्य आम्हांला लाभेल!'' असे म्हणून तिन्ही लोकांमध्ये नारदाची स्वारी निघाली. शंकराचा पार्वतीवरील अनुराग, महातेजांत बदलला. अग्नीने ते महातेज शरवण सरोवरांत पोचते करण्याची तत्परता दाखविली. सहा तोंडे असलेल्या शणमुखाचा जन्म झाला. सहा ऋषि-पत्नींनी त्याचा सांभाळ करून त्याला पार्वतीपरमेश्वराकडे पोचते केले. कुमारस्वामी हळूं-हळूं मोठा झाला. गरुडाने त्याला मयूर-वाहन दिले. इन्द्राने त्याला अनेक आयुधे दिली. पार्वतीने आपले अपूर्व शक्ती असलेले शूल दिले. कुमारस्वामी वाढूं लागला असता तारका-सुरास वाईट स्वप्नं पडूं लागली व तो भीतीमुळे थरथर कापू लागला.

कुमारस्वामीने घोर तपस्या करून ब्रह्मज्ञानाचे रहस्य उलगडून घेतले. म्हणून त्याचें नांव सुब्रह्मण्यम झाले. ओंकाराचे गुपित, शिवासारख्या परमेश्वरालाच गुरू म्हणून उपदेश देतांना सांगितले. पार्वतीपरमेश्वरांच्या डोळ्यांचेपारणे फेडणारे ते दोघे भाऊ-गणपती व कुमारस्वामी खेळत खेळत मजेत कैलासावर विहार करूं लागले.

(क्रमशः)





# डोलती खुर्ची

चरण हा एक कुशल सुतार होता. तरुण वयांतच त्याने देशभर भ्रमंती केली आणि शेवटीं तो आपल्या गांवी परतला. त्याच्या कारागिरीचं सारेजण कौतुक करीत असत. आसपासच्या गांवात त्याची भरपूर स्तुती होत असे.

एक दिवस त्याला वाटलं कीं अशी एखादी खुर्ची बनवावी कीं दिसायलाही आगळीवेगळी असेल आणि आजपर्यंत तसल्या प्रकारची खुर्ची कुणीच बनवलेली नसेल. त्या खुर्चीत जो बसेल किंवा आरामांत पडून राहील. त्याला वाटेल त्या दिशेला ती खुर्ची वळवता यायला हवी आणि त्याचा थकवाही जायला हवा!

चरण त्या कामांत गुंतला आणि एका महिन्यांतच त्याने ती डोलणारी खुर्ची तयार केली. महिनाभर त्याने स्वतः ती खुर्ची वापरून पाहिली. आपल्या कौशल्यावर तो संतुष्ट झाला होता. त्याला वाटलं कीं जवळच्याच जमीनदाराला ही खुर्ची दाखवली तर चांगल्या किंमतीला ती विकता येईल.

एके दिवशी सकाळींच त्याने ती खुर्ची बैलगाडींत ठेवली आणि तो जमीनदाराच्या वाड्याकडे जायला निघाला. दुपारीं त्याने एका वडाच्या झाडाखाली गाडी थांबवली. बैलांना गवत खाऊं घातले, पाणी पाजले आणि त्यानेही आपली शिदोरी खाल्ली. जरा विश्रांति घेऊन तो पुढे जाणार तितक्यांत आमराईच्या बाजूने एक सुंदर घोडागाडी आली. तिच्या मागून दोघेजण बोलत बोलत येत होते. त्यांच्यापैकीं एकजण उंचनिंच होता व त्याला चांगल्या भरदार मिशा होत्या. त्याच्या हातांत एक किंमती काठी होती. त्याच्या अंगावरचे कपडेदेखील उंची होते त्याच्या मागून येणारा दुसरा माणूस जरा ठेंगणा होता आणि खाली मान घालून नम्रपणें चालत होता.

- मधुसूदन गर्ग -



त्या ठेंगण्या माणसाला चरणच्या गाडींत ठेवलेली ती डोलणारी खुर्ची दिसली. त्याने चरणला विचारलं, ''ही खुर्ची कांही निराळीच दिसते आहे. ही तुझी आहे कां?''

''होय बाबूजी, ही डोलती खुर्ची आहे आणि अगदी निराळ्या प्रकारची आहे.'' चरणने त्या खुर्चीची सारी वैशिष्ट्यें वर्णन करून सांगितली. ती बनवण्यासाठीं त्याने किती मेहनत केली होती तेही सांगितलं. तो पुढे म्हणाला, ''ही विकायला मी जमीनदाराकडे मी घेऊन चाललोय. कमीतकमी पांच हजार रुपये तरी मिळतील अशी मला आशा वाटतेय.''

''जर जमीनदारांनी पांच हजार रुपये द्यायचे नाकारले तर काय करशील?'' त्या उंच माणसाने हंसतहंसत विचारले. चरणने उत्तर दिले, ''चार हजार रुपये मागीन.'' तो उंच गृहस्थ म्हणाला, ''जर तेवढेही द्यायचे त्यांनी नाकारले तर?'' ''तर तीन हजार मागीन'' चरणने पटकन सांगितले, ''ही रक्कम द्यायलाही ते तयार झाले नाहीत तर?'' त्या उंच गृहस्थांनी जोराने हंसून विचारले.

चरणला त्या हंसण्यात कांहीतरी वेगळंच वाटलं. दोघे तिघे जणांनी मिळून एखादी नवीन वस्तू पाहिली आणि एकत्र मिळून हे हंसायला लागलेत ते कशासाठी?

चरणने विनयपूर्वक त्यांना उत्तर दिले, ''जमीनदारसाहेबांनी जर दोन हजार रुपयेदेखील द्यायला नाखुषी दाखवली तर मी ही खुर्ची सरळ घरीं घेऊन जाईन. जेव्हां जेव्हां मला आराम करावासा वाटेल, तेव्हां तेव्हां मी या खुर्चीवर बसेन आणि डोलत राहीन.''

हे ऐकून तो उंच गृहस्थ व तो ठेंगणा गृहस्थ, दोघेही हंसायला लागले. नंतर ते दोघे घोडागाडींत बसून निघून गेले.

त्या दिवशी संध्याकाळीं चरण जमीनदाराच्या वाड्यावर पोंचला. पहारेकऱ्यांनी त्याला आंत जाऊं दिले. त्याला कांही प्रश्न न विचारता आंत सोडले म्हणून चरणला आश्चर्य वाटले. त्यावेळीं जमीनदार, त्यांचे दिवाणजी व दोघेतिघे कर्मचारी यांच्याबरोबर चर्चा करीत होते. त्यांनी सुंदर पगडी घातली होती. कपडेही फार सुरेख होते.

जमीनदाराला पाहून चरण थोडासा चमकला. त्याला वाटलं कीं आपण न बोलावताच इथें आलोय ही चूक तर झाली नाही ना? जर ते नाराज झालेले असले तर संपलंच आपलंच काम!

पण तसं झालं नाही, जमीनदारांनी स्मितहास्य केलं. चरणचा संकोच त्यांच्या लक्षांत आला. चरणने सारं धैर्य एकवटलं, खुर्ची उचलून घेऊन त्यांच्याजवळ ठेवली आणि त्यांना प्रणाम केला. नंतर त्याने डोलणाऱ्या खुर्चीचे विशेष गुण सांगितले.

जमीनदाराने त्याचे बोलणें लक्षपूर्वक ऐकले व म्हटले, ''तुझ्यासारखा हुशार सुतार माझ्याच जमीनदारीच्या गांवात आहे, हे पाहून मला संतोष वाटतो. तू खूप मेहनत करून ही खुर्ची बनवली आहेस ना? आता सांग, केवढ्याला विकायची आहे तुला ही खुर्ची?''

चरण म्हणाला, ''पांच हजार रुपये'' त्यानंतर वडाच्या झाडाखाली जो संवाद झाला, तसाच संवाद पुन्हां इथें झाला.

चरणला वाटलं कीं जमीनदार अत्यंत कंजूष स्वभावाचा आहे. त्याने आपली शेवटची बोली सांगून म्हटले, ''आपण जर किमान दोन हजार रुपये दिले नाहीत तर मी तसाच परत जाईन. ही खुर्ची त्यापेक्षां कमी किंमतीला विकायचा प्रश्नच उद्भवत नाही.''

जमीनदार त्याच्या बोलण्यावर पुन्हा हंसायला लागले. त्या हंसण्याची लकब थेट वडाच्या झाडाखाली त्याने हंसणें ऐकल्याप्रमाणेंच होती. तिथें दिसलेला उंचापुरा गृहस्थ म्हणजे स्वतः जमीनदारच होता हे चरणला समजले. तो भ्यायला आणि कांपऱ्या स्वरांत म्हणाला, ''मला क्षमा करा. आपणच जमीनदार आहात हे मला ठाऊक नव्हतं. मी आपल्याला प्रणामदेखील केला नव्हता. ही डोलणारी खुर्ची मी आपल्याला भेट म्हणून अर्पण करतो.'' चरणने नमस्कार करीत म्हटले.

आता मात्र जमीनदाराबरोबर इतरही सारे हंसायला लागले. जमीनदाराने चरणला दहा हजार रुपये देववले. चरण आनंदाने फुलून गांवी परतला.





# फुकट सल्ला

सदाशिवच्या मातापित्यानीं त्याला भरपूर संपत्ती ठेवलेली होती. म्हणून आपली पत्नी व मुलांबाळांसह तो समाधानाने राहात होता.

एखादी कठीण समस्या आली तर ग्रामाधिकाऱ्यापासून सारे गांवकरी त्याच्याकडे येत व त्याचा सल्ला मागत असत. अडचणीची पूर्ण माहिती करून घेऊन सदाशिव त्यांना त्यांतून मार्ग सुचवीत असे. अशा तऱ्हेने त्याने बऱ्याच लोकांना मदत केली होती.

त्यांत सूरदास हा एक व्यापारी देखील होता. एकदा त्याची सारी धान्याची पोती पावसामुळें भिजली. तो रडवेला होऊन सदाशिवकडे आला. सदाशिवने त्याला सल्ला दिला, "चित्रपुर गांवचे लोक धुतलेल्या तांदळाचा वापर करतात. तिथें हा तांदूळ विकून टाक."

सूरदासने त्याप्रमाणें केलं आणि त्याला शंभर रुपयांचा नफा झाला. दुसऱ्या वेळेला सूरदासने एका धनवंतासाठीं हिऱ्यांचा हार बनवला. पण धनवंताला तो हार कांही आवडला नाही. आपली चिंता सूरदासने सदाशिवला सांगितली. तेव्हां सदाशिवने सल्ला दिला, "रत्नपुरच्या जमीन-दाराला नवेनवे अलंकार जमवण्याचा छंद आहे. ते तुझा हार तर घेतीलच. त्याखेरीज तुला छानशी भेटवस्तूदेखील देतील." सदाशिवचा सल्ला सूरदासला पटला. त्या व्यवहारांत त्याला दोन हजार रुपयांचा फायदा झाला.

एके दिवशी एक वीस वर्षाचा तरुण अनाथ मुलगा सूरदासकडे आसरा मागायला आला. त्याचं नांव चंद्र होतं. तो लबाड आहे असं लोक म्हणत होते. सूरदासला एखादा मदतनीस हवाच होता. तरीदेखील तो चंद्रला घरीं ठेवून घ्यायला चांचरत होता. सूरदासने याविषयीं सदाशिवला सल्ला विचारला. तो म्हणाला, "कुणीही व्यक्ती जन्मतःच वाईट नसते. तूं त्याच्यावर विश्वास ठेवून पहा. तो विश्वासू होईल."

सूरदासने चंद्रला घरीं ठेवले. पण एका दिवशीं चंद्रने घरांतून दोन हजार रुपये चोरले आणि तो पळून गेला.

संतापाने सूरदास काळानिळा झाला. तो सूरदासला म्हणाला, "तुझ्या सांगण्यावरुन मी चंद्रला घरांत ठेवले. त्यामुळें माझे दोन हजार रुपयांचे नुकसान झाले. आता तू ते भरुन दिलं पाहिजेस." सदाशिव चिडून म्हणाला, "सल्ला द्यायचा हे माझं काम आहे. त्याचा परिणाम हा तुझ्या आचरणावर अवलंबून असतो. जर तू त्याच्यावर मनापासून विश्वास ठेवला असतास, तर त्याने तुला असा धोका दिला नसता."

"मला वाटलं होतं कीं तू मला रास्त सल्ला देशील! पण तू तर मला चुकीचा सल्ला दिलास. त्यामुळें माझं दोन हजाराचं नुकसान झालं. ते तू आता भरुन दे. नाहीतर मी लगेच ग्रामाधिकाऱ्याकडे तक्रार करीन." सूरदासने धमकावलं. पण सदाशिवने त्याच्या बोलण्याकडे लक्षच दिलं नाही. हा तिढा नंतर ग्रामाधिकाऱ्यापर्यंत पोंचला.

यावर काय निर्णय घ्यावा ते ग्रामाधिकाऱ्याला ठरवता येईना. सूरदासचं म्हणणं मान्य केलं तर सदाशिव त्यानंतर कुणालाही फुकट सल्ला द्यायचा नाही. म्हणून तो स्वतःच सदाशिवला भेटायला गेला आणि म्हणाला, "सूरदासला जर आत्ता



- शिवानंद -

धडा शिकवला नाही, तर गांवामधें वाईट लोकांच्या संख्या वाढायला लागेल. म्हणून यांतून बाहेर पडण्याचा कांहीतरी मार्ग तूच शोधून काढ.''

सदाशिवने त्यावर मार्ग शोधला. दुसऱ्या दिवशी त्यानुसार साऱ्या गांवकऱ्यांना ग्रामाधिकाऱ्याने चावडीवर बोलावले. सूरदासची तक्रार त्याने लोकांना समजावून सांगितली. ''सूरदासची तक्रार ठीक वाटते. पण सदाशिवचा सल्ला मानावासा कां वाटला, ते सूरदासने सर्वांना सांगितलं पाहिजे.''

त्यावर सूरदासने उत्तर दिले, ''यापूर्वीदेखील सदाशिवने मला दोनदा छान सल्ला दिला होता. त्यामुळें माझा फायदा झाला आणि मी त्याच्यावर विश्वास ठेवला.''

''तर मग सदाशिवने तुला दोन हजार रुपये दिलेच पाहिजेत. पण पूर्वीच्या दोन्ही व्यवहारांत सदाशिवच्या सल्ल्यामुळें तुझा फायदा जो झाला होता, त्याचाही तूं हिशेब कर. आणि ती रक्कम त्याला दे!'' आपल्या निर्णय ग्रामाधिकाऱ्याने सांगितला.

तो ऐकून सारे गांवकरी हंसायला लागले. परंतु ग्रामाधिकारी गंभीर स्वरांत बोलू लागला, ''याच्यापुढें ज्या कुणाला सदाशिवचा सल्ला घेऊन नफा होईल, त्याने आपल्या फायद्यांतला एक हिस्सा सदाशिवला द्यायला हवा. जर नुकसान झाले तर सदाशिव आपला हिस्सा तुम्हाला देईल. ही रुजवात माझ्यासमक्ष व्हायला हवी. असं झालं नाही तर ही जबाबदारी माझ्यावर राहाणार नाही.''

यापूर्वी लोकांना सदाशिवकडून फुकट सल्ला मिळत होता. परंतु आता मात्र त्याची किंमत मोजणें भाग पडूं लागले. सारा गांव सूरदासवर नाराज झाला. त्यावर सदाशिवने सांगितलं, ''चांगल्या माणसांना मदत केली कीं स्वार्थी माणसांची आशा बळावते. सूरदासने एक प्रकारें माझे कल्याणच केले. यापुढें मी कुणालाही फुकटचा सल्ला देणार नाही.'' त्यानंतर तो जास्त समाधानाने राहू लागला.







# माया सरोवर

## 5

*(जंगली हत्तींचा निःपात केल्यानंतर मगरवाला चरकाचारीला शोधायला निघाला. अजगराच्या जबड्यांत अडकलेला चरकाचारी प्राण कंठाशी येऊन तडफडत होता. जयशीलने त्याला अजगरापासून वाचवलं आणि तो त्याला प्रश्न विचारूं लागला. तेव्हां मगर आकारवाला तिथें आला. त्याला पाहून जयशीलचा हात अभावितपणें तलवारीच्या मुठीवर गेला. सिद्धसाधकाने मंत्रदंड हातांत उचलून घेतला!) - त्यानंतर...*

मगर आकारवाल्याने पाहिलं कीं जयशील व सिद्धसाधक निर्भयपणे उभे आहेत आणि त्याच्याशी सामना करायला तयार आहेत. ते पाहून त्याचे धैर्य ओसरलं. त्याला खात्री वाटत होती की त्याचे वाहन पाहून आणि त्याचा मगरीसारखा आकार पाहूनच त्या दोघांची भीतीने गाळण उडेल. पण तसं कांही झालं नाही.

मगर आकारवाल्याने आपला शूळ उचलून तारस्वरांत विचारलं, ''तुम्ही कोण आहात? या अरण्यांत तुमचं काय काम आहे?''

जयशीलने म्यानांतून तलवार काढून उत्तर दिले, ''तुझे हे रूप पाहून मला हंसू आवरेनासे झाले आहे. जो प्रश्न मी तुला विचारायचा, तो तू मलाचा विचारतो आहेस! ठीक, सांग, तू कोण आहेस? या अरण्यांत तुझं कसलं काम आहे? ज्या हत्तीवर तू बसला आहेस, त्याची कातडी कांहीतरी वेगळ्याप्रकारे



आच्छादलेली दिसते. हे सगळं ढोंग कशासाठी?" "छी, एक क्षुल्लक माणूस मला हे विचारूं शकतो? काय हा अपमान!" असे म्हणत मगर आकारवाल्याने आपल्या हत्तीला ढोसले. तोपर्यंत त्याची शेपटी पकडून बसलेल्या वीरने धैर्य एकवटले आणि मगर आकारवाल्याचा शूळ असलेला हात त्याने दोन्ही हातांनी घट्ट पकडला. आणि वीर त्याला म्हणाला, "मगर महाराज, जरा शांत व्हा. तुम्ही श्रेष्ठ वीर आहात हे कबूल आहे. पण तुमच्या पोटांत अजूनही ती तुटकी तलवार रुतलेली आहे. तुम्ही दोघांनी जरा सामोपचाराने वागले तर बरें होईल. चरकाचारीदेखील अजून तुमच्यावर इलाज करण्याच्या स्थितींत नाही." वीरचे बोलणें ऐकून मगरवाल्याने चरकाचारीकडे पाहिले तो उठायचा प्रयत्न करीत होता, पण त्याला उठवत नव्हते. त्याचे पाय अजून लटपटत होते. वेदनांनी तो कण्हत होता. त्याच्या शेजारीच अजगराचे तुकडे पडले होते. ते दृश्य पाहून मगरवालाही क्षणभर थांबला व म्हणाला, "चरकाचारी, माझा इलाज करायला आलास आणि अजगराच्या विळख्यांत फसलास! तुला हवा होता तर हत्तीला देखील भारी होईल इतका याहून मोठा अजगर मी तुला दिला असता."

मगरवाल्याने त्या दोघांकडे मग्रुरीने बघत म्हटले, "तुम्ही दोघेही अजून इथेंच आहात. जिवंत राहायचं असेल तर इथून पळा, नाहीतर माझा शूळ आपले बळ दाखवील."

जयशीलने तलवार उपसली आणि एक पाऊल पुढें टाकले. ते पाहून वीरने त्याला ओरडून सांगितले, "ए तलवारवाल्या तरुणा, जरा थांब. या मगर महाराजांच्यावर कशाला तलवार उचलतो आहेस? एका असहाय्य माणसाला मारण्यासारखे आहे ते! त्यांच्या पोटांत तलवार अडकलेली आहे. ती बाहेर काढली नाही तर रक्त सांखळेल आणि ते मरतील."

"ह्याचा मृत्यू इतका सुखाने व्हावा असं मला वाटत नाही. याच्या पोटांत जी तलवार रुतलेली आहे, तिचा अर्धा भाग कनकाक्ष राजाच्याजवळ आहे." जयशीलने सांगितले.

जयशीलचे बोलणें पूर्ण होण्यापूर्वीच मगर



आकारवाल्याने म्हटलं, "याचा अर्थ मी कोण आहे हे तुला माहित आहे?" "हो ना? तुम्हीच अरण्यांत राजकुमार व राजकुमारीचे अपहरण केले आहे. तुझ्या पोटांतली जी तलवार आहे ना, ती राजकुमार कांचनवर्माची आहे." जयशील बोलला. "हे सगळं जर तुला माहीत आहे, तर तू जिवंत असणं माझ्या हिताचं नाही" असं म्हणून त्याने आपला हत्ती पुढे काढला, आणि जयशीलवर शूळ फेंकणार त्यापूर्वीच वीरने मागून शूळ पकडून धरला. पण या गडबडींत वीरचा तोल गेला आणि तो हत्तीवरुन खाली पडला.

या संधीचा फायदा घेऊन जयशील मागच्या बाजूने हत्तीवर चढला आणि त्याने मगरवाल्याची मान पकडली. तोपर्यंत सिद्धसाधकाने जमिनीवर पडलेला शूळ उचलला आणि "जय महाकाली" असा देवीचा नामघोष करून तो ओरडूं लागला. मगरवाल्याचा शूळही गेला आणि आता तो शत्रूच्या ताब्यांत गेला.

त्याच्या मानेवर तलवार ठेवून जयशीलने त्याला विचारले, "आता सांग, तू कोण आहेस नि तुझे नांव काय? निमूटपणें पराभव मान्य कर कीं ही तलवार मानेवर फिरवूं?"

मगरवाल्याने म्हटलं, "अरे मानवा, मी तुझ्या हिंमतीला मानतो." जयशीलने त्याची मानगूट हातांत पकडून हलवली आणि विचारले, "अरे नकली मगर, सांग, तुझे नांव काय? तू हरला आहेस हे मान्य कर आणि हिरण्यपुरच्या



कनकाक्ष राजाकडे माझ्याबरोबर चल. त्यांची मुलें तू कुठे लपवून ठेवली आहेस हे त्यांनाच सांग."

"माझं नांव मकरकेतू आहे. राजाची मुलें कुठे आहेत हे सांगायला त्यांच्याकडे कशाला जायला हवं? हे गुपित मी इथेंच तुम्हाला सांगतो." मगरवाला म्हणाला.

तरीसुद्धां जयशील त्याला म्हणाला, "मला सांगायची जरूर नाही. जे सांगायचं ते राजालाच सांगायला हवं. तुझ्या या हत्तीला हिरण्यपूरकडे घेऊन चल. वाटेंत पळून जायचा थोडासा जरी प्रयत्न केलास तरी एकाच वारांत तुझी मान कापीन."

मकरकेतूने त्याची आज्ञा मानली. तो निमूटपणें हत्तीवर बसून जाऊं लागला.



सिद्धसाधक वेगाने त्याच्याजवळ येऊन सांगू लागला. "जयशील, मी पण बरोबर येतो आहे. जरा हात दे. मी पण हत्तीवर चढून बसतो."

जयशीलने सिद्धसाधकाला हत्तीवर ओढून घेतले. हत्ती पुढें जाऊं लागणार तेवढ्यांत वीर व चरकाचारीने टाळ्या वाजवून म्हटले, "महाराज! जरा थांबा! आमचं गांव तर अगदी जवळच आहे, पण राजाकडे जायचं तर या भयंकर अरण्यांतून जावं लागेल. इथें सिंह, वाघ, व इतर हिंस्त्र श्वापदें आहेत. आपण त्यांचेच भक्ष्य बनता कामा नये."

"घाबरण्याचे कांही कारण नाही. इथें तुम्हाला कुणीही कांहीही करणार नाही. या दुष्टावर उपचार करण्याच्या तयारींत तुम्ही गुंतलात, म्हणून हा आपल्या हातीं लागलाय. तुमचे रक्षण करणें हे आमचे कर्तव्य आहे. हत्ती अगदी सावकाश जाईल. तुम्ही दोघेही त्याच्या मागोमाग या." जयशीलने म्हटलं. "सर्वजण हिरण्यपुरच्या वाटेने जाऊं लागले. थोड्याच वेळांत चरकाचारीने घसा खाकरत म्हटले, "जयशील महाराज, आमची एक विनंती आहे."

जयशीलने आश्चर्य वाटून विचारले, "बोला, काय विनंती आहे?" "मी आणि हा वीर सकाळपासून या मगरवाल्यावर उपचार करायच्या प्रयत्नांत गुंतलो होतो. दुसऱ्या कुणाच्या पोटांत जर अशी तलवार रुतलेली असती, तर तो निश्चितपणें पाहतापाहता मेला असता, पण हा तर ती तुटकी तलवार एखाद्या आभूषणाप्रमाणे मिरवतो आहे. मी त्याच्या शरीराची चिकित्सा केली. त्याचे रक्त शीतल आहे. हा कोणीतरी पाण्यांतला जीव असेलसं वाटतं."

"तुला काय म्हणायचंय कीं हा बेडकां-सारखा जीव आहे कीं काय? जो पाण्यांत राहातो किंवा पाण्याबाहेरही राहातो? कनकाक्ष राजाचे ह्याच्याजवळचे काम पूर्ण झाले कीं लगेच ह्याला या हत्तीसकट तुला भेट देऊन टाकीन. तोपर्यंत वैद्यराज म्हणून जे करायचे असेल ते कर." जयशील म्हणाला त्यांचा संवाद ऐकून मकरकेतूने दांतओठ खाल्ले. ते पाहून जयशीलने आपली तलवार त्याच्या गळ्याशी भिडवत म्हटले, "अरे मकरकेतू, सावधान! कांहीही करायचा प्रयत्न केलास तर तुझे शिर धडावेगळे होईल!"

अचानक मकरकेतूवर एक बाण येऊन पडला. जयशील, सिद्धसाधक एकदम चक्रावले. जयशील डोके उंचावून इकडेतिकडे पहात होता, तेवढ्यांत एक भेसूर आवाज ऐकू आला, "अरे ए मगरीच्या शेपूटवाल्या, ज्या रानकोंबड्यावर मी नेम धरून बाण सोडला होता, तो कोंबडा तू चोरुन नेतो आहेस! हा पाहा, हा बाण आता तुझ्या छातींतच घुसेल."

जयशील व सिद्धसाधकने हा आवाज ओळखला. हे बोलणारा दुसरा कुणी नसून भिल्ल भीम होता. सिद्धसाधकाने आपला मंत्रदंड उचलून त्याच्या दिशेने धरला व म्हटले, "अरे भिल्ल भीम, आणखी एक बाण मारलास तर मी तुला महाकालीला बळी चढवीन. आधी झाडावरुन खाली उतर."

"कोण? तू? राजाचा भूतवैद्य?" भीम ओरडला.

"मी भुतांचा वैद्य नाही. मी मांत्रिक आहे, सिद्धसाधक आहे. मुकाट्याने झाडावरुन खाली उतर, नाहीतर हा मंत्र म्हणतो बघ! झाडाच्या फांद्यांत वणवा सुरुं होईल आणि त्या अग्नींत तू जळून मरशील." सिद्धसाधकाने म्हटलं.

"माझ्यावर बाणांचा वर्षाव करणारा तो दुष्ट भिल्ल भीम आहे काय? मी मायासरोवराचा अधिपती आहे आणि काय ही माझी दुर्दशा! वाहवा, वेळ कधी सांगून येत नाही. माझा हत्ती आता झाडाजवळ जाईल आणि ते झाड उखडून त्याचा चेंदामेंदा करील." आणि मकरकेतूने हत्तीला झाडाजवळ नेले. जयशील त्याला थांबवण्याचा प्रयत्न करीत होता तेवढ्यांत भीम बसला होता त्या झाडाजवळ हत्ती गेला. त्याने झाडाला धडक दिली आणि सोंडेने वळखा घालून ते झाड मुळासकट उखडून टाकले. झाडाच्या फांदीत लपून बसलेला भीम जोरजोरांत किंचाळूं लागला.

(क्रमशः)





# लाख मोहरांच्या किंमतीचा दगड

माधव हा एक वीस वर्षाचा गरीब तरुण होता. दिवसभर तो शेतांत काम करायचा पण खायला पोटभर अन्नसुद्धा त्याला मिळत नसे, इतकी त्याची कमाई कमी होती. आपल्यापेक्षां जास्त कमावणाऱ्यांचा तो मत्सर करी.

एकदा तलावाच्या किनाऱ्यावर बसलेल्या एका संन्याश्याची आणि त्याची भेट झाली. त्याने माधवला विचारले, "काय, झालं काय? तू इतका दुःखी कां दिसतोस?"

माधवने आपल्या मनांत सलत असलेला विचार बोलून दाखवला आणि म्हटले, "जितकी मी मेहनत करतो त्याचे योग्य ते फळ मिळेल अशी मी अपेक्षा करतो."

"जगामध्ये लोक जितकी मेहनत करतात, तितकी फलप्राप्ती त्यांना होत असते. त्यासाठी तू कशाला इतकी चिंता करतोस?" संन्यासी म्हणाला.

"क्षमा करा, स्वामी. आपला हा विचार चुकीचा आहे. देव सर्वांना त्यांच्या मेहनतीप्रमाणे फळ देत नाही." माधव म्हणाला.

जरा वेळ विचार करून संन्यासी म्हणाला, "मला या बाबतीत फारसं माहित नाही. पण, तुला कांही माहित असेल तर सविस्तर सांग."

"गर्ग नावाचे एक अतिशय विद्वान या गांवात राहतात. पण त्यांच्या नशिबी कांही सुखाचे जीवन नाही. पण तेच त्यांचा एक शिष्य भार्गव राजाच्या राज्यांत काम करतो आणि सुखसमृद्धीसह आनंदात जीवन व्यतीत करतो आहे, आयुष्यांतली मौज लुटतो आहे." माधवने एक पुरावा दिला.

"पण गर्ग यांनी राजाच्या गांवी जायचा कधी प्रयत्न केला कां?" संन्यासी म्हणाला. त्यावर माधवने उत्तर दिले, "नाही. त्यांना हा गांव सोडून जायची इच्छा नाही."

त्यावर संन्यासी म्हणाला - "पाहिलंस ना, जो जितकी मेहनत करतो, तितकीच त्याला फलप्राप्ती होते." माधव जरा नाराजीने म्हणाला, "स्वामी, माझ्यासारख्या लोकांवर या जगांत अन्यायच होत आहे असं म्हणावं लागेल. आणि आपण यावर कांही विचारदेखील करत नाही असं मला वाटतं. एकसारखी मेहनत केल्यानंतरसुद्धां कांही लोकांचेच भाग्य उजळते. भाग्यशाली लोक आपले भाग्य अथवा आनंद, अभागी लोकांना देत नाहीत, किंवा देऊं इच्छित नाहीत." माधवने तक्रार केली.

संन्याशाला माधवची दया आली. आणि झोळींत हात घालून त्यांनी एक दगड काढून दिला व म्हणाले, "हा एक अतिशय मूल्यवान हिरा आहे. याची किंमत सोन्याच्या लाख मोहरांइतकी असेल. तू याचा फायदा घे आणि सुखसमाधानाने मजेंत जीवन जग."

माधवने तो दगड घेतला व संन्याशाला नमस्कार करून तो निघून गेला. त्यानंतर कांही वर्षांनी संन्याशी माधवला भेटायला आले. तेव्हां माधवच्या स्थितीमध्ये खूप बदल झाला होता. आता त्याच्याजवळ स्वतःचे छान घर होते, सुंदर पत्नी होती. घरात ऐष-आराम व काम करायला नोकर माणसें होती.

परंतु संन्याशाला पाहताच माधवने त्यांना आदरपूर्वक नमस्कार केला व म्हणाला, "आपल्यामुळे आज मी हे वैभवाचे दिवस पाहतो आहे. आपल्या कृपेमुळेच मी आज सुखी आहे, समृद्ध आहे."

"हो, ते मी पाहतोच आहे. नशिबाने तुला आज साथ दिली आहे. पण मला आज जाणून घ्यायचं आहे कीं तू तुझे हे नशिब किती लोकांबरोबर वाटून घेतो आहेस? तुझ्याकडे काम करणाऱ्या किती लोकांना तू घर किंवा शेत खरेदी करून दिले आहेस? हे जाणून घेण्यासाठी मी अतिशय उत्सुक आहे." संन्याशी म्हणाला.

माधवचा चेहरा उतरला. तो जरा कांकू करीत म्हणाला, "आपण मला लाख मोलाचा दगड दिलात. जीवनांतला आनंद लुटण्यासाठी मी आतुर झालो होतो. आज माझ्या नशिबाने दिलेल्या सर्व सुखांचा मी उपभोग घेत आहे. असे असताना मी दुसऱ्यांचा विचार करूंच कशाला? त्याची जरूरीच काय मुळी?"

"तू स्वार्थी आहेस. ज्यावेळी तुझ्याकडे कांहीही नव्हते त्यावेळी तुला वाटत होतें की सर्वांनी



- सिद्धनाथ -

तुझ्याविषयी विचार करावा, त्यांचे भाग्य, त्यांचा आनंद तुझ्याबरोबर तुटावा. पण तुझ्याजवळ सर्व असताना मात्र तू कुणाबरोबर त्यांचा भागीदार होऊ इच्छित नाहीस. ह्या क्षणापासून तुझे भाग्य तुझ्यापासून हिरावून घेतले जाईल." संन्याशाने आपला निर्णय सांगितला.

"नाही, नाही स्वामी, कृपा करून असे करू नका. संपत्तीशिवाय मी जगूं शकत नाही. ह्या संपत्तीसाठी जे कांही करायला हवं, ते सर्व करायला माझी तयारी आहे." माधव दीनवाण्या स्वरांत म्हणाला.

संन्याशाने साफ नकार दिला आणि त्याच क्षणीं तेथे एक सोन्याच्या दागिन्यांचा व्यापारी आला, व म्हणाला, "माधव, तू दिलेला तो हिरा नाही, दगड आहे. त्याची किंमत एक पैसासुद्धा नसेल. तुझा दगड तुला परत देऊन माझ्या एक लाख मोहरा मला परत देऊन टाक."

पाहता पाहता माधवची सगळी संपत्ती, ऐश्वर्य नाहीसे झाले. तो एकटा असलेला पाहून संन्यासी त्याच्याजवळ आला व थोडेसे धाडस करून म्हणाला, "माधव, नशिबाने साथ दिली तर तू काय करशील हे आता सिद्ध झाले आहे. जे कांही झाले आहे, तो केवळ आभास आहे. काळजी करूं नकोस. जीवन चांगल्या रीतीने व्यतीत करण्यासाठी जे करायला हवं ते कर. नेकीने, प्रामाणिकपणे जीवन व्यतीत कर. जे आहे त्याच्यातच संतुष्ट, आनंदित राहायला शीक."

"स्वामी, आता माझी बुद्धी ठिकाणावर आली. मला तो मूल्यवान दगड द्या. यापुढे जीवनात विवेकाने व्यवहार करेन." माधव विनम्रपणे हात जोडून म्हणाला.

संन्यासी स्मित हास्य करत म्हणाले, "काय? अजून तुझ्या लक्षांत नाही आलं की माझ्याजवळ जो दगड आहे, तो हवा तर लाख मोहरांइतका आहे, किंवा त्याला कांहीच मूल्य नाही? मला तू तळ्याच्या काठांवर भेटला होतास तेव्हां शेतांत काम करत होतास. तुझ्यामध्ये जर सहनशक्ती असेल व काम करण्याचा निग्रह असेल तर आसपासची नापीक जमीनदेखील तू सुपीक बनवू शकतोस. भूमातेवर विश्वास ठेवला तरच भरपूर पीक येते व धान्याच्या राशी उत्पन्न करता येतात. ही जमीन, ही भूमाता एक सत्य आहे, आणि तू ज्याला वैभव समजतोस ते केवळ एक स्वप्न आहे." असे म्हणून साधूने माधवला आशिर्वाद दिला आणि ते तिथून निघून गेले.





राजा विक्रम व वेताळाच्या नव्या कहाण्या

# राजभक्ति

निश्चयी विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ आला. त्याने झाडावरुन शव खाली उतरवले आणि खांद्यावर घेतले. तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटले, "राजन, तुझा आग्रह आणि पराक्रम वाखाणण्याजोगा आहे. म्हणून तुझे अभिनंदन केल्याशिवाय राहवत नाही. तुझ्यांत जसे कांही सद्गुण आहेत, तसेच कांही दोषदेखील आहेत. ते दोष जर तू सुधारले नाहीस तर त्यांत तुझेच नुकसान आहे. मला इतकंच वाईट वाटतं कीं जिथें तुझ्यांत चिकाटी आहे, शौर्य आहे, प्रेमाची भावना आहे, तिथें जरा तर्क-शक्तीचा अभाव आहे. कोणताही विषय



तर्काच्या कसोटीला लावून पाहिला पाहिजे. आणि नंतरच त्याविषयीची कार्यसिद्धी केली पाहिजे. नाहीतर अनर्थ ओढवेल. कुणाचेतरी भले होण्याऐवजी त्याचे नुकसान होईल. मला वाटतं वीरदत्ताप्रमाणें तुझ्यामधेंही खोलवर विचार करण्याची वृत्ती नाही. कोणत्याही विषयाचा अगदी सखोल विचार करणें अतिशय जरूरीचे असते. नाहीतर खरं काय आहे ते समजतच नाही. मी तुला तुझे विचार सुधारण्याची संधी देतो आहे. त्याच वीरदत्ताची गोष्ट तुला सांगतो. मात्र नीट लक्ष देऊन ऐक.'' आणि वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

फार पूर्वीची गोष्ट आहे ही. केयूर देशांत वीरदत्त नांवाचा एक तरुण होता. तो एक श्रेष्ठ योद्धा होता. सर्व प्रकारच्या युद्ध विद्यांमधें तो निपुण होता. मल्लयुद्ध, धनुर्विद्या, गदायुद्ध वगैरे सर्व क्षत्रियांच्या विद्यामधें तो प्रवीण होता. त्याखेरीज शास्त्रांचादेखील त्याचा उत्तम अभ्यास होता.

केयूर राज्याच्या सेनापतीचा अकाली मृत्यू झाला. त्या पदावर योग्य व्यक्तीची निवड करण्यासाठी शोध सुरुं झाला. त्यासाठी राजधानीमधें एक खास स्पर्धा ठरविण्यांत आली.

या स्पर्धेत भाग घेण्याचे वीरदत्तने ठरवले. राज्याच्या या महत्वाच्या जागेवर आपली नेमणूक व्हावी अशी त्याची महत्वाकांक्षा होती. जेव्हां त्याच्या वडिलांना मुलाची ही इच्छा समजली तेव्हां त्यांनी वीरदत्ताला म्हटले, ''मुला, राजाची नोकरी म्हणजे सुळावरची पोळी! लहानशा चुकीसाठी तुला प्राणांची किंमत मोजावी लागेल. सापाच्या फण्याखाली तुला आयुष्य घालवायचे आहे कां? इथेंच रहा आणि शेती कर. आरामांत जगता येईल त्याबद्दल निश्चिंत राहा.''

वीरदत्ताला आपल्या वडिलांचा उपदेश कांही आवडला नाही. त्याने आपली नापसंती दर्शवून म्हटले, ''मी इतक्या विद्या शिकण्यासाठी भरपूर मेहनत घेतली होती. त्यांत मी प्राविण्य मिळवलंय. तेव्हां जर माझी राजाच्याकडे वर्णी लागली तर या कष्टांचे सार्थक होईल.'' पित्याने त्याला खूप समजावले, परंतु त्याने आपला हट्ट सोडला नाही. तो स्पर्धेत भाग घेण्यासाठीं राजधानीला निघून गेला.

तिथें भाग घेण्यासाठी कितीतरी शूरवीर आलेले होते. पहिली फेरी होती शारिरीक बल आणि सामर्थ्य, व्यायाम, योगविद्याज्ञान, व पारंपारिक क्षात्रविद्या! त्यामधे वीरदत्त सहज जिंकला. अशा प्रकारचे स्पर्धेचे इतरही अनेक सामने होते, त्यांत त्याने इतरांना हरवले आणि सर्व स्पर्धांमधे तो पहिला आला.

त्यानंतर होती तोंडी परीक्षा! केयूर देशाच्या शेजारची मित्रराष्ट्रें व शत्रूराष्ट्रांबद्दल अनेक प्रश्न त्याला विचारण्यांत आले. वीरदत्ताने साऱ्या प्रश्नांची योग्य उत्तरें दिली. आता मात्र त्याला वाटायला लागलं कीं त्याचीच नेमणूक सेना-पतीच्या जागी होणार. जेव्हां त्याची राहाण्याची व्यवस्था एका मोठ्या वाड्यांत केली गेली, तेव्हां तर त्याची खात्रीच पटली.

दुसऱ्याच दिवशी केयूर देशाचे प्रधानमंत्री त्रिनाथ स्वत: वीरदत्तला भेटायला त्याच्या वाड्यावर आले. प्रथम त्यांनी त्याचे शौर्य व बुद्धिमत्ता याची भरपूर स्तुती केली. नंतर ते म्हणाले, ''आम्हाला खात्री वाटते कीं सेनापती होण्यासाठी लागणारे सारे गुण तुझ्यांत आहेत. देशाचे रक्षण करणारे हे पद अतिशय जोखमीचे आहे. ते पद सांभाळण्याची योग्यता तुझ्यांत आहे कीं नाही, त्याची चांचणी अजून व्हायला हवी. त्यासाठीं तुला आणखी कांही दिवस इथें राहावे लागेल. पुढील सहा महिने तुला महाराजांच्या दरबारांत काम करायला हवे. जी कामें तुझ्यावर सोंपवली जातील, ती दिलेल्या अवधींत पुरी करावी लागतील. तुला आता कोणतेही पद मिळणार नाही. परंतु त्यानंतर मात्र मी सांगितल्यावर तुला सेनापतीचा मान दिला जाईल.''

त्यानंतर दोन महिने तसेच गेले. वीरदत्तावर कोणतेच काम सोंपवले गेले नव्हते. एक दिवस अचानक त्रिनाथांकडून त्याला बोलावणें आले. तो मंत्रींना भेटायला गेला.

त्रिनाथने वीरदत्ताचे सादर स्वागत केले आणि म्हटले, ''वीरदत्त, गुप्तचरांच्या प्रमुख अधिकाऱ्यां



कडून आत्ताच एक महत्वाची बातमी मिळाली आहे. आमचे महाराज केयूरसिंह यांची एक जुनी संवय आहे. ते महाराणींना घेऊन नित्यनेमाने रोज उद्यानवनांत फिरायला जातात. त्यांच्या अंगरक्षकांनादेखील तिथें जाण्याची अनुमती नसते. शत्रूला ही माहिती मिळालीय, आणि त्यांनी महाराजांना तिथेंच मारण्याची योजना तयार केली आहे. आजपासून महाराज व महाराणींच्या रक्षणाची जबाबदारी तुझ्यावर सोंपवलेली आहे. त्यावेळेस तू उद्यानवनांत राहिलं पाहिजेस. पण तू तिथें आसपास आहेस हे राजदांपत्याला मुळींच कळता कामा नये. जर त्यांना कळलं कीं त्या दोघांच्या व्यतिरिक्त इतर कुणीतरी त्या उद्यानांत आहे, तर तुला कठोर शिक्षा दिली जाईल. तेव्हां सावध रहा.''

वीरदत्ताने ही जबाबदारी स्वत:वर घेतली. त्या दिवसापासून तो महाराज व महाराणींच्या



पाठीमागून हिंडत राहूं लागला. परंतु त्याचे अस्तित्व त्यांना जाणवणार नाही याची काळजी तो अवश्य घेत होता. चार दिवस उलटले. पांचव्या दिवशी अकस्मात राजदांपत्याला चौघा जणांनी येऊन घेरले. महाराज केयूरसिंह त्यांच्याशी सामना करणार इतक्यांत वीरदत्ताने आपली तलवार उपसली आणि त्यांच्यावर तो चालून गेला. ते हल्लेखोर घाबरून पळाले.

वीरदत्ताने राजदंपतीला प्रणाम केला आणि त्याने गेले चार दिवस तो त्यांच्या नकळत कसा त्यांच्या पाठीशी रक्षणार्थ सज्ज होता, हे त्यांना सांगितले. हे ऐकून केयूरसिंहाने ताबडतोब वीरदत्ताला तुरुंगात टाकण्याची आज्ञा दिली.

वीरदत्ताला भेटायला त्याच रात्रीं महामंत्री त्रिनाथ तुरुंगात आले. सगळी हकीकत समजून घेतल्यानंतर त्यांनी वीरदत्ताला सहानुभूती दाखवत म्हटले, "वीरदत्त, तुला उद्यां दरबारांत उपस्थित व्हावे लागेल. महाराज तुला कठोर शिक्षा देतील, हे निश्चित आहे. दरबारांत असली घोर संकटे नेहमीच येत असतात. झालं ते झालं, तुझ्यावरही सध्यां जे संकट कोसळलं आहे, त्याला एका दृष्टीने मीच कारणीभूत आहे. म्हणून मी तुला सल्ला देतो कीं तू इथून पळून जा. त्यासाठीं मी आवश्यक ती व्यवस्था केलेली आहे. महाराज रागावले तरी मी कांहीतरी सांगून त्यांचा राग शांत करीन व समजूत घालीन."

वीरदत्तने क्षणभर विचार केला आणि म्हटले, "महामंत्रीजी, आपण जी जबाबदारी माझ्यावर सोंपवली होती, ती मी योग्य रितीने निभावली आहे. महाराज मला उद्यां काय शिक्षा देतील त्याची मी चिंता करणार नाही, मी कांही पळूनबिळून जाणार नाही. कारण मी चूक केलेलीच नाही. आपण मला उदार मनाने ही पळवाट देऊं केलीत, त्याबद्दल धन्यवाद!"



हे ऐकून मंत्रीजी मनांतल्या मनांत समाधानाने हंसले आणि वीरदत्ताच्या खांद्यावर थोपटल्यासारखे करून ते तिथून निघून गेले.

वेताळाने ही गोष्ट सांगितली आणि विक्रमार्काला म्हटले, "राजन्, असं शक्य आहे कीं वीरदत्त जरी अगदी शूरवीर असला तरी त्याबरोबर तो महामूर्खदेखील आहे असं मला वाटतं. वडिलांचा सल्ला न मानता त्याने राजदरबारांत नोकरीसाठीं जायचे ठरवले, हा विचारही मूर्खपणाचाच होता. महामंत्र्यांचा सल्लाही त्याने धुडकावून लावला आणि तुरुंगातच थांबण्याचा निर्णय घेतला, हा ही मूर्खपणाच! ज्या महाराजांचे प्राण त्याने वांचवले, त्याच महाराजांनी त्याला कैदेत टाकले. अशा कठोर व कृतघ्न राजावर त्याने कसा विश्वास टाकला? तो दरबारांतल्या न्यायनिवाड्यासाठीं कां तयार झाला? याचे उत्तर माहीत असूनही तू जर गप्प बसलास तर तुझ्या डोक्याचे तुकडे तुकडे होतील."

विक्रमार्क राजाने वेताळाच्या प्रश्नांची उत्तरें देत म्हटले, "वीरदत्त हा एक निश्चितच श्रेष्ठ वीर आहे. त्याला मूर्ख समजणें हाच मूर्खपणा आहे. असा गुणवंत राजाच्या दरबारांत काम करायला योग्य आहे. याच कारणामुळें सेनापती बनण्याची आकांक्षा मनांत धरून वीरदत्ताने स्पर्धांमधे भाग घेतला. महामंत्री त्रिनाथांनी जे म्हटलं होतं कीं केवळ पराक्रम व युद्धतंत्राचे ज्ञान या दोन गोष्टी म्हणजे सेनापती बनण्यासाठीं पुरेसे मापदंड नाहीत. राजदंपतीच्या रक्षणासाठी तो एकटाच चार दुष्टांच्यावर चालून गेला. राजदंपतीची शांतता वीरदत्ताने बिघडवली ही केवळ एक सबब आहे. वीरदत्ताला बंदिशाळेंत ठेवणें, दुसऱ्या दिवशी न्याय करणें ही राजा व मंत्री यांची एक खेळी होती. त्याची स्वामीभक्ती, देशभक्ती व कर्तव्यपरायणता पाहाण्यासाठीं त्यांनी हा एक मार्ग अनुसरला. मंत्र्यानी त्याची तुरुंगातून पलायन करता येईल अशी व्यवस्थादेखील केली होती, तरीसुद्धां वीरदत्ताने पळून जायला नकार दिला. त्यामुळें त्याची राजभक्ती सिद्ध झाली. म्हणून मंत्री मनांत खूष झाले व त्यांनी वीरदत्ताची पाठ थोपटली. याचा एकच अर्थ निघतो कीं सेनापती बनण्यास वीरदत्त सर्वस्वी पात्र होता आणि त्यासाठी घेतलेल्या सर्व कसोट्यांमधें तो यशस्वी झाला होता."

राजाचे मौनभंग झाल्यामुळें वेताळ शवासहित अदृश्य झाला व पुन्हां झाडावर जाऊन बसला.

(आधार - शैलजा व्यास यांची रचना)



भारतीय दंतकथा - ३

# वादळाची शक्ती कशी वाढली?



देव आणि दानव, म्हणजेच सुर आणि असुर, अनेक वर्षे एकमेकांशी भांडत होते. हजारो वर्षे त्यांची लढाई सुरुं होती. कधी देव जिंकत होते, कधी त्यांचा पराभव होत होता. दोन्ही पक्षांच्या जय-पराजयाचा जर हिशेब केला तर देवांपेक्षां दानवांनीच जास्त वेळां विजय मिळवला होता.

राक्षसांच्या म्हणजे दानवांच्या पक्षांत अनेक निपुण व कुशल योद्धे होते. त्यांना अनेक कलामधें रस होता. आणि वेगवेगळ्या शास्त्रांमधें त्यांनी प्राविण्य मिळवलेले होते. पण त्यांचा दोष म्हणजे त्यांचा अहंकार, आणि दुराभिमान! त्यांच्या स्वार्थी इच्छापूर्तींसाठीं ते कठोर आणि दुष्टमार्ग स्वीकारण्यास मागेपुढें पहात नसत. शांती, नम्रता भक्ती यासारख्या आदर्श कल्पनांची त्यांनी कधी कदर केली नाही. खरे पाहिले तर त्यांच्यापैकीं फार थोडेजण सोडले तर बाकीच्या दानवांना शांतीप्रिय मंडळी आवडत नव्हती. जे भक्तीभावाने प्रार्थना करीत होते त्यांचा दानव तिरस्कार करीत. स्वर्गलोक देवांचा होता म्हणून देवांशी त्यांचे वैर होते. दानवांना पृथ्वी व स्वर्गाचेदेखील राज्य हवे होते. अनेकवेळा त्यांनी युद्ध सुरुं करुन देवांचा राजा इंद्र, याचा पराभव केलेला होता, व त्याला त्याच्या महालांतून हांकलून दिले



होते. परंतु विष्णू, शिव किंवा ब्रम्हदेव, यापैकीं कुणाची तरी मदत दरवेळीं घेऊन इंद्राने आपले आसन व सत्ता पुन्हां मिळवायची, असे चालले होते.

एकदा काय झालं, कीं वृत्तासुर नांवाचा एक राक्षस फारच महत्वाकांक्षी व उन्मत्त झाला. कांहीतरी कारण काढून किंवा विनाकारण तो देवांवर आक्रमण करीत असे आणि त्यांना पराभूत करीत असे. वृत्तासुराला मारण्यासाठीं इंद्राने अनेक प्रयत्न केले, पण त्याला यश आले नाही. वृत्तासुराने असे वरदान मिळवले होते कीं त्याला अग्नी जाळूं शकणार नाही किंवा त्याला पाण्यांत बुडून मृत्यू येणार नाही; कोणत्याही धातूच्या किंवा लांकडाच्या शस्त्राने त्याला मरण येऊं शकणार नाही.

वृत्तासुराचा त्रास कसा संपवावा याबद्दल इंद्राने अनेक मुनींशी विचारविनिमय केला. त्यावरुन असे कळले कीं जर एखाद्या ऋषी वा मुनीने इंद्रपद मिळवूं शकेल इतकी कठोर तपश्चर्या केलेली असली, तर वृत्तासुराचा त्रास संपवण्यासाठीं त्या मुनीची मदत होऊं शकेल. आता इतकी तपश्चर्या केलेल्या मुनीला कुठे शोधायचे? परंतु त्या पदाला पोंहोचूं शकेल असा एक मुनी होता - दधिची ऋषी. परंतु त्यांच्याकडे जाऊन त्यांना विचारण्याचे धैर्य इंद्राला झाले नाही. कारण दधीचिने इंद्राचेच आसन बळकावले असते अशी इंद्राला भिती वाटत होती म्हणून इंद्राने



त्यांच्या तपश्चर्येत पूर्वी विघ्न आणले होते. आता इंद्र त्यांना कशी विनंती करुं शकणार?

दधीची ऋषींना देवांनी विनंती करण्यास इंद्राच्या या आगळिकीचा फक्त एकच अडथळा नव्हता. देवांच्या मदतीला जर दधीचि ऋषी आले तर त्यांची हाडे ढगांचा गडगडाट अनेकपटीने वाढवण्यासाठीं आवश्यक होती. आणि वृत्तासुराला मारण्यासाठीं ढगांचा गडगडाट प्रचंड प्रमाणांत होणे जरुर होते. त्याचाच अर्थ, देवांच्या हितासाठी दधीचि ऋषींना आत्मार्पण करावे लागणार होते. त्यांची हाडें काढूनच इंद्राला ती ढगांच्या गडगडाटासाठीं वापरता आली असती.

ऋषींना जर हा प्रस्ताव सांगितला तर त्यांनी हंसून त्याच्याकडे दुर्लक्ष केले असते असे इंद्राला

वाटले. ज्या इंद्राने त्यांच्या तपसाधनेंत विघ्न आणले होते. त्या इंद्राला त्यांनी मदत कशाला करायची?

इंद्र गप्प बसला. काय करावे ते त्याला कळेना.

एकीकडे, वृत्तासुराचा उपद्रव देवांना व ऋषीमुनींना सतत चालूं होता. जरी दधीचि ऋषी त्यांतून अलिप्त होते, तरी या राक्षसाची कृष्णकृत्यें त्याच्या कानी पडत होती. त्याचा हा त्रास कायमचा संपवण्यासाठीं जो एकमेव मार्ग होता, त्याचीही माहिती त्यांना समजली. त्यांनी क्षणाचाही विचार केला नाही. त्यांनी देवांना आणि ऋषींना एका यज्ञाचे आयोजन करायला सांगितले. त्याप्रमाणें केले गेले. दधीचिंनी तपाचरण सुरुं केले आणि देहत्याग केला.

इंद्राने गडगडाट व वादळ जास्त जोरदार करण्यासाठी दधीचि ऋषींची हाडं वापरली; नंतर जेव्हां इंद्र व वृत्तासुराची लढाई सुरुं झाली, त्यांत वादळ व गडगडाटामुळें वृत्तासुराचा वध होऊं शकला.

एका सत्कार्यासाठी या श्रेष्ठ मुनींनी सर्वात श्रेष्ठ असे आत्मसमर्पण केले. जरी इंद्राने त्यांना त्रास दिला होता, तरी त्यांच्या मनांत इंद्राविषयी राग नव्हता. त्यांना वृत्तासुराबद्दल देखील राग नव्हता. परंतु देवांच्या व मानवांच्या हिताच्या दृष्टीने वृत्तासुराचा अंत होणें आवश्यक होते. दधीचि ऋषींनी कठोर तप करुन आपले शरीर पवित्र केलेले होते. त्यांच्या मनांत वा शरीरांत कणभरदेखील स्वार्थ राहिलेला नव्हता. म्हणून त्यांची हाडें अत्यंत प्रभावी बनली. दधीचि ऋषी हे परोपकार व चांगुलपणा यांचे एक तेजस्वी उदाहरण आहे.

- बिंदुसार





# गुप्त सत्कार

कार्तिक हा श्रीमंत माणूस होता. त्याची बायको सुस्वभावी होती आणि दोन समर्थ असे मुलगे त्याला लाभले होते. तो आपले आयुष्य आरामांत घालवत होता. अचानक स्वत:ला मोठा म्हणवून घेण्याची इच्छा त्याच्या मनात आली.

त्याला काव्य करावेसे वाटूं लागले, चित्रकार व्हावेसे वाटूं लागले, गाणी गावेसे, एवढेच काय तर नाचावेसे देखील वाटूं लागले. जादूगार बनून सगळ्यांना आपल्या जादूने भारून टाकण्याचा अभ्यास करावा असे पण त्याला वाटूं लागले. पण त्याच्या हातून यांतले कांही घडले नाही. आपले दु:ख पत्नीपाशी उघड करत तो म्हणाला, "माझी कुठलीच इच्छा पुरी होऊं शकली नाही. माझ्या अपयशाची मला लाज वाटते".

तेव्हां त्याची बायको त्याला म्हणाली" कुठलीही कला शिकून येत नाही, तर ती आपल्यांत निसर्गदत्तच असावी लागते. आपण ती मिळविण्याचा प्रयत्न सोडावा यांतच शहाणपणा आहे. आजकाल समाजांत, जे लोक कलाकारांचा गौरव करतात, त्यांचा आदर केला जातो. माझा असा सल्ला आहे की आपण दर महिन्याला अशा एका कलाकाराचा गौरव करा. त्यामुळे आपल्याला प्रसिद्धी मिळेल. आणि कलाकारांना पण मदत होईल." पत्नीचा सल्ला कार्तिकला पटला. प्रथम तो नटराज या कलाकाराला भेटला.

नृत्यविद्येत नटराज हे साक्षात नटराज स्वामींचा अवतार होते. कार्तिकचा हेतू ऐकून त्याचे कौतुक करीत नटराज म्हणाले, "मला आपले म्हणणे आवडले. हं, पण या संदर्भात मी एक गोष्ट सांगू इच्छितो, कीं जेव्हां माझा गौरव केला जाईल तेव्हां माझे मोठेपण जाणणारे लोक सभागृहात अवश्य असले पाहिजेत आणि त्यांनी मी कां सन्मानित केला



जातो आहे, व त्याचे काय कारण आहे, हे रंगमंचावर जाऊन सांगितले पाहिजे".

"महोदय, आपले नांव ऐकल्यावर मला असे वाटले की या सत्कारासाठी आपली सर्वथा पात्रता आहे. देशभर आपली कीर्ती पसरलेली आहे. अशा वेळी दुसऱ्या कोणाची मान्यता असण्याची काय गरज आहे? मी स्वतःच आपला सत्कार करीन".

यावर आपला नकार दर्शवीत नटराज म्हणाले, "आपल्याला नृत्याबद्दल कांहीच माहिती नाही. म्हणून माझा सत्कार करण्याची आपली पात्रता नाही. सत्कारासाठी माझी निवड करणारे नाट्याचार्य किंवा नृत्यविद्येतले श्रेष्ठ गुरु असणे आवश्यक आहे. कलाकाराच्या सत्कारापेक्षां हा सत्कार करायचे ठरविणाऱ्या व्यक्ती कोण आहेत, याला जास्त महत्व आहे. अशा श्रेष्ठ व्यक्तींचा सल्ला आपण घ्या. त्यांच्या मताचा कोणीही नृत्यप्रेमी मोठ्या आदराने स्वीकार करेल."

कार्तिक नृत्यशाखेच्या गुरु शंकरना भेटला. आणि त्यांना त्याने सर्व हकिगत सांगितली. "मी कुठलाही निर्णय एकटा घेऊ शकत नाही. मी अजून दोन गुरुंची नांवे सांगतो. त्यांचा पण सल्ला घ्या. या वर्षीचा प्रमुख नर्तक कोण, याचा आम्ही सर्वजण एकमताने निर्णय करू".

कार्तिक निराश होऊन म्हणाला "गुरुवर्य, मी नटराजचा सत्कार करण्याचे ठरविले होते. आपल्याला फक्त होला हो करायचं होतं. आता निर्णय आपल्या हातांत आहे.".

"मी नाट्यगुरु आहे. आम्ही ज्यांची निवड करू, तुला त्यांचाच सत्कार करायला पाहिजे. तुझा निर्णय आम्ही कधीच मान्य करणार नाही". गुरु शंकर गंभीरपणे म्हणाले.

हताश झालेल्या कार्तिकने ही गोष्ट आपल्या पत्नीला सांगितली. ती लगेच म्हणाली", जरी कलाकार निवडणारे दुसरे असले तरी सत्कारासाठी कलाकार निवडण्याचा अंतिम निर्णय आपळाच हवा".

कार्तिकला पुन्हां आपल्या बायकोचे म्हणणे पटले. मग त्याने सत्कार करण्यासाठी कलाकार शोधायला सुरवात केली. मोठ्या मुश्किलीने चार कलाकार मिळाले. एक कवी, एक चित्रकार, एक नर्तक व एक गायक. ते अगदी सामान्य दर्जाचे कलाकार होते.

"तुमच्या सत्काराने आमची कीर्ती वाढेल". ते चौघे म्हणाले. कार्तिक त्या चौघांना आपल्या घरी घेऊन आला. त्याच्या कुटुंबाने अगदी सहज या कलाकारांची योग्यता ओळखली. ते विचारांत पडले की या कलाकारांचा काय आणि कसा सत्कार करायचा? त्यांना एक मार्ग सापडला. कार्तिकला ते काय करणार आहेत हे त्यांनी आधीच सांगितले होते. दुसरा कांहीच मार्ग न सापडल्याने त्याने आपल्या घरच्यांचे म्हणणे मान्य केले.



कार्तिकची पत्नी त्या चार कलाकारांना म्हणाली, "हे बघा, माझे पती फार संकोची आहेत. त्यांना अशी भीती वाटते की या सत्कारामुळे सगळीकडे त्यांची प्रसिद्धी होईल. मी हे स्पष्ट करू इच्छिते, कीं आम्ही लोकांसमोर आपला जो सन्मान करणार आहोत त्यांत प्रत्येकाला एक हजार रुपये दिले जातील. परंतु सर्वांच्या नकळत गुप्तपणें हा सत्कार झाला तर एकेकाला दहा हजार रुपये दिले जातील. तुम्ही स्वतःच सांगा की तुम्हाला कोणत्या प्रकारचा सन्मान हवा आहे?"

चौघांनी दहा हजार रुपये घेण्याचा निर्णय जाहीर केला. ते चौघे म्हणाले "सन्मान हा सन्मान असतो, मग तो जाहीरपणे असो वा गुप्तपणे असो".

कार्तिकने त्या चौघांना पैसे देऊन त्यांची बोळवण केली. बिचारे त्याला धन्यवाद देत निघून गेले.

या घटनेनंतर दोन आठवड्यांनी कोणीतरी मध्यरात्री कार्तिकचा दरवाजा खडखडवत होतं. कार्तिकने दार उघडले, तर समोरील व्यक्ती दुसरे तिसरे कोणी नसून स्वतः नटराजच तिथे उभे होते. त्यांना बघून कार्तिक आश्चर्यचकित झाला.

आपला गळा खाकरत खालच्या आवाजांत ते म्हणाले, "माझ्या नृत्यकलेची तारीफ करणारे कितीतरी लोक आहेत. पण एकदेखील माणूस असा नाही जो मला अडीअडचणीला मदत करेल. माझी परिस्थिती अत्यंत बिकट आहे. माझे खूप हाल होत आहेत. अपात्र आणि अयोग्य माणसांकडून सन्मान घेऊन माझी बदनामी होईल अशी मला भीती वाटत होती. असं ऐकलंय की आपण गुप्तपणे लोकांचा सत्कार करता. आपण माझ्या सत्काराची बातमी जर गुप्त ठेवली तर मी आपला सत्कार स्वीकारायला तयार आहे. कारण दहा हजार रुपये हा माझ्या दृष्टीने मोठी रकम आहे."

तेव्हां त्यांचे पाय धरून कार्तिक म्हणाला "आपले बोलणे ऐकून मला माझे कर्तव्य समजले. इथून पुढें स्वतःच्या प्रसिद्धीसाठी लोकांचा सत्कार करायची इच्छा धरणार नाही. तर गरजू कलाकारांना जशी जमेल तशी मदत करत राहीन". असं म्हणून त्याने नटराजांना मोठ्या प्रेमाने ती रकम दिली.



# विचार करा

या महिन्यांतली प्रश्नावली नव्या प्रकारची आहे. एका कागदावर उत्तरें लिहून ठेवा आणि पुढल्या महिन्याच्या अंकातल्या उत्तरांशी ताडून पाहा.

१. खाली दिलेल्या नद्यांपैकी एकीला सालेरी, प्राणहिता आणि इंद्रावती या उपनद्या येऊन मिळतात. ही नदी कोणती?

अ. कृष्णा, ब. गोदावरी, क. कावेरी, ड. साबरमती.

२. पंजाब व हरयाणा यांची एकच राजधानी आहे. चंदीगडपूर्वी पंजाबची राजधानी कोणती होती?

अ. जालंदर, ब. लुधियाना, क. अमृतसर, ड. शिमला.

३. स्वातंत्र्यपूर्व कालांत ब्रिटिश सरकारची उन्हाळ्यांतली राजधानी कोणती होती?

अ. श्रीनगर, ब. शिमला, क. डेहराडून, ड. डलहौसी.

४. भारताचा राष्ट्रीय वृक्ष कोणता आहे?

अ. कडुनिंब, ब. आंबा, क. बोधी, ड. वड.

५. बांबू हे कोणत्या वर्गात गणले जातात?

अ. वृक्ष, ब. वेल, ड. गवत.

६. 'बाटीक' म्हणजे काय?

अ. एक प्रकारची कापडाची वीण, ब. लहान चित्र,
क. एक रंगवायचा प्रकार, ड. शिल्पकलेचा नमुना.

७. बंगलोर हे जर भारताची सिलीकॉन व्हॅली आहे, तर भारताचे पोलादी शहर कोणते?

अ. सेलम, ब. राऊरकेला, क. जमशेदपूर, ड. भिलाई.

**(उत्तरें पुढील महिन्यांत)**

## जून प्रश्नावलीची उत्तरें

| | |
|---|---|
| १. अरवली | ६. वेंबनाद |
| २. कावेरी | ७. महाबळेश्वर |
| ३. महानदी | ८. शरावती |
| ४. केरळ | ९. नवलसागर |
| ५. गेंड्रे | १०. बुंदेले |



# पिता पुत्रांची कहाणी

फार वर्षापूर्वी एका मोठ्या नगरांत सोमनाथ नांवाचा एक श्रीमंत आणि सज्जन माणूस राहात असे. खूप दिवसांनंतर त्यांना एक मुलगा झाला. त्यामुळे आई वडिलांनी त्याला फार लाडांत वाढवले. या अति कौतुकामुळें मुलगा चांगला हुशार न होता बिघडला.

सोमनाथचे आपल्या मुलावर चांगले लक्ष होते. तो आता लग्नाचा झाला होता. त्यामुळे सोमनाथने असे ठरविले की याला वठणीवर आणायच्या कामांत आता हयगय करुन चालणार नाही.

एक दिवस सोमनाथ आपल्या मुलाला म्हणाला, "मुला, आता तू मोठा झालास. एखाद्या चांगल्या मुलीशी तुझे लग्न करुन द्यावे, अशी माझी इच्छा आहे. आता आणखी उशीर करुन चालणार नाही. तुला आणखी एक गोष्ट सांगतो. कोदंडपाणी आणि बलराम हे माझे चांगले मित्र आहेत. खूप दिवसांपासून त्यांचे आपल्याकडे जाणेयेणें नाही, पण आम्हाला एकमेकांची खुशाली माहिती असते. हल्लीच मला असं कळलं की त्यांची परिस्थिती फारच बिघडली आहे. त्यांचे सारे धन लुटले गेले आहे. त्या दोघांनाही लग्नाच्या वयाची एक मुलगी आहे. त्यांतली जी मुलगी तुला आवडेल तिच्याशी तू लग्न केले पाहिजेस. मी त्यांना तसं वचन दिले आहे. आपण दोघं बरोबर जाऊन त्या मुली बघून येऊं. मग त्या दोघींतली जी तुला पसंत पडेल, तिच्याशी तुझे लग्न होईल. मी दिलेले वचन पूर्ण करणे हे तुझे कर्तव्य आहे."



परंतु या गोष्टीचा गंभीरपणे विचार न करता मुलगा म्हणाला, "तुम्ही तर फार पूर्वी वचन दिले आहे. आपण ते पाळलंच पाहिजे असे नाही. असल्या आलतूफालतू लोकांशी आपण नातं नाही जोडूं शकत. त्यामुळे त्यांना भेटायला जाण्याची कांही गरज नाही. आपण त्यांना न भेटलेलंच बरं."

मुलाचे हे बोलणे ऐकून सोमनाथ म्हणाला "मुला, हे तू काय बोलतोस? मी जर असं वागलो तर लोकं असं नाही कां म्हणणार कीं याने दिलेला शब्द मोडला? आणि लाजेने मला कुठे तोंड दाखवायला देखील जागा उरणार नाही".

सोमनाथच्या मुलाला आपल्या वडिलांचे म्हणणे ऐकणे भाग पडले आणि मुली बघायला जाण्यास होकार द्यावा लागला.

दुसऱ्या दिवशी सकाळीच घोडागाडीत बसून ते निघाले. प्रथम ते कोदंडपाणी राहात असलेल्या चक्रधरपूरला गेले. तिथे पोचेपर्यन्त दुपार झाली. कडक ऊन होते. गाडी एका साध्या घरासमोर थांबली. खाली उतरुन सोमनाथने घर-मालकाला विचारले "कृपा करुन आपण मला रामावतार कोदंडपाणींचे घर कुठे आहे ते सांगाल कां?"

घरमालकाने सोमनाथचा वेष बघून हा कोणीतरी श्रीमंत माणूस आहे हे ओळखले होते. तो मोठ्या आदराने म्हणाला, "तुम्ही कोदंडपाणींना भेटायला आला आहात?" पण हे विचारता विचारताच तो थांबला.

हे लक्षांत येऊन सोमनाथ म्हणाला "मी त्यांच्याशी नाते जोडायला आलो आहे. गाडीत बसलेला माझा लग्नाचा मुलगा आहे, आणि तो माझा एकुलता एक मुलगा आहे".

हे ऐकून घरमालक आनंदाने म्हणाला, "आपण कोदंडपाणीच्या मुलीला बघायला आला आहात तर! या ना, आंत या." त्याने त्या दोघांना आंत नेऊन खुर्च्यांवर बसविले. स्वयंपाकघरांतून मीठ घातलेले ताक आणून त्यांना देत म्हणाला, "घ्या. उन्हांतून आला आहात. प्रवासाने दमला असाल. हे थंड ताक पिऊन आपला शीण घालवा".

इत्कयांत घरमालकाची म्हातारी आई आली. सोमनाथला नमस्कार करीत म्हणाली, "कोदंडपाणीच्या लक्ष्मीशी विवाह करणारा हा भाग्यवान कोण आहे हे जाणून घेण्याची मला फार उत्सुकता आहे. मुलगी खरोखरच लक्ष्मीदेवी आहे. अत्यंत गुणी आहे. जेव्हां आपल्या घरांत येईल तेव्हां खरच आपल्या घरांत देवी लक्ष्मी आली आहे असे समजा".

सोमनाथने आपल्या मुलाकडे पाहिले. या सगळ्या गोष्टींचा आपल्या मुलावर काय परिणाम झाला आहे हे त्याला बघायचे होते. बोलता बोलता अजून अर्धाएक तास गेल्यावर घरमालक आणि त्याची आई म्हणाली "कोदंडपाणीचे होणारे व्याही म्हणजे आमचे पण नातेवाईकच. आता आपण जेवूनच जा" मग त्यांनी दोघांना आग्रहाने स्वादिष्ट भोजन जेवायला घातले.

ज्यावेळी गांवातल्या लोकांना कोदंडपाणी-च्या मुलीशी लग्न ठरवायला लोक आले आहेत असे कळले, तेव्हां ते भेटायला आले आणि सोमनाथ व त्याच्या मुलाला मोठ्या आदर-सत्काराने कोदंडपाणीकडे गेऊन गेले.

कोदंडपाणीचे घर छोटेसेच पण स्वच्छ आणि नीटनेटके ठेवलेले होते. आपल्या मित्राला भेटून कोदंडपाणीला खूप आनंद झाला. पण गावकऱ्यांनीच मित्राचा आदरसत्कार केल्याने आपल्याला ही संधी मिळाली नाही म्हणून त्याला वाईटही वाटले. लक्ष्मीला पाहून तिच्याशी थोड्या गप्पागोष्टी केल्यावर ती खूप सुंदर व चांगली हुषार आहे हे समजायला त्यांना वेळ लागला नाही.

तिथे अजून एक तासभर थांबून नंतर सोमनाथ बलराम राहात असलेल्या अनंतपूरला जायला निघाला. त्या गांवी पोचेपर्यन्त रात्र झाली. सोमनाथने गांवकऱ्यांकडून, कोदंडपाणीची जशी माहिती काढली तशी बलरामच्या बद्दल काढण्याचा प्रयत्न केला.



बलरामचे नांव ऐकताच एक गांवकरी चिडून म्हणाला, ''बलरामचे घर कुठे म्हणून विचारता आहात? त्या इंद्रभवनात जायचे असेल तर बरेच गल्लीबोळ पार करुन जावे लागेल. आणि त्यांच्याकडे तुमचे काय काम आहे ते कळेल कां?'' उपहासाने तो म्हणाला. सोमनाथचे उत्तर ऐकून तो म्हणाला, ''बाप रे, बलरामशी नातं जोडणार? त्याचे व्याही होणार? जा, जा तिथे तुमचे चांगले स्वागत होईल'' असं म्हणून तो तिथून निघून गेला.

सोमनाथने आणखी दोघा तिघांना बलरामचे घर कुठे म्हणून विचारले, पण कोणीही सरळ उत्तर दिले नाही. कुणी प्यायला पाणी दिले नाही, कीं बलरामचे घर दाखविले नाही. उलट त्याच्याबद्दल वाईटच बोलायला लागले.

शेवटी एक दीर्घ निश्वास टाकून सोमनाथ गाडीत बसला व मुलाला म्हणाला ''कोदंडपाणी शांत स्वभावाचा आहे. लखपती होता तेव्हां देखील लोकांशी तो चांगला वागत असे. त्याच्या अशा स्वभावामुळे आज ही लोक त्याचा आदर करतात. त्याच्या गरिबीच्या परिस्थितींतही ते त्याला मान देतात. त्यांना सगळ्यांना वाटते की तुझे लग्न लक्ष्मीशी व्हावे. लक्ष्मीपण आपल्या वडिलांसारखीच शांत आणि गुणसंपन्न आहे. बलराम गर्विष्ठ आहे. लोकांशी तो चांगला वागला असता तर आज त्याच्या अडचणीच्या वेळी लोकांनी त्याला मदत केली असती. बघितलंस, त्याचे घर दाखवायला देखील कुणी तयार नाही. तरीपण आपण त्याचे घर शोधायचा प्रयत्न करुं या''.

हे सर्व ऐकून सोमनाथचा मुलगा विचारांत पडला. मग स्वत:शी निश्चय करुन म्हणाला, ''नाही बाबा! आपल्याला बलरामच्या घरीं जाण्याची कांही गरज नाही. मला कोदंडपाणींची मुलगी आवडली आहे. तुम्हाला हवं असलं तर तुम्ही या गांवी परत कधीतरी या, आणि आपल्या मित्राला भेटा. मला कांही आता त्यांना भेटायचे नाही.''

मुलाचे बोलणे नम्र आणि विचारपूर्वक होते. त्याला चांगल्या वाईटांतला फरक समजला होता. आपली युक्ती सफल झालेली पाहून आनंदाने सोमनाथ आपल्या मुलाला म्हणाला ''बरें, तू म्हणतोस तसंच करुंया'' आणि ते दोघं आपल्या गांवी परतले.






## चकाकते ते सारे....



भारतांतल्या राजेराण्यांचा इतका झगमगाट कां होता असं तुम्हाला वाटतं? ती कांही त्यांच्या असामान्य बुद्धिमत्तेची चमक वगैरे नव्हती. इतर सामान्य नागरिकांमधे असत तसे राजघराण्यांतील मंडळीतदेखील बुद्दू लोक असत. पण त्यांनी घातलेले चमकदार जवाहीर याची झळाळी फारच छान असायची.

हा झगमगाट त्यांना मिळवून देण्याचं श्रेय मात्र एका अत्यंत बुद्धिमान व्यक्तीला जातं. इ.पू. तिसऱ्या शतकांत चाणक्य याने अर्थशास्त्र या निबंधात राजनीतीचे नियम नमूद केले आहेत. त्याने लिहीलंय कीं प्रत्येक राज्यकर्त्याला आपल्या राज्यांतल्या खनिज संपत्तीची माहिती असावी आणि खाणींतून मिळणाऱ्या धातू व जवाहिरावर त्याचे नियंत्रण असावे. राजेलोकांनी हा नियम मात्र मनापासून पाळला. त्यामुळें प्रत्येक राज्यांतली उत्कृष्ट रत्नें, सोने, चांदी व इतर धातू खाणींतून राजाच्या खजिन्यांत सरळ जातील याची चोख व्यवस्था केली जाई.



## आसाममधले पदलालित्य

जेव्हां नृत्याचा विषय निघतो, तेव्हां प्रथम मनांत नांवे येतात ती भरतनाट्यम्, ओडिसी, कुचिपुडी आणि कथकली. त्यांतले आणखी एक नांव, सत्रिय. ही अप्रसिद्ध नृत्यनाट्य शैली आसाममधे प्रचलित आहे. पंधराव्या शतकांतला प्रसिद्ध वैष्णव संत शंकरदेव याने ही शैली सुरुं केली असं मानतात. एके काळीं सत्रिय फक्त पुरुष नर्तक करीत असत. नंतर त्यांत स्त्री कलाकार भाग घेऊं लागले. कथकली प्रमाणें हे नृत्यनाट्य वेगवेगळ्या दृश्यांत विभागलेले नसते. सूत्रधार किंवा निरुपकाच्या समर्थ कथनातून कथानृत्य नाट्यरुपाने

# खास बातम्या

## तोल राखण्याची कमाल



तुमच्यापैकीं बहुतेकांना लहानपणीं चमचालिंबू शर्यतींत भाग घेतलेला आठवत असेल. चमच्यांत लिंबू ठेवायचे, आणि तें न पाडता तो चमचा तोंडात धरून एक विशिष्ट अंतर पार करायचे. जर लिंबू पडले, तर तो गडी बाद होत असे! आता कल्पना करा, कीं दुधाने भरलेली दहा इंच उंच बाटली तुमच्या डोक्यावर ठेवायची आहे आणि तुम्हाला ठराविक अंतर काटायचे आहे. बाटली खाली न पाडता जे खेळाडू तेवढे अंतर चालूं शकतील, त्यांना हवे असल्यास त्यांनी त्या बाटलींतले दूध प्यावे; त्याशिवाय बक्षीस तर मिळणार आहेच! ऑस्ट्रेलियांतल्या सेंट्रल सिडनीमधें अशी स्पर्धा झाली, आणि भारतांत जन्मलेला सुरेश जोआकिम याने डोक्यावरच्या बाटलीचा तोल सांभाळत, श्वास रोखून धरा - १३३ कि मी अंतर चालण्याचा विक्रम केला. तो शेवटच्या टप्प्यावर पोंचेपर्यंत दूध नासलेदेखील असेल, पण त्याने बक्षीसही जिंकले आणि गिनेस बुकांत त्याचे नांवही नोंदले गेले.

## मुंग्यांचे संग्रहालय



हे कांही मुंगीसारखे पिटुकले संग्रहालय असणें शक्य नाही. कारण त्यांत १००,००० पेक्षां जास्त मुंग्या राहातात. थायलंडमधल्या कसेट-सार्त विद्यापीठांत हे संग्रहालय आहे. वनरक्षण विभागाकडे याच्या देखभालीची जबाबदारी आहे. मुंग्यांची सुमारें शंभर कुटुंबे आणि ५५० प्रकारच्या जिवंत मुंग्या यांत प्रदर्शनासाठी ठेवण्यांत आलेल्या आहेत. त्याशिवाय मद्यार्कात सुरक्षित ठेवलेल्या १००,००० मुंग्या आहेतच. जेव्हां तुम्हाला कधी थायलंड पाहायची संधी मिळाली, (हा देश म्हणजे पांढऱ्या हत्तींसाठी प्रसिद्ध असलेला पूर्वीचा सयाम) तर तुमच्या प्रेक्षणीय स्थळांच्या यादींत ह्या मुंग्यांच्या संग्रहालयाला भेट द्यायला विसरूं नका.





# गणेश पुराण

एकदा नारद कैलासाला जायच्या वाटेने निघाले असतां, कंटकमुखी असे नांव असलेली एक यक्षिणी चेष्टेने त्याला म्हणाली-"माझ्याशी लग्न कर की रे नारदा! ब्रह्मचर्य सोडून दे रे ब्रह्मपुत्रा!"

"मी कलह-भोजन-प्रिय म्हणून विख्यात आहे! तेव्हा कलह-भोजन शिजविणारी हवी बरं का मला!" नारद म्हणाला.

"मी भांडण लावण्यात, तुझ्याहून वरताणच ठरेन बरं!" यक्षिणी म्हणाली.

त्याच वेळी, समोरून गणेश व कुमारस्वामी दोघे 'चित-का-पट' घालीत येत होते. त्या दोघांना येत असलेले पाहून, नारद त्या यक्षिणीला म्हणाला-"त्या दोघा भावांमध्ये भांडण लावशील कां?"

"हात्तेच्या! एवढेच ना?" असे म्हणत ती कंटकमुखी, लगेच जवळ असलेल्या दलसरोवरांत शिरली व सुवर्ण-कमळाचे रूप धारण करून "पार्वती-परमेश्वरांच्या सुपुत्रा करितां मी उमलले आहे!" असे गाऊं लागली. ते ऐकून ते दोघे भाऊ "हे माझं आहे", म्हणून भांडू लागले. "आईनं बनविलेला बाहुला आहेस तू! मळाचा नुसता गोळा आहेस झालं!" कुमारस्वामी गणेशाला चिडवीत म्हणाला. त्यावर आक्षेप घेऊन "चिखलाचे आगर असलेल्या शरवण सरोवरांतूनच तू आलेला आहेस!" गणपतीने उलट चिडविले.

कार्तिकियाने हाताची मूठ वळवून गणपती वर ठोसा उगारला तेव्हा गणेशाने आपल्या सोंडेने त्याचे मनगट धरले. दोघांचे भांडण जुंपले.



गणपतीने आपल्या सोंडेने कार्तिकस्वामीची कंबर धरली व त्याला वर उचलले. त्या बरोबर कुमारस्वामीने आपल्या भाल्याचा नेम लंबोदराच्या पोटावर धरला.

धांवत येऊन नारदाने त्यांना सोडविले व "तुम्ही दोघेही कुठली तरी पैज लावा बघूं!" नारद म्हणाला.

क्षणभर विचार करून कुमारस्वामी म्हणाला- "विश्वप्रदक्षिणा करून आधी जो येईल, त्याचेच ते स्वर्णकमळ!"

"छान आहे! चांगली पैज लावलीत!" नारद म्हणाला. कुमारस्वामी लगेच मोरावर बसून विश्व-प्रदक्षिणा करण्यास निघाला.

गणपतीने हताश होऊन एक उसासा सोडला. "काय विघ्नेशा! तुझा काय विचार आहे?" नारदाने पृच्छा केली.

"ज्याच्या आवाक्यात जेवढे आहे; तेवढेच त्याला प्राप्त होणार! स्वर्णकमळ मलाच मिळूं दे म्हटले, तर मिळणार आहे कां, नारदा? माझे हे लंबोदर व माझे हे उंदीर-वाहन पाहिलंस ना? मला कसली जमते विश्व प्रदक्षिणा? धाकट्या भावालाच मिळू दे ते स्वर्ण-कमळ!" गणपती म्हणाला.

"विश्व-जननी व जनक असलेल्या पार्वती-परमेश्वराचे दर्शन घ्यावे, या विचाराने या बाजूला आलो होतो, परंतु बघूं पुढे कधी तरी! बरंय विघ्नपती! येईन परत!" असे म्हणत नारद निघून गेला.

गणेश पटकन् उठला व एका चबुतऱ्यावर बसलेल्या पार्वती-परमेश्वराभोवती तीन वेळां प्रदक्षिणा घालून, धाकटा भाऊ यायची वाट पहात बसला.

बऱ्याच वेळानंतर कुमारस्वामी विश्व-प्रदक्षिणा घालून परत आला व मयूरवाहनावरून खाली उतरला. गणपतीने कुमारस्वामीला मिठी मारली व "छोट्या! फार त्रास घेऊन विश्वाला प्रदक्षिणा घातलीस! आधी जाऊन ते स्वर्ण-कमळ घे बघूं! पैज मीच जिंकली, पण मला ते कमळ नकोय!" गणपती म्हणाला. "ते कसे काय?" नवल वाटून कुमारस्वामी म्हणाला.

"तुझ्या आधीच मी त्रिवार विश्वप्रदक्षिणा घालून इथे बसलो आहे, कुणाला विचारतोस, ते विचार!" गणेश म्हणाला.

"पैज गणपतीनेच जिंकली!" अशी आकाशवाणी झाली. सत्य समजल्यानंतर कुमारस्वामीने गणपतीपुढे गुढघे टेकले व म्हणाला-"दादा! मी



मोठी तपश्चर्या करून ब्रह्मज्ञान मिळविले, परंतु छोट्या विषयांत अज्ञानीच राहिलो! तुझी बुद्धी कुशाग्र आहे. तुझ्यापुढे माझी फुशारकी ती किती? तुझ्यानंतरच मी झालोय ना? तारकासुराशी युद्ध करण्यास निघतो आहे. मला आशीर्वाद दे!".

त्याला वर उठवून विघ्नेश्वर म्हणाला- "छोट्या! मी मोठा, तूं लहान, असे मानण्याचे कांही कारण नाही. तुझा जन्म निश्चित अशा कारणाकरिता झालेला आहे. तू म्हटल्याप्रमाणे, मी मात्र, कांहीतरी खेळ म्हणून आईने केलेला मातीचा गोळाच आहे! तुझ्यासाठी म्हणून शिवपार्वतीचे महामीलन घडले! त्यांच्या अनुरागाचे तू फळ आहेस! 'तुझा विजय होणे' हे आधीच ठरलेले विधीलिखित आहे! 'तुझ्या हातून मरण यावे' असा तारकासुराने वर मागून घेतला आहे. तू सुब्रह्मण्येश्वर असून कांही भागांमध्ये तुझी मोठी देवालये होतील, कांही तीर्थक्षेत्रे होतील! प्रमुख दैवत म्हणून लोक तुझी उपासना करतील! शक्य तेवढे लवकर तारकासुराच्या कचाट्यांतून सर्वांना मुक्त कर!"

देवांचा सेनापती म्हणून कुमारस्वामी तारकासुरावर चाल करून गेला.

यक्षांचा अधिपती कुबेर याने कंटकमुखीला शाप दिला-"शिव-पार्वतीच्या मुलांमध्ये भांडण लावणाऱ्या पापी मुली! पृथ्वीतलावर 'गोखरू' म्हणून जन्माला येशील!"

कंटकमुखीने कुबेराची क्षमा मागितली असतां-"विघ्नेश्वराच्या कृपेमुळेच तुला शापमुक्त होता येईल!" असा कुबेराने तिला



उःशाप दिला. कंटकमुखी तत्काळ गोखरूची रोपे बनून जमिनीवर उगवली व पसरूं लागली. देवादिकांचे सेनापत्य करून कुमारस्वामीने तारकासुराचा वध केला. त्यामुळे समाधान वाटून देवेन्द्राने आपली कन्या देवयानी हिच्याशी कुमारस्वामीचा विवाह करण्याचे योजिले. परंतु मोठ्या भावाआधी धाकट्याचे लग्न कसे करणार? म्हणून ते लग्न लांबणीवर पडले.

"प्रियनंदना! छोट्याचे लग्न व्हावे असे तुला वाटत असेल तर 'तूं लग्नासाठी तयार होणे' हे तुझे कर्तव्य ठरत नाही कां?" पार्वतीने हळूच गणेशाला विचारले.

"आई! अर्थ नसलेले हे नियम कशा करितां? विवाह, हा ज्याचा त्याचा ऐच्छिक प्रश्न होय! माझ्यासारख्या एकदंताच्या व एकान्त प्रिय व्यक्तीला या चिखलांत कां ओढूं इच्छिता?"



तपोभंग करावयास आलेल्या अप्सरा नृत्य करूं लागल्या तर तो त्यांच्या पायाला गोखरूंचे काटे बोचूं लागले. आंगभर गोखरूं बोचल्यामुळे त्या यातना सहन न होऊन त्या अप्सरा आर्तनाद करूं लागल्या. विघ्नेशाचे ध्यान मोडले. डोळे उघडून पाहिले तेव्हां झाला प्रकार त्याच्या लक्षांत आला. घाबरलेल्या अप्सरा लंगडत-पडत पळूं लागल्या. गणपतीला गोखरूं व सराटयांबद्दल अभिमान वाटला. तेव्हां 'गोखरू' म्हणून जन्मलेली कंटकमुखी म्हणाली-''स्वामी! तुम्हा भावंडांमध्ये भांडण लावल्याच्या अपराधावरून कुबेराच्या शापाला बळी पडले आहे. अनुग्रह असावा!'' असे म्हणून गणेशाची क्षमा मागितली.

त्या दिवशी भाद्रपद शुक्ल चतुर्थी होती. तो गणेशचतुर्थीचा दिवस! गणपती कंटकमुखीला म्हणाला-''आजच्या दिवशी लोक 'विचित्र-विनोद' म्हणून तुझी कांटेरी फळें उपयोगात आणतील बरें!''.

यक्षिणी शापमुक्त होऊन अलकापुरीस निघून गेली. तेव्हां रूई असे म्हणाली-''स्वामी! माझ्याकडेही तुमची कृपादृष्टी वळूं दे! मी अर्का नांवाची अप्सरा असून, इंद्राची आज्ञा अमान्य केल्यामुळे, आज अशी अस्पृश्य रूई झाले आहे. तुम्ही माझे श्रद्धास्थान असून, तुमच्या ठायी माझी नितांत भक्ती आहे!''

''विघ्नेश्वर म्हणाला-''या सृष्टीत अस्पृश्य असे कांहीच नाही! तुझ्या कळ्या फुलांचा हार मी प्रेमाने गळ्यांत घालीन! द्वापर युगामध्ये तूं कुब्जा म्हणून जन्माला येशील. भगवान कृष्ण तुझा उद्धार करतील. तु निर्भय होऊन स्वर्गात

अशाच कित्येक पळवाटा गणपती काढीत राहिला! यावेळेस मात्र पार्वतीने गणेशाच्या लग्नाविषयी हट्टच धरला. तेव्हां ''आई! मला तप करायचे आहे! धाकटया भावाने केले, परंतु मी केले नाही ना?'' असे म्हणून गणपती तपश्चर्येकरिता बाहेर पडला.

इंद्राने स्वर्गातील अप्सरांना विनायकाचा तपोभंग करण्यासाठी पाठविले. अर्का नांवाच्या अप्सरेने आपला विरोध दाखविला. तेव्हां ''तू डोंबकावळा आहेस! अस्पृश्य रूईचे रोपटे बनून जमिनीवर उगव!'' असा तिला शाप दिला.

तपाकरिता अनुकूल अशी जागा शोधून विघ्नेश्वर तप करूं लागला. त्या जागी सर्वत्र गोखरूंची रोपं उगवली होती. रूईच्या झुडुपांवर फुलांचा बहर आलेला होता. विघ्नेश्वराचे तपाचरण सुरू होते.





जा! तुला इंद्राचीच नव्हे तर कुणाचीही भीती बाळगण्याचे कारण नाही. कुठलाही शाप तुला लागू पडणार नाही. अर्कमुळे आयुर्वेदातील औषधांसाठी उपयोगी ठरतील. अर्कपत्रें सूर्याला प्रिय राहातील!'' अर्का, अप्सरेचे रूप धारण करून स्वर्गात निघून गेली.

विघ्नेश्वर कैलासाकडे निघाला. त्याला पाहतांच पार्वती म्हणाली-''बाळा! तप झाले ना? आतां लग्न....'' तिचे म्हणणे पूर्णपणे ऐकून न घेता, गणपती म्हणाला-''तप झाले ना? म्हणून काय विचारतेस? खरं सांगायचं तर तपाची सुरुवातच झाली नाही! हा बघ, तप करावयास निघालोच!'' असे म्हणून विघ्नेश्वराने दुसऱ्या एका ठिकाणी ध्यान धरले. त्या जागेच्या चोहीकडे सर्पांची वारूळे होती. गणपती तपाचरण करीत असतां वारूळांतील सारे नाग तडक उठले व विघ्नेश्वराच्या चोहीकडे फणा उगारून खडा पहारा देऊं लागले. ते पाहून इंद्राने-मूषकासुराचे अनुचर असलेल्या राक्षसांना चिथविले-''तुमच्या राजाला ज्याने आपले वाहन केले आहे, तो विघ्नेश्वर, तुम्हा सर्वांचा समूळ विनाश करण्यासाठी आता तप करीत आहे. तेव्हां तुम्ही त्याचा सूड उगविण्यास ही उत्तम संधी आहे!''

ते ऐकून विघ्नेश्वरावर चालून गेलेल्या राक्षसांना, पाताळांतून आलेल्या महासर्पांनी पळवून लावले. जे थोडेबहुत राक्षस जीव वांचवून पळाले, ते आपल्या अविवेकाला व इंद्राला दोष लावूं लागले.

आता इंद्राने, अतिशय उत्साही व सुंदर

देवांना तसेच अप्सरांना-"गणपतीचे मन अनुरागाकडे वळेल असे करा!" अशी आज्ञा देऊन पाठविले व वज्रायुध हाती धरून तो स्वतः त्यांच्या मागून निघाला.

स्वर्गातील देवपुरुष व अप्सरा जोडीजोडीने सुरापान करीत, नाचत, गात, कोलाहल करीत निघाले. त्यामुळे महासर्पांना राग आला व त्यांनी देवांच्या पायांना विळखा घालून चावा घ्यायला सुरुवात केली. इंद्राने त्या सर्पांवर आपले वज्रायुध उगारले. ते पाहून सर्प चवताळले व पाताळातून लक्षावधी महासर्पांनी बाहेर पडून, देवांना सळो की पळो करुन सोडले. देव व नागांमध्ये छोटासा संग्रामच झाला! इंद्राच्या वज्रालाही न जुमानता त्या सर्पांनी स्वर्गातसुद्धा हाहाःकार माजवला. नंतर सर्व सर्प मागे परतले. त्यांनी केलेल्या या सहाय्यामुळे गणपतीला फार समाधान वाटले. त्या सर्पांना उचलून घेऊन विघ्नेश्वराने त्यांचे कौतुक केले व सर्पांचे दागिने अंगभर घातले व कैलासाला निघाला.

गणपतीच्या अंगभर सर्प रूळत असलेले पाहून पार्वती आश्चर्यचकित झाली. "आई! वडिलांचा वारसा मुलाला मिळणे साहजिकच नव्हे कां! शंकराची आभरणे, तीच माझी भूषणे! शिवाय हे सर्प माझे जीवश्च मित्र आहेत. प्राण पणाला लावून यांनी माझे रक्षण केले आहे. आप्तस्वकीयांच्या सदिच्छा पाठीशी असणे भूषणावह असते! म्हणून मी नागभूषण हे नांव सार्थकी लावले!" विघ्नेश्वर म्हणाला.

पार्वती विनायकाच्या विचित्र चेष्टांना कंटाळली. शंकर मात्र मनापासून हंसत होता. अशा रीतीने विनायक नाना विघ्ने उपस्थित करीत राहिला.

पार्वतीने अखेरचा म्हणून परत एकदा लग्नाचा विषय काढला. तेव्हां-"आई! कांहीतरी मोठेकार्य केल्यानंतरच ना मला प्रतिष्ठा मिळेल? धाकट्या भावासारखे कुठले तरी मोठे कार्य साधून 'समर्थ' ठरल्यानंतरच मी लग्नाचा विचार करीन!" गणपतीने निक्षून सांगितले.

"तुझ्यांत कसली कमतरता आहे? समर्थ नव्हेस तर काय शेळपट आहेस होय?" पार्वती नाईलाजाने म्हणाली.

(क्रमशः)





# सावित्रीची हुशारी

भारती आणि सूरजच्या विवाहास अजून वर्षही पूर्ण झाले नव्हते तरी त्यांच्या कुटुंबात भांडणे व मतभेद होण्यास सुरवात झाली. सकाळी उठल्यापासून रात्री झोपेपर्यंत आपआपसांत ती दोघे कोणत्या न कोणत्या विषयावर सारखी भांडत असत.

एके दिवशी भारतीने मोठ्या प्रेमाने एक मांजराचे पिल्लू पाळण्यासाठी घरी आणले. सूरजने ते पिल्लू बाहेर सोडून दिले. व एक कुत्र्याचे पिल्लू घेऊन तो घरी आला. एके दिवशी ते पिल्लू भुकेने ओरडत होते, पण भारतीने त्याला कांहीही खायला दिले नाही. उलट तिने त्या पिल्लास काठीने मार दिला. त्याच वेळेस नेमका सूरज घरी आला. कुत्र्याला मारताना पाहून त्याला खूप राग आला. रागाच्या भरांत त्याने त्याच काठीने भारतीला एक तडाखा दिला.

भारती रडत-ओरडत शेजारच्या गल्लीमध्ये राहणाऱ्या तिचा भाऊ याच्याकडे धर्मवीरकडे गेली. धर्मवीरने भारतीला रडण्याचे कारण विचारले. भारतीने घडलेली हकीकत वाढवून सांगितली, आणि आता सूरजबरोबर तिने राहण्याचा प्रश्नच येणार नाही असेही सांगितले.

धर्मवीर स्वभावाने खूप दयाळू होता. त्याला दुसऱ्यांचे दुःख पाहवत नसे. तो सर्वांना मदत करण्यास नेहमी तयार असायचा. त्याचे त्याच्या बहिणीवर फार प्रेम होते.

"तू आता गप्प बैस. मी सूरजला बोलेन तोपर्यंत तू इथेच रहा." असे धर्मवीरने भारतीला समजावून सांगितले.

दुसऱ्या दिवशी सूरज धर्मवीरच्या घरी आला. धर्मवीरने त्याला बसवून घेतले. त्याची समजूत घातली. त्याने सूरजला सांगितले की,

- भानुमती अग्रवाल -



कुटुंब चालवण्याची पती-पत्नीची सारखीच जबाबदारी असते. दोघांनी एकमेकांच्या भावनेचा आदर करण्याची संवय लावून घेतली पाहिजे. सूरजने त्याचे म्हणने मुकाट्याने ऐकून घेतले. व भारतीला घेऊन आपल्या घरी परत आला.

सूरज व भारतीची भांडणें सारखी चालूंच होती. दर दोन-चार दिवसांनी त्यांचे भांडण होत असे व धर्मवीर भांडण मिटवून देत असे.

धर्मवीरच्या आजूबाजूला राहणारे लोक भारतीच्याच बाबतीतच नाही, तर धर्मवीरबद्दलही खोट्यानाट्या गोष्टी करुं लागले.

हे पाहून धर्मवीरला खूप वाईट वाटले. तो दुःखी झाला व उदास होऊं लागला. धर्मवीरला, त्याच्या पत्नीने, सावित्रीने त्याच्या दुःखाचे कारण विचारले. धर्मवीरने आपले दुःख सांगून सावित्रीला विचारले, "ह्या बहिणीच्या भांडणाचा शेवट कसा होईल?" सावित्री मोठ्याने हंसत म्हणाली, "ह्या समस्येचा शेवट नक्कीच होईल."

दुसऱ्या दिवशी भारती पुन्हा रडत-ओरडत, नवऱ्याला शिव्या देत धर्मवीरच्या घरी आली. समोरचे दृश्य पाहून भारती आश्चर्यचकित झाली व पुतळ्याप्रमाणे स्तब्ध उभी राहीली.

घरांतील सर्व सामान अस्ताव्यस्त पडलेले होते. घरात धर्मवीर पत्नीला जोरांत म्हणत होता, "तू वेडी झाली आहेस कां? तुझ्या अंगात भूत शिरले आहे म्हणून तू घरांतील सगळ्या वस्तूंचा नाश करीत आहेस?"

"होय! होय! मी वेडी झाले आहे. माझ्या अंगात भूत शिरले आहे. तुमच्याशी लग्न केल्यानंतरच माझी बुद्धी नष्ट झाली आहे. माझ्या आई-वडिलांना तुमच्या भुक्कड कुटुंबाबद्दल थोडीसुद्धा कल्पना नव्हती."

"जास्ती बोलू नकोस. आमच्या कुटुंबाला नांवे ठेवू नकोस." धर्मवीरही चिडून सावित्रीला म्हणाला.

"शंभर टक्के हे खरे आहे. तुम्ही व तुमचे कुटुंब अगदी वेडे आहात." सावित्री ओरडून म्हणाली. भारती उंबऱ्यावर उभी राहून सर्व ऐकत होती. भारतीच्याने राहवले नाही. ती वेगाने घरात आली व भावाला म्हणाली, "भाऊ, तू गप्प कां आहेस? वहिनी तुझा आणि आपल्या कुटुंबाचा अपमान करते आहे. तिला तू धडा शिकव."

धर्मवीरने भारतीकडे त्रासिक नजरेने पाहिले



व म्हणाला, "हे पहा, हे पति-पत्नीमधील भांडण आहे. तू ह्यांत लक्ष देऊ नकोस."

भारतीने धर्मवीरचे बोलणे ऐकले व तिचा चेहरा एकदम फिका पडला. वहिनींसमोर भावाने केलेला तिचा अपमान तिला सहन झाला नाही. ती म्हणाली, "हे काय भाऊ, वहिनी आपल्या कुटुंबाला नांवे ठेवते आहे. वाईट-साईट बोलते आहे, तरीही तू गप्प बसला आहेस."

तेवढ्यांत सावित्री तिला आडवून म्हणाली, "तू कोण आहेस ग मधे बोलणारी? तुझे इथे काही काम नाही. तू आपल्या घरी निघून जा. कुटुंबामधे अनेक अडचणी येतात. मतभेद होतात, पण कुटुंबातील सगळेजण पुन्हां एकत्र येतात. ह्या गोष्टी तुला समजायच्या नाहीत, कारण तुला तेवढी अक्कलच नाही."

भारती स्तब्ध झाली. ती ज्या कामासाठी आली होती ते ती विसरली अन् म्हणाली, "भाऊला पाहण्यासाठी आले होते." तिचा चेहरा पार सुकून गेला होता.

धर्मवीर चिडून म्हणाला, "मला काय पहायचे आहे? जवळच तर राहतेस आणि आठवड्यांतून दोन तीनदा तरी येतेसच. सांग, इकडे कोणत्या कामासाठी आली होतीस?"

भावाचे बोलणे ऐकून भारती आश्चर्यचकित झाली. पती-पत्नी दोघे आपआपसांत भांडत असूनही, दोघेही तिला झिडकारुन देत होते, नांवे ठेवत होते. आपआपसांत भांडणाऱ्या आपल्या वहिनीला व भावाला कसे सांगायचे की, आता मी नवऱ्याशी भांडून आले आहे? तिने खरी गोष्ट लपवली व म्हणाली, "कांही नाही, आम्ही हरिद्वारला जात आहोत व असा विचार केला की,



तुम्ही आमच्या बरोबर याल तर बरे होईल. हेच विचारण्यासाठी आले होते. इथे येऊन पाहते तर तुम्ही दोघेही लहान मुलांसारखे भांडत आहात! ठीक आहे, ह्या वेळेस आम्ही दोघेच जाऊन येऊ." असे म्हणत ती वेगाने घराबाहेर पडली.

पत्नीला येवढ्या लवकर घरी परत आल्याचे पाहून सूरज चकित झाला. तिच्या भावाच्या घरी काय घडले असेल यांचा त्याला अंदाज करता येईना. कांहीही होवो, पत्नी लवकर घरी आल्या-मुळें त्याला आनंद झाला. भारतीने आपल्या पतीस जेवायला वाढले व ती कांहीच घडले नाही असे भासवून गप्प बसली.

त्या रात्री, सूरजला समाधानी पाहून भारती म्हणाली, "असं वाटतंय की, आपण सैतानाच्या तावडीत सांपडलो आहोत. म्हणूनच आपली छोट्या-छोट्या कारणांवरुन भांडणे होतात. आपण एकदा हरिद्वारला जायचं का? गंगेचे स्नान करण्याने आपले मनदेखील पवित्र होईल."

पत्नीतील हा बदल पाहून सूरज खूष झाला. व म्हणाला, "हो, आपण हरिद्वारला अवश्य जाऊं या."

भारतीला वाटले कीं असे करण्याने आपण वहिनीला व भावाला चांगला धडा शिकवला. त्यांनी केलेल्या अपमानाचा आपण सूड उगवला. दुसऱ्याच दिवशी ती आपल्या पतीबरोबर हरिद्वारला जाण्यास निघाली. हे सर्व धर्मवीर व सावित्री पाहात होते.

धर्मवीरने पत्नीच्या हुशारीची खूप प्रशंसा केली. तो सावित्रीला म्हणाला, "तू सुचवलेल्या उपायाने कमाल केली. तिला आपाले भांडण खरे वाटले. तुझ्या उपायाने आता त्यांच्या कुटुंबात शांतता राहील."

सावित्री म्हणाली, "जे झाले ते चांगले झाले यानंतर तुमची बहीण आपल्याकडे सारखी येणार नाही, स्वत:ला आणि तुम्हाला नांवे ठेवून घेणार नाही. शेजार पाजारचे लोकही गप्प बसतील."



# शेखरला भेट

आसपासच्या गांवात राहाणारे नागेंद्र व शेखर हे जिवलग मित्र होते. शेतीच्या कामांत ते अतिशय निपुण होते. पंधरवड्यांतून एकदा ते शहरांत जात असत. भाज्या, फळें गाडीवर लादून घेऊन जात व विक्री करुन परत येत.

एकदा शहरांतून परत येताना शेखरने पत्नीसाठी दोन साड्या खरेदी केल्या. चमेली व गुलाबाची फुलें आणि सोन्याची अंगठीदेखील खरेदी केली.

"हे सगळं आपण कशाला विकत घ्यायचं? आपण घेतलेल्या वस्तू घरीं आवडल्या नाहीत तर?" नागेंद्राने आपले वेगळे मत प्रदर्शित केले.

त्यावर शेखर हंसला आणि म्हणाला, "न आवडायला काय झालं? उलट ह्या वस्तू पाहून त्यांना खूप आनंद वाटेल. पति या नात्याने त्यांना खूष ठेवणें हे आपले कर्तव्य आहे. या वस्तू पाहून मुलेंदेखील खूष होतील. अशा लहानसहान भेटवस्तू दिल्या तर त्यांना वाटेल कीं त्यांना सारं कांही मिळालं."

शेखरची भावना नागेंद्राला आवडली. त्याने शेखरकडे नीट पाहिलं आणि म्हणाला, "तुझं म्हणणं बरोबर आहे." नागेंद्र एका दुकानात शिरला आणि आपली पत्नी व मुलें यांच्यासाठीं त्यानेही खूप खरेदी केली. त्याचा चेहरा आता आनंदाने फुलला होता.

जेव्हां शेखर घरीं पोंचला तेव्हां त्याने आणलेल्या साऱ्या वस्तू पाहून अगोदरच रडवेली झालेली त्याची पत्नी म्हणाली, "आज सकाळीं उजाडताच कुणाचं तोंड पाहिलं होतं कोण जाणे! गल्लींतल्या पोरट्यांनी आपल्या श्यामला खूप मारलं, विहीरीवर पाणी काढताना दोरी तुटली आणि कळशी विहीरीत पडली. त्यांत भर म्हणून तुम्ही सगळी कमाई अशी उडवून टाकलीत. आपल्याला पैसे शिल्लक टाकायला हवेत हे तुम्हाला कळत नाही कां?" असं म्हणून ती डोळे पुसूं लागली.

- सरला गुप्ता





# देवमाणूस

एका गांवी सुभाष नांवाचा एक वैद्य रहात असे. तो पाला, मुळ्या व कांही फळे यांची औषधें तयार करून सर्व तऱ्हेच्या रोगांवर इलाज करीत असे.

सुभाष एकटा होता. म्हणून थोडक्या मिळकतीवर त्याचा उदरनिर्वाह चाले. तो गोरगरिबांना फुकट औषधे देई. म्हणून जवळपासच्या पंचक्रोशीत त्याचा नांवलौकिक वाढला. अर्धांगवायूसारखे भयंकर रोग आणि सर्पदंशासारखे आजार तो थोड्या वेळात बरे करी. अशा रोगांचे औषधपाणी करून देखील तो पैसे फारच कमी घेई. त्याचा हाताला यश होते. व तो मनापासून रोग्याची तपासणी करी. औषधेंही विनाकारण देत नसे. म्हणून त्याला लोक देवमाणूस मानीत.

सुभाषची वाढती कीर्ती पाहून गांवच्या जमीनदाराच्या पोटांत दुखू लागले. कारण सुभाष त्या गांवात येण्यापूर्वी लोक त्या जमीनदाराला एक मोठा देवमाणूस मानीत. परंतु आता स्थिती बदलली होती. त्याच्या घरी लोकांची गर्दी जमण्याऐवजी सुभाषच्या घरी जमू लागली होती. कारण सुभाष गरीबांना पैशाची कमी जास्त मदत करीत असे.

सुभाष लोकांच्याशी प्रेमाने वागून त्यांची विचारपूस करीत असे. गांवात त्याचे महत्व फारच थोड्या दिवसांत वाढले. त्याचा उत्कर्ष व लोकप्रियता जमीनदाराला आवडत नव्हती.

सुभाषचा हा वाढता मान कसा कमी होईल या गोष्टींचा जमीनदार विचार करू लागला. एक दुष्ट विचार त्याच्या मनांत आला आणि आपला बेत पुरा होण्यासाठी तो संधी पाहू लागला.

एकदा संध्याकाळी सुभाष कांही औषधे एका पिशवींत घालून कोठेतरी परगांवी एका रोग्याला पहायला निघाला. जमिनदाराने ते पाहिले आणि सुभाषला विचारले - ''काय हो वैद्यबुवा! कोठे निघालात?''

''शेजारच्या गांवी दोघे तिघे आजारी आहेत, त्यांना पाहून औषधपाणी करण्यासाठी जातो आहे.'' सुभाष म्हणाला.

जमीनदार अशाच संधीची वाट पहात होता. सुभाष निघून गेल्यावर जमीनदाराने आपल्या नोकरांकरवी सुभाषच्या घराच्या एका भिंतीला भोंक पाडले व आंत जाऊन औषधाच्या बाटल्या फोडून टाकल्या. आणि ज्या मुळ्या व इतर औषधें होती ती जाळून टाकली. सुभाषच्या घरांत कोणीच नव्हते.

दुसऱ्या दिवशी सुभाष गांवाहून परत आला. घरांत कोणीतरी शिरून दुष्टपणाने औषधाच्या बाटल्या फोडून इतर औषधें जाळून टाकल्याचे कळले. एका जागी भिंतीला एक भगदाड पडल्याचे पण दिसले.

चोरी करण्यासारख्या पुष्कळ वस्तू जशाच्या तशाच होत्या. फक्त औषधांची नासधूस झालेली पाहून कोणीतरी दुष्टबुद्धीने हे सर्व केले असावे, असे साहजिकच सुभाषला वाटले. परंतु त्याने कधी कोणाचे नुकसान केले नव्हते. मग द्वेषबुद्धीने हे कोणी केले असावे, हे त्याला कळेना.

सुभाषने खूप मेहनत करून पुष्कळ औषधे तयार करून ठेवली होती. पण ती अशातऱ्हेने एका रात्रीत नष्ट झाली. त्याच्याकडे अनेक रोगी येऊन वाट पहात होते. परंतु आता लगेच



कोणाला औषध देणे त्याला शक्यच नव्हते. लोकांनी चोराला शिव्या दिल्या परंतु जमीनदाराला मात्र त्याचा डाव साधल्याबद्दल फार आनंद झाला.

त्याच वेळी जमीनदाराचे नोकर जमीन-दाराच्या मुलाला घेऊन घाबऱ्याघाबऱ्या आले आणि मुलाला साप चावला असल्याचे सांगू लागले. म्हणाले - ''शेतांत छोट्या मालकांना साप चावला. अर्धा तास झाला, अजून मुलाला कांही शुद्धच येत नाही. काय वाटेल ते करुन औषध वेळेवर देववले पाहिजे.''

जमीनदाराच्या घरासमोर लोकांची गर्दी जमली. गर्दीतला एक मनुष्य म्हणाला, ''सुभाष वैद्यांकडे घेऊन जा. एका मिनिटांत मुलगा शुद्धीवर येईल.''

म.ना. रानडे

निरुपायाने जमीनदाराला सुभाष वैद्याकडेच मुलाला घेऊन धावावे लागले. नोकर मुलाला उचलून घेऊन पाठीमागून आले. जमीनदार वैद्याला हांक मारून म्हणाला – "अहो वैद्यबुवा! काय वाटेल ते करून मुलाला वांचवा हो! सांप चावला आहे याला."

"होय हो, पण काय करू? रात्रीं कोणीतरी दुष्टाने घरांत शिरून सर्व औषधांच्या बाटल्या फोडून टाकल्या व औषधांचा पाला नि मुळ्या जाळून टाकल्या." सुभाष म्हणाला.

जमीनदाराला थोबाडींत मारल्यासारखे झाले. घोगऱ्या आवाजांत तो म्हणाला – "वैद्यबुवा! तो दुष्ट मीच होतो हो! मला क्षमा करा. माझ्या मुलाला वांचवा. आयुष्यभर मी तुमचे हे उपकार विसरणार नाही."

"बरं थांबा हं, आलोच!" असे सांगून सुभाष घराबाहेर धांवत गेला.

"आतां वैद्यबुवा कशाला येतील? करावे तसे भरावे. देव सर्व पहात असतो." एकजण म्हणाला.

"मी आपल्या मुलाचा गळा स्वतःच्या हाताने कापला हो!" असे म्हणत जमीनदार टाहो फोडून रडूं लागला. परंतु सुभाष थोड्याच वेळांत परत आला. त्याच्या हातात कसल्या तरी मुळ्या व पाला होता. त्याने पाला चुरगळून मुलाच्या नाकाजवळ नेला. आणि त्याचा रस थोडा डोळ्यांत घातला. थोड्या वेळाने जमीनदाराचा मुलगा हलला आणि चांगला शुद्धीवर आला.

तेथे जमलेल्या सर्व लोकांना जिवांत जीव आल्यासारखे झाले.

त्या दिवसापासून जमीनदाराच्या वागणुकींत एकदम फरक झाला. त्याने सुभाषला नुकसान-भरपाई म्हणून पुष्कळ धन दिले आणि औषधे तयार करण्यासाठी आपल्या नोकरांना पाठविले.

सुभाषचा नांवलौकिक ह्या घटनेनंतर जास्तच वाढला. त्याने त्याच गांवात कायमचे रहावयाचे ठरवून लग्न करून घेतले. सर्वजण म्हणूं लागले – "एका देवमाणसामुळे दुष्ट माणूस-देखील देवमाणूस झाला."











# हिशेब बरोबरच !

राम व भीम शेजारी होते. रामला पुस्तकें जमवण्याची फार आवड होती. एकदा भीम रामच्या घरीं आला. तिथें कपाटांत ओळीने नीट ठेवलेली पुस्तकें पाहून तो म्हणाला, ''अरे, शेजारच्या घरांत राहून देखील तुझ्याकडे इतकी भरपूर पुस्तकें आहेत हे मला आजपर्यंत ठाऊक नव्हतं. हे एक पुस्तक मला दे. वाचून झालं कीं मी परत देईन.''

रामने ताडकन उत्तर दिले, ''माफ कर. मी कुणालाही माझी पुस्तकें उसनी देत नाही; पण हो, तुला जर वाचायची इतकी जबरदस्त इच्छा असेल तर इथेंच ये आणि हवा तितका वेळ वाचत बैस.''

रामचे हे बोलणें ऐकून भीमला वाईट वाटले, तरीपण कांहीही न दाखवता त्याने गंभीरपणें उत्तर दिले, ''हो, हो, जरूर वाचीन. पण आत्ता नाही, पुन्हां केव्हांतरी येईन.''

आठवडाभराने राम भीमच्या घरीं आला. तो म्हणाला, ''मला तुझी मदत हवी आहे. माझ्या घरांत खूप जळमटें झाली आहेत. तुझ्या घरांत जर लांब दांडीचा झाडू असला तर जरावेळ दे. तासाभरानंतर परत देईन.''

भीमाने हंसून सांगितले, ''माझ्याकडे तो झाडू आहे रे, पण माफ कर. दुसऱ्यांना झाडू उसना द्यायची मला संवय नाही. पण तू आहेस माझा शेजारी, माझा चांगला मित्र आहेस - तेव्हां तो झाडू मी स्वतःच घेऊन येईन आणि सगळी जळमटें काढून टाकीन.''

रामला आता आपली चूक समजली. त्याने पुस्तक उसने देण्यास नकार दिला होता. तेव्हां झाडू देण्यास नकार देऊन भीम त्याचा हिशेब बरोबर चुकता करीत होता.

- सरला दामोदर





# माया सरोवर

## 6

(मगरीच्या डोक्याचा आकारवाला जेव्हां चरकाचारीच्या जवळ आला तेव्हां त्याने त्याला जोराने पकडलं आणि त्यांच्या जलग्रह वाहनावर तो चढून बसला. जयशील आणि सिद्धसाधक हिरण्यपुरच्या दिशेने चालायला लागले. एका वृक्षावर बसलेल्या भिल्ल भीमाने मगरीच्या डोक्याचा आकार असलेल्यावर बाण सोडला. जलग्रह हत्तीने त्या वृक्षाला मुळासकट उखडून टाकले, आणि भीम त्यावरच बसलेला होता. - त्यानंतर)

प्राणांच्या भीतीने भिल्ल भीम ओरडत होता. वृक्षाबरोबर तोही धाडकन जमिनीवर आपटला. मगरीचा आकार असणाऱ्या मकरकेतूच्या खांद्याला जोराने हालवून जयशीलने जोराने विचारले, ''अरे दुष्टा, माझ्या अनुमतीशिवाय तू जलग्रहाला वृक्ष उखडून टाकायची आज्ञा कां दिलीस?''

मकरकेतूने कण्हत म्हटले, ''जयशील, मी जर भीमला जमिनीवर पाडले नसते, तर त्याने आणखी एक बाण सोडला असता आणि मला मारले असते. त्याला खाली पाडण्याखेरीज माझ्याजवळ दुसरा कांही उपाय नव्हता.''

तेवढ्यांत सिद्धसाधकने जलग्रहच्या पाठीवरून खाली उडी घेतली आणि वृक्षाच्या फांद्यात अडकलेल्या भीमला बाहेर ओढून काढत तो म्हणाला, ''अरे मूर्खा, बघ, कांही हातपाय तर मोडलेला नाही ना!''



भीमने उडी मारून पुढे येत म्हटले, "भुतांचे मालक, मी अगदी सुरक्षित आहे. मला कुठेही लागलं नाही. पण माझा नेम चुकला व तो दुष्ट बांचला याचं मला वाईट वाटतं. पण आता या वेळेला मात्र माझा नेम चुकणार नाही. माझ्या बाणाने हत्तीवर बसलेल्या त्या पिशाच्च्याचा अंत होईल." असं म्हणून त्याने मोठ्या उत्साहाने हातांत धनुष्य घेतले.

जयशीलने घाईने हत्तीवरून उडी घेतली आणि भीमचे मानगूट पकडून तो चिडून म्हणाला, "अरे, तुझ्या हे लक्षांत आलं नाही कीं तुझा नेम चुकता, तर तो मला लागला नसता कां?"

"मालक, माझा नेम अचूक आहे. जर मनांत आलं तर मी त्या मगरवाल्याच्या डोळ्यांच्या मधोमध बाण मारीन," असं म्हणून त्याने धनुष्य वर उचललं.

जयशीलने झटकन त्याच्या हातांतले धनुष्य आणि बाण हिसकावून घेतले आणि फेंकून दिले. त्याच वेळीं चरकाचारी आणि वीर तिथे येऊन पोंचले. चरकाचारी, मकरकेतूला पाहून चकित झाला. तो म्हणाला, "हे काय? पोटांत तलवार रुतली आहेच; आता खांद्याला देखील बाण लागला वाटतं? अरेरे, याचे अगदी वाईट दिवस आलेले दिसतात."

"छे, कसलं हे माझं जिणं? या अधम मानवांकडून माझा असा अपमान? त्यापेक्षां मरण परवडलं. माझा शूळ कुठे आहे?" असं म्हणत मकरकेतू आपला शूळ शोधूं लागला.

तो शूळ आपल्या हातांत घेऊन वर उचलत सिद्धसाधक म्हणाला, "हा बघ तुझा शूळ. हा आता माझ्याजवळ आहे!"

त्यानंतर जयशील व सिद्धसाधक पुन्हां हत्तीवर चढून बसले आणि म्हणाले, "मकरकेतू, घाबरण्याचे कांहीच कारण नाही. कोणत्याही परिस्थितींत आम्ही तुला मारणार नाही किंवा मरूं देणार नाही. तुला जवळच्याच गांवात घेऊन जाऊं व तुझ्यावर औषधोपचार करूं. तुझी जखम भरली कीं नंतर आम्ही तुला हिरण्यपुरच्या राजाकडे घेऊन जाऊं. आमच्यावर तूं विश्वास ठेव."

मकरकेतूने दोन्ही हात वर उचलून म्हटले, "ही सारी माया सरोवरेश्वराची कृपा आहे.



आणखी एखादा दुष्ट भिल्ल वाटेंत माझ्यावर बाण सोडणार नाही याची फक्त काळजी घ्या. माझा प्राण संकटात सांपडणार नाही याची जबाबदारी तुम्हा दोघांच्यावर आहे."

"आम्ही कोणत्याही परिस्थितींत तुला बांचवू. विश्वास ठेव आमच्यावर. आता तुझ्या जलग्रहाला पुढे काढ." जयशीलने सांगितलं.

जलग्रह तिथून थोड्याच अंतरावर गेला नाही, तोंच झाडावरून डफ व शिट्या वाजल्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. क्षणार्धातच भिल्लांचा भूतनाथ व दहाबारा तरुण भिल्ल झाडावरून खाली उतरले. सर्वांकडे आयुधें होती.

भिल्ल भूतनाथ अंगात आल्यासारखा नाचायला लागला व म्हणूं लागला, "बळी! बळी! मी महाकाली आहे. मगरवाल्याचा गळा चिरडून टाकीन आणि त्याच्या रक्ताने माझे पाय धुवीन. जर असं झालं नाही तर भिल्ल कुळांचाच मी नाश करीन."

जलग्रहाच्या पाठीमागे भीम उभा होता तो "माते काली" म्हणून ओरडला. नंतर सिद्धसाधकाला म्हणूं लागला, "हे राजा, हे भुतांच्या स्वामी, आमच्या गणाचारीवर आमची कुलदेवी महांकाली हिचा प्रभाव आहे. मातेला या मगरवाल्याचे रक्त हवे आहे. त्याला हत्तीवरून खाली ढकलून द्या. त्यानंतर आमचा भूतनाथ गणाचारी याचा चांगला समाचार घेईल."

जयशीलच्या लक्षांत आलं कीं भीमाच्या अंगात आता देवीचा प्रभाव दिसायला लागला



आहे. भीम त्या धुंदीत आहे आणि कोणत्याही क्षणीं कांहीही गोंधळ होऊं शकेल. तेव्हां जयशीलने मकरकेतूच्या कानांत हळूंच कांहीतरी सांगितलं. लागलीच मकरकेतूने आपल्या जलग्रहला पुकारत सांगितले, "जलग्रह, या दुष्ट भिल्लाला आपल्या सोंडेने उचलून वर घे."

जलग्रहने लगेच भीमाच्या कमरेला सोंडेने विळखा घातला आणि त्याला वर उचलले. भीम लटपटत होता. तो म्हणाला, "जयशील महाराज, महांकाली मगरवाल्याचे रक्त मागते आहे आणि आपण त्याला रोखता आहात. यामुळे देवीचा कोप होईल आणि अनर्थ घडेल हे तुम्हाला ठाऊक नाही कां?"

जलग्रहच्या पाठीवरून जयशील जरा खाली वांकला आणि भीमच्या पाठीवर तलवारीचं



टोंचतेय हो. जरा ती बाजूला करा ना!'' ''अरे भीम, मी तुला काय सांगितलं? आणि तू काय करतो आहेस?'' त्याच्या पाठीला तलवार आणखी जोराने टोंचत जयशीलने म्हटलं.

जलग्रहावर तुटून पडण्यासाठी सज्ज असलेल्या भिल्लांना भीमने तावडतोब सांगितलं. ''अरे मोठे मामा, लहानूकाका, हल्ला करायचा नाही! सावधान! मगरवाला राजाचा माणूस आहे.''

''पण मग याच्या रक्ताने मी माझे पाय धुवीन या माझ्या प्रतिज्ञेचे काय? मी शांत राहाणार नाही. मी काली आहे, महाकाली आहे. मी त्या पिशाच्च्याचा बळी घेणारच बळी! बळी! पिशाच्च्याचा बळी!'' असे म्हणत गणाचारी जलग्रहाच्याजवळ येऊं लागला.

तेव्हां जयशीलने जलग्रहवरुन खाली उडी घेतली आणि गणाचारीचे केस त्याने पकडले. त्याला धमकावत तो म्हणाला, ''खोटारड्या, आता खरं काय ते सांग. खरोखरच कां देवीचा तुझ्यावर प्रभाव आहे? दारुच्या धुंदीत तू हे सारं बरळतो आहेस, नाटक करतो आहेस!''

''महाकाली, मला बांचव, मला बांचव!'' गणाचारी ओरडायला लागला. तेवढ्यांत दहा घोडेस्वार तिथें पोंचले आणि त्यांनी सगळ्यांना घेरले.

ते घोडेस्वार राजाच्या सेनेपैकीच होते हे जयशीलने ओळखले. तो त्यांना म्हणाला, ''पहा, हत्तीवर मगरीच्या डोक्यासारखा आकार असलेला महाराजांचा कैदी आहे. तो पळून जाणार नाही याबद्दल दक्ष राहा!''

घोडेस्वारांचा प्रमुख मकरकेतूला व जलग्रह हत्तीला पाहून आश्चर्यचकित झाला. क्षणभर त्याच्या तोंडून शब्द फुटेना. तो नंतर म्हणाला, ''हा आहे तरी कोण? राक्षस आहे कीं कोणी भूत?''

''तो दोघांपैकी कुणीही नाही. तो कोणत्या जातींतला आहे हे सांगणंदेखील कठीण आहे.'' जयशील त्याला म्हणाला.

तोपर्यंत सिद्धसाधक गणाचारीला पकडून दूर घेऊन गेला आणि हातांत धनुष्यबाण घेऊन हल्ला करण्याच्या पवित्र्यांत उभे असलेल्या भिल्लांना म्हणाला, ''हा कालीमातेचा खराखुरा भक्त मुळीच नाही. याच्यावर तुमचे बाण सोडा आणि त्याच्या छातीची चाळण करून सोडा.''



हे ऐकून गणाचारी भयाने थरथर कांपायला लागला. आणि तिथें आलेल्या जयशीलला म्हणूं लागला, ''महाराज, या साध्याभोळ्या भिल्लांपासून मला बांचवा. नाहीतर आपल्या बाणांनी ते माझ्या शरीराचे तुकडे तुकडे करून टाकतील.''

भिल्ल त्याच्यावर बाणांचा वर्षाव करण्याच्या तयारीत होते. जयशीलने त्यांना सावध करीत म्हटले, ''थांबा, ह्याला मारुं नका.'' आणि पुढें तो सिद्धसाधकाला म्हणाला, ''हे काय करतो आहेस तू? मृत्यूदंडाची शिक्षा द्यायला तू कुणी राजा आहेस कां?''

घोडेस्वारांना हे सगळं काय चाललंय ते समजेना. त्यांनी जयशीलला विचारले, ''आपणच जयशील आहात कां? जवळच्याच डोंगरातल्या तलावाजवळ मंत्रीजी विश्राम करीत आहेत. या अरण्यांत आम्ही आपल्यालाच शोधायला आलो होतो.''

''सरदार, चांगल केलंत तुम्ही. माझं नांव सिद्धसाधक. मी आणि जयशील, युवराज व राजकुमारीचे अपहरण करणाऱ्यांचा शोध घेत घेत इकडे आलो. या विचित्र तोंडाच्या व्यक्तिने त्याचे अपहरण केले आहे. अरण्यांत हिंडत असताना आम्ही याला ताब्यांत घेतला आहे.''

सरदाराने मकरकेतूची मूर्ती पाहात म्हटले, ''हा विचित्र दिसतो आहेच, शिवाय भेसूरही दिसतोय. याच्या पोटांत तलवार रुतली आहे आणि खांद्यावर बाण रुतलेला आहे. या दोन्ही



गोष्टी तो एखाद्या दागिन्यासारखा मिरवतो आहे. हे किती विचित्र दिसतंय ना?''

''हे दागिने नाहीत. ह्याचे प्राण घेणारे यमपाश आहेत.'' जलग्रहच्या पाठीमागून येत वीर त्यांना म्हणाला.

इथें अशा प्रकारे वेळ वाया घालवणे व्यर्थ आहे असे जयशीलला वाटले. त्याने मकरकेतूला म्हटले.

''तू आपल्या सुरक्षेबद्दल निश्चिंत राहा! खुद्द कनकाक्ष राजाने आपला मंत्री धाडला आहे. चला, पुढें निघूं या.''

भीमने भूतनाथ गणाचारीकडे भेदक नजरेने पाहिले आणि जवळच उभ्या असलेल्या घोडेस्वाराच्या हातातला भाला त्याने हिसकावून घेतला व तो उंच स्वरांत मोठ्याने ओरडूं लागला, ''माझा कोंबडा कुठे आहे? अरे गणाचारी, तू



त्याला कुठे लपवून ठेवलं आहेस?'' भाला घेऊन तो गणाचारीकडे वळला.

गणाचारी भेदरला आणि तोही ओरडायला लागला, ''याच्या अंगात भूत शिरलंय. आता इथें थांबणं धोक्याचं आहे. पळा, पळा!'' असं म्हणून तो मागे वळून पळायला लागला. इतर भिल्लदेखील त्याच्या मागोमाग पळायला लागले. भीमसुद्धां भाला घेऊन त्यांच्या पाठीमागे पळूं लागला.

''वांचलो, जयशील, वांचलो. या भिल्लांची पीडा टळली'' असं म्हणून सिद्धसाधक जोरांत हंसायला लागला.

हे सारं आश्चर्यचकित नजरेने पाहणाऱ्या सरदाराने जयशीलला म्हटले, ''महाराज, निघायचं कां आता?''

जयशीलने चरकाचारी व वीरला आपल्या-जवळ बोलावले व त्यांना सांगितले, ''तुम्ही पुढें व्हा आणि मार्ग दाखवा. मंत्रीजी आपल्या गांवाजवळच थांबले आहेत.''

''मंत्रीमहोदयांच्या येण्यामुळें आपल्या गांवाचे नांव होईल. मकरकेतूवर आपण तिथेंच नीट शस्त्रक्रिया करुं व त्याच्याकडून प्रशस्ती मिळवूं. आपण किती चांगले शल्यविशारद आहोत हे आम्ही सिद्ध करुन दाखवूं.'' चरकाचारी म्हणाला.

''होय, तू बरोबर आहेस चरकाचारी. या कृत्यामुळें राजाच्या दरबारीं आपल्याला मान्यता मिळेल व आपण राजवैद्य होऊं शकूं. होय कीं नाही?'' स्वतःवरच खूष होऊन वीर म्हणाला.

तुम्ही दोघेजण राजवैद्य व्हाल कीं नाही ते मला माहीत नाही, पण एवढं मात्र निश्चित समजा, कीं जर तुम्ही मकरकेतूला वाचवलं नाहीत तर मंत्रीजी तिथल्या तिथें तुमचा शिरच्छेद करतील!'' जयशील म्हणाला.

हे ऐकून सिद्धसाधक आवेशाने म्हणूं लागला, ''ते काम जर मंत्रीजींनी माझ्यावर सोंपवलं तर महाकालीला मी यांचा मंत्रोच्चारणासहित बळी चढवीन. त्यामुळें आमचंच नाही, तर लोकांचंही कल्याण होईल.''

सिद्धसाधकच्या बोलण्यावर जयशीलने हंसत उत्तर दिलं, ''आता चर्चा पुरे करा आणि निघा.''

घटकाभरांतच ते सर्वजण मंत्र्यांच्या डेऱ्यावर पोंचले. मंत्री धर्ममित्र यांनी सर्वांकडे एकवार पाहिलं आणि जयशीलला अदबीने म्हटलं, ''महाराजांच्या अपत्यांचे अपहरण करणाऱ्यांना तुम्ही बंदी बनवलंत, त्याबद्दल माझ्यातर्फे तुमचं अभिनंदन. परंतु या दुष्टाने त्यांना कुठे लपवून ठेवलंय त्याबद्दल कांही माहिती आहे कां?''

मंत्रीजींना संपूर्ण वृतांत सांगून जयशील म्हणाला, ''मंत्रीमहोदय, आत्ता हा शरीरपीडेने व मनस्तापाने थकलेला आहे. म्हणून अपहरणा-विषयीं मी जास्त खोलांत शिरलो नाही. वाटेतल्या संकटांमधून याला वांचवत, मी त्याला आपल्यापाशी घेऊन आलो आहे. प्रथम याच्यावर शस्त्रक्रिया करुन त्याच्या शरीरांत रुतलेली ही तुटकी तलवार आणि बाण काढायला हवा. जेव्हां जखम भरेल तेव्हां नंतर त्याबद्दल खोलांत शिरुन चौकशी करणें योग्य ठरेल.''

मकरकेतू त्यांचा संवाद लक्षपूर्वक ऐकत होता. तो म्हणाला, ''जयशील, जलग्रह तहानेला आहे. अनेक दिवस त्याला प्यायला पाणी मिळालेले नाही. प्रथम तलावांत त्याला नेऊन त्याला पाणी पाजतो व त्याची तहान भागवतो.''

जयशीलला प्रथम वाटलं की यांत मकरकेतूची कांहीतरी चाल असावी. म्हणून मकरकेतूला आपल्या नियंत्रणाबाहेर क्षणभरदेखील जाऊं देण्याची त्याची इच्छा नव्हती. जरासा विचार करुन तो म्हणाला, ''हो, चालेल. परंतु मी आणि सिद्धसाधक, दोघेही जलग्रहवर बसून राहूं. कदाचित तू आम्हाला फसवशील!'' असं म्हणून जयशील जलग्रहवर चढून उभा राहिला. सिद्धसाधकही लगेच त्यावर चढून जयशीलच्याशेजारी उभा राहिला.

मकरकेतूने जलग्रहला वळवून तलावांत उतरवलं व बऱ्याच अंतरावर आंत नेतानेता तो म्हणाला, ''जयशील, मला वाटतं कीं मी आता मृत्यूपासून वांचू शकणार नाही. मग ते जखम भरण्यापूर्वी असेल किंवा त्यानंतर!'' क्षणभर तो स्तब्ध राहिला आणि एकदम ओरडला, ''हे मायासरोवरेश्वर! जलग्रह, पाण्यांत बुडी मार आणि मार्ग दाखव!''

जलग्रहाने लागलीच जयशील आणि सिद्धसाधकासह पाण्यांत बुडी मारली.

(क्रमशः)






# त्यांत काय विशेष?

''या देखण्या पक्षाची किंमत फक्त पन्नास अक्से। (जुनी तुर्की मोहर)! या नि हा आगळा पक्षी फक्त पन्नास अक्से देऊन घ्या!'' अल-सहिरच्या बाजारांत एक विक्रेता जोरांत सांगत होता. त्यावेळेस होडजा आपल्या गाढवावर बसून बाजारांत फेरफटका मारत होता. त्या खास पक्षाला पाहायला एव्हाना बरीच गर्दी जमली होती.

एकदा तो पक्षी स्वतःच पहावा म्हणून गर्दीतून वाट काढीत नसिरुद्दीन होडजा त्या माणसाजवळ पोंचला. होडजाला तो पक्षी अगदीच सामान्य वाटला. दुसऱ्या ठिकाणी असला पक्षी केवळ पांच अक्से देऊन मिळूं शकला असता. हा माणूस पन्नास अक्से कशासाठीं मागतोय?



''अरे भाई!'' त्याने त्या पक्षी विकणाऱ्याला विचारले, ''तू पन्नास अक्से मागण्याइतकं या पक्षांत विशेष काय आहे?''

''महाशय'' पक्षीविक्या म्हणाला, ''हा कांही सामान्य पक्षी नाही जो अलसहिर गांवातल्या कुठल्याही कोपऱ्यांत मिळेल! हा खास जातीचा पोपट आहे.'' ''त्यांत खास काय आहे? दिसतोय तर इतर पक्षांसारखाच'' होडजा म्हणाला.

''महाशय, या पक्षाला पोपट म्हणतात आणि तो बोलूं शकतो.'' पक्षीविक्या म्हणाला.

होडजाच्या मनांत एक विचार आला. तो आपल्या घरीं गेला आणि त्याने घरांतून एक मोठा पाणकोंबडा घेतला. तो परत बाजारांत आला. तो त्या पक्षीविक्याच्या शेजारीं बसून ओरडायला लागला, ''या या, फक्त शंभर अक्से देऊन हा शानदार पक्षी घ्या!''

पहिला पक्षीविक्या हैराण झाला व म्हणाला, ''तुझ्या पक्षांत तरी खास बात कुठली आहे रे? साधा नेहमीचा पाणकोंबडा तर आहे. त्याच्यासाठी तूं शंभर अक्से मागतो आहेस होय?''

''अरे, तू देखील तुझा पक्षी पन्नासाला विकणार आहेस ना?'' होडजाने त्याला प्रतिप्रश्न केला. ''अहो, पण मी सांगितलं ना की माझा पक्षी बोलूं शकतो म्हणून? तुमचा पक्षी नुसताच केकाटतो!'' वेडावांकडा चेहरा करुन त्या पक्षीविक्याने रागावून म्हटले.

''वा वा!'' होडजाने उत्तर दिले, ''माझा पक्षी विचार करूं शकतो की!''

राजा विक्रम व वेताळाच्या नव्या कहाण्या

# माधवचा महिमा

दृढनिश्चयी विक्रमार्क पुन्हां झाडा-जवळ गेला. झाडावरून प्रेत खाली काढून त्याने ते आपल्या खांद्यावर टाकले. आणि स्मशानाकडे जाऊं लागला. तेव्हां प्रेताच्या आंत बसलेला वेताळ त्याला म्हणाला ''राजा, या निबिड अंधारात तू कुठे जातो आहेस? आपला जीव फुकट धोक्यांत कां घालतो आहेस? जर तुला असं वाटत असेल की कोणतेही ध्येय गांठायला कठोर परिश्रम हा एकमेव मार्ग आहे, तर हे चुकीचे आहे. माधवचेच उदाहरण घे. तो एक सामान्य माणूस होता. त्याने कांही कठोर परिश्रम केले नाहीत पण त्याने चमत्कार घडवले. अशा



माधवला देखील मंत्र्याने दुर्लक्षिले. त्याला दुष्ट, अज्ञानी म्हटले. त्या दोघांची गोष्ट माझ्याकडून ऐक आणि स्वतःला सुधार''. असे म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला.

माधव हा एक साधा माणूस होता. गांवात त्याला चांगला मान होता. त्याची पत्नी सुस्वभावी होती. त्याला एक मुलगा आणि मुलगी होते. आपल्या बायकोमुलांबरोबर तो मोठ्या सुखांत आयुष्य घालवत होता.

एक दिवस माधव सहकुटुंब राजधानी पहायला निघाला. तिथे पोचायला त्यांना एका छोट्याशा जंगलातून जावे लागणार होते. जेव्हां ते चौघे जंगलातून जाऊं लागले तेव्हां दोन चित्त्यांनी त्यांच्यावर हल्ला केला. माधवने मोठ्या कष्टाने स्वतःला वांचवले पण त्याच्या मुलांना आणि बायकोला चित्त्यांनी मारुन टाकले.

या आकस्मिक घटनेने माधव अतिशय दुःखी झाला. तो आपल्या गांवी परत गेला. सर्व जमीनजुमला विकून दुसऱ्या गांवी रहायला जावे म्हणून निघाला. त्या गांवात त्याचा सुदर्शन नांवाचा एक दूरचा नातेवाईक होता. त्याने माधवला आपल्या घरांत रहायला जागा दिली.

सुदर्शन व्यवहारी आणि चतुर होता. थोड्या पैशांसाठी खोटं बोलायला तो मागेपुढे पहात नसे. माधवकडे खूप पैसाअडका आहे, म्हणून माधवला आपण आपलंस करुं, असं त्याला वाटत होतं.

पण बघता बघता माधव त्या गांवातल्या लोकांचा आवडता मित्र बनला. गरजू लोकांना पैसे देऊं लागला. त्यांचे वैयक्तिक प्रश्न सोडवूं लागला. अशा तऱ्हेने त्याचे खूप चांगले नांव झाले.

त्या दिवसांत भीम नांवाच्या एका खेडुताच्या घरी चोरी झाली. मोठ्या कष्टाने भीमने ते पैसे जमवले होते. चोराने सर्व पैसे चोरुन नेले. त्याच गांवच्या एका सावकाराला त्याला पैसे द्यायचे होते. पैसे दिले नाही तर घराचा लिलांव करायची सावकाराने त्याला धमकी दिली. आपली ही कर्मकहाणी त्याने माधवला सांगितली.

''ते कर्ज फेडायला तर मी तुला नक्कीच मदत करीन. पण ज्याने तुझ्या मेहनतीची कमाई चोरलीय, त्याचं कधी भलं होणार नाही. ज्या हातांनी त्याने चोरी केली ते तुटून जातील. जो पैसा त्याने चोरला, त्याचा उपयोग त्याचे



क्रियाकर्म करायलाच होईल''. असे म्हणून माधवने त्याला कांही पैसे दिले.

यानंतर एक विचित्र घटना घडली. भीमच्या घरी चोरी करणारा दुसरा तिसरा कोणी नसून त्याचा शेजारी नारायणच होता. त्या रात्री तो बैलांना चारा घालत असताना एका बैलाने शिंग मारुन त्याला जखमी केले. त्यांत त्याचे दोन्ही हात मोडले. तो मलमपट्टी करायला बाहेर पडणार, एवढ्यांत तिथे कांही दुसऱ्या कामासाठी आलेल्या सुदर्शनने ते पाहिले. तो म्हणाला ''नारायण, आमच्या माधवाने शाप दिला होता कीं भीमच्या घरी ज्याने चोरी केली असेल त्याचे हात तुटतील. त्याच्या बोलण्यांत अद्भुत शक्ती आहे. तुझे तुटलेले हात बघून माझी खात्री पटूं लागली आहे, कीं तूंच भीमच्या घरी चोरी केली आहेस. भीमचे पैसे त्याला परत कर. नाहीतर माधवच्या शापानुसार ते पैसे खरोखरच तुझे क्रियाकर्म करण्यास उपयोगी होतील''.

नारायण घाबरला. त्याने आपला गुन्हा लगेच कबूल करुन भीमचे पैसे त्याला परत केले. आणि पळत पळत माधवकडे जाऊन आपला शाप परत घ्या, अशी त्याची विनवणी करुं लागला.

''काय म्हणालास? मी तुला शाप दिला? भीमचे दुःख पाहून मला राग आला आणि मी जे काही तोंडाला येईल ते बोललो. बरं झालं. मी कांही म्हणायच्या अगोदरच तू तुझीचूक सुधारलीस. काळजी करुं नकोस. तुझ्या हाताची हाडें तुटलेली नाहीत, तू दोन दिवसांत



बरा होशील''. माधवने त्याची समजूत घालीत म्हटले.

आश्चर्याची गोष्ट अशी की दोनच दिवसांत त्याच्या जखमा भरल्या आणि तो बरा झाला. सुदर्शनने या संधीचा फायदा घेऊन गांवात सगळीकडे असा प्रचार सुरुं केला कीं माधवच्या वाणींत अद्भुत शक्ती आहे.

सुदर्शनने ही गोष्ट माधवपासून मात्र लपवून ठेवली. माधवच्या तोंडून शुभ उद्गार निघण्यासाठी व अशुभ बोलणे न येण्यासाठी तो गांवच्या लोकांकडून पैसे घेऊं लागला.

माधवच्या जवळ रोज लोकांची रोज गर्दी होऊं लागली. थोड्या दिवसांनी माधवला त्याचे कारण समजले. त्याच्या नांवावर सुदर्शन लोकांना फसवीत आहे, हे त्याच्या लक्षांत आले. जेव्हां हे त्याच्या सहनशक्तीपलीकडे गेले

तेव्हां तो कोणाला न सांगता एका रात्री तो ते गांव सोडून निघून गेला.

तो रात्रभर चालतच राहिला. जेव्हां सकाळ झाली तेव्हां त्याला कडकडून भूक लागली. तो मनांतल्या मनांत विचार करुं लागला, जर कोणी मला आपल्या घरी घेऊन जाऊन छान चवदार अन्न खायला देईल, तर काय मजा येईल!

त्याचवेळी एक घोडागाडी तिथे येऊन थांबली. त्या गाडींत बसलेल्या श्रीमंत माणसाने माधवला आपल्या घरी नेऊन स्वादिष्ट जेवण दिले.

माधवला कळेना की हे खरं आहे कीं स्वप्न! त्याने त्या धनवानाला आपली सर्व हकिगत सांगितली.

धनवान म्हणाला, "मला पण असंच वाटतं की आपल्यामधे दैवीशक्ती आहे. कदाचित देवानेच आपली भेट घडवून आणली असेल. माझा पंधरा वर्षांचा मुलगा गेली चार वर्षे आजारी आहे. कोणालाही या आजाराचे निदान करता आलेले नाही. तो बोलूं शकत नाही. तुम्ही तुमच्या शक्तीने त्याला बरं करा".

आता माधवला आपल्या शक्तीविषयी थोडा विश्वास वाटूं लागला. त्याने धनवानाच्या मुलाच्या अंगावर आपले हात ठेवले व म्हणाला, "पंधरा दिवसांच्याआंत तू इतर सर्व मुलांप्रमाणे बोलायला आणि हिंडाफिरायला लागशील".

या घटनेनंतर चारच दिवसांनी शहरांतून एक वैद्य आला. तो धनवानाला भेटून म्हणाला, "तुमच्या मुलाच्या आजाराविषयी मी ऐकले आहे. त्याच्या इलाजासाठी लागणारी सर्व औषधे माझ्याकडे आहेत. मी त्याला दहा दिवसांच्या आंतच बरा करीन".







वैद्याचे म्हणणें खरे ठरले. मुलगा एकदम बरा झाला. यामुळे सगळीकडे माधवची कीर्ती पसरली.

एक दिवस माधव नदी किनारी गेला. तिथे एक गरीब बाई कपडे धूत होती. तिचा दहा वर्षांचा मुलगा इकडेतिकडे दगड फेकत खेळत होता. त्यांतला एक दगड माधवच्या डोक्याला लागला. वेदनेने माधव जोरांत ओरडला. घाबरुन जाऊन मुलाने नदींत उडी मारली. त्याच्या आईला माहित होते की आपल्या मुलाला पोहायला येत नाही. ती माधवजवळ येऊन विनवूं लागली, "आपल्या शापाने माझा मुलगा नदींत पडला. त्याला पोहोता येत नाही. आपणच त्याला बुडण्यापासून वाचवूं शकता."

माधव त्या बाईला धीर देत म्हणाला "घाबरूं नकोस! तुझा मुलगा पोहत कांठावर येईल."

माधवचे बोलणे संपले नाही तेवढ्यांत मुलगा पोहत कांठावर आला. ती गरीब बाई माधवच्या पायां पडून म्हणाली, "स्वामी, आपण कोणी सामान्य व्यक्ती नाही. मला आशिर्वाद द्या कीं माझ्या घरावर सोन्याचा वर्षाव होऊं दे, आणि माझा मुलगा शिकलासावरलेला बनू दे".

आई, जे आपल्या हातांत नाही ते वर रुपाने मागावे. धन आणि शिक्षण मेहनतीने मिळते." असे म्हणून माधव तिथून निघून गेला.

त्यावेळी त्या देशाचा राजा तिथे वेष बदलून फिरत होता. जे काय घडलं ते त्याने स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले व कानांनी ऐकले. त्याला या घटनेचे नवल वाटले आणि त्याने माधवबद्दल सर्व माहिती मिळविली. राजधानींत पोचल्यावर त्याने माधवला तिकडे बोलाविले आणि आपल्या मंत्र्यांशी त्याची ओळख करुन दिली.

यानंतर राजाने माधवची शक्ती व चमत्कारांबद्दल मंत्र्यांना सांगितले. आणि तो म्हणाला,"याच्या वाणीच्या शक्तीच्या मदतीने मी शत्रूंवर विजय मिळविण्याची इच्छा करतो. तुमचा काय सल्ला आहे?".

यावर मंत्र्यांनी उत्तर दिले "माधवने केलेल्या चमत्कारांत कांही वेगळे केलेले नाही. भीमवर झालेल्या अन्यायाबद्दल सहानुभूती दाखवत तो म्हणाला, "चोराचे हात तुटले आणि योगायोगाने बैलाने चोराला जायबंदी केले. भुकेल्या वेळीं त्याला वाटले चांगले जेवण मिळावे, आणि योगायोगाने धनवान तेथे आला.

व त्याला घरीनेऊन त्याने स्वादिष्ट भोजन दिले. त्याला वाटत होते की आजारी मुलगा बरा व्हावा आणि योगायोगाने वैद्य वेळेवर तिथे आले आणि त्यांनी मुलाला बरे केले. अशा तऱ्हेने जे कांही घडले ते योगायोगानेच घडले''.

मंत्र्यांच्या बोलण्यावर खूप विचार करुन राजा म्हणाला, ''माधवच्या शक्तीचा आपल्याला जरी फायदा झाला नाही तरी कांही नुकसान तर होणार नाही ना?''

मंत्री म्हणाले ''महाराज, माधवचा जर आपल्याला फायदा झाला नाही तर जगांत सगळीकडे आपलं हसं होईल. कारण मूर्ख विश्वास ठेवणे हे अविवेक्यांचे लक्षण आहे. आपल्याला माहितच आहे त्याच्या कुटुंबावर काय संकट कोसळले होते ते!''

मंत्र्याच्या उत्तराने चकित झालेला राजा म्हणाला ''बरं झालं, तुम्ही योग्य वेळीं आठवण करुन दिली'' असं म्हणत त्याने मंत्र्याच्या हुषारीचे कौतुक केले व माधवला बोलवून त्याचा सत्कार करुन त्याला गांवी पाठवून दिले.

ही गोष्ट सांगून वेताळाने राजाला विचारले ''राजा, माधव चमत्कार करुं शकतो कां नाही हे मी नाही सांगू शकणार, पण त्याच्या वाणीत शक्ती आहे. माधव सज्जन माणूस आहे. तो कुणाचे वाईट इच्छित नाही, करीत नाही, मग अशा चांगल्या माणसाला मंत्र्यांनी अज्ञानी कां म्हटलं? माझ्या शंकेचं उत्तर माहित असूनही तू गप्प रहिलास तर तुझ्या डोक्याचे तुकडे तुकडे होतील''.

राजा विक्रमार्क म्हणाला, ''माधवचे आपल्या बायको व मुलांवर खूप प्रेम होते. तरी तो त्यांना चित्त्यांपासून वाचवूं शकला नाही. म्हणजे त्याच्यांत दैवी शक्ती नव्हती. जर ती असती तर तो आपल्या बायको व मुलांना वाचवूं शकला असता. राजाला पण मंत्र्यांचा तर्क ऐकून आपली चूक कळली. म्हणूनच त्याने माधवची आपल्या दरबारांत नेमणूक न करता फक्त त्याचा सत्कार करुन त्याला गांवी पाठवून दिले''.

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग झाल्याने वेताळ प्रेतासकट अदृश्य झाला आणि परत झाडावर जाऊन बसला.

**(आधार-कस्तुरी यांची रचना)**





भारतीय दंतकथा - ४

# राजकन्येला आव्हान



जंगलानी वेढलेल्या सरोवरांत हळूं हळूं संध्याछाया पसरत होत्या. वसंत ऋतू फुलला होता. राजा सरयाती व राणी तळ्याकाठी बसून मंद वारं आणि त्याबरोबर येणाऱ्या फुलांच्या सुगंधाचा आनंद लुटत होते. त्यांची सुस्वरूप मुलगी सुकन्या फुलपाखरांप्रमाणे इकडे तिकडे बागडत, खेळत होती. ती खूप आनंदात होती. तिला नेहमीच कांही जंगलात यायला मिळत नसे. ती दासीं पासून वेगळी होऊन हरणे, मोर यांच्या मागे जंगलात धावत गेली

हळूं हळूं ती घनदाट अरण्यांत शिरली. आणि तिथली उंचउंच झाडे, छोटे धबधबे नवलाईने पाहूं लागली. ''राजकन्ये, तू कुठे आहेस?'' तिच्या दासींच्या हांका तिला ऐकूं येत होत्या. अंधार पडूं लागला. आता आई बाबांकडे परतले पाहिजे. ती परत जायला वळली. तेवढ्यांत कोणत्यातरी विलक्षण गोष्टीकडे तिचे लक्ष गेले. मुंग्यांच्या वारुळावर दोन रत्ने चिकटविल्या सारखी दिसत होती. ते काय होतं बरं? राजकन्येने झाडाचा एक कांटा तोडला आणि त्या चकचकीत वस्तूंत खुपसला.

दुसऱ्या क्षणी तिला एक किंकाळी ऐकूं आली. हा आवाज कुठून आला? तिला कांही कळेना. ती घाबरुन स्तब्ध उभी राहिली. आणि नंतर तळ्याकडे पळाली. तळ्याच्या कांठावर उभे असलेले राजाचे सैनिक कांहीतरी विचित्र, आजारी वाटतंय, म्हणून तक्रार करुं लागले. त्यांना जागेवरुन हलता येईना. राजा दूरदर्शी होता. त्याच्या लक्षांत आलं की हा कुणाचा तरी शाप त्यांना भोवला आहे. हा शाप त्यांना कुणी बरं दिला असेल?

त्याने शोध घेण्यास सुरवात केली. आणि लवकरच तो वारुळाशी आला. तिथून त्याला कण्हण्याचा आवाज आला. त्याच्या लक्षांत आले



की कुणीतरी ऋषी-मुनी तेथे आंत आहेत. किंवा ते एकांतात तिथे बसून खूप दिवस तप करीत असताना मुंग्यांनी त्यांच्या भोवती वारुळ केले आहे.

राजा आणि सैनिकांनी वरचा मातीचा थर बाजूला केल्यावर बसलेले मुनी दिसू लागले. राजकन्येने नकळत त्यांच्या डोळयांत काटा खुपसला होता. आपली समाधी संपवून त्यांनी जेव्हां डोळे उघडले तेव्हां ही चूक तिच्या हातून अजाणता घडली होती. याच मुनींच्या शापाने राजाचे सैनिक आजारी पडले होते.

ते च्यवन नांवाचे थोर ऋषी होते. राजा राणीने त्यांच्या पायावर लोटांगण घालून, ''आपला शाप मागे घ्या'', अशी विनंती केली. आंधळे झालेले मुनी म्हणाले ''ज्या कुणी गुन्हा केला आहे त्याने प्रायश्चित केल्यावर शाप विरुन जाईल''.

राजाने मुनींना राजवाड्यांत चलण्याची विनंती केली म्हणजे त्यांची नीट काळजी घेता येईल. पण या विनंतीला मुनींनी नकार दिला. राजकन्येने प्रायश्चित केलेच पाहिजे. तिने आंधळया मुनींच्या बरोबर जंगलात राहून त्यांची सेवा केली पाहिजे. त्यांची प्रेमाने काळजी घेणाऱ्या पत्नीची त्यांना गरज होती.

राजा-राणी मोठ्या संकटात सापडले. आपल्या लाडक्या मुलीचे लग्न एखाद्या तरुण राजकुमाराशी न करता या म्हाताऱ्या मुनींशी, जरी ते अगदी श्रेष्ठ असले तरी, कसे लावून द्यायचे? पण राजकन्या पुढे झाली आणि मुनींशी लग्न करते म्हणाली. ''बाबा, मला नेहमीच एकांत आवडत आला आहे. आणि एखाद्या संन्याशा सारखे रहावे अशी देखील माझी सुप्त इच्छा होती. नशिबाने या इच्छा पूर्ण होण्याची संधी माझ्यापुढे ठेवली आहे तेव्हां कृपाकरुन मला मुनींशी विवाह करुन त्यांची सेवा करुं द्या''.

हळूहळू इतर सैनिकांना ही शापाचा त्रास होऊं लागला त्यामुळे राजाराणीला आपल्या मुलीच्या इच्छेला संमती द्यावी लागली. सुकन्येचा मुनींशी विवाह झाला. तिने राजवाड्यांतील जीवन हंसत सोडून दिले. जिथे दहाबारा दासदासी तिच्या साठी हजर असत, तिथे आता ती मुनींबरोबर एकटी राहूं लागली. त्यांची सेवा करताना ती कधीही थकत नसे.

एक दिवस राजकन्या आंघोळ करुन तळया-बाहेर आली तेव्हां तिला दोन यक्ष भेटले. ते दोघे



एकसारखे दिसत होते. त्यांनी तिला वंदन केले तिनेही त्यांना उलट नमस्कार केला.

''हे सुंदरी, तुला त्या म्हाताऱ्या मुनीबरोबर आयुष्य काढताना पाहून आम्हाला फार दुःख होते आहे. आम्ही दोघे जुळे भाऊ अश्विनीकुमार, देवांचे धन्वंतरी आहोत. आम्ही तुझ्या सेवेला हजर आहोत. तू नवरा म्हणून आम्हांपैकी कुणाही एकाची निवड करुं शकतेस. तू सुखांत राहाशील''. ते म्हणाले.

राजकन्या संतापली आणि अशा वागण्याबद्दल त्यांना ''शाप देईन'' अशी धमकी तिने दिली. अश्विनीकुमारांनी माफी मागितली व तिला म्हणाले. ''आम्ही तुझ्या नवऱ्याला रुबाबदार तरुण बनवूं. आमच्या दिव्यौषधीने त्याची दृष्टी देखील परत येईल. त्यांनी फक्त आमच्या बरोबर तळयांत एक डुबकी मारुन बाहेर यायला पाहिजे. त्यानंतर तुला एक परिक्षा आहे. तुला हे मान्य आहे?''.

सुकन्येने आपल्या पतीची कितीही मनोभावे सेवा केली तरी आपल्यामुळे त्यांची दृष्टी गेली याचे दुःख तिला होतेच. त्यामुळे अश्विनीकुमारांचे म्हणणे मान्य करावे असे तिला वाटले. तिने मुनींना सर्व हकिगत सांगितली. तिची काय परिक्षा आहे याची तिला किंवा मुनींना कांहीच कल्पना नव्हती. तरीही मुनींनी तिला हा धोका पत्करायला होकार दिला.

अश्विनीकुमार व मुनी तळयांत उतरले. ''आम्ही बाहेर आलो की तू तुझ्या नवऱ्याला हाताला धरुन परत ने''. ते म्हणाले.

नंतर तिघांनी डुबकी मारली. जेव्हां ते पाण्यातून बाहेर आले तेव्हां तिघेही अगदी एकसारखे दिसत होते. कुठल्याही व्यक्तीला त्यांतले मुनी कोण हे सांगणे अशक्य होते.

पण राजकन्या सुकन्या कांही सामान्य व्यक्ती नव्हती. अश्विनीकुमार आपली फजिती करुं पाहात आहेत हे तिच्या लक्षांत आले. तिने डोळे मिटून अदितीची प्रार्थना केली आणि तिघांपैकी एकाचा हात धरला. आणि तेच तिचे पती च्यवन ऋषी होते.

सुकन्या आणि च्यवनऋषींनी खूप वर्षे ध्यान, धारणा, जपतप, करीत आनंदाने दिवस घालविले.

-बिंदुसार



 Restore  127    



# खरे सौंदर्य

श्रीपूर गांवात श्रीधर नांवाचा एक श्रीमंत गृहस्थ राहात होता. भरपूर संपत्ती असूनही तो नेहमी बेचैन व काळजीत असे. तो दिसायला फार कुरुप होता.

आपण सुंदर दिसावे म्हणून त्याने विविध प्रकारची देशी औषधे, कंदमुळें इ.घेतली. जो कोणी सांगेल, ते सर्व तो करायचा. पण कांही उपयोग झाला नाही. अनेक देवळांत जाऊन त्याने पूजा-अर्चा केली पण त्याच्यावर देवाची कृपा कांही झाली नाही.

शेवटी श्रीधर एका साधुजवळ गेला व त्याने आपले दु:ख त्याला सांगितले. साधु म्हणाला, "पुत्रा, देवाने जे रूप दिले आहे, ते बदलण्याचा हट्ट धरूं नकोस. देवाच्या कृपेने तुझ्याजवळ अपार धन आहे, त्याचा गरीबांसाठी उपयोग कर. त्यामुळे लोकांना तू सुंदर दिसशील, कोणीही तुला कुरुप म्हणणार नाही."

श्रीधरने साधूच्या सांगण्याकडे दुर्लक्ष केले. कारण दुसऱ्यांसाठी पैसा खर्च करणे त्याला आवडत नसे. पण साधुला हे न सांगता, दुसरा कांहीतरी उपाय सांगा म्हणून तो विनवण्या करूं लागला. बराच वेळ विचार करून साधु म्हणाला, "हरिपूर गांवात माधव नांवाचा एक तरुण आहे. तो तुझ्यापेक्षांही जास्त कुरूप आहे. तू त्याच्याबरोबर कांही दिवस राहिलास तर तुला आपणच सुंदर आहोत असे वाटेल".

श्रीधरला हा सल्ला ठीक वाटला व तो माधवला भेटायला हरिपूरला गेला. माधव खरोखराच कुरूप, काळा व बेडौल होता. त्याला पाहून, श्रीधरला आपणच चांगले दिसतो, असे वाटून आनंद झाला. त्याने लगेच माधवला आपल्या घरी यायला सांगितले.

माधव गरीब होता. दिवसभर काबाडकष्ट करून कसाबसा उदरनिर्वाह करत असे. त्यामुळे श्रीधरने माधवला सांगितले की, "तू जर माझ्याकडे आलास तर आरामांत जीवन जगशील" त्यावर माधव म्हणाला, "मी इथें खूष आहे. गांवचे सर्व लोक माझ्यावर प्रेम करतात. त्यामुळे मी हा गांव सोडून जाण्याचा प्रश्नच येत नाही".

श्रीधर आपली तुलना माधवशी करूं लागला. भरपूर धन-दौलत असूनही मी दु:खी आहे आणि हा कांहीही नसताना देखील कसा बरं सुखी आहे? ह्या दरिद्री माणसावर लोक कसे काय प्रेम करतात?" त्याच्या मनांत शंका येऊं लागल्या. खरे काय ते पाहण्यासाठी त्याने गांवातल्या लोकांना माधवविषयी विचारायला सुरवात केली.

कांही लोक म्हणाले कीं माधव खूप परोपकारी आहे, कांही लोक म्हणाले तो खूप चांगला माणूस आहे, तर कांहींनी तो निस्वार्थी आहे असे म्हटले. पण कुणीही तो कुरूप आहे असे म्हटले नाही. तेव्हां श्रीधरनेच एका गांवकऱ्याला माधवच्या कुरूपतेविषयी विचारल्यावर तो म्हणाला, "जेव्हां मी त्याला पाहतो, तेव्हां मला त्याचा दयाळू स्वभावच आठवतो, त्याच्या रूपाकडे माझे लक्षच जात नाही".

हे सत्यच होते. त्याच गांवात सगुणा नावाची एक तरुणी होती. ती दूध विकून आपले घर चालवीत होती. ती इतकी सुंदर होती की



ती माधववर फिदा होती व गांवभर ती सांगायची की मी लग्न करीन तर माधवशीच.

श्रीधर सगुणाला पाहायला गेला. तिचे सौंदर्य पाहून त्याला घेरी आली आणि तो बेशुद्ध पडला. सगुणाने त्याच्या तोंडावर पाणी शिंपडल्यावर तो शुद्धीवर आला. सगुणाने त्याला विचारले, "काय झालं तुम्हाला? अशी अचानक घेरी कशी काय आली?"

"तू एक अलौकिक लावण्यवती आहेस. मला तुझ्याशी लग्न करायचं आहे. मी खूप श्रीमंत आहे. माझ्याकडे ऐष-आराम आहे. तू माझ्याशी लग्न केलेस तर गांवभर दूध विकण्यासाठी तुला हिंडावं लागणार नाही, तू आरामांत राहशील".

"मी माधववर प्रेम करते. मी लग्न करीन तर त्याच्याशीच" सगुणा ठामपणे म्हणाली.







माझ्यासारखा तो श्रीमंत पण नाही. काय एवढं तू पाहिलस त्याच्यांत?'' श्रीधरने आपली असंतुष्टता प्रकट करत म्हटले.

''मला काय माहित? पण जेव्हा पाहावं तेव्हा त्याच्या चेहऱ्यावर हास्य असतं. आणि माहित आहे, तेव्हा तो किती सुंदर दिसतो ते!'' सगुणाने बेधडक सांगून टाकले.

श्रीधरने हंसण्याचा प्रयत्न केला, पण त्याला हंसणे जमले नाही, तेव्हा तो पुन्हां माधवला भेटला व कसे हंसत राहावे ते त्याला विचारले. माधव म्हणाला, ''आपल्याविषयी विचार न करता दुसऱ्याविषयी विचार कर. दुसऱ्यांना आनंद दिला तर जो आनंद मिळतो, तो अलौकिक असतो. तू एक काम कर, ह्या गांवच्या टोंकाला असलेल्या आंब्याच्या बागेत नित्यानंद स्वामी राहतात. त्यांना जाऊन भेट. ते तुला अशा कांही गोष्टी सांगतील, कीं त्या ऐकून, हंसून हंसून तुझे पोट दुखेल''.

श्रीधर नित्यानंद स्वामींना भेटला. त्यांनी सांगितलेल्या विनोदी कथा ऐकल्या. ते स्वतः कथा पण सांगत आणि खूप जोराने हंसत असत.

''कथा सांगताना तुम्ही स्वतः कां इतके हंसता?'' श्रीधरने विचारले.

नित्यानंद स्वामी म्हणाले, ''मी माझ्या कथांवर बिल्कुल हसत नाही. माझ्या कथा ऐकून तुझे पोट जोरजोराने हलत असलेले दिसले. पण तुझ्या चेहऱ्यावर हंसू कां नाही? ते पाहूनच मला हंसू आलं!''

श्रीधर म्हणाला, ''खरं सांगतो, मी भरपूर हंसलो म्हणूनच माझे पोट हलत होते''.

''तू हंसूनही ते चेहऱ्यावर कां दिसले नाही? तुझ्या मनांत स्वार्थी विचार खूप आहेत तेच बाहेर येत असल्याने तुझे हास्य चेहऱ्यावर दिसले नाही''. नित्यानंद स्वामींनी गंभीर स्वरांत जे सत्य होते तेच सांगितले.

श्रीधरला आता खरी गोष्ट कळून चुकली होती. तो श्रीपूरला परत आला. गांवच्या लोकांच्या भल्यासाठी तो काम करूं लागला. त्यांच्या सुखादुःखांत तो सहभागी होऊं लागला. लोकांची सेवा, लोकांचा आनंद हाच आपला आनंद मानू लागला. तेव्हां त्याला त्याच्या कुरूप होण्याचे दुःख बिल्कुल वाटले नाही.



# भारताची ओळख

आपल्या देशाचा भूतकाळ व वर्तमान यांची प्रकर्षाने आठवण ऑगस्टच्या महिन्यांत होते. खाली दिलेले प्रश्न तुमचे कुतुहल निश्चित चाळवतील.

१. स्वतंत्र भारताचे पहिले आर्थिक अंदाजपत्रक कुणी सादर केले होते?
२. भारताच्या कोणत्या राष्ट्रपतींची कारकीर्द सर्वांत कमी काळ होती?
३. मतदारांची वयोमर्यादा २१ वरून १८वर केव्हां आणली गेली?
४. 'जय जवान, जय किसान' या घोषणेला 'जय विज्ञान' ही पुस्ती कुणी जोडली?
५. लोकसभेंत अविश्वासदर्शक ठराव मांडण्यासाठी किमान किती खासदारांची आवश्यकता असते?
६. राज्यसभेंत, भारताचे उपराष्ट्रपती अध्यक्षस्थान स्वीकारुन सत्र चालवतात. त्यांच्या अनुपस्थितींत अध्यक्षस्थान कोण स्वीकारतात?
७. भाषावार प्रांतरचनेनुसार प्रथम कोणत्या राज्याची स्थापना झाली होती?
८. एक मल्याळीभाषिक प्रदेश केरळमधें समाविष्ट नाही. हा प्रदेश कोणता व तो कोणत्या राज्यांत समाविष्ट आहे?
९. गोमटेश्वराची एका खडकांतून कोरलेली मूर्ती पाहण्यासाठीं आपल्याला कोणत्या राज्यांत जायला हवे?
१०. केंद्रशासित राज्यांपैकीं सर्वांत छोटे राज्य कोणते?
११. भारतांतले पहिले कृषी विद्यापीठ कोणते आहे?
१२. सर्वांत जुनी भारतीय फुटबॉल स्पर्धा कोणती आहे?
१३. अंदमान व निकोबार बेटांना नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी नवी नांवे दिलेली होती. तुम्हाला ती नांवे माहिती आहेत कां?
१४. बंगालची फाळणी झाली त्यावेळीं हिंदुस्तानचे व्हाईसरॉय कोण होते?

(उत्तरें पुढील अंकात)

## जुलै प्रश्नावलीची उत्तरें

१. गोदावरी
२. शिमला
३. शिमला
४. ९५
५. गवत
६. रंगवण्याची पद्धत
७. जमशेदपूर



# तलावाचे खोदकाम

नारायण सीतापूर ग्रामपंचायतीचा अधिकारी होता. वर्षभर पाऊस न आल्यामुळे गांव दुष्काळ-ग्रस्त झाला होता. भविष्यांत दुष्काळाच्या वेळीं त्रास होऊ नये म्हणून एक मोठा तलाव खोदण्याचा नारायणने निर्णय घेतला. ह्या कामासाठी राजाकडून परवानगी मिळाली व त्यासाठी आवश्यक ती रक्कमही आली. काम लवकर पूर्ण करण्यासाठी त्याने दोनशे मजुरांना कामावर ठेवले.

पण हे काम अतिशय मंद गतीने होत होते. दोन महिने झाले, पण दोन फूट खोल खड्डा सुद्धां खणला गेला नाही. हे सर्व ग्रामाधिकाऱ्याला माहित असूनही त्याने फारसे लक्ष दिले नाही. या दरम्यान भूषण नावाचा एक माणूस गांवात आला.

भूषण खूप श्रीमंत होता. दुष्काळामुळे बरेच लोक गांव सोडून जात असल्याचे त्याने ऐकले होते. त्यांची जमीन स्वस्त व कमी दरांत खरीदण्यासाठी तो आला होता. पाहता पाहता त्याने गांवची पाऊण जमीन खरेदी केली. त्यालाही वाटले की शेतांच्या मध्यांत एक मोठा तलाव खोदावा. व हा तलाव ग्रामाधिकाऱ्याच्या तलावापेक्षां मोठा असावा. पण त्याने या कामासाठी शंभर मजूर कामावर ठेवले. एका महिन्याच्या आंत त्यांनी तलावाचे बरेच खोदकाम केले. नारायणला ही गोष्ट जेव्हां समजली तेव्हा त्याला अतिशय आश्चर्य वाटले.

याचा योग्य विचार करायचा असे त्याने ठरवले. मजुरांना नारायण भूषणपेक्षां जास्त मजुरी देत होता, ते संख्येनेही अधिक होते, असे असताना नारायणपेक्षां भूषणच्या तलावाचे काम कसे जास्ती झाले होते? पण भूषणचे मजूर वेळेवर कामाला येत व विशिष्ट काम पूर्ण झाल्या-नंतरच घरी जात.

मजुरांना काबूंत ठेवण्यासाठी नारायणने तलावाच्या चारी बाजूंना कुंपण घातले. तिथे एक पहारेकरी ठेवले. कामाच्या वेळेत कुणीही बाहेर जाऊं शकत नव्हते. हा नियम तोडल्यास मजुरीतून पैसे कापले जात. मजुरांवर कडक निरीक्षण ठेवण्यासाठी कांही अधिकाऱ्यांनाही नेमले गेले.

आता मजूर वेळेवर येऊं लागले व वेळेवर जाऊं लागले. पण तरीही कामाला गती आली नव्हती. नारायणने परत आढावा घेतला, कीं चूक कुठे होत आहे? तेव्हां त्याला कळले की कांही मजूर पहारेकऱ्यांशी दोस्ती करून, गोड गोड बोलून उशिरा येतात, कांही मजूर कुंपणातून वेळीअवेळी बाहेर जातात, कुणीही उत्साहाने काम करत नाही. तिकडे भूषणच्या तलावाचे काम पूर्ण होत आले होते.

नारायणला वाटले की भूषणला जाऊन भेटावे व त्याच्यात अशी काय जादू आहे ते समजून घ्यावे. त्याने आपले दुःख भूषणला सांगितले. तेव्हां भूषण म्हणाला, "यांत मजुरांचा दोष नाही; तुझा आहे. तलावाच्या खोदकामासाठी तू राजाचा पैसा खर्च करतो आहेस आणि मी माझा खर्च करतो आहे."

"पण तरीही काम मजूरच करतात ना? तेच या कामाला जबाबदार आहेत." नारायण म्हणाला.

त्याच्याकडे दुर्लक्ष करत भूषण म्हणाला, "पैसा माझा असल्यामुळे मी विशिष्ट कार्याला एक विशिष्ट मजुरी देतो. तुझी पद्धत पाहून मजुरांना कळून चुकलंय कां काम करा किंवा न करा, मजुरी निश्चित मिळणार आहेच. माझी पद्धत अशी आहे की विशिष्ट काम झालं तर पूर्ण मजुरी मिळणार. जितकं लवकर ते काम करतील तितकी त्यांना मजुरी जास्त मिळणार. त्यामुळे ते काम उत्साहाने करतात. आता तुला कळलं असेल कीं फरक काय आहे व कुणाचा दोष आहे?"

नारायणला आता आपली चूक कळली होती. भूषणने सांगितल्याप्रमाणे त्याची पद्धतच सुरूं करायचा त्याने निश्चय केला. आणि तलावाचे खोदकाम लवकरच पूर्ण केले.



# खास बातम्या

## गुजरातमधें अश्वमेध यज्ञ



आपण श्रीराम आणि युधिष्ठिर यांनी अश्वमेध यज्ञ केल्याचे वाचलेले आहे. आता गुजरातमधे या यज्ञाचे आधुनिक स्वरूप दिसणार आहे. २००१ मधें झालेल्या भूकंपानंतर हा यज्ञ सर्व नियम व रीतीरिवाजांनुसारच होणार आहे. संयोजकांनी एक लांकडी घोडा बनवायचे ठरवले. त्यानुसार उत्तर केरळमधल्या कान्हनगड इथें सहा फूट उंच व सात फूट लांबीचा घोडा एका आम्रवृक्षाच्या खोडांतून तयार केला आहे. तमिळनाडमधल्या कल्कुरिची इथल्या स्वामीदुराई या कलाकाराला हा घोडा कोरून काढण्यासाठी एक महिना लागला. त्यावर नक्षीकाम व इतर बारकावे कोरण्यास त्याने आणखी पंधरा दिवस घेतले. त्यानंतर त्यावर पितळेचा पत्रा लावण्यांत आला, व रेल्वेच्या एका उघड्या वाघिणींत ठेवून त्याला गुजरातमधें नेण्यांत आले. त्या घोड्याबरोबर असलेल्या मंडळींनी पंधरा दिवसांच्या या प्रवासांत अखंड मंत्रपठण केले.

## शांतता दिन



भारताच्या अनेक भागांत १३ एप्रिल हा नववर्षदिन मानला जातो, उत्सव साजरा केला जातो. पण हाच दिवस बालीमधें शांततादिन म्हणून पाळला जातो. बाली हे इंडोनेशियांमधले एक मोठे बेट आहे. इथें बहुसंख्य हिंदू नागरिक आहेत. या दिवशीं सर्वलोक घरींच राहातात. काम बंद राहाते. वाहतूक व आवाज करणारी विजेची उपकरणें बंद असतात. करमणुकीचे कार्यक्रम नाहीत, टीव्ही किंवा रेडियोदेखील कुणी लावीत नाहीत. टेलिफोनदेखील मौन बाळगून असतो. प्रवाशांना हॉटेलच्या खोल्यांतच राहावे लागले. बोटी नांगरुन स्वस्थ पडल्या होत्या आणि आसमंतात एकही विमान दिवसभर नव्हते. आदल्या रात्रीं जेव्हां भुतेखेते समुद्राकडे पळवून लावली जाण्याचे धार्मिक विधी सुरुं झाले, तेव्हांपासून दुसऱ्या दिवशी सार्वजनिक सुटी असल्यामुळें, वाईट वृत्तींना बेटावर परत येता येत नाही अशी श्रद्धा आहे.



# गणेश पुराण

आपल्या विवाहात अडथळा घालणाऱ्या गणेशावर कुमारस्वामींच्या मनांत रोष होता.

एके दिवशी आपल्या आईला म्हणाला– "दादा अयोग्य नाही म्हणतोस, तर सुयोग्य कसा ते सांग पाहूं. तो नुसता खादाड आहे. असले लोक महानकार्य कसे करूं शकतील?".

विघ्नेश्वराच्या डोळ्यांत टचकन् पाणी आले. "आई, ऐकतेयस ना, छोटा कसं बोलतोय ते?" गणेश म्हणाला.

ते ऐकून पार्वतीला राग आला. विघ्नेश्वराला आपल्या पोटाशी धरून त्याचे डोळे पुसत ती म्हणाली–"बाळा, मी जो बाहुला केला, त्याला तुझ्या पित्याने मारले आणि हा अशी चेष्टा करतोय. त्यांचे हे अज्ञान त्यांनाच लाजिरवाणे ठरेल!".

"आई, छोटा अज्ञानी असू शकेल, पण तात अज्ञानी कसे असतील? हा तुझा निव्वळ भ्रम आहे. वेडेपणा आहे." गणपती म्हणाला.

पार्वती मान खाली घालून म्हणाली–"बाळा, वेडेपणा माझा नव्हे, तर तुझ्या पित्याचा आहे. त्याशिवाय कां, विष्णूच्या जगन्मोहिनीच्या रूपावर ते भाळले असते? म्हणूनच ना त्यांचं असं हंसं झालं?"

"त्यानंतर काय झालं? आई सांग ना!" गणपतीने विचारले.

"अरे, त्यानंतर कांही तरी जगावेगळं घडलं खरं. त्यांच्यापासून 'भैरव' नांवाचा, काळ्या भुतासारखा मुलगा झाला म्हणे!" पार्वती म्हणाली.



"आई, तो भैरव नांवाचा मुलगा असतो तरी कुठे? मी त्याला बघू इच्छितो". गणेश म्हणाला.

"कुठे रहातो कुणास ठाऊक! पण तो काळे कपडे घालतो म्हणे. तू चुकूनसुद्धां त्याच्याजवळ जाऊं नकोस हं! तुला भीती वाटेल". पार्वती म्हणाली.

"आई, भीती म्हणजे काय गं? मला तीही कळायला हवी ना?" गणेश म्हणाला.

"लग्न कर, म्हणजे कळेल सारं". पार्वतीने त्याला समजावले.

"असं होय! पत्नी म्हणजे असं भयंकर कांही तरी होय? म्हणूनच तर मी लग्न नको म्हणतोय!" गणपती म्हणाला.

ते ऐकून कुमारस्वामी मध्येच म्हणाला- "लग्न न करणे, एवढे एकच महान कार्य तुला करायचे आहे वाटते. तोवर मी सूर्याला प्रदक्षिणा घालून येतो". असे म्हणून कार्तिकेय मोरावर बसून उडून गेला.

त्यानंतर गणेश सरळ उठला व मेरू पर्वतावर जाऊन सर्वोच्च शिखरावर बसला. सूर्य स्वतः मेरू पर्वताची परिक्रमा करीत असतो. तिथे कधीच सूर्यास्त होत नाही.

कुमारस्वामी परिश्रमपूर्वक, सूर्याला प्रदक्षिणा घालून मोठ्या दिमाखांत परत आला.

आपला थोरला भाऊ, मेरू पर्वतावर आसनस्थ झाल्याचे ऐकून लज्जित झाला.

त्याला पाहून पार्वतीला नवल वाटले. ती काळजीच्या सुरांत म्हणाली- "कुमारा, तू असा खाली मान घालून कां बसला आहेस? झाले तरी काय?"

"मी सूर्याला प्रदक्षिणा घालून आलो आणि इकडे दादा, सूर्यालाच स्वतः भोवती प्रदक्षिणा घालायला लावीत आहे. खरं सांगायचं म्हटलं तर दादाचंच कार्य महान आहे". कुमारस्वामी म्हणाला.

या घटनेनंतर, थोड्या दिवसांनी पार्वतीने परत विघ्नेश्वराच्या लग्नाचा विषय काढला.

त्यावर गजवदन म्हणाला- "आई, देखणेपणात तुझी बरोबरी करणारी कुणी मुलगी असली, तर मी तिच्याशी लग्न करीन".

पार्वतीचे मन खचले. खालचा ओठ चावून, "तर मग तू ओसरीवर बसून वाटेने येणाऱ्या-जाणाऱ्या मुलींना न्याहाळीत रहा!" असे म्हणत ती निघून गेली.

"आई, जशी तुझी आज्ञा!" असे म्हणत गणपती रस्त्याच्या कडेला, ओसरीवर बसून जरावेळ पूर्वेकडे, नंतर थोडावेळ पश्चिमेकडे, असे आठही दिशांना पाहू लागला.

गणपतीचा तो विक्षिप्तपणा पाहून पार्वती म्हणाली- "काय रे, कुणी सुंदर मुलगी दिसली कां?"

"आई, मी जिकडे बघतो तिकडे, जगन्मातेच्या रूपांत, अष्टभुजांनी युक्त अशी तुझीच मूर्ती मला दिसते आहे". गणपती भाबडेपणाने म्हणाला.

त्याचे हे बोलणे ऐकून पार्वती प्रसन्नतेने तन्मय होऊन म्हणाली - "बाळा, विघ्नराजा! सर्व देवांना असा नियम लागू आहे की, त्यांना पूजा घ्यायची असली तर, त्यांनी पूर्वेस तोंड करून पूजा घ्यावी, म्हणजे ती त्यांना लाभेल. परंतु तूं कुठल्याही दिशेला तोंड करून राहिलास, तरी पूजा लाभायची तुझी योग्यता आहे." पार्वतीने गणेशाला असे वरदान दिले. यानंतर पार्वती गणेशाच्या लग्नाचा विषय विसरली. आपल्या लाडक्या पुत्राच्या बुद्धीचातुर्याच्या गोष्टी, ती खुलवून खुलवून शंकराला सांगू लागली, व त्यांतच रंगून गेली.

तेव्हां शंकर म्हणाले- "तू माझ्या संपूर्ण प्रथम गणांचा 'गणपती' हो!"

"बाबा, तुम्ही पुत्रप्रेमामुळे असं म्हणता आहात. 'गणपती' होण्याची योग्यता असायला हवी ना? कुमारस्वामीला सेनापतीपदाचा चांगला अनुभव असतां मला त्या पदावर बसविण्यांत काय हंशील आहे?" विघ्नेश्वराने विचारले.

प्रमथ गणांनी कुमारस्वामीची निवड केली. तेव्हां शंकर म्हणाले- "माझ्या गणांचा गणनाथ





विघ्नेश्वरच होईल. कुमारस्वामी, देवतांचा सेनापती आहेच! एकावेळी दोन अधिकार संभाळणे कसे जमेल?''.

गणेश म्हणाला-''बाबा, एखादी परीक्षा घेऊन त्यांत सुयश मिळविणाऱ्याला, गणांचा अधिपती बनविणे योग्य ठरेल''.

देवगण व प्रमथ गणांनी मिळून, एक परीक्षा ठेवली-'पृथ्वीवरील सगळ्या तीर्थांची व पुण्यक्षेत्रांची, जो कुणी आधी परिक्रमा संपवेल तो विजयी ठरेल व त्यालाच गणाधिपती म्हणून मानले जाईल!'

ही सुनावणी ऐकून कुमारस्वामी त्वरेने मोरावरून उडूं लागला, परंतु गणपती मात्र हताश झाला.

तेव्हां विष्णूने त्याला एकांतात नेऊन असे सांगितले-

''बाळा, तुझ्यावर माझा वात्सल्यभाव अधिक आहे. म्हणून तुझा पराभव तो साऱ्या देवांचा पराभव ठरेल. तेव्हां आमचा अवमान होऊं देणे इष्ट नव्हे! आपल्या पित्याचे श्रेष्ठत्व सिद्ध करणे कुणाही पुत्राला गौरवास्पदच वाटते. तेव्हां तुला कुठलीही प्रदक्षिणा करण्याचे कारण नाही. मी सांगतो तसे कर!'' असे म्हणत विष्णूने विनायकाच्या कानांत हळूच कांही तरी सांगितले.

पार्वतीने एक उसासा टाकला व विष्णूकडे कृतार्थतेने पाहिले.

विघ्नेश्वराने आसन घालून ध्यान धरले. डोळे मिटून शिवपंचाक्षरी मंत्राचा जप करूं लागला.

जिथे जिथे कुमारस्वामी जाई, तिथें तिथे त्याला-'आत्तांच उंदीरावर बसून गणपती येऊन गेला' असा निरोप मिळे. हे ऐकून त्याला आश्चर्य वाटूं लागले. तेव्हां तो निराश होऊन परत आला व 'या परीक्षेत विघ्नेश्वरच विजयी झाला' असे त्याने घोषित केले.

विघ्नेश्वराने आपल्या भावाचा हात धरला व त्याला शिवाकडे नेले. नंतर खरा प्रकार सांगितला. ''अरे छोट्या! खरं पाहता माझा विजयही झालेला नाही की तुझी हारही झालेली नाही. आपण दोघे तर निमित्त मात्र आहोत. खरा विजय तर बाबांचाच झाला आहे. कारण शिव-पंचाक्षरीचा महिमाच असा आहे. शिवनामाचा विजय झाला असून जिंकविणारा श्री विष्णू होय!''

विघ्नेश्वर व कार्तिकस्वामीने नंतर शंकराचे





पाय धरून प्रणिपात केला.

नंतर कुमारस्वामीने अशी घोषणा दिली की ''विघ्नेश्वराचा 'प्रमथ गणाधिपती' म्हणून पट्टाभिषेक लवकरच व्हायला हवा आहे. शिवाची आज्ञा शिरोधार्य आहे!''

हे ऐकून देवतांना आनंद झाला. सिद्ध, साध्य, यक्ष, भूतगणही प्रसन्न झाले. परंतु प्रमथ गणांचे नायक-भृंगीश्वर, श्रृंगीश्वर, चंडीश्वर व नंदीश्वर यांनी आपला विरोध दाखविला. याचे कारण असे होते की पुत्र गणपतीने पूर्वी ह्या लोकांचे गर्वहरण केले होते.

आपला रोष प्रकट करीत ते म्हणाले-''कुमारस्वामीला स्वतः चे असे सैन्य असून ते देवगणाचे सेनापती आहेत, आम्हीतर पूर्वीपासूनच शिवाचे सेवक असून त्याच्या गणांचे नायक आहोत, त्याचे विश्वसनीय शिवगण आहोत. तेव्हां हा विघ्नेश्वर आमचा अधिपती कसा होईल? 'गणपती' म्हणवायला त्याचा स्वतःचा गण कुठे आहे? त्याचे स्वतः चे असे प्राविण्य कशांत आहे? असे असतां 'गणाधिपती' चा पट्टाभिषेक करण्याचे प्रयोजन काय?''

हे ऐकून शिवाला राग आला. प्रमथ गणाला रागावून म्हणाले-''तुम्ही माझ्या निर्णयावर टीका करण्याइतके मोठे झालांत काय?''

विघ्नेश्वर शांतपणे म्हणाला-''या लोकांचे म्हणणे बरोबर आहे. माझे गण कुठे आहेत? नाहीतना ! कदाचित नसतीलही! मला असं आठवतंय की जेव्हां मी पुत्र गणपती होतो, तेंव्हा माझा असा गण होता. परंतु आतां तो कुठे आहे?''

तेव्हां कोट्यावधी विघ्नेश्वरासारखे दिसणारे

लोक, आकाशांतून जन्मल्यासारखे दाही दिशांनी येऊ लागले व विघ्नेश्वराचा गण म्हणून उभे राहिले.

त्या सर्वांना चार हात होते. त्या हातांत अनेक प्रकारची आयुधें होती. निरनिराळी अवजारे व नाना चित्र-विचित्र वस्तू होत्या. कांहींच्या हातीं शूल, धनुष्य-बाण, तलवारगदा होती, तर कांहींच्या हातीं लेखण्या, रंग-कुंचले होते.

कांही जणांनी बिळे, हातोडे व कोयते धरले होते, तर कांहींनी वीणा, डफ व मृदंग धरले होते, कांहींच्या हातांत वनस्पती औषधें, चरखे होते. त्यांच्या घोळक्यात अधे मधे देव व प्रमथगण दिसत होते.

विघ्नेश्वराचे रूप धारण केलेले कांही लोक अंतरिक्षांत उडत होते. त्यांच्या नायकांच्या हातांत चवऱ्या आणि रंगीबेरंगी झेंडे होते.

दोघांनी एक रत्नखचित सिंहासन आणलं. दोघांनी विघ्नेश्वराला त्यावर बसविलं. तेंव्हा छत्र-चामरधारी दोघे येऊन उभे राहिले. श्वेत छत्राच्या मोत्यांच्या किनखापी व झिरमिळ्या शोभून दिसत होत्या.

छोटा उंदीर सिंहासनाखाली उड्या मारूं लागला. पार्वती भान हरपून विघ्नराजाला प्रणाम करायला वांकणार तोंच-"आई! असं करुं नकोस, मी तुझा लाडका पुत्र आहे." गणपती म्हणाला. त्या क्षणीं सभोवतालचे त्याचे गण अदृश्य झाले. गणपतीने वांकून आईला वंदन केले.

"विघ्नेश्वरा!" अशी शंखध्वनीसारखी हांक त्यावेळी ऐकूं आली. ती विष्णूची हांक होती. तिकडे न बघता गणेश म्हणाला-"तुम्ही काय म्हणूं इच्छिता, हे मी जाणतो".

"तुला माहीत असले तरी इतरांना ते कळायला हवे ना! मी तेच सांगणार आहे. 'विघ्नेश्वराच्या लग्नाला हजार विघ्ने' या म्हणीला सार्थ करून तू आपले लग्न टाळण्यासाठी जी विघ्ने घातलीस त्यांची संख्या हजार पूर्ण झाली आहे. आतां यापुढे विघ्न घालणे असंभव आहे. जरी विघ्न घालायचा प्रयत्न केलास तरी ते निष्फळ ठरेल!" (क्रमशः)





# राम भक्त

एका डोंगरावर एक रामाचे देऊळ होते. देवळाच्या सभोवती असलेल्या झाडांवर खूप माकडे होती. देवळांत येणारे भक्त ह्या माकडांमध्ये थोडा कां असेना, पण रामभक्त हनुमानाचा अंश त्यांच्यात आहे असे समजत व त्यांना खायला फळे, शेंगदाणे असे कांहीना कांही देत असत.

एक दिवस कपिल आपल्या आई-वडिलांबरोबर देवळांत आला. त्याच्या आई-वडिलांची धन दौलत असलेली जमीन त्यांच्या नातेवाईकांनी हडप केली होती. त्यांच्यावर खूप मोठा अन्याय झाला होता. याविषयी न्यायाधीशांकडे त्यांना तक्रार करायची होती पण न्यायाधीशांची भेट होत नव्हती. कारण नातेवाईकांनी न्यायाधीशांच्या पहारेकऱ्यांना लांच दिल्यामुळे ते न्यायाधिशांना भेटूंच देत नव्हते. त्यांच्यापेक्षा जास्त लांच कपिलचे आई वडील गरीब असल्यामुळें देऊं शकत नव्हते.

त्यामुळे आपले दुःख त्या कृपाळू रामाला सांगण्यासाठी ते आज रामाच्या देवळांत आले होते. ... देवळाबाहेर आले व माकडांना खाऊ द्यायला लागले.

कपिलजवळ एक केळे होते पण ते त्याने माकडांना दिले नाही. त्याचे लक्ष दूर बसलेल्या एका माकडावर गेले. ते अतिशय भुकेलेल्या नजरेने कपिलकडे व त्याच्या हातांतल्या केळयाकडे पहात होते, पण ते जागेवरून हलत नव्हते. कपिल स्वतः त्या माकडाकडे गेला. त्यावेळी त्याला कळले की माकडाच्या पायाला जखम झाली आहे व ते चालूं शकत नाही. केळे माकडाला देताच त्याने आनंदाने ते घेतले व झटपट खाऊन टाकले. कपिलजवळ गांवच्या वैद्याने दिलेले एक मलम होते, ते जखमा लवकर बरे करी.

कपिलने ते मलम माकडाच्या जखमेवर लावले व म्हटले-"इथें तुला खायला कांही ना कांही मिळेल, पण तुझी तब्येत ठीक होणार नाही. आम्हां मनुष्यांजवळ कितीतरी सोई आहेत, सुखे आहेत. तू एक काम कर. ही जागा सोड आणि आमच्या



मनुष्यांत वावरणाऱ्या माकडांना त्यांच्या भावना कळतात पण बोलून दाखवता येत नाहीत. ते माकड कपिलकडे पाहातच राहिले. नंतर कांही वेळाने कपिल आपल्या आईवडीलांबरोबर निघून गेला.

दुसऱ्याच दिवशी माकडाची जखम बरी झाली. त्याला त्याचे आश्चर्य वाटले व त्याने हे इतर सर्व माकडांनाही सांगितले. ते म्हणाले, कीं आपण माणसांत जाऊं या, माणसे जिथे राहतात तिथे जाऊन त्यांच्या बरोबर राहू या. त्यावर वय झालेले एक माकड हंसून म्हणाले, "माणसांवर विश्वास ठेवता येत नाही. ते जसे देवळांत वागतात, तसेच ते घरांत वागतील असं बिल्कुल समजूं नकोस. आपण इथे राहणेंच योग्य आहे."

वयस्कर माकडाचा सल्ला ह्या माकडाला योग्य वाटला नाही. एक दिवस ते केळे खायला दिलेल्या श्रीमंत माणसाबरोबर त्याच्या गांवी गेले. श्रीमंत माणसाला खूप आनंद झाला. साक्षात् हनुमान घरी आले आहेत असे समजून तो त्याची चांगली देखभाल करूं लागला. त्याची मुले त्या माकडा-बरोबर खेळूं लागली व त्याचे नोकर त्याला हवे-नको ते पाहू लागले. माकड अशा तऱ्हेने मजेंत व आरामांत राहूं लागले. पण अखेर त्याची माकड बुद्धी कशी बरे त्याला स्वस्थ बसू देईल? एक दिवस त्याने श्रीमंताच्या घरच्या सर्व वस्तू अस्ताव्यस्त करून टाकल्या. नोकरांनी त्याचा पाठलाग केला तर ते धावत पळत मागच्या बागेंत गेले आणि इकडे तिकडे उडया मारून बागेतल्या फुलझाडांची त्याने वाट लावून टाकली, फळ झाडांच्या, फांद्या तोडून टाकल्या.

श्रीमंताची सहनशक्ती आता संपली होती. त्याला वाटले की, ह्या माकडाला ठेवूण घेणे म्हणजे संकटाला आमंत्रण देण्यासारखेच आहे. त्याचा शाप मिळूं नये म्हणून त्याने त्याला शिवी दिली नाही कीं त्याला मारले नाही, पण एका मदाऱ्याला बोलावून त्याच्या हवाली केले.

त्या मदाऱ्याचे नांव होते बळवंत व तो अतिशय क्रूर होता. त्याने मारून, घाबरवून व धमकावून माकडाल बऱ्याच गोष्टी शिकवल्या. तो दिवसभर माकडाला घेऊन गांवभर भटकायचा, त्याला थकवा येईपर्यंत नाचवायचा व पैसे कमवायचा. कांही दिवसांतच मदाऱ्याला कळून चुकले कीं इतर माकडांपेक्षा हे माकड जास्त हुशार आहे. भीतीमुळे ते माकड नाचत असे खरे, पण लोकांची वाहवा व त्यांनी वाजवलेल्या टाळ्या त्याला बिल्कुल आवडत नसत. आता त्याला पूर्णपणे कळून चुकले होते कीं मुक्त जीवनाइतका आनंद दुसऱ्या कशांतही नाही.

एक दिवस बळवंतने माकडाला गुलाबी रंगाचे सुरेख कपडे घातले व एका गल्लींत त्याला नाचवायला घेऊन गेला. माकडाचे छान छान कपडे व सुंदर नाच पाहून त्या रस्त्यावरून जाणारा एक हिऱ्यांचा व्यापारी मोहून गेला. तो त्या माकडाचा नाच पाहून अवाक् होऊन पाहातच राहिला. बळवंतला हेच हवे होते. त्याने माकडाला त्याच्या मुक्या भाषेने व इषाऱ्यांनी सांगितले की, "तू त्या व्यापाऱ्याच्या हातांतील छोटी पिशवी चोरून घे, मी मग तुला मुक्त करीन", व लगेच त्याच्या गळ्यांतली दोरी काढून टाकली.

माकड उडया मारत मारत हिऱ्यांच्या व्यापाऱ्याजवळ आले व झटक्यांत त्याच्या हातांतली छोटी पिशवी हिसकावून घेतली आणि आपल्या कपड्यांमध्ये लपवली. मग ते तिथून वेगांत धावूं लागले. व्यापाऱ्याला आश्चर्याचा धक्का बसला व इतर प्रेक्षकही पाहातच राहिले. कांही लोकांनी माकडाला दगड मारायला सुरवात केली. आता माकड पूर्णपणे घाबरून गेले. ते झाडांवर व घरांच्या छपरांवर, व पुन्हा छपरांवरून दुसऱ्या झाडांवर, असे धावत पळत किती तरी दूर दूर आले होते. दमून भागून ते एका घराच्या मागच्या बागेत येऊन पडले.

ते घर कपिलचे होते. त्याचवेळी बागेंत आलेल्या कपिलने मूर्च्छित होऊन पडलेल्या माकडाला पाहिले. लगेच त्याने त्याच्या तोंडावर पाणी शिंपडून त्याला शुद्धीवर आणले. त्याला केळी खायला दिली. माकडाने लगेच कपिलला ओळखले व आपला एक पाय पुढे करून दाखवला. त्याच्यावर कपिलने पूर्वी मलमाचा लेप लावला होता. त्याला काय सांगायचे आहे ते कपिलला कळले. त्याला अतिशय आश्चर्य वाटले व आपल्या आईलाही त्याने बोलावले.

कपिलचा आरडाओरडा ऐकून त्याचे आई-



वडिल दोघेही बाहेर आले. माकडाने आपल्या कपड्यांत लपवून ठेवलेली छोटी पिशवी कपिल-जवळ दिली. कपिलच्या वडिलांनी त्या पिशवीत पाहिले तर त्यात चमचम चमकणारे अनेक हिरे होते.

कपिलचे वडील अतिशय प्रामाणिक व नेक होते, दुसऱ्यांची संपत्ती बळकवणाऱ्यांतले ते नव्हते. त्या छोट्या पिशवीत त्यांना एक लहानसा कागद मिळाला. त्याच्यावर हिऱ्याच्या व्यापाऱ्याचे नांव व पत्ता होता. ते पाहून ते म्हणाले, "बिचारा व्यापारी! आपले इतके मौल्यवान हिरे हरवल्यामुळे किती दुःखी झाला असेल! मी आत्ता जाऊन त्याला देऊन येतो" असे म्हणून ते बाहेर पडले.

व्यापाऱ्याला हिरे परत मिळतील अशी जरासुद्धां आशा नव्हती. कपिलच्या वडिलांनी जसेच्या तसे सर्व हिरे परत आणून दिलेले पाहून व्यापारी आश्चर्याने स्तंभित झाला व म्हणाला, "तुझ्या-

सारखी प्रामाणिक माणसे या जगांत आहेत हे पाहून मला अतिशय आश्चर्य व आनंदही वाटतो आहे. तुला जे कांही हवे असेल ते संकोच न करता सांग, मी तुला सर्व तऱ्हेची मदत करायला तयार आहे.''

कपिलच्या वडिलांनी आपली दुःखद स्थिती सांगितली, व्यापाऱ्याने त्याला धीर देत म्हटले, ''बरे झाले, तू मला तुझे दुःख सांगितलेस. कांही काळजी करू नकोस. ते न्यायाधिश माझे चांगले मित्र आहेत. तुला न्याय मिळेलच''. नंतर तो व्यापारी कपिलच्या वडिलांना न्यायाधिशांच्या घरी घेऊन गेला. न्यायाधिशांना आपले पहारेकरी लांचखाऊ असल्याचे कळताच त्यांनी त्यांना कामावरून काढून टाकले. आणि कपिलच्या वडलांना त्याच्या नातेवाईकांकडून त्याची जमीन परत घेऊन दिली.

घरी गेल्यानंतर कपिलच्या वडलांनी सर्व हकिकत आपल्या बायकोला व कपिलला सांगितली. ते ऐकून कपिलला अतिशय आनंद झाला व तो म्हणाला, ''बाबा, ह्या माकडामुळेच आपली जमीन आपल्याला परत मिळाली, आता आपण त्या माकडाला आपल्याबरोबरच ठेवून घेऊं या''.

''ते चुकीचं आहे बाळा. ह्याने मदत केली म्हणून याचा अर्थ असा नव्हे की आपण त्याच्यावर बंधन घालून त्याचं स्वातंत्र्य हिरावून घ्यायच''! बाबा म्हणाले.

कपिलने असहायपणे माकडाकडे पाहिले. त्याने कपिलच्या वडलांच्या मोठेपणाची इशाऱ्यांनीच स्तुती केली. कारण माकडाने मदारीबरोबर भरपूर त्रास सहन केला होता व जीवनांतले अनेक कडू अनुभव व कठोर सत्य अनुभवले होते.

नंतर कांही दिवसांनी त्यांनी माकडाला पर्वतावरच्या राममंदिरात सोडून दिले. सर्व कष्टांतून व दुःखांतून देवाने सुटका केली म्हणून त्यांनी देवळांत मोठी पूजा केली. तेव्हांपासून दरवर्षी न चुकता ती सर्वजण राममंदिरांत येऊं लागली. आई-वडील देवाचे दर्शन घेत असताना कपिल रामाचा सेवक असलेल्या माकडाला पाहायला बाहेर येई. इतर छोटी मुले दगड मारत असतील तर तर त्यांना सांगे, ''मित्रांनो, दगड मारू नका. तुम्ही त्यांना प्रेम दिले तर ती तुम्हाला हिरे आणून देतील. तुम्ही त्यांचे दुःख समजून घेतल्यास ती तुमचे दुःख समजून घेतील. पशु काय, राक्षस काय, इतकेच नव्हे तर अचेतन वस्तूवर जरी प्रेम केले, तरी ती सुद्धा पाझरते. इथे माकड तर एक साधारण पशूच नव्हे, तर प्रभू रामचंद्राचे सेवक आहेत. हा रामभक्त हनुमानाचा अवतार आहे !''





# मूर्खपणाची कमाल

प्रसाद नांवाचा एक माणूस शहरांत नोकरी करीत होता. शहापूर या त्याच्या गांवी त्याचे एक लहानसे घर व पांच एकर सुपीक जमीन होती. त्याला मूलबाळ नसल्याने पत्नी घरी एकटीच राहायची. बऱ्याच वर्षांपासून नोकरी करीत असल्यामुळे घराची व शेताची देखभाल त्याला करता येत नव्हती आता लवकरच निवृत्त व्हायचा त्याचा विचार होता. नोकरी सोडल्यानंतर गांवात राहून घराची चांगली देखभाल करता येईल असे त्याला वाटत असे.

शेताची व घराची दुरुस्ती करायला कमीत कमी तीन महिने तरी लागले असते. कचेरींत भरपूर काम असल्याने हे काम त्याला स्वतःला करणे शक्यच नव्हते.

परशू नांवाचा एक नोकर त्याच्याकडे बऱ्याच वर्षांपासून काम करीत होता. तो प्रामाणिक होता खरा पण बुद्धीने चतुर नव्हता. त्याशिवाय आणखी कुणावर काम सोपवावे असा कोणी माणूस त्याच्याजवळ नव्हता.

एक दिवस त्याने परशूलाच हे सर्व करायला सांगून आवश्यक तितकी रकम दिली. परशू ते सर्व काम दिलेल्या मुदतीच्या आंत संपवून पुन्हा शहरांत आलेला पाहून प्रसादने त्याची प्रशंसा केली.

प्रशंसेने खूष झालेल्या परशूने आपल्या मालकाला म्हटले, ''मालक, आपल्या शेतांत एक विहीर असती तर खूप चांगले झाले असते, पीक ही चांगले येईल''.

प्रसादला त्याचा हा सल्ला योग्य वाटला. तो म्हणाला, ''तुझें म्हणणे बरोबर आहे. तू पुन्हां एकदा गांवी जाऊन हे कामही पूर्ण करून ये'. यासाठीही आवश्यक ती रकम प्रसादने दिली.

दोन आठवड्यांनी परशू परत आला, पण तो निराश दिसत होता. तो म्हणाला, ''मालक,













आपण सांगितल्याप्रमाणे तीस फूट खोल खणूनही पाणी बिलकुल आले नाही.''

त्याच्या त्या दीनवाण्या स्वरांतल्या सांगण्या-मुळे प्रसाद थोडा बेचैन होत म्हणाला, ''अरे, हो कां? बरं, आता यावेळी चाळीस फूट खोल खणून पहा. तरीही पाणी नाही आलं तर पन्नास फूट खोल खणून घे. तेव्हां तरी पाणी अगदी अवश्य येईल.'' असे म्हणून त्याने आणखी थोडी रक्कम दिली.

चार आठवड्यांनी परशू परत आला. अतिशय दुःखित स्वरात, डोळयांत पाणी आणून तो म्हणाला, ''मालक, पन्नास फूट खोल खणूनही पाण्याचा एक थेंबसुद्धा आला नाही''. प्रसादला अतिशय आश्चर्य वाटले. शेजारपाजारच्या शेतांत असलेल्या सर्व विहीरींना भरपूर पाणी असताना आपल्या शेतांतच असे कां व्हावे ते त्याला समजेना. त्याची पत्नी, शांता त्याला म्हणाली, ''मला खरंच समजत नाही, हा परशू तिथे जाऊन काय करतो? तुम्ही माझं ऐका, तुम्हीच एकदा जाऊन कां नाही पहात?''

प्रसादने एक दिवसाची सुट्टी घेतली व परशूला घेऊन तो गांवी गेला. शेतांत जाऊन पाहिले तर तो चाकितच झाला. त्याला चक्कर आल्यासारखे झाले. शेतांत एक नाही, दोन नाही, तर तीन विहीरी त्याला दिसल्या. एक तीस फूट, दुसरी चाळीस फूट तर तिसरी पन्नास फूट!

प्रसादला माहित होते की परशू चतुर नाही पण त्याला हे माहित नव्हते की तो इतका मूर्ख असेल. मूर्खपणाला सुद्धां एक सीमा असते आणि याने तर सर्व सीमा पार केल्या होत्या. खरे तर प्रसादला अतिशय राग आला होता, त्याला शिव्या द्याव्यात, रागवावे असेही वाटले होते.

पण त्याचा कांही फायदा होणार नाही, म्हणून त्याने परशूला म्हटले, ''परशू, तू खूप मोठी चूक केलीस. तू प्रथम तीस फूट खोल जी विहिर खणलीस, तीच आणखी वीस फूट खोल खणायला हवी होतीस तेव्हां पाणी त्यांत अवश्य आले असते. एक तर माझे इतके पैसे उगाच व्यर्थ गेले आणि दुसरं म्हणजे शेतांत जिकडे तिकडे खड्डे झाले आहेत''.

प्रसादचे ते बोलणे ऐकून परशूच्या डोळ्यांत पाणी आले व तो त्याच्या पाया पडला. परशूला उठवत प्रसाद म्हणाला, ''जे झालं ते होऊन गेलं. आता त्यावर दुःख करून काय उपयोग? झालेली चूक आता सुधारायची असेल तर आपल्यापुढे आता एकच मार्ग आहे. बाकी सर्व विहीरीत माती भरून बंद करायच्या व एक विहीर आणखी थोडी खोल खणायची. पाणी अवश्य येईल. पण मला इथे राहता येणार नाही, उद्या कचेरीत गेलंच पाहिजे.'' असे म्हणून त्याने आणखी थोडे पैसे त्याला दिले.

इकडे शांता म्हणाली, ''परशूशिवाय आपल्या-जवळ आणखी कुणी नाही, आपण तरी काय करणार? विहीरीला पाणी आलं तर आपलं भाग्य समजायचं'' चिंता व्यक्त करीत शांता म्हणाली.

दोन तीन दिवसांतच परशू विहीरीला पाणी आल्याची खूषखबर घेऊन आला. अत्यानंदाने प्रसादने विचारले, ''किती फूट खोल खणल्यानंतर पाणी आलं?''

''साठ फूट खोल गेल्यानंतर पाणी आलं. कांहीही असो, आता आपल्या शेतांत पाण्याने भरलेली विहीर आहेच.'' परशू उत्साहाने म्हणाला.

परशूने राहिलेली रक्कम प्रसादला परत दिली. तेव्हां झालेल्या खर्चाचा हिशोब पाहात त्याने परशूला विचारले, ''बरं, कुठली विहीर माती भरून बंद केली व कुठली विहीर आणखी जास्त खणली?'' परशू नम्रपणे म्हणाला, ''जी प्रथम तीस फूट खोल खणली होती तीच विहीर आणखी तीस फूट खोल खणली. नंतर दोन खणलेल्या विहीरींत माती भरून त्या बंद केल्या.

त्याचे हे उत्तर ऐकून प्रसाद अवाक् होऊन जागल्या जागी स्तंभित झाला. तो म्हणाला, ''पन्नास फूट खोल खणलेली विहीर आणखी दहा फूट खणली असती तर काम झाले असते. तुझा मूर्खपणाची तर आता कमाला झाली!''.

इतका वेळ गप्प असलेली शांता मध्येच हस्तक्षेप करत म्हणाली, ''त्याचा मूर्खपणा सोडून द्या. तुम्ही पण कांही कमी नाही. तुम्हाला ज्यावेळी माहित होतं की परसूने दोन वेळां विहीर खणताना चूक केली आहे तेव्हा तिसऱ्या वेळीं तुम्ही त्याला काय करायला पाहिजे, कसं करायला पाहिजे, हे सर्व सविस्तर आधीच का नाही सांगितलं? इतका जो पैसा व्यर्थ खर्च झाला त्याला तुम्हीच जबाबदार आहात. काय? माझं म्हणणं बरोबर आहे ना?''



# टायडा मधले जंगल बेल्स्



पूर्वेकडील घाटांतील आंध्रप्रदेश मधे विशाखापट्टणम् पासून ७५ कि.मी. वर टायडा हे एक छोटे खेडे आहे. आंध्रप्रदेश टुरीझम डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन आणि राज्य वन विभाग यांनी मिळून निसर्गाचा अभ्यास करणाऱ्यांना प्रोत्साहन देण्यासाठी जंगल बेल्स नांवाची छावणी उभारली आहे. राज्यातील एकमेव अशी पर्यावरणाचे शिक्षण व नैसर्गिक परिस्थिती व जीव यांच्या परस्पर संबंधांचे दर्शन घडविणारी छावणी आहे.

जंगलबेल्स् निसर्ग छावणी ही २५ एकर जंगलभर पसरली आहे. इथे तुम्ही तंबू, लाकडी झोपडी, कॉटेज, किंवा डॉरमिट्रीमधे राहू शकता. कॉफीशॉप, निसर्ग ग्रंथालय, वॉच टॉवर्स, हॅमॉक्स् या तऱ्हेच्या आधुनिक सुखसोयी तिथे उपलब्ध आहेत.

वाटाड्यांच्या मदतीने तुम्ही जवळपासच्या जंगलात टेकड्यांवर, छोट्या खेड्यातून फिरुन येऊं शकता. आणि वेगवेगळे पक्षी देखील बघूं शकता. पक्षी निरीक्षकांना 'टायडा' ही मोठी पर्वणीच आहे. पक्षांच्या जवळपास ३५० जाती इथे दिसल्या आहेत. तुम्हाला खराखुरा 'जंगली' माणूस बनायचे असेल तर इथले शिक्षक तुम्हाला आनंदाने पंजांचे ठसे आणि प्राण्यांचे एकमेकांना बोलवण्याचे आवाज ओळखायला, प्राण्यांची घरे शोधायला, वाघाच्या डोळ्यात बघायला जर एखादा समोर आलाच तर, अशा वेगवेगळ्या कौशल्याच्या गोष्टी शिकवतील. टायडाच्या जंगलात स्पॉटेड् डिअर, बार्किंग डिअर, स्लॉथ बेअर, जंगली रानडुक्कर व चित्ते आहेत.

जवळच असलेल्या टेकड्यांवर तुम्ही 'रॉक क्लाइम्बिंग किंवा नुसतीच चक्कर मारुं शकता.

**तिथे जाण्यास :** तुम्ही वायझॅककहून भाड्याची गाडी ठरवूं शकता. परंतु ट्रेनचा प्रवास सगळ्यात चांगला. वायझॅक - टायडा मार्गावर हिरव्या गार टेकड्या, दऱ्या, धबधबे आणि खूप बोगदे आहेत. किंवा तुम्ही 'एपीटीडीसी' ची पॅकेजटूर घेऊन लाय टेक कोचमधून प्रवास करुं शकता.



# माया सरोवर

## 7

**(घोडदळातील सैनिकांकडून जयशीलला कळले कीं धर्ममित्र मंत्री डोंगरीतळ्याजवळ थांबलेले आहेत. आपल्या बरोबर मकरकेतुलाही तिकडे घेऊन जायचे त्याने ठरवलें. आता आपलं मरण कांही चुकत नाही असं मकरकेतुला वाटलें. कुठल्याही परिस्थितीत त्याला आता जिवंत ठेवणार नाहीत. म्हणून जलगृहाला पाणी पाजण्याच्या निमित्ताने तो त्याला पाण्यात घेऊन गेला. जयशील आणि सिद्धसाधक पण त्याच्या बरोबर पाण्यात गेले कारण त्यांना काळजी होती कीं हा आपल्याला फसवेंल. पण असंच झालं. जलग्रह सहित चौघेजण अकस्मात पाण्यात बुडाले.)**

जलग्रह अकस्मात पाण्यात बुडाला नाही तर पाण्याच्या तळाला तो वेगाने पुढे जाऊं लागला. त्याच्यावर स्वार झालेल्या जयशील व सिद्धसाधकाला त्याने वर येण्याची संधीच दिली नाही. सिद्धसाधक घाबरला जेव्हां त्याला वाटलें की आता आपण मरणार तेव्हां तो घाबरुन ''जय महाकाली'' असे ओरडूं लागला. जयशीलला त्याचं ओरडणं स्पष्ट ऐकू आलं. समोर बसलेला मकरकेतुही त्याला नीट दिसत होता. याचा अर्थ असा झाला कीं तो पाण्याच्या तळाजवळ आहे आणि तळात त्याला स्पष्ट दिसत आहे. आणि आवाजपण ऐकूं येत आहे. त्याला खूप आश्चर्य वाटलें.

जयशील मकरकेतुचा खांदा पकडत म्हणाला, ''अरे दुष्टा, हे तू काय केलेस? आम्हाला पाण्यात बुडवून मारणार आहेस कां?''



खदखदा हंसत मकरकेतु म्हणाला ''जयशील, आता आपण पाण्याच्या तळाशी आहोत. इतक्या खोल पाण्यात असताना देखील मानव श्वास घेऊन शकेल?'' बोलूं शकेल आणि बघूं शकेल?''

''जयशील हे काय चाललंय? आपण कुठें आहोत आणि हा आपल्याला कुठे घेऊन चालला आहे? जे काही होतंय सर्व महाकालीच्याकृपेने होतंय.'' चहूकडे बघंत साधक बडबडूं लागला. त्याच्या डोळ्यात भीती स्पष्ट दिसंत होती.

जलग्रह भराभर वेगाने पुढे जात होता. समोर पाण्यात डोंगरातल्या गुहेतून वेगाने पाणी बाहेर येत होते.

जलग्रहावर बसलेला मकरकेतु ''जलग्रह'' असं ओरडला. त्याला डोंगरातल्या गुहेकडे पळवत तो म्हणाला ''जयशील, सिद्धसाधक, गप्प कां बसलांत? विचार करतांय का कीं तुम्ही दोघं पाण्याखाली असून जिवंत कसे? याचं कारण माहिती आहे?''

''हो, हो, समजलं. जो पर्यन्त आम्ही जलग्रहाला पकडून ठेवूं तोपर्यंत आम्ही मानव देखील श्वास घेऊन जिवंत राहूं शकु.'' त्याच्या बोलण्यावरुन हे सहज कळंत होतं की तो जरा सुद्धा घाबरलेला नाही.

''तुला बरोबर समजलं आहे. पण मग तुझा हात या तलवारीच्या मुठीवर कशाला?'' तो कुत्सितपणे म्हणाला.

''तुझं डोकं उडवायलां. जलग्रहाला पाण्याच्यावर आणतोस की नाही?'' जयशील रागाने म्हणाला.

सिद्धसाधक त्रिशूळ उचलत म्हणाला ''जय महाकाली, आत्तापर्यन्त पाण्याखाली प्राण्याचा बळी देणारा भक्त तू पाहिला नसशील. पण आज हे नवल घडणार आहे.'' असं म्हणंत त्याने मकरकेतुच्या गळ्यावर त्रिशूळ रोखला.

मकरकेतु जोरात हंसत म्हणाला, ''मी तुमची आज्ञा पाळणार नाही. त्यासाठी तुम्ही दोघं माझं डोकं उडवणार का? पण याद राखा. तुम्ही जर असं केलं तर पाण्यात जगण्याची तुमची शक्ती नाहीशी होईल. आणि तुमची प्रेतं पाण्याबर तरंगतील.''

मकरकेतुचे हे बोलणे ऐकून त्यांना कळले की ते आता मकरकेतुचे बंदी आहेत. आता त्यांना भीती वाटूं लागली.

तेवढ्यात एक मोठी मगर एका मोठ्या माशाचा पाठलाग करंत त्यांच्या रोखाने आली. तिला सहज दूर फेकत मकरकेतु म्हणाला ''जयशील, तुम्ही



दोघं माझे कैदी नाही की मी तुमचा कैदी नाही. जलग्रह जेव्हां त्याबाजूच्या डोंगराच्या पाण्यात जाईल तेव्हां तुम्ही दोघं निर्विघ्नपणे जाऊं शकता.''

अर्ध्यातासांत जलग्रह तिथे पोचला. मकरकेतुच्या आज्ञेप्रमाणे तो पृष्ठभागावर तरंगत सोंड उचलून ललकाऱ्या देऊं लागला. जयशील व सिद्धसाधकाने स्वत:ला एक चिमटा काढला आणि जिवंत असल्याची खात्री पटून खुष झाले. जयशीलने मकरकेतुला विचारले ''मकरकेतु, हेच कां ते मायासरोवर?''

मकरकेतुने याचे उत्तर लगेच दिले नाही. आपल्या शरीरावर रोखलेल्या त्रिशूळ व तलवारीकडे पुन्हा पुन्हा पाहात तो म्हणाला ''या पाण्यातल्या उपचाराने माझा त्रास जरा कमी झाला आहे. ही सगळी सरोवेश्वराची कृपा.'' मग जयशीलकडे वळून तो म्हणाला ''जयशील, हे माया सरोवर नाहीये. ज्या मानवांनी मायासरोवर बघितलं आहे ते आजपर्यन्त जिवंत परत आलेले नाहीत.''

जयशील आणि कांही बोलणार इतक्यात मकरकेतु ''जलग्रह'' असे ओरडला. जयशील आणि सिद्धसाधकाच्या लक्षांत आले की ते भोवऱ्यांत अडकणार आहेत. त्यांनी जलग्रहावरुन खाली उड्या मारल्या व पाण्यात पोहूं लागले. तेव्हां पाण्यातून वाहात येणारा एक वृक्ष त्यांना दिसला. दोघांनी त्याच्या फांद्यांना पकडले आणि धडपडंत ते झाडाच्या फांद्यावर चढून बसले. तेवढ्यात त्यांना दिसलं की झाडाच्या शेंड्यावर एक वाघ आपल्या पुढच्या दोन पायांनी एक



फांदी पकडून उलटा लोंबकळंत आहे. झाड पाण्यात खालीवर होत जवळ आलेल्या धबधब्यातून जात खाली कोसळूं लागले. जयशील व सिद्धसाधकाला आता आपला शेवट आला आहे असं वाटून भीतीने दोघांनी डोळे मिटून घेतले.

डोंगरावरुन धबधबा जिथे कोसळंत होता तिथे छोटे मोठे खडक पसरलेले होते. झाड मध्यांत तुटून त्याचा एक भाग मोठ्या खडकावर आदळला. त्यामुळे त्याचे दोन तुकडे झाले. एकावर जयशील तर दुसऱ्यावर सिद्धसाधक आणि वाघ. थोड्यावेळाने जयशीलने डोळे उघडले आणि चोहीकडे नजर फिरवली. त्याच्या शरीराचा अर्धा भाग पाण्यात होता. डोकं एका खडकाजवळ होते. लांबून धबधब्याचा खळखळाट जोरात ऐकूं येत होता.



"अरे, हे काय? मी जिवंत आहे." असा विचार करत तो उठला. तेवढ्यात त्याला सिद्धसाधकाची आठवण झाली. तो कुठे असेल असा विचार करंत तो त्याला सगळीकडे शोधूं लागला. पण त्याला सिद्धसाधक कुठेही दिसला नाही.

सिद्धसाधक कुठे दिसत नाही म्हणून त्याला वाईट वाटले आणि काही अनर्थ तर झाला नसेल ना अशी भीतीही वाटूं लागली. त्याला सगळ्या जुन्या गोष्टी आठवूं लागल्या आणि त्याच्या विषयी मनात माया दाटून आली.

जयशील ताबडतोब तिथून निघाला आणि आजूबाजूला पसरलेल्या झाडीतून पुढे जाऊं लागला. अचानक त्याला वाघाची डरकाळी ऐकूं आली. तेव्हां त्याला धबधब्यात अडकलेल्या वाघाची आठवण आली.

"वाघाने साधकाला खाऊन तर टाकले नाही नां?" असा विचार करंत त्याने म्यानातून तलवार बाहेर काढली आणि वाघाच्या ओरडण्याच्या दिशेने तो पुढे जाऊं लागला.

तिथे पोचल्यावर त्याला दिसलं की सिद्धसाधक बेशुद्ध होऊन एका ठिकाणी पडला आहे. वाघाच्या मागल्या पायांना खूप जखमा झाल्या आहेत. आणि पुढल्या पायांवर सरपटंत तो सिद्धसाधकाच्या दिशेने सरकंत आहे.

जयशीलने एक दगड त्याच्या अंगावर फेकला. दगड लागताच तो मागे वळला आणि डरकाळ्या फोडूं लागला.

ते ओरडणे ऐकून सिद्धसाधक शुद्धीवर आला. घाबरंत त्याने डोकं वर केलं. बघतो तर काय वाघ अगदी समोर उभा. "महाकाली, माझं रक्षण कर." असं तो ओरडूं लागला.

जयशीलच्या लक्षात आलं की वाघाचे मागले पाय मोडलेले आहेत. तेव्हां त्याने वाघाचे मागले पाय घट्ट पकडून त्याला ओढत लांब नेले. सिद्धसाधक उठंत म्हणाला, "जयशील तू इथे आहेस? वाघाच्या ओरडयाने मी शुद्धीवर आलो."

वाघाची वाईट अवस्था बघून जयशीलला दया आली. त्याच्याकडे बघंत तो म्हणाला "धबधब्यातून खाली खडकावर पडल्यामुळे वाघाचे मागचे दोन्ही पाय मोडले आहेत. त्याच्या अंगात आता शिकार करण्याएवढी ताकद उरली नाही. कसंही असलं तरी याला मारावंस वाटत नाही." पाण्याच्या काठांवर साधकाला आपला त्रिशूळ मिळाला. जयशील कडून त्याची तलवार



घेत तो म्हणाला "हा वाघ नरकयातना भोगतो आहे.

मला त्याची तडफड बघवंत नाही. त्याला या दुःखातून मुक्त करुं या. यातच पुण्य आहे." असं म्हणून त्याने एका घावात धडापासून डोकं उडवलं.

जयशील काळजीत होता. एक निश्वास सोडून तो म्हणाला "आपण मकरकेतूला सोडायला नको होतं."

"जयशील, जे झालं ते झालं. आता आपल्याला जे झालं त्याचा विचार न करता जे होणार आहे त्याचा विचार केला पाहिजे. आता प्रश्न असा आहे की आपण कुठे आहोत? आणि हा कोणता प्रदेश आहे?" सिद्धसाधक म्हणाला.

जयशील कांही बोलणार एवढ्यांत नदीच्या खालच्या भागातल्या झाडीतून एका माणसाचे आणि डोंगरी मेंढ्याचे ओरडणे ऐकूं आले.

"डोंगरी मेंढ्याने कोणा माणसाला पकडले आहे की माणसाने मेंढ्याचे मानगूट धरले आहे? दोघांवर कांहीतरी संकट आलय असं दिसतंय. चल, तिकडे जाऊं या." सिद्धसाधक म्हणाला.

दोघं आवाजाच्या दिशेने जाऊं लागले. थोडं दूर गेल्यावर त्यांना एक दृश्य दिसले. ते बघून ते आश्चर्यचकित झाले आणि घाबरले देखील. पाण्याजवळच्या एका मोठ्या वृक्षाच्या फांद्यांना एक बुटका माणूस आणि एक मेंढा लटकलेले होते.

हे बघून सिद्धसाधक त्रिशूळ उचलंत म्हणाला "या दोघांना कोणा भुताने जखडून ठेवलेलं दिसतंय. माझं त्रिशूळ त्याच्या हृदयाच्या आरपार घालतो." असं म्हणून तो त्रिशूळ



फेकणार एवढ्यांत झाडाच्या एका फांदीने वाकून त्याचा खांदा पकडला. एका झटक्यात उडी मारुन सिद्धसाधक झाडापासून दूर जात म्हणाला "जयशील सांभाळून, ज्याने या दोघांना जखडलं आहे, ते भूत नसून राक्षस आहे."

जयशील कांही न बोलता त्या झाडाजवळ आला आणि तलवारीने झाडाची फांदी छाटली. मेंढा आणि बुटका नदीत पडले.

बुटका थरथरंत नदीतून बाहेर आला आणि त्या दोघांना नीट निरखून बघितल्यांवर नम्रपणे म्हणाला, "महाशय, तुम्ही या सेनापतीला माणसे खाणाऱ्या झाडांपासून वाचवले आहे. धन्यवाद. आमची महाराणी आपल्याला नक्की बक्षिस देईल."

त्याचे बोलणे संपण्या आधीच झाडांमागून आवाज येऊं लागला. दुसऱ्याक्षणी त्यांना रथांत



बसून येणारी एक बाई दिसली. तिने हरणाचे कातडे घातले होते. बगळा आणि मोराच्या पिसांपासून बनवलेला मुगुट घातला होता. तिच्या रथाला डोंगरी मेंढे जुंपलेले होते. रथाच्या मागे आणि दोन्ही बाजूला मेंढ्यांवर स्वार, हातात भाले घेतलेले कितीतरी बुटके होते.

ते दिसल्याबरोबर बुटका सेनाधिपती पुढे होऊन म्हणाला ''महाराणी!'' मग त्याने त्या बुटक्या बाईला वाकून मुजरा केला आणि जयशील व सिद्धसाधकाची ओळख करून देत म्हणाला ''या दोघांनी मला त्या नरभक्षक झाडापासून वाचवलें.''

बुटकीराणी म्हणाली ''अती उत्तम!'' मग त्या दोघांकडे वळून म्हणाली ''हे वीरांनो काल रात्री मी तुम्हाला स्वप्नात बघितले. तुम्ही प्रतिज्ञा केली होती कीं तुम्हीं मागर्डकारीच्या शत्रुंचां नाश कराल. आणि आम्हाला चिरंतर स्वरुपाची सुरक्षा मिळवून द्याल. ते दोघं तुम्हीच आहात नां?''

''ही राणी चांगली चलाख दिसते आहे. जयशील, आपल्याला सावध राहिले पाहिजे.'' साधक हळूंच जयशीलला म्हणाला. ''बोलण्यांत अगदी तरबेज आहे. काय माहिती या खुजांना कोणापासून धोका आहे? यांना चांगली भरपुर मदत करूं या.'' जयशील म्हणाला.

सिद्धसाधक अनिच्छेने डोकं हलवंत म्हणाला ''जयशील, आपण एक मोठं काम करायला निघालो आहोत. असं असताना या छोट्या कामात पडुन आपला अमूल्य वेळ कां घालवायचा?''

''साधक, कनकाक्ष राजाच्या मुलाच्या प्राणां प्रमाणे यांचे प्राण देखील मोलाचे आहेत. यांना कोणापासून धोका आहे ते तरी पाहूंया. यांचे रक्षण करणे हा पण आपला धर्म आहे.'' जयशील म्हणाला.

इतक्यात जवळच्या डोंगराच्या टेकाडावरुन एक भयानक चित्कार ऐकूं आला. सगळे तिकडे बघूं लागले. सुमारे दहाबारा फुटी उंच भयानक आकृती तिथे उभी होती. तिच्या हातात एक मोठा धोंडा होता. तिच्या कमरेला एक साखळदंड बांधलेला होता. एका हाताने साखळदंड पकडुन दुसऱ्या हातात तलवार घेऊन एक माणूस तिथे उभा होता.

त्या भयानक आकृतीला बघून खुजा राणीसकट तिचे सर्व अनुयायी थरथर कापूं लागले. भयानक आकृतीच्या जवळ उभा असलेला आपल्या तलवारीने त्याची पाठ घासूं लागला. ती भयानक आकृती धोंडा हातात घेऊन इकडे तिकडे डोलूं लागली.

जयशील सिद्धसाधकाला म्हणाला, ''साधक, या भयानक प्राण्याला माणासाळवून खेळणारा खेळाडू खुजा नसून आपल्या सारखाच मानव आहे. हा कोणता प्राणी असेल बरं?'' मग राणीकडे वळंत म्हणाला ''महाराणी, आपण ज्या शत्रुविषयी बोलंत होता तो, ही भयानक आकृती व तिच्या बरोबर असलेला माणूसंच कां?

राणी थोडा सावरली होती. रथातून खाली उतरुन यां दोघांसमोर येत ती म्हणाली ''हे महावीरांनो आमचा शत्रु कोणी दुसरा नाहीये. तर पर्वताच्या त्या बाजूला राहाणारे आमच्याच जातीचे लोक आहेत. परंतु त्यांचं असं म्हणणं आहे की ते यक्ष जातीचे असून आमच्यापेक्षा श्रेष्ठ आहेत. या गोष्टीचा त्यांना फार अभिमान आहे. आणि ते आमचा सर्वनाश करायला निघाले आहेत.

त्यांनी तर असले भयंकर प्राणी पाळले आहेत. असे प्राणी असताना तुम्हाला हरविणे आणि आपले गुलाम बनविणे त्यांना सहज शक्य आहे. पण ते असं का नाही करुं शकले?'' जयशीलने आपली शंका विचारली.

''महाशय, ते भयानक प्राणी नरवानर आहेत आणि त्यांच्याहातून जो धोंडे फेकवतोय तो तुमच्यासारखा मानव आहे.

या दोघांनी दहा दिवसांपूर्वी आमच्या शत्रुशी मैत्री केली.'' बुटकीराणी म्हणाली.

राणीचे बोलणे संपतासंपताच नरवानर जोरात ओरडला आणि त्याने तो धोंडा बुटक्यांवर फेकला.

(क्रमशः)



# सर्वोत्तम परिपूर्ण

होजा नासिरुद्दिन मित्राबरोबर कॉफी पीत बसला होता. तेवढ्यांत अजून एक मित्र आला आणि मोठ्या आनंदात त्याला सलाम केला. व म्हणाला, "पुढल्या आठवड्यांत मी लग्न करतो आहे. मला खूप छान वाटतंय. पण होजा साहेब, तुम्ही कां नाही कधी लग्न करण्याचा विचार केला?"

"अरे, मी केला होता बाबा, पण ती खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे." होजा म्हणाला.

"कां? काय झालं? तुम्हाला कोणी योग्य मुलगी सापडली नाही कां?" मित्राने विचारले.

"नाही, तसं कांही नव्हतं. मी तरुण असताना एकदा सर्वोत्तम परिपूर्ण अशी बायको शोधायला निघालो. मी दऱ्या खोऱ्यांतून, डोंगरापलीकडे खूप लांब प्रवास केला. शेवटी डोंगरउतरणीवर एका छोट्याशा गांवात मला एक सुंदर मुलगी भेटली. ती शहाणी तशी दयाळु पण होती. पण तिला जगाचा अनुभव नव्हता. त्यामुळे मला वाटले की ती मला माझ्या दैनंदिन कामात मदत करुं शकणार नाही. म्हणून मी तिच्याशी लग्न केले नाही. मी आणखी पुढे प्रवास केला. आणि एका शहरांत आलो. तिथे मला जातिवंत सुंदर मुलगी भेटली. ती हुषार आणि दयाळु होती व तिला जगाचा अनुभव पण होता. ती जवळ जवळ परिपूर्ण होती."

"मग? कुठं घोडं अडलं? होजाचे बोलणं ऐकणारे दोन्ही मित्र एकदम म्हणाले "तू तिच्याशी लग्न कां नाही केलंस?"

"काय करणार, ती आपली भाषा बोलूं शकत नव्हती आणि मी तिची." होजा म्हणाला. "म्हणून मला वाटलं, जिच्याशी आपल्याला बोलता येणार नाही तिच्याशी लग्न करुन काय उपयोग? म्हणून मी आणखी पुढे गेलो. आणि इजिप्तला पोचलो. तिथे ती मला सापडली. ती सर्वदृष्टीने परिपूर्ण होती. ती सुंदर व दयाळु होती. तिला जगाची रीत माहिती होती. ती भावीक होती आणि मला बोलायला आवडणारी भाषा पण तिला येत होती. मला लगेच लक्षांत आले की आपल्याला सर्वोत्तम परिपूर्ण बायको सापडली आहे."

"ओह, होजा! तू अशा मुलीला कसं जाऊं दिलंस? तू तिच्याशी लग्न कां नाही केलंस?" मित्र म्हणाले.

"देवारे देवा!" दुःखाने डोकं हलवंत होजा म्हणाला, "मी काय करणार? ती सर्वोत्तम परिपूर्ण नवरा शोधंत होती."



राजा विक्रम व वेताळाच्या नव्या कहाण्या

# सत्यशोधक

निश्चयी विक्रमार्क परत झाडाजवळ गेला. त्याने झाडावरून शव काढले, आपल्या खांद्यावर घेतले व नेहमीप्रमाणे स्मशानाच्या दिशेने तो चालू लागला. तेव्हां शवाच्या आत असलेल्या वेताळाने बोलायला सुरवात केली, "राजा, अज्ञान आणि मूर्खपणा यांच्याही काही सीमा असतात. पण तू या सीमांच्या पार पलिकडे जात आहेस. मी तुला पुनःपुन्हा विचारलं की तुझं ध्येय काय आहे, पण तू कधीच उत्तर दिलं नाहीस. मी कितीतरी ज्ञानी, विवेकी व तपस्वी व्यक्तिंना पाहिले आहे ज्यांनी काहीतरी चुका केलेल्या आहेत, नीट विचार न करता चुकीचे निर्णय घेतले आहेत. त्यामुळे आपल्या



ध्येयापासून ते दूर जातात व त्यांच्या जीवनाचा चक्काचूर होतो. तुला योग्य मार्गावर आणणं माझं कर्तव्य आहे. ह्या कर्तव्याने प्रेरित झाल्यामुळे शशांक नावाच्या एका तपस्वीची कथा मी तुला सांगणार आहे.'' असे म्हणून वेताळाने शशांकाची गोष्ट सांगायला सुरवात केली.

शशांक सुवर्णपुरीच्या राजपुरोहिताचा एकुलता एक मुलगा होता. लहानपणापासूनच शशांकला सांसरिक विषयांची आवड नव्हती. हळूहळू तो विरक्त बनत गेला व लौकिक सुखांचा त्याग करून जवळच्या अरण्यात तपश्चर्या करू लागला.

काही वर्षे त्याने घोर तपश्चर्या केली. त्यानंतर त्याने कंदमुळे, फळे इत्यादि खाणेसुद्धा थांबवले. फक्त तुळशीचे पाणी पिऊन तो राहू लागला. तपश्चर्या करून त्याने अनेक गोष्टींवर ताबा मिळवला, अनेक विद्या अवगत करून घेतल्या, अलौकिक सामर्थ्य प्राप्त करून घेतले. तो पाण्यावर चालू शकत असे, हवेत त्याला उडता येत असे. पण या सर्वांना तो महान शक्ती मानायला तयार नव्हता. त्याला वाटे की या सर्व विद्या क्षणभंगुर आहेत, व मृत्यूवर जय मिळवणे, ती जी शक्ती आहे ती सर्वात उच्च आहे व शाश्वत आहे. ही शक्ती मिळवण्यासाठी तो पुन्हा घोर तपश्चर्या करू लागला.

शशांकच्या या तपश्चर्येमुळे गंधर्व लोकात खळबळ माजली. त्यांच्या मनात भीती निर्माण झाली. गंधर्व राजाला वाटले की आपले सिंहासन मिळावे म्हणूनच तो ही तपश्चर्या करत आहे. म्हणून त्याने निश्चय केला की शशांकच्या हातून काहीतरी पाप घडवावे व त्याची तपश्चर्या निष्फळ करावी. त्यासाठी त्याने एक उपायसुद्धा शोधला.

गंधर्व राजा दैवज्ञाचे रूप धारण करून सुवर्णपुरी गावात गेला व तिथल्या राजाला भेटून म्हणाला, ''महाराज, आपला पुत्र, स्वर्णकीर्तिमध्ये संपूर्ण जगाचा सम्राट होण्याची क्षमता आहे. पण त्यात अडचण आहे, आणि पिता या नात्याने ती दूर करणे तुमचे कर्तव्य नाही कां?''

''अवश्य, अवश्य. काय करायला पाहिजे सांग, मी ते करीन.'' राजा म्हणाला.

''सर्वजीवकोटि यज्ञ करायला हवा. म्हणजे तुमच्या राज्यात जितके पशू, पक्षी आहेत ते सर्व यज्ञात बळी द्यावे लागतील.'' दैवज्ञ



म्हणाला, ''पण यात एक अट आहे,'' तो पुढे म्हणाला, ''काय, कसली अट?'' राजा म्हणाला.

''पशू-पक्ष्यांचा बळी साधारण माणसाच्या हाताने नव्हे तर एका तपस्व्याच्या हाताने द्यायला हवा आणि हा तपस्वी इंद्रियांवर विजय मिळवलेला व ज्याने एक वर्षभर सतत तुळशीचे पाणी पिऊन तप केलं आहे असा तपस्वी हवा.''

''अरे बापरे, असा तपस्वी कुठे मिळणार?'' राजा म्हणाला.

''प्रयत्न केला तर अवश्य मिळेल. तुमच्या इच्छा-आकांक्षा सफल होऊं देत. विजयी भव.'' असे म्हणून दैवज्ञ निघून गेला.

राजाला आपला मुलगा सम्राट होणार म्हणून अतिशय आनंद झाला होता. एका पित्याला, एका राजाला याहून अधिक काय हवे असते? त्याने निश्चय केला की कसेही करून हा यज्ञ करायचाच. त्याने राज्यात दवंडी पेटवली की राज्यात असतील तितक्या प्रकारचे पशू-पक्षी पकडून ठेवा व यज्ञात त्यांचा बळी द्यायची तयारी ठेवा, हा सर्वजीवकोटि यज्ञ जनतेच्या कल्याणासाठी केला जात आहे व त्यासाठी अशा एका तपस्व्याची जरूर आहे की ज्याने आपल्या इंद्रियांवर काबू मिळवलेला आहे. या घोषणेद्वारे लोकांना विनंती केली गेली की असा तपस्वी कुणाला माहिती असल्यास त्यांनी राजाला कळवावे.

या घोषणेनंतर पाचव्या दिवशी एक भिल्ल राजाला भेटायला आला. त्याने राजाला



सांगितले की जंगलात तुळशीचे पाणी पिऊन तप करणारा एक तपस्वी त्याने पाहिला आहे.

राजाने मंत्र्याला बोलावून लगेच तपस्व्याला कसेही करून घेऊन यायला सांगितले.

मंत्र्याने तपस्वी शशांकला सर्व वृत्तांत सविस्तर सांगितला व म्हटले - ''या यज्ञामुळे राज्याचे व सर्व जनतेचे कल्याण होणार आहे, व ते फक्त आपल्या हातांनी यज्ञ केला तरच साध्य आहे. राजा आपल्याला त्यासाठी हवे ते द्यायला तयार आहे. ते आपल्याला प्रमुख सल्लागाराची जागासुद्धा देतील. भविष्य निर्माण करणाऱ्या नव्या पिढीला आपण ज्ञानदान करू शकता, त्यांना चांगले नागरिक बनवू शकता, त्यासाठी आपल्या आश्रमाजवळ गुरूकुलाची स्थापना करतील.'' पण शशांकने सर्वांना नकार



देत म्हटले - ''यज्ञाच्या नांवाने सजीव प्राण्यांचे बलिदान देणे पाप आहे. हे माझ्या तत्वांच्या विरुद्ध आहे.''

''राजा आपल्यासाठी प्रशांत उद्यानाच्या मध्यात एक भव्य अलिशान बंगला बांधून देतील व त्यात सर्व प्रकारच्या सुखसोई उपलब्ध असतील.'' मंत्री म्हणाला.

''मी एक तपस्वी आहे आणि या जीवनातच मला खरा आनंद मिळतो. माझ्या ध्येय-सिद्धीसाठी हे जंगलच सर्वात अनुकूल स्थळ आहे.'' शशांकने ठामपणे म्हटले.

या तपस्व्याला समजावणे सोपे नाही असे दिसताच मंत्री परत राजधानीला आला. राजाला सर्व समजताच तो म्हणाला, ''जा, त्या तपस्व्याला सांगा की मी माझ्या मुलीचे लग्न त्याच्याशी लावून देईन आणि माझे राज्यही त्याला देईन.''

राजाचे ते बोलणे ऐकून राजकुमारी भार्गवीला आश्चर्याचा धक्का बसला. तिच्या चेहऱ्यावरचे भाव पाहून राजा तिला म्हणाला, ''घाबरूं नकोस मुली! प्रथम यज्ञ तरी होऊ दे. नंतर काय करायचं मी पाहून घेईन.''

वडिलांचे हे बोलणे भार्गवीला आवडले नाही. पण जनकल्याणाचा विचार मनात धरून ती गप्प बसली.

राजकुमारी भार्गवी देखील मंत्र्याबरोबर जंगलात गेली. मंत्र्याने तपस्व्याला म्हटले ''साधुमहाराज, जर आपण येऊन यज्ञ केला तर ही राजकुमारी भार्गवी आपली धर्मपत्नी होईल. राजा मार्तण्डवर्मानंतर सुवर्णपुरीचे राजे आपणच व्हाल, हे राजाचे वचन आहे.''

शशांकने राजकुमारीला पाहिले आणि तो पाहातच राहिला. तिचे मुग्ध करणारे सौंदर्य पाहून तो आपल्या जीवनाचे उदात्त, उच्च ध्येय विसरला व तो म्हणाला, ''या सौंदर्यलताङ्गीशी लग्नही करीन आणि राज्याचा राजाही होईन.''

सुवर्ण रथात बसून तिघेही स्वर्णपुरीला निघाले.

महान यज्ञाची तयारी केली गेली. हजारो पशू-पक्षी मोठ्या प्रांगणात आणले गेले. राजा आणि मंत्र्याबरोबर शशांकही हातात खड्ग घेऊन यज्ञाच्या जागी आला. यज्ञकुंडात पहिला बळी द्यायला एक हत्ती आणला होता. त्याचा बळी द्यायला शशांकने हातातले खड्ग वर उचलले आणि घाबरलेला हत्ती मोठ-मोठ्याने



विचित्र आवाज करू लागला. तेव्हां तिथे असलेले बाकीचे सर्व प्राणीही दीनपणे विचित्र आवाज करू लागले.

शशांकची तंद्री एकदम भंगली व त्याने खड्ग दूर फेकून दिले. राजाला तो म्हणाला, ''क्षमा करा महाराज, मी हे पाप करणार नाही. उलट पाप करण्याची प्रवृत्ती माझ्यात निर्माण झाली म्हणून त्याचे प्रायश्चित घेईन. कृपया मला परवानगी द्या.'' असे म्हणून शशांक भरल्या जनतेच्या सभेतून निघून गेला.

वेताळाने शशांकची गोष्ट सांगून झाल्यावर म्हटले - ''राजा, शशांक राजकुमारीचे अप्रतिम सौंदर्य पाहून बेहद्द खुष झाला. राजा होण्याच्या मोहाने तो प्राण्यांचे बलिदान द्यायलाही तयार झाला. पण प्राण्यांचे बलिदान देण्यापूर्वी अचानक त्याच्या मनात परिवर्तन कां झाले? माझ्या प्रश्नाचे उत्तर माहित असूनही तू गप्प राहिलास तर तुझ्या डोक्याचे तुकडे तुकडे होतील.''

राजा विक्रमार्क म्हणाला, ''शशांकच्या मनात अकस्मात परिवर्तन झालं पण त्याला कारण कुठलंही भय नव्हे की त्याच्या मनाची चंचलता नव्हे, पण इथे एक गोष्ट आपल्याला विसरून चालणार नाही की शशांकला सांसरिक विषयात प्रथमपासूनच अभिरुचि नव्हती. तो एक सत्यशोधक होता. असा एक विरक्त माणूस राजकुमारीला पाहून मोहित झाला आणि राज्य मिळणार व मोठा राजा होणार या आशेने मंत्री व राजकुमारीसह सुवर्णपुरीला गेला, या सर्वांमागे गंधर्वांचे मायाजाल होते. याचा अर्थच असा होतो की गंधर्वांनी त्याच्या मनात भ्रम निर्माण केला. परंतु हत्तीचा चित्कार व इतर प्राण्यांच्या दीन रूदनाने त्याचा भ्रम दूर केला गेला, मायाजालातून तो बाहेर आला. त्याच क्षणी त्याला कळलं की आपण कित्ती मोठा अपराध करायला जात होतो. म्हणून लगेच त्याने राजाची क्षमा मागितली व आपले जीवन-ध्येय साधण्यासाठी तो परत तपस्या करण्याकरता जंगलात निघाला.''

राजाने मौन-भंग करताच वेताळ आपला विजय सिद्ध करण्यासाठी शवासमेत अदृश्य झाला व पुन्हा झाडावर जाऊन बसला.





देत म्हटले - ''यज्ञाच्या नांवाने सजीव प्राण्यांचे बलिदान देणे पाप आहे. हे माझ्या तत्वांच्या विरुद्ध आहे.''

''राजा आपल्यासाठी प्रशांत उद्यानाच्या मध्यात एक भव्य अलिशान बंगला बांधून देतील व त्यात सर्व प्रकारच्या सुखसोई उपलब्ध असतील.'' मंत्री म्हणाला.

''मी एक तपस्वी आहे आणि या जीवनातच मला खरा आनंद मिळतो. माझ्या ध्येय-सिद्धीसाठी हे जंगलच सर्वात अनुकूल स्थळ आहे.'' शशांकने ठामपणे म्हटले.

या तपस्व्याला समजावणे सोपे नाही असे दिसताच मंत्री परत राजधानीला आला. राजाला सर्व समजताच तो म्हणाला, ''जा, त्या तपस्व्याला सांगा की मी माझ्या मुलीचे लग्न त्याच्याशी लावून देईन आणि माझे राज्यही त्याला देईन.''

राजाचे ते बोलणे ऐकून राजकुमारी भार्गवीला आश्चर्याचा धक्का बसला. तिच्या चेहऱ्यावरचे भाव पाहून राजा तिला म्हणाला, ''घाबरू नकोस मुली! प्रथम यज्ञ तरी होऊ दे. नंतर काय करायचं मी पाहून घेईन.''

वडिलांचे हे बोलणे भार्गवीला आवडले नाही. पण जनकल्याणाचा विचार मनात धरून ती गप्प बसली.

राजकुमारी भार्गवी देखील मंत्र्याबरोबर जंगलात गेली. मंत्र्याने तपस्व्याला म्हटले ''साधुमहाराज, जर आपण येऊन यज्ञ केला तर ही राजकुमारी भार्गवी आपली धर्मपत्नी होईल. राजा मार्तण्डवर्मानंतर सुवर्णपुरीचे राजे आपणच व्हाल, हे राजाचे वचन आहे.''

शशांकने राजकुमारीला पाहिले आणि तो पाहातच राहिला. तिचे मुग्ध करणारे सौंदर्य पाहून तो आपल्या जीवनाचे उदात्त, उच्च ध्येय विसरला व तो म्हणाला, ''या सौंदर्यसम्राज्ञीशी लग्नही करीन आणि राज्याचा राजाही होईन.''

सुवर्ण रथात बसून तिघेही स्वर्णपुरीला निघाले.

महान यज्ञाची तयारी केली गेली. हजारो पशू-पक्षी मोठ्या प्रांगणात आणले गेले. राजा आणि मंत्र्याबरोबर शशांकही हातात खड्ग घेऊन यज्ञाच्या जागी आला. यज्ञकुंडात पहिला बळी द्यायला एक हत्ती आणला होता. त्याचा बळी द्यायला शशांकने हातातले खड्ग वर उचलले आणि घाबरलेला हत्ती मोठ-मोठ्याने



विचित्र आवाज करू लागला. तेव्हां तिथे असलेले बाकीचे सर्व प्राणीही दीनपणे विचित्र आवाज करू लागले.

शशांकची तंद्री एकदम भंगली व त्याने खड्ग दूर फेकून दिले. राजाला तो म्हणाला, ''क्षमा करा महाराज, मी हे पाप करणार नाही. उलट पाप करण्याची प्रवृत्ती माझ्यात निर्माण झाली म्हणून त्याचे प्रायश्चित घेईन. कृपया मला परवानगी द्या.'' असे म्हणून शशांक भरल्या जनतेच्या सभेतून निघून गेला.

वेताळाने शशांकची गोष्ट सांगून झाल्यावर म्हटले - ''राजा, शशांक राजकुमारीचे अप्रतिम सौंदर्य पाहून बेहद्द खुष झाला. राजा होण्याच्या मोहाने तो प्राण्यांचे बलिदान द्यायलाही तयार झाला. पण प्राण्यांचे बलिदान देण्यापूर्वी अचानक त्याच्या मनात परिवर्तन कां झाले? माझ्या प्रश्नाचे उत्तर माहित असूनही तू गप्प राहिलास तर तुझ्या डोक्याचे तुकडे तुकडे होतील.''

राजा विक्रमार्क म्हणाला, ''शशांकच्या मनात अकस्मात परिवर्तन झालं पण त्याला कारण कुठलंही भय नव्हे की त्याच्या मनाची चंचलता नव्हे, पण इथे एक गोष्ट आपल्याला विसरून चालणार नाही की शशांकला सांसरिक विषयात प्रथमपासूनच अभिरुचि नव्हती. तो एक सत्यशोधक होता. असा एक विरक्त माणूस राजकुमारीला पाहून मोहित झाला आणि राज्य मिळणार व मोठा राजा होणार या आशेने मंत्री व राजकुमारीसह सुवर्णपुरीला गेला, या सर्वांमागे गंधर्वांचे मायाजाल होते. याचा अर्थच असा होतो की गंधर्वांनी त्याच्या मनात भ्रम निर्माण केला. परंतु हत्तीचा चित्कार व इतर प्राण्यांच्या दीन रूदनाने त्याचा भ्रम दूर केला गेला, मायाजालातून तो बाहेर आला. त्याच क्षणी त्याला कळलं की आपण कित्ती मोठा अपराध करायला जात होतो. म्हणून लगेच त्याने राजाची क्षमा मागितली व आपले जीवन-ध्येय साधण्यासाठी तो परत तपस्या करण्याकरता जंगलात निघाला.''

राजाने मौन-भंग करताच वेताळ आपला विजय सिद्ध करण्यासाठी शवासमेत अदृश्य झाला व पुन्हा झाडावर जाऊन बसला.



      



# देवांबरोबर जुगार



शहर जुगाऱ्यांच्या अड्ड्यांनी भरलेले होते पण या कलेत अनाथ सोमदत्ता इतका पटाईत कुणीच नव्हता. केव्हांही तो जुगार खेळला की न चुकता जिंकीत असे. त्यामुळे इतर जुगारी त्याच्याशी खेळायला तयार नसंत यांत कांही नवल नव्हतें. पण सोमदत्त इतका उदार होता की त्याला जुगारात मिळालेला पैसा तो सगळाच्या सगळा गरजू लोकांना देत असे.

गावाच्या वेशीजवळ एका गुहेत एक सिद्धपुरुष राहात असंत. सोमदत्तला त्यांच्याबद्दल खूप आदर वाटंत असे. तो त्यांच्यासाठी नेहमी रसाळ फळे व खाण्याचे पदार्थ घेऊन जात असे. तो म्हणत असे "हे सिद्ध पुरुषा, मी एक मूर्ख, अज्ञानी माणूस आहे. देवाची कशी प्रार्थना करावी हे मला माहित नाही. तेव्हां आपण माझ्यासाठी त्याच्याकडे दया याचना कराल कां?"

सोमदत्तचे अर्थार्जन फक्त जुगारातूनच होत असे. एका पावसाळी दिवशी तो पुष्कळ जुगारांच्या अड्ड्यांवर जुगार खेळायला गेला पण कुठेही त्याला खेळायला मिळाले नाही. असं करंत संध्याकाळ झाली. सोमदत्तला भूक लागली होती. त्याला कुठेही आसरा नव्हता. गावाबाहेर शंकराचे एक देऊळ होते. सोमदत्त आत गेला. दिव्याच्या मिणमिणत्या उजेडांत त्याला देवापुढे कांही अन्न ठेवलेले दिसले. त्याने देवाला नमस्कार केला आणि म्हणाला "मी भुकेला आहे. हे अन्न आधीच तुझा प्रसाद झाले आहे. आता मी ते खाऊं शकतो कां?" त्याला एक आवाज ऐकूं आला. किंवा [illegible] आहे ते तो खाऊं शकतो.

कृतज्ञतेने तो म्हणाला "देवा, मी तुला कसं खूष करुं? मला फक्त जुगारंच खेळता येतो. सिद्धपुरुष म्हणतात की आपले सर्व कौशल्य देवाचरणी अर्पण करावे. मी जुगार खेळून दाखवूं? पण अडचण अशी आहे की एकट्याने जुगार खेळता येत नाही. अजून एकजण तरी पाहिजे. मी कसं खेळूं?"

"हे देवा, तुम्ही माझे भिडू बनता कां? हां! माझा उजवा हात तुमच्यासाठी खेळेल व डावा हात माझ्यासाठी. ठीक आहे?"

मी हरलो तर माझा हा फाटका शर्ट मी तुला देईन. आणि जर तू हरलांस तर इथे आहे त्यापैकी मी जर कांही घेतले तर तुला चालेल ना?"

याला पण देवाने होकार दिला. असं सोमदत्तला वाटले. त्याने खेळायला सुरवांत केली. कांही वेळानंतर तो एकदम टाळ्यां वाजवूं लागला. "देवा, तुम्ही हरलां! तुम्ही हरलां! पण मन खट्टू नका करुं. कारण तुमच्या आयुष्यात तुम्ही प्रथमच जुगार खेळंत, आसांल नाही कां? आता ठरल्याप्रमाणे मी छानसं काहीतरी घेऊं शकतो. बरोबर? बघूं या बरं...."

त्याने दिवा उचलून सभोवार बघितलें. तिथे देवी देवतांच्या दगडांत व धातूंत कोरलेल्या मूर्ती होत्या त्यातली देवी दुर्गेची मूर्ती त्याला सर्वात जास्त आवडली. किती सुंदर मूर्ती आहे! मला आई नाहीये. या मूर्तीचा मला आईसारखा आधार



होईल. मी ही घरी नेईन !

'चुक, चुक.' त्याला वाटलं कुणीतरी असं म्हणतं आहे. "एका देवाची व्यवस्था करायची हे कांही इतकं सोपं नाही. तुला त्याची नीट काळजी घ्यावी लागेल. पूजाअर्चा करावी लागेल. त्याच्यासाठी पुजारी शोधावा लागेल. शिवाय तुझ्यावर पवित्र मूर्ती चोरल्याचा आरोप येऊन शिक्षा पण होईल."

"खरंच." सोमदत्त म्हणाला. त्याने ती मूर्ती परत जागेवर ठेवली. "पण मग मी रिकाम्या हातीच परत जाऊं?"

"अरे मूर्खा, तुला गरज आहे ती आईची नसून बायकोची आहे. माझ्या मागे लपून जरा वाट बघ. आणि तुला एक सुंदरी मिळेल. तशी सुंदरी या जन्मी कधी पाहिली नसशील." त्याला सांगितलं गेलं - असं त्याला वाटलं.



तो मूर्तीमागे लपून वाट पाहूं लागला. ती पौर्णिमेची रात्र होती. तिलोत्तमा नांवाची अप्सरा देवापुढे नृत्य करुं लागली. आश्चर्यचकित झालेला सोमदत्त नृत्य पाहूं लागला. आणि तिचे नृत्य संपल्याबरोबर बाहेर येऊन म्हणाला ''तू जी कोणी आहेस, तुला माझ्याशी लग्न करावे लागेल असे देवाने मला सांगितले आहे!''

गंमतीने तिने सोमदत्त आणि मग देवाकडे पाहिले. ''ठीक आहे युवका. आपण जाऊं या.'' ती म्हणाली. सोमदत्त तिच्यामागे आमराईत गेला. अप्सरा मंद हसंत म्हणाली ''मी जिथे राहूं शकेन असं तुझं घर आहे कां? तुझ्याकडे, माझा व माझ्या दासींचा सांभाळ करता येईल एवढे पैसे आहेत कां?''

''माझ्याकडे नाहीत.'' लाजेने खाली बघंत सोमदत्त पुटपुटला.

''महाराज, हे तरुणी तुला फक्त बायकोचीच गरज नसून, बरोबर घर आणि कांही धनसंपत्तीची देखील गरज आहे. बरोबर आहे की नाही?'' अप्सरा म्हणाली.

''तुमचे म्हणणे बरोबर आहे.'' मोठ्या संकोचाने सोमदत्त म्हणाला.

काळजी करुं नकोस. यातून मी कांहीतरी मार्ग काढते. पण अप्सरा मर्त्यजिवाशी लग्न करुं शकत नसल्यामुळे मी तुझ्याशी लग्न करुं शकणार नाही. हळू आवाजात तिने सोमदत्तच्या कानात कांहीतरी सांगितले आणि ती अदृष्य झाली.

थोड्याच दिवसांत सगळीकडे बातमी पसरली की राजकन्येला कांहीतरी विचित्र आजार झाला आहे. जरी तिचे नांव कमलकुमारी होते तरी ती स्वतःला तिलोत्तमा असे म्हणवंत होती. तिने खाणेपिणे सोडून दिले आणि ती इंद्राचा दरबार, देवांचा राजा इंद्र असे असंबद्ध बडबडूं लागली.

कोणीही वैद्य तिला बरे करुं शकेना. ती अगदी अशक्त झाली आणि मरणाच्या दारांत येऊन ठेपली तेव्हां राजाने दवंडी पिटली कीं जो कोणी राजकन्येला बरे करेल त्याला जे पाहिजे ते मिळेल.

सोमदत्तला एकट्यालांच हे माहित होते. कीं कबूल केल्या प्रमाणे अप्सरेने राजकन्येला पछाडले आहे. आणि त्याने राजकन्येला बरे करण्याची जबाबदारी घेतली की ती तिला सोडून जाईल.

[illegible]

बरे करायचा उपाय सापडला आहे. त्याचा प्रयोग तिच्यावर करण्याची परवानगी मला द्या.'' सोमदत्तने विनंती केली.

''तू जरुर प्रयत्न कर मुला, पण तू जर असफल झालास तर तू देखील राजकन्येबरोबर स्वर्गात जाशील.'' राजा म्हणाला.

''आणि मुला, तू सफल झालास तर आमच्या राजकन्येला तिचा पती म्हणून आयुष्यभर साथ देशील.'' राणी म्हणाली.

सोमदत्ताने त्यांना मजुरा करुन राजकन्येबरोबर एकटे सोडायची विनंती केली. तो एकटा राहिल्यावर तो राजकन्येच्या कानात हळूच म्हणाला ''हे अप्सरे तिलोत्तमे! तू मला खूप मदत केली आहेस तशीच आतापण राजकन्येचे शरीर सोडून जाऊन मदत कर. नाहीतर माझी कांही धडगत नाही.''

त्याचे बोलणे संपत असतानांच राजकन्या डोळे उघडून आश्चर्याने त्याच्याकडे बघूं लागली. आणि हळूंच म्हणाली ''काय गंमत आहे! अत्ता मला तुमचेच स्वप्न पडले होते. आणि डोळे उघडते तो तुम्ही समोर! पण मी कुठे आहे? मला काय झाले होते?''

''हे राजकन्ये माझ्याबद्दल तुला काय स्वप्न पडले होते?'' सोमदत्तने विचारले. राजकन्या नुसतीच लाजली पण कांही बोलली नाही.

राजकन्या आपल्या स्वप्नाबद्दल सोमदत्तला कांही बोलली नाही. पण तिने त्याबद्दल आपल्या आईला सांगितले. एका अप्सरेने तिला सांगितले की ती आता जाईल पण लगेचच तिचा भावी नवरा तिथे येईल. आणि क्षणार्धात तिचा भावी पती तिच्या समोर उभा राहिला.

हे सांगायची जरुरंच नाही की सोमदत्तचे राजकन्येशी मोठ्या थाटांत लग्न झाले. राजाने आनंदाने राजसंन्यास घेतला व तो आश्रमात राहायला गेला. अनाथ, अज्ञानी सोमदत्त राजा बनल्याबरोबर त्याने जुने शंकराचे देऊळ पाडून भव्य नवे देऊळ त्या जागी बांधले.

आणि त्याने दुसरी एक चांगली गोष्ट काय केली माहिती आहे कां? राज्यातलां जुगार बंद करुन जुगाऱ्यांना नोकऱ्या दिल्या.





# कुंभची निद्रा

शाम आणि रुक्मिणी हे पती-पत्नी एका गावात राहात होते. खूप वर्षांनी त्यांना एक मुलगा झाला. पण आश्चर्याची गोष्ट अशी होती की मुलाने डोळे उघडले नाहीत की तो जरा सुद्धा रडला नाही. घाबरुन आजीने त्याला थोडं ढोसलं तेव्हां त्याने जराशी हालचाल केली. पण तो दूध व पाणी प्यायला मात्र तोंड उघडंत असे.

असे सात दिवस गेले. आठव्या दिवशी एक साधु त्यांच्या घरी आले. शामने आपल्या मुलाबद्दल सर्व हकिगत सांगून त्यांना विनंती केली की असा कांही उपाय सांगा ज्याने माझा मुलगा बरा होऊन इतर मुलांसारखा हसूं-खेळूं लागेल. साधुंनी त्यांना बाळाचे जन्म नक्षत्र विचारुन हातावर बोटं मोजून हिशोब करुन आश्चर्याने म्हटले, ''हे बघ शाम, तुम्हाला एवढी काळजी करण्याची गरज नाही. तुमच्या मुलांत कुंभकर्णाचा थोडा अंश आहे. तुला माहिती आहे नां, त्रेतायुगांत कुंभकर्णाने अर्धवट झोपेतून उठून युद्धात भाग घेतला होता. आणि त्या युद्धातंच तो मारला गेला होता. त्याची झोप पूर्ण न झाल्यामुळे त्याने पुन्हा जन्म घेतला. कुंभकर्ण वर्षात सहा महिने जागत असे व सहा महिने झोपत असे. म्हणून तुझा मुलगा वर्षातले बरेचसे दिवस झोपेल. तो जर रडलां तर त्याला झोपेतून जाग येईल म्हणून तो रडंत नाहीये.''

साधूचे बोलणे ऐकून शाम व रुक्मिणी निर्धास्त झाले व मोठ्या प्रेमाने त्यांनी मुलाचे नांव कुंभ असे ठेवले. व ते त्याचा सांभाळ करुं लागले. तो पहाटे उठून सर्व विधी अटपून दूध पिऊन झोपत असे. दुपारी उठून जेवुन परत झोपत असे. तो फक्त खाण्यासाठी उठंत असे व उरलेला सर्व वेळ झोपत असे. तो कांही काम न केल्याने लठ्ठ झाला.

पांचव्या वर्षी कुंभ शाळेत जाऊं लागला. त्याच्या लठ्ठपणामुळे तो पाई शाळेत जाऊं शकत नसल्याने त्याच्या वडीलांनी शाळेत जायला एक बैलगाडी ठेवली. शाळेत जाताना सुद्धा तो गाडीत झोपत असे. शाळेतल्या मुलांच्यात त्याच्या जाडीमुळे तो एखाद्या राक्षसा सारखा दिसत असे. सुट्टीत मुलं त्याच्या अंगावर खेळंत असंत. कोणी त्याचे कान उपटी, पण त्याला कांही जाग येत नसे.

आता कुंभ सोळा वर्षाचा झाला. आता तो आणखी जाड झाला होता. या वयांत देखील त्याला जरा सुद्धा लिहायला वाचायला येत नव्हते. कुंभ कोणावर देखील रागवंत नसे. कारण असं केलं तर आपली झोप मोडेल अशी त्याला भीती वाटे. म्हणून तो मुलांना अजुनच आवडूं लागला.

शाम व रुक्मिणीला आता कुंभची काळजी वाटूं लागली. की याला आपण चार चौघां सारखा कसा बनवणार? इतक्यात त्याच्या जन्मवेळी आलेले साधू परत त्यांच्याकडे आले. कुंभच्या आई वडीलांच्या आग्रहावरुन साधुने एक पूर्ण दिवस अगदी बारकाईने कुंभचे निरीक्षण केले. व ते म्हणाले ''कुंभ खूप झोपतो हे खरे. पण तो अत्यंत बुद्धिमान आहे. झोपेसाठी कितीही अवघड काम तो चटकन् करुं शकतो. म्हणून त्याच्यांत कुठलीही विद्या शिकण्याची क्षमता आहे. मागल्या जन्मीची निद्रा आता पुरी झाली असल्याने मी एक महिना इथे राहून त्याला विद्या देईन.''

साधूंचा उपाय यशस्वी झाला. झोपण्यासाठी तो कितीही अवघड धडा क्षणात आत्मसात करुन लगेच झोपत असे. बाकीची मुले वर्षभरांत जेवढं शिकत तेवढं तो महिन्यात शिकत असे. साधूंनी कुंभचे कौतुक करत म्हटले, ''तू खूपच हुषार आहेस आणि पटापट अभ्यास करतोस. तू आता गुरुकुलांत जा. आणि मोठमोठ्या शास्त्रांचा



अभ्यास कर. त्याचा फायदा इतरांना होईल.''

''साधूमहाराज, मी अधिक वेळ जागा राहूं शकत नाही. आपण श्रेष्ठ आहात. आपल्या अंगात दैवीशक्ती आहे. आपण माझ्या स्वप्नात येऊन मला कां शिकवंत नाही?'' कुंभने साधूंना विनंती केली. ''ठीक आहे. मी तसं करीन. पण माझी एक अट आहे. तुला तुझं जेवण देखील स्वप्नातंच जेवावं लागेल.'' साधू म्हणाले. कुंभने साधुची अट मान्य केली. आता साधु त्याला त्याच्या स्वप्नातच शिकवूं लागले. कुंभ स्वप्नातच खाऊं लागला. पण त्यामुळे त्याचे पोट भरत नसे आणि मग तो चांगल्या तऱ्हेने अभ्यास नीट शिकूं शकत नव्हता. चार दिवसांतच कुंभच्या लक्षांत आले की स्वप्नात जेवणे शक्य नाही. अशक्तपणामुळे त्याला नीट झोप देखील येत नसे. वेळ घालवण्यासाठी तो गावात इकडे तिकडे फिरुं लागला. तेव्हां त्याला गाव आवडूं लागले. त्याला भूक सहन होत नसे म्हणून तो गावातल्या खानावळीत खाऊं पिऊं लागला. ते जेवण त्याला फार चवदार आहे असे वाटून आवडूं लागले.

माझ्या आजूबाजूला एवढे मोठे जग आहे. हे न जाणताच मी नुसता झोपलो आहे. हे जग स्वप्नातल्या जगापेक्षा केवढे वेगळे आहे. जे डोळे उघडून दिसते तेच सत्य आहे. ही गोष्ट त्याला पटली. त्याने ती साधूमहाराजांना पण सांगितली.

''ज्याने मनुष्याचा जन्म घेतला आहे, त्याने स्वप्नरंजनात वेळ कमी घालवून सत्य काय आहे याचा शोध घेण्यात जास्त वेळ घालवावा. झोपेत जी स्वप्ने आपण पाहातो ती जाग आल्यावरच खरी होऊं शकतात. म्हणून मनुष्याला जास्तीजास्त वेळ जागं राहिलं पाहिजे. परंतु काही काम न करता जागं राहाणं हे झोपल्या सारखंच आहे. म्हणून मनुष्याला कष्ट करुन स्वतःचं व जगाचं भलं साधलं पाहिजे.'' साधूंनी अशातऱ्हेने कुंभला हितोपदेश केला.

आता कुंभाच्या विचारांत अमूलाग्र बदल झाला. त्याने एकानंतर एक असा सर्व शास्त्रांचा सखोल अभ्यास केला. आणि तो एक ज्ञानी व्यक्ती झाला. आता तो खूपच कमी झोपत असे. पण ही थोडी झोप देखील त्याला पहिल्यापेक्षा जास्त आनंद देऊं लागली.





# श्रमदान

रामपुर नांवाचे एक छोटेसे गाव होते. तिथे एक रामाचे देऊळ होते. ते खूप जुनं आणि जीर्ण पडकं झालं होतं. एकदा त्या गावी भयंकर मोठं वादळ झालं. खूप सोसाट्याचं वारं सुटलं. जोरदार पाऊस येऊं लागला. त्यामधे ते जुनं देऊळ जवळपास जमीनदोस्त झालं. गावातील लोकांनी देवळाचा जिर्णोद्धार करण्याचे ठरवले.

रामपुरांत नारायण नांवाचा एक श्रीमंत व्यापारी राहात असे. तो मोठा रामभक्त होता. गावातली चार अनुभवी माणसं त्याच्याकडे गेली. देवळाच्या झालेल्या पडझडीचे वर्णन करुन म्हणाली, ''देवळाच्या जिर्णोद्धाराला अंदाजे दहा हजार रुपये खर्च येईल!''

हे ऐकून नारायण हंसत म्हणाले, ''कुठल्यातरी राजाने आपल्या राजवटीत हे मंदीर बांधले असले पाहिजे. त्यावेळी त्याने हजारो रुपये खर्च केले मोठी रकम नाही. आपण काम सुरु करा.''

''तुमच्या या बोलण्याने आमचा उत्साह अजुनच वाढला आहे.'' असे म्हणत गावच्या सरपंचांनी एकदा सर्वांकडे बघितलं आणि ते परत बोलूं लागले. आपण व्यापारांत कुशल आहांत. आपल्या कौशल्याची तारीफ आपल्याच गावातले लोक नव्हे तर आसपासच्या गावातले लोक देखील करतात. आपण गावातली सर्वात श्रीमंत व्यक्ती आहत याचा गावाला अभिमान आहे.''

''हे पाहा कमलनाथ, माझं एवढं कौतुक नका करुं. माझी बुद्धी, व्यापार कौशल्य, संपत्ती हे सर्व त्या रामाच्या कृपेने आहे. आज माझ्याकडे जे काही आहे ती सगळी त्याची देणगी आहे.'' राम मंदिराच्या दिशेने हात जोडंत नारायण म्हणाला.

तेव्हां गावातले पुरोहित मधे पडत म्हणाले

कौतुक केल्यावाचून मला राहावत नाही. देवळाच्या जिर्णोद्धारासाठी गावच्या प्रमुख लोकांनी एक रक्कम ठवली आहे. आम्हाला आशा आहे की याचा एकचतुर्थांश भाग आपण दान म्हणून द्याल.''

हे ऐकून नारायण चकित होऊन म्हणाला, ''याचा अर्थ ''मी अडीच हजार द्यावे अशी आपली इच्छा आहे.'' गावचे सरपंच तावडतोब म्हणाले ''आपल्याला ही रक्कम कांही मोठी नव्हे. एवढी छोटीशी रक्कम द्यायला आपल्याला कांही अडचण आहे कां?''

''नाही. मला काय अडचण असणार हे पैसे द्यायला? लहानपणांपासून मला असं वाटतं कीं मित्र, नातेवाईक, अगदी देवसुद्धा, यांनी आपल्याला कांही दिलं तर ते परत करणं त्यांचा अपमान नव्हे कां? धनदानापेक्षा श्रमदान श्रेष्ठ आहे. सर्वांनी खूप श्रमदान केले पाहिजे. मी आणि माझा मुलगा प्रतिज्ञा करतो की जोपर्यन्त राममंदीर पुरं होत नाही तो पर्यन्त आम्ही रोज एक तास श्रमदान करुं.''

हे ऐकून सगळे लोक जोरांत हसूं लागले. त्यांचे हसणे ऐकून नारायणचा चेहरा पडलां. तेव्हां गावचे सरपंच म्हणाले ''हे दहा हजार रुपये जमवण्यासाठी आम्ही एक योजना तयार केली आहे. जे जे लोक देवाच्या दर्शनाला येतील त्यांच्या कडून त्यांच्या ऐपती प्रमाणे आम्ही देणगी वसूल करुं. तुम्ही. तर सकाळी आणि संध्याकाळी देवदर्शनाला यालंच नां?''

अस म्हणत सरपंचांच्या बरोबर सर्व लोक उठून उभे राहिले. तेव्हां नारायण सरपंचांचे हात पकडत म्हणाला ''जरा थांबा.'' मग त्याने खोलीत जाऊन पैसें आणले आणि सरपंचांना दिले.

गावातले लोक खूष झाले आणि सर्वांनी त्याच्या औदार्याची स्तुती केली व त्याचे आभार मानले. निघता निघता सरपंच त्याला म्हणाले आपण देणगी देउन फार चांगले काम केले आहे. आमच्या सगळ्यांचा उत्साह आणखी वाढवला आहे पण कृपया आपण सांगितलेल्या त्या श्रमदानाच्या गोष्टीबद्दल विसरुं नका हं! हे ऐकताच सर्वजण खळखळून हंसले.






## भोपळ्या सारखा भयंकर



तमिळनाडूमधे नव्या घरावर एखाद्या भयानक राक्षसाचा चेहरा लोंबकळताना दिसला तर घाबरुं नका. बहुदा त्याच्या मागे भोपळा दडलेला असेल. या राज्यातले लोक नव्या घराला दृष्ट लागू नये म्हणून कोहळ्यावर राक्षसांचे चेहरे रंगवतात आणि त्याला नव्या घरासमोर टांगतात. हे कोहळे पुढील प्रवास चांगला व्हावा म्हणून व नियमीतपणे अमावस्येला आणि इतर कांही प्रसंगी नव्या

## देव की दानव?

महाभारतातील कौरव राजकुमार दुर्योधनाच्या स्वभावाचे तुम्ही कसें वर्णन कराल? तुम्हाला असं वाटतं कां की नेहमीच योग्य विचार करणाऱ्या पांडवांचा तो वेड्यासारखा हेवा करत असे? अतिशय महत्वाकांक्षी? की सरळ दुष्ट? पहा बरं, उत्तर काशीतील यमुनेच्या खोऱ्यांतल्या कांही जमातीतले लोक तुमच्या मताशी सहमत होणार नाहीत. कां बरं? कारण ते दुर्योधनाला आपला देव मानून त्याची पूजा करतात.



## खास बातम्या

# देवळाला कुलुप

जुलै महिन्यात वार्षीक रथयात्रा भरणाऱ्या पुरीच्या जगन्नाथाच्या देवळाच्या महाद्वारासाठी नवीन कुलुप केलं आहे. हे असाधारण कुलुप २ फूट लांबीचे असून १ फूट रुंद आणि ५० किलो वजनाचे आहे. हे कुलुप ३०,००० रु. किंमतीचे असून ते तयार करण्यास तीन महिने लागले. त्याला ३६ सें.मी. म्हणजे जवळ जवळ १५ इंच लांबीच्या ३ किल्ल्या आहेत. हे कुलुप बनविलेल्या कंपनीचं हे कांही सगळ्यांत जड कुलुप नव्हतं. त्यांनी १९६१ साली दिल्लीत झालेल्या 'वर्ल्ड ट्रेड फेअर' साठी ८० किलो वजनाचे कुलुप बनविले होते.




# भारतीय महिला उत्तर धृवावर

उत्तर धृवावर पाउल ठेवणारी केरळची ४६ वर्षाची 'रॅचेल थॉमस' ही पहिली भारतीय महिला स्काय-डाईव्हर आहे. एप्रील महिन्याच्या शेवटी तिने ही ऐतिहासीक उडी मारली. तपमान शून्याच्या खाली पन्नास अंश असताना १,००० फुटावरुन तिने उडी ठोकली. परत जायला मदत येई पर्यन्त ती रेनडिअरचे मांस व मासे खाऊन राहिली होती. श्रीमती थॉमस यांची कन्या ॲनी ही एकेकाळची 'भारत सुंदरी' होती व गेली २५ वर्षे ती स्कायडाईव्हिंग करत आहे.






# गणेश पुराण

गणाधिपत्याच्या पट्टाभिषेका करिता पार्वतीने गणपतीसाठी जरीकाठी पितांबर निवडला. परंतु गणपतीने शुभ्र-वस्त्र धारण केले. ते पाहून पार्वती म्हणाली - ''हे बघ बाळ, ज्या वेळी चांगले नेसून सुशोभित व्हायचे, त्यावेळी तू हे कसलं शुक्लाम्बर धारण केलं आहेस?''

''आई, हे कपडे अत्युत्तम आहेत! श्वेत रंग उत्तम स्वभाव व विवेकाचा द्योतक आहे. म्हणून मी ते आवडीने धारण केले आहेत!'' विघ्नेश्वर म्हणाला.

नंतर योग्यवेळी पट्टाभिषेक झाला. त्यामुळे विघ्नेश्वर 'गणनाथ' बनला. जयलक्ष्मी असे नांव धारण केलेली सिद्धी, व विद्यावती असे नांव असलेली बुद्धी, यांनी गणनाथाला वरले. त्या दोघी गणपतीच्या दोहो बाजूला विराजमान झाल्या. त्यामुळे गणनाथाला ''सिद्धी-बुद्धी विनायक'' असे आणि एक नामाभिधान मिळाले. त्याचवेळी आठही दिशांनी अष्टसिद्धी सुंदर तरुणींचे रूप धारण करून तिथे आल्या. त्यांच्या हातात बकुल फुलांच्या माळा होत्या. त्यांनी त्या माळा गणपतीला वाहिल्या व अष्ट सिद्धींनी गणपतीला वरले. त्यामुळे गणपतीला 'सिद्धी विनायक' असे नांव मिळाले. विनायकाचा लग्नसोहळा, मोठ्या वैभवाने व थाटात साजरा करण्यात आला.

विष्णू विघ्नेश्वराला म्हणाला - ''कोटीविघ्नें आली तरी विनायकाचे लग्न कांही थांबायचे नाही! अशी नवी म्हण आता रूढ होईल. हे कल्याण गणेशा! आजपासून तुझ्या वरप्रसादानेच विवाह घडतील. 'ज्यांचा विवाह होतो, त्यांचा जन्म धन्य झाला, सार्थ झाला' असे मानले जाईल!''



गणपती म्हणाला - ''हो, हो! असेच घडू दे! तुम्ही कौसल्येच्या पोटी, रामचन्द्र म्हणून जन्माला याल! रावणाचा अंत कराल!'' विष्णू म्हणाला - ''गजानना! तुझे प्रसन्न गजवदन पाहून, मला हत्तीचा मोह वाटू लागला असून, हत्तीबद्दल वात्सल्य वाटते आहे!''

''होय. गजेन्द्राच्या हाके सरशी, तूं धावून जाशील व मगरीच्या तावडीतून त्याचे रक्षण करून 'करिवरद' म्हणवशील!'' गणेश म्हणाला.

अष्ट सिद्धी, आपल्या हातात चवऱ्या घेऊन गणेशाला वारा घालू लागल्या. सिद्धी-बुद्धीच्या घोळक्यांत विघ्नेश्वर सिंहासनावर आरूढ झाला होता. त्याला पाहून असे वाटले, जणु तारकांच्या घोळक्यात चंद्र असावा! इतक्यात लक्ष्मी रुसली व तोंड वळवून जाऊ लागली. तिला अडवीत विष्णु म्हणाला - ''सिद्धी विनायका, 'लक्ष्मी चंचल असून ती कधीच स्थिर रहात नाही', तेव्हां हिला तू आपल्या मांडीवर बसवून घे, म्हणजे कदाचित हिला स्थिरता मिळेल!''

''लक्ष्मी मातेला, मांडीवर बसवायचे भाग्य मला लाभत आहे, खरंच मी धन्य झालो!'' असे म्हणून विनायकाने, लक्ष्मीच्या पावलांना नमस्कार केला व तिला सोंडेने अलगद उचलून आपल्या उजव्या मांडीवर बसविले.

हे पाहून, विष्णू म्हणाला - ''आता गणेश, 'लक्ष्मी गणपती' झाला आहे. आई जसा आपल्या मुलांचा सांभाळ करते; त्याप्रमाणे, ज्यांना गणपतीचा अनुग्रह लाभेल, त्यांच्या घरी लक्ष्मी स्थिरनिवास करील!''

तेव्हां नारद म्हणाला - ''अरे वा! गणेशाला नांव तरी किती? सिद्धीविनायक, लक्ष्मीगणपती, शुक्लाम्बरधर...'' असे म्हणत नारदाने आपल्या वीणेची तार छेडली व ''जय जय जन-गण नायक जयहे!'' असे विनायकाचे स्तवन गाइले.

एके दिवशी गणपती आपल्या उंदीर वाहनावरून आकाशमार्गाने भ्रमण करीत विंध्याचल पार करून दक्षिणेतील कृष्णपर्वतावर उतरले. तिथे केळीचे दाट बन पसरले होते. पायथ्याशी रहाणारे शबर, ढोल, डफ वगैरे वाद्य वाजवीत, कसलातरी उत्सव करीत होते.

गणेशाने एका बालकाचे रूप धारण केले व तो त्या उत्सवाच्या बाजूला जाऊ लागला. शबरांनी त्याला उचलून घेतले. ''देवांनी आपल्यासाठी एक बालक पाठविला आहे.'' असे मानून त्यांनी त्याला उत्सवाच्या मध्यभागी नेले. तिथे रक्ताने भिजलेली एक काळी शिळा होती व





समोर एक मुका मुलगा रडत होता. त्याच्या अंगाला हळद लावली होती व कमरेला काळे वस्त्र गुंडाळले होते. त्याच्या गळ्यात लाल जास्वंदीची माळ होती. त्या मुलाला पाहून बालरूपी गणेश शबरांच्या नायकाला म्हणाला - ''मी तुमच्या देवाशी बोलू इच्छितो. मला त्याच्याकडे घेऊन चला!''

ते ऐकून शबर नायक खदखदून हंसला. ''तू मोठा विक्षिप्त मुलगा दिसतो आहेस! तू आमच्या देवाशी बोलणार आहेस? आमचा देव काळ्याकुट्ट अंधारासारखा, महाभयंकर आहे. त्याला कुणी पाहू शकत नाही. आणि जर कुणी पाहिलं, तर रक्ताच्या ओकाऱ्या होऊन तो मरून पडतो!''

शबर नायकाचे बोलणे ऐकून विघ्नेश्वराला हंसू आले. तो शिळेजवळ गेला व म्हणाला - ''तुम्ही, आपल्या भित्रेपणामुळे, आपल्या देवाला, भयंकर समजता! भीतीलाच तुम्ही भक्ती मानता आहात! तुम्हापैकी कुणीही, आपल्या देवाला पाहिलेले नाही! तुमच्या देवाने कधीही असा 'नरबळी' मागितलेला नाही! तुमचा देव फार सुंदर आहे!'' असे त्या शबरांना समजावून सांगून, विघ्नेश्वराने त्या शिळेला थोपटले. ती काळी शिळा, एकदम केळीच्या पांढऱ्या गाभ्याच्या रंगाची झाली व क्षणभरांत त्या शिळेची एक सुंदर मूर्ती झाली. गुडघ्यांवर हात टेकवून बसलेली ती देवाची सुहास्य वदन मूर्ती फारच आकर्षक होती. विनायकाने त्या मुक्या मुलाच्या डोक्यावर हात ठेवला.

तो मुका मुलगा एकाएकी ओरडला - ''स्वामी, मी तुला शरण आलो आहे!'' असे म्हणत तो मुलगा स्तोत्र गाऊं लागला.

काळ्या शिळेची, सुंदर मूर्ती होणे व मुक्याचे बोलणे, या अघटित घटना क्षणभरांत घडल्यामुळे ते शबर भयचकित झाले. त्यांनी घाबरून त्या बालकाला नमस्कार केला.

त्यांना अडवीत विघ्नेश्वर म्हणाला - ''तुम्ही मला नमस्कार नका करूं. तुमच्या मनांतली भीती सोडून, प्रेमाने त्या देवमूर्तीची आराधना करा. तुम्ही ज्याला देव मानता, त्याच्यावर पित्यासारखे व बंधुसारखे प्रेम करा. 'बळी' सारख्या क्रूर पद्धती सोडून द्या. फुलें, फळें व तोरणें बांधून आनंदाने उत्सव साजरा करा. हा मुका, ज्याला आत्ताच वाचा आली आहे; याला तुम्ही आपला गुरू माना. असे सांगून विघ्नेश्वर काळ्या पर्वतावर चढले. शबर अर्ध्यावाटे पर्यंत त्याच्या मागे गेले व नंतर थांबले. तिथे भैरव-स्वामी, डोके



बांकबून, उदास बसला होता. त्याचे शरीर काळ्या ढगासारखे होते.

विघ्नेश्वराने पळत जाऊन भैरवाला आलिंगन दिले. त्यासरशी भैरवाचे शरीर स्वच्छ चांदण्यासारखे कांतीमान होऊन चमकूं लागले. दिव्य मंगल रूप धारण केलेल्या त्या भैरवाने, मोठ्या आनंदाने, बालरूपी विघ्नेश्वराला मिठी मारली. "तू विघ्नेश्वर आहेस हे मला माहीत आहे. "तुझ्या कृपेमुळे माझे काळे-कभिन्न रूप, अदृश्य होईल' अशी आकाशवाणी, माझ्या अवतरणाच्या वेळी झाली होती. 'मला दैवत्वाची सिद्धी प्राप्त होईल!' असेही त्या आकाशवाणीने सांगितले होते. या पर्वतावर येण्याचे, कुणालाही धाडस होत नाही. पक्षी सुद्धा मला पाहून कलख थांबवतात! भीतीमुळे त्यांचे चिवचिवणे बंद होते. माझ्या या रूपाची मलाच घृणा वाटते. मी चिरकाला पासून, तुझ्या वाटेकडे डोळे लावून बसलो आहे! तुझे प्रत्यक्ष रूप दाखवून मला कृतार्थ कर!" भैरव म्हणाला.

आपले खरे रूप प्रकट करीत विघ्नेश्वर म्हणाला - "आज पासून 'देव' म्हणून पूजा प्राप्त करणारा तू 'स्वामी' मानला जाशील. 'शिवकेशवांचा तू संगम आहेस! आईकडून तुझा वृत्तांत समजल्यापासून, तुझ्या भेटीची मला हुरहुर लागली होती. 'मोह' काळोखा सारखा असतो! मोहावेशाने शिव, जगन्मोहिनी रूपी विष्णूच्या मागे लागले. शिव व विष्णूच्या तेजाचे मीलन होऊन, तुझा अवतार झाला आहे. म्हणून तुला असे काळे रूप प्राप्त झाले होते. खरं पाहता, तुझ्या सारखा 'दिव्य-मंगल-सुंदर' स्वामी दुसरा कुणी नाही! शबर लोक, तुझी मोठ्या श्रद्धेने उपासना करतात. एकदा तू त्यांना दर्शन दे!"

बालरूपधारी विघ्नेश्वर, परत शबरांजवळ आला. व त्यांना म्हणाला - "तुम्ही आपल्या स्वामीसमोर गुडघे टेकून 'स्वामी! आम्ही तुला शरण आलो आहोत!' असे एका सुरात म्हणा; म्हणजे स्वामी तुम्हाला दर्शन देतील. जेव्हां जेव्हां तुम्ही त्याला साद घालाल, तेव्हां तेव्हां, तो तुम्हाला दर्शन देईल! तुम्ही घर बांधा, शेती करा, सुखाने मानवासारखे जगा! तुमच्या 'स्वामीची' कृपा तुमच्यावर अखंडित राहील!" असे म्हणून बालरूपधारी विघ्नेश्वर अंतर्धान पावला. शबरांना मोठा अचंबा वाटला. ते बालकाने दाखविलेल्या देव मूर्तीसमोर आले. भक्तीभावाने त्यांनी आपल्या स्वामीला हांक मारली. स्वामीने त्यांना दर्शन दिले.





मंदहास्य करीत, त्यांना अभय देऊन स्वामी अदृश्य झाले.

दरवर्षी मार्गशीर्ष महिन्यात, शबर केळीच्या खांबांचा मण्डप बनवून, कोमल लता-फुलांनी त्याला सजवून स्वामीची पूजा करूं लागले. बळी देणे बंद करून, नियमित उपासना करूं लागले. हळूं हळूं शबर सुसंस्कृत झाले. मानवतेचे पुजारी बनले. स्वामींनी त्यांना ज्या पर्वतावर दर्शन दिले होते, तिथे त्यांनी शिल्पें कोरून सुंदर मंदीर उभारले. संगीत, नृत्य व काव्याने स्वामीची आराधना करूं लागले. कुठल्याही मानवजातीने त्यांना गौरवावे, इतके ते शबर सुसंस्कृत झाले.

'आपला स्वामीच, बालरूपांत येऊन, आपल्याला जागे करून गेला' असा त्यांचा विश्वास होता. ही सारी किमया गणपतीची असल्याचे, त्यांना माहीत नव्हते! गणपतीने स्वतःला पडद्याआड ठेवून, 'आपल्या भक्तांची अपार श्रद्धा आपल्यावर जडवली' याची जाणीव भैरवाला पदोपदी होत असे. त्याने जर स्वतःचे रूप प्रगट केले असते, तर हे शबर, केव्हांचेच आपल्याला विसरले असते! असेही भैरवाच्या मनांत यायचे. कैलासाला जाऊन, विघ्नेश्वर व कुमार (कार्तिक) स्वामीबरोबर राहून, भ्रातृप्रेमाचा आनंद उपभोगावा असे कुतुहल भैरवस्वामीच्या मनांत वाढूं लागले.

शबरांना जागे करून, विघ्नेश्वर मूषकवाहनावरुन आकाशमार्गाने उत्तरेकडे जात असता डोंगराच्या पायथ्याशी घनदाट झाडं असल्याचे, परंतु सगळी जमीन ओसाड व

निरुपयोगी पडून असल्याचे, गणपतीच्या लक्षांत आले. पाण्याच्या अभावी जमिनीला मोठ्याल्या भेगा पडल्या होत्या. पाण्याने भरुन दुथडया वहाणाऱ्या नद्या असत्या, तर ही सारी जमीन सस्य-श्यामला झाली असती. लोक, पावसावर विसंबून, आभाळाकडे टक लावून बसले होते.

"गंगेसारखी एखादी नदी, ज्या प्रांतात वहाते, तिथले लोक किती भाग्यवान असतात! पूर्ण गंगा जरी दुर्मिळ असली तरी, तिचा एखादा फाटा जरी इकडे वाहिला, तरी आम्ही धन्य होऊं! देव आम्हाला कां नाही पावत? तेहतीस कोटी देव आहेत म्हणे! त्या पैकी, एकाचीही कृपा-दृष्टी, आम्हा पामरांकडे वळूं नये?" सामान्य माणसांचे, असे बोलणे विघ्नेश्वराच्या कानी आले. ते शब्द त्याच्या डोक्यांत घुमूं लागले.

इकडे पश्चिमेकडे, उंच उंच पर्वतरांगा आहेत. पूर्वेकडे छोट्या छोट्या टेकड्यांनी सुशोभित पृथ्वी, पूर्वी सागरापर्यंत पसरली आहे. आणि इकडे हे असंख्य लोक, पशु-पक्ष्यांची शिकार करीत, रानटी जीवन कंठीत आहेत! जे थोडेबहुत शेती करुन जगतात, त्यांना असंख्य यातनांना तोंड द्यावे लागत आहे. असंख्य लोक, जिवावर उदार होऊन, समुद्रांत मासे धरण्यासाठी जात असलेले विनायकाला दिसले.

उत्तरेकडील जमिनीशी, इथली तुलना करुन, गणेशाला फार दुःख झाले. हिमवंताच्या पायथ्याशी, सर्वत्र असंख्य सुंदर जल-प्रपात, रमणीय सरोवरे व नद्या-उप-नद्यांनी, प्रकृती किती शोभायमान झालेली आहे! तर इकडे या पश्चिमी पर्वतरांगा, बुजगावण्यासारख्या, अगदीच निर्जीव वाटत आहेत!

त्या पर्वत रांगांमध्ये, सह्याद्रीच्या जवळच्या एका घाटीत कोळशाच्या ढिगांत जसा हिरा चमकावा, तसा गौतम ऋषींचा आश्रम मोठा विलोभनीय दिसत होता. कांहीतरी सुचल्यासारखे, विघ्नेश्वराने डोके हलविले. मूषकाला वेग वाढवायची आज्ञा देऊन, दक्षिण व विंध्याचल ओलांडून तो उत्तर दिशेला पोचला. उत्तरेकडची जमीन त्याला नवी-अनोळखी वाटूं लागली.

जवळ जाऊन पाहिले, तर कांही समजेनासे, सुचेनासे झाले.





# रामपुरचे स्थळ

मोठ्या बाजारांत रंगनाथचे कापडाचे दुकान आहे. दुकान बंद करुन जेव्हां तो घरी परतला तेव्हां त्याची बायको सरलाने हंसत त्याचे स्वागत केले. चार दिवसांपूर्वी ती आपल्या मोठ्या भावाकडे त्याच्या मुलाच्या वाढदिवसाला माहेरी गेली होती. आणि आज दुपारीच परत आली होती.

जेवायला वाढल्यानंतर सरला आपल्या नवऱ्याला, रंगनाथला म्हणाली, "माझ्या भावाने आपल्या मुलासाठी एक चांगलं स्थळ सुचविले आहे. एक लाखाहून जास्त हुंडा देतील. पण मुलगी काळी आहे. असली म्हणून काय झालं. तिच्या रंगाशी दिसण्याशी आपल्याला काय करायचंय?"

"याचा अर्थ जी काळी असते ती काय सुंदर असूं शकत नाही कां? तुझीच गोष्ट घेना." सरला हंसून कांही म्हणणार एवढ्यात रंगनाथ पुन्हा बोलला. "मी जे काय सांगतो ते पहिले ऐक. काल रामपुरहून राजेश्वर नांवाचा एक माणूस आलाय. आपल्या मुलाने त्याच्या मुलीला कुणाच्यातरी लग्नात पाहिले आणि त्याला ती खूप आवडली आहे. राजेश्वरचं म्हणणं आहे की आपण एकदा तिला बघितलं तर फार बरं होईल."

सरला आपल्या नवऱ्याकडे पहातंच राहिली. त्यांचा मुलगा शहरात चांगल्या नोकरीवर आहे आणि त्याला जर अगोदरच मुलगी सुंदर वाटली, आवडली तर कुठलें आईबाप चांगला दणदणीत हुंडा देतील.

तुम्ही एकटेच जाऊन मुलगी बघून या. ते लोक जर कमितकमी एक लाखभर हुंडा द्यायला तयार असतील तर मी मुलगी पाहीन." ताटातंच हात धुवत सरला म्हणाली.

चार दिवसांनी रंगनाथ रामपुरला गेला. त्याने मुलीला बघितलं. मुलगी खरोखरच सुशील आणि

सुंदर होती. लोक पण चांगले होते. पण जेव्हां त्याला समजले की वडील हुंडा देऊं शकणार नाहीत तेव्हां त्याने आपला हेतू स्पष्टपणे सांगितला. तो म्हणाला, ''आम्हाला कमितकमी एक लाख रुपये हुंडा पाहिजे. आपण लोक आमच्या तोडीचे दिसत नाही. आपण एखादं दुसरं स्थळ पाहाण्यातच आपलं भल आहे.'' एवढं बोलून तो तेथून निघाला.

परंतु घरी परतण्यासाठी त्याला तिथे वहान मिळेना. त्याने विचार केला ''चला जरा पुढे जाऊन गाडी मिळते कां ते पाहू या.'' चालता चालता अंधार पडला. पाऊस पण पडूं लागला. तोपर्यन्त रंगनाथ गावाच्या वेशीजवळ पोचला होता. तिथे त्याने एक जुनं कौलारु घर पाहिलं. तेव्हां त्याला वाटलं पाउस थांबेपर्यन्त इथेच राहावे. त्याने तिकडे जाऊन दरवाजा खटखटंवला. हळूहळू दरवाजा उघडला.

त्याने पाहिले की दरवाजात एक पांढरी स्वच्छ लांब दाढी असलेला कृश म्हातारा उभा आहे.

''पाऊस कांही कमी होण्याची लक्षणे दिसंत नाहीत उलटा जोर आणखी वाढलेंच असं वाटतंय. आपल्या घरी आज रात्रीपुरता आश्रय मिळेल कां?'' चाचरंत रंगनाथने त्या वृद्धाला विचारलें.

''आश्रय देऊं शकतो पण भोजन देऊं शकणार नाही. या घरात कोणी बाईमाणूस नाहीये.'' त्याला आत नेतानेता तो वृद्ध म्हणाला.

वृद्धाने मधल्या खोलीत दोन चटया अंथरल्या. ''माझ नांव भूषण आहे. आपलं नांव? गांवात कसकाय येणं केलं?''

चटईवर आडवं होत रंगनाथ म्हणाला ''मी सीतापुरचा आहे. रामपुरला जाऊन आलो. तुम्ही अनुभवी दिसता म्हणून तुमच्यापासून मी काही लपवुन ठेवूं इच्छित नाही. आपल्याला सर्व सांगावं





असं मला वाटतं.'' मग त्याने सर्व हकिगत सांगत म्हटलं मी त्या मुलीच्या वडिलांना साफ सांगून आलोय की कुठलंतरी दुसरं स्थळ पाहा.'' डोक्याखालची उशी ठीक करत तो म्हणाला.

''पण तुम्ही तर म्हणत होता की तुमच्या मुलाला मुलगी आवडली आहे.'' भूषण पण चटईवर झोपत म्हणाला.

''म्हणून काय झालं? मुलीचे वडील हुंडा देऊं शकत नाहीत. तर आम्ही तरी काय करणार.'' मोठ्यांदा हंसत रंगनाथ म्हणाला.

भूषण थोडा वेळ गप्प राहिला आणि नंतर म्हणाला, ''तुम्हाला माहित आहे की या वयांत देखील मी असा अनाथासारखा कां जगतो आहे?'' रंगनाथने नकारार्थी मान हलवली.

''माझ्या मुलानं हुंडा घेतला म्हणून.'' भूषण म्हणाला. ''पण असं कसं झालं?'' रंगनाथने

''तर ऐका आता. मी हट्टाने आपल्या मुलाच्या लग्नात हुंडा घेतला. त्यामुळे माझ्या सुनेच्या वडिलांना आपल्या पूर्वजांपासून असलेले घर विकावे लागले. मग त्यांच्या कुटुंबाला तरतऱ्हेच्या अडचणींना तोंड द्यावे लागले. यामुळे माझ्या सुनेचा माझ्यावर फार राग होता. ती मला वेळोवेळी शिव्याशाप देऊं लागली, सारखी त्रास देऊं लागली. माझ्याशी ती अगदी कठोरपणे वागत असे. आणि माझा मुलगा, तो तर तिच्या पूर्ण आहारी गेला होता. ती जसं म्हणेल तसं तो वागतं असे. तो माझं कांही ऐकतंच नसे माझ्या दुर्दशेचा कांही विचारंच करत नसे. माझी बायको मेल्यानंतर तर माझी स्थिती अजुनच वाईट झाली. ती मला एखाद्या किड्यामकोड्या सारखे तुच्छ लेखंत असे. हे मला सहन झाले नाही आणि माझ्या नातेवाईकाच्या जुन्या घरांत मी राहूं लागलो. स्वयंपाक करून

नसली तर विचारपूस करणारे देखील कोणी नाही. एकदम अनाथ झालो आहे. एकटा कसेतरी दिवस काढतो आहे.'' असं म्हणून त्याने तोंडावर चादर ओढून घेतली.

हे ऐकून रंगनाथ देखील गोंधळून गेला. त्याच्या तोंडून एक शब्द सुद्धा बाहेर पडला नाही. मध्यरात्री केव्हांतरी त्याला झोप लागली. सकाळी उठला तेव्हां भूषण तिथे नव्हता. रंगनाथ घरातून बाहेर पडला. समोर एक म्हातारी बाई बाभळीच्या झाडाची फळे तोडून बकऱ्यांना खायला घालत होती. तिने रंगनाथला विचारले ''आपण कोण? पूर्ण रात्र त्या घरांतच काढली? एवढे धाडस?''

रंगनाथला ही म्हातारी बाई काय बोलते आहे हेच कळेना. तो म्हणाला ''काय करणार. जोरांत पाऊस पडत होता. त्यामुळे त्या घरांत राहावेच लागले. पण तिथला पांढरी दाढीवाला म्हातारा कुठे गेला तुम्हाला माहित आहे कां?''

हे ऐकताच म्हातारीच्या हातातली वेताची छडी खाली पडली. आणि ती आश्चर्याने म्हणाली ''म्हणजे गावातल्या लोकांचे बोलणे खरं दिसतय. ते म्हणतात हुंड्यासाठी वेडा झालेला भूषण भूत झालाय आणि तो इथेच कुठेतरी राहातो.

त्याने हुंड्यासाठी सुनेला खूप त्रास दिला. तिच्या कुटुंबाचे वाटोळे झाले. म्हणून तिने पण याचा बदला घ्यायची शपथ घेतली. आणि त्याला खूप छळले. इतके कीं एक दिवस त्याला घराबाहेर काढले. निरुपायाने भूषण या घरांत राहिला आणि खूप हाल सहन करत शेवटी वर्षाच्या आतंच मेला.''

रंगनाथचा आपल्या कानावर विश्वासंच बसत नव्हता. एक रात्र त्याने भुताबरोबर घालवली या विचारानेच त्याचे हातपाय कापू लागले. या सत्याने त्याला जागं केलं. त्या क्षणी त्याने एक निर्णय घेतला. तिथून जाणाऱ्या भाड्याच्या गाडीत बसून गेला.

थोड्यावेळाने भूषण झाडांमागून बाहेर आला. आणि म्हातारीला म्हणाला, ''ताई, मी जसं सांगितलं तसंच तुम्ही केलं. मी सांगितलेल्या गोष्टी तुम्ही जशाच्या तशा बोललांत. तुम्ही एक पुण्यकर्म केलं. नाहीतर हुंड्याच्या पाठीमागे लागून तो पण माझ्या सारखा वाईट परिस्थितीत सापडेल.''

''मी पुण्यकर्म केलं? ते कसं? तुम्हाला काय माहिती की त्याचे हुंड्याचे वेड गेले आहे.'' म्हातारी म्हणाली. ''तुम्ही बघितलं नाही कां? की तो भाड्याची गाडी वळवून रामपुरच्या दिशेने जात आहे.'' भूषण आनंदात म्हणाला.





# ज्ञानी, अज्ञानी, मूर्ख

पंडीत शिवानंद आपल्या गुरुकुलात् शिष्य-वर्गाला शास्त्र-विद्या तर शिकवतच पण त्याच-बरोबर वास्तविक ज्ञानाचे शिक्षणही देत असत. त्यांचा दृढ विश्वास होता की शास्त्र-विद्यांचा कितीही गहन अभ्यास केला तरी जीवनात येणाऱ्या संकटाना तोंड देण्यासाठी वास्तविक ज्ञान असणे अत्यंत आवश्यक आहे. आणि ते असले तरच जीवनात शांती प्राप्त करता येते.

एक दिवस ते पहाटेच आपल्या तीन शिष्यांना घेऊन जंगलात गेले. तिथून त्यांना देशी औषधांसाठी जंगली वनस्पतींचा पाला, मूळे इ. आणायची होती. त्या तीन शिष्यांपैकी दोघे नवीनच गुरुकुलमध्ये दाखल झाले होते.

शिवानंद स्वामींच्या मागोमाग येत असलेल्या

एका आठवड्यापूर्वी मी आपल्याला विचारले होते की ज्ञानी, अज्ञानी व मूर्ख यात काय फरक आहे? तेव्हां आपण मला योग्य वेळ आल्यानंतर सांगेन असे म्हटले होते.''

शिवानंद स्वामी गप्प राहिले. त्यांनी काहीच उत्तर दिले नाही. त्या तीन शिष्यात जो जुना होता तो नव्या शिष्यावर जरा नाराज होत म्हणाला, ''गुरुजींना माहित नाही का कधी आणि केव्हां तुझ्या प्रश्नाचे उत्तर द्यावे ते? तू हे विचारून चूक केलीस. यापुढे अशी चूक होणार नाही याची काळजी घे.''

परंतु दुसरा जो नवीन शिष्य होता, तो विरोध करत म्हणाला, ''गुरुजी अनेक विषयांवर चर्चा करतात. आपल्याला विविध ज्ञान ते देत असतात.



होतात व त्या दूर करण्यासाठी आपण प्रश्न विचारतो. कदाचित् ते आपले प्रश्न विसरण्याची शक्यता असू शकते. अशावेळी आपल्या शंकेचे निरसन करण्यासाठी त्यांना आठवण केली तर तो अपराध कसा असू शकेल?''

शिवानंद स्वामी जीवनातल्या बिकट समस्यांना तोंड कसे द्यावे याचा खुलासा करताना जीवनातल्या प्रत्यक्ष उदाहरणांचाच आधार घेत असत. कारण त्यांचा दृढ विश्वास होता की त्यामुळे शिष्य जीवनाची वास्तविकता जाणतील व त्यातून स्वतःचा अनुभव घेतील.

गुरु-शिष्यांनी औषधी मूळे, पाला सर्व एकत्र करून होईपर्यंत दुपार झाली. थोडासा आराम करण्यासाठी ते एका डेरेदार झाडाखाली येऊन बसले. त्याचवेळी जवळच्या आणखी एका वृक्षाखाली विश्रांती घे[illegible] खांद्यावर मोठमोठ्या जड पिशव्या होत्या. ते तिघेही तरूण होते. तिघांनीही पिशव्या खाली ठेवल्या व आजूबाजूला सर्वत्र पाहिले. त्यातल्या एकाने जवळच असलेल्या झाडाजवळ एक बिळ पाहिले व घाबरत म्हणाला, ''ते बिळ पाहिलेत का? आपण तर आता इतके थकलो आहोत की पाठ जमिनीला लागली की आपण गाढ झोपी जाणार. पण जर का त्या बिळातून साप आला व आपल्याला डसला तर?''

''आपण तिघेही इथेच विश्रांती घेऊ या. साप आलाच तर तिघांनी मिळून त्याला मारून टाकू.'' दुसरा प्रवासी पिशवीतून चादर काढून ती पसरवित म्हणाला.

त्यावर पहिला प्रवासी म्हणाला, ''तू काहीही म्हण, मी नाही इकडे झोपणार. दुसरीकडे कुठेतरी जाऊ या, पण इकडे नको.''

इतका वेळ गप्प असलेला तिसरा प्रवासी म्हणाला, ''घाई करू नका. जंगलात धोका नसलेली जागा असूच शकत नाही. पण जिथे धोका कमी आहे अशी जागा आपल्याला निवडायला पाहिजे.''

''म्हणजे सापाने डसणे हा धोका नाही असं तुला म्हणायचं आहे का?'' पहिला प्रवासी थोड्याशा रागाने म्हणाला.

''माझ्या म्हणण्याचा अर्थ असा नाही, पण मला वाटतं की हे बिळ सापाचे नसावे.'' तिसरा प्रवासी त्याचे समाधान करत म्हणाला.

''अरे तू काय बोलतोस काय? समोर सापाचे बिळ दिसूनही ते तू सापाचे मानायला तयार नाहीस. हे अद्वैत तू कुणाकडून, केव्हां शिकलास?'' त्याच्या रागाचा पारा चढतच होता.

[illegible]त म्हणाला, ''अरे मित्रा, असा रागावू नकोस. आधी शांत हो. मी काय म्हणतो म्हणजे अशा प्रत्येक बिळात साप असतो असे नाही, हा माझा अनुभव आहे. हे बिळ अवश्य मुंग्यांचे असावे.''

दुसऱ्या प्रवाश्याने त्यावर आश्चर्य प्रगट करत विचारले, ''तू ठामपणे हे सापाचे बिळ नाही असे कसं म्हणतोस?''

''सांगू, ऐका तर. ते बिळ आहे, त्याच्याजवळच एक वृक्ष पण आहे आणि त्या वृक्षावर कितीतरी पक्षी राहातात, त्यांची घरटी त्याच्यावर आहेत, त्या घरट्यात त्यांची छोटी छोटी पिल्लं आहेत. निसर्गाच्या नियमाप्रमाणे प्रत्येक प्राणीमात्राला भय असते व तो आपली रक्षा करून घेत असतो, धोक्यापासून सुरक्षित जागेवर राहात असतो. सापाचं बिळ असतं तर पक्षी या वृक्षावर राहिले नसते व त्यांना पिल्लंपण झाली नसती.'' असे म्हणून चादर पसरून तिसरा प्रवासी आडवा झाला.

त्या तिघांचे बोलणे शिवानंद स्वामी व त्यांचे तिघे शिष्यही ऐकत होते. गुरूजींनी आपल्या नव्या शिष्याला विचारले, ''त्या तिघात ज्ञानी, अज्ञानी व मूर्ख कोण सांगू शकतोस का?''

शिष्य नम्रपणे म्हणाला, ''नाही गुरूजी, मला नाही समजलं.'' नंतर त्यांनी राहिलेल्या दोन शिष्यांनाही तोच प्रश्न विचारला. पण तेही सांगू शकले नाहीत.

तेव्हां शिवानंद स्वामी सविस्तर खुलासा करत म्हणाले, ''साप आलाच तर तिघांनी मारून टाकू, असं म्हणणारा मूर्ख आहे. आपण झोपल्यावेळी साप आला व डसला तर? आपण विश्रांतीसाठी दुसरी जागा पाहू या, असं म्हणणारा अज्ञानी आहे. तो खरंच धोका आहे का हे समजून घ्यायलासुद्धा तयार नाही. आता तुम्हाला कळले असेल की ज्ञानी कोण? जवळपासच्या परिस्थितीचे अवलोकन करून धोका आहे की नाही हे आपल्या बुद्धीच्या बळावर विचार करून ठरवणारा तोच खरा ज्ञानी. धोक्याचा अंदाज घेणारा व तो टाळण्यास काय केले पाहिजे याचा निर्णय घेण्यास तोच समर्थ आहे. तुम्हीसुद्धा त्या ज्ञानी माणसाप्रमाणे शास्त्र-कलांबरोबर वास्तविक व व्यावहारिक ज्ञान प्राप्त करून घेतले तर तुमचे जीवन सुखदायी होईल. जीवनातले चढ-उतार, बिकट समस्या सुलभ होतील व जीवन आनंदमय होईल.'' शिवानंद स्वामींनी त्यांचे शंका निरसन केले.













# स्वर्ग-प्राप्ती

एक माणूस होता. त्याने जीवनांतली सगळी सुखें व आनंद उपभोगले होते व शेवटी स्वर्ग मिळावा या विचाराने जंगलात जाऊन त्याने तपश्चर्या करायला सुरवात केली.

दुसरा एक माणूस जीवनापासून विरक्त होऊन तोही जंगलात येऊन पोहोचला. तिथे आधीपासूनच एक व्यक्ती तपश्चर्या करत असल्याचे त्याने पाहिले. तपश्चर्या करणाऱ्या माणसाला पाहून त्याला वाटले की याचीच आपण सेवा केली तर आपल्यालाही स्वर्गप्राप्ती करून घेता येईल. तेव्हां त्याने तपश्चर्या करणाऱ्या व्यक्तीला म्हटले, ''आपण मला आपला शिष्य करून घ्याल कां?''

त्यावर तो तपश्चर्या करणारा माणूस म्हणाला, ''मला कुणाच्याही सेवेची जरूर नाही, माझी एकाग्रता भंग करू नकोस.'' असे म्हणून डोळे बंद करून तो ध्यानस्थ झाला. दुसऱ्या माणसाला वाटले, ''ह्या तपस्वीच्या तपांत विघ्न येणार नाही याची जरी मी काळजी घेतली तरी मला पुण्य मिळेल.'' असा विचार करून तोही डोळे मिटून तपश्चर्या करू लागला.

दुसरा माणूस तप करत असतानादेखील पहिल्या माणसाच्या तपश्चर्येंत कसलाही भंग किंवा विघ्न येणार नाही याची काळजी घेत असे. जंगलात विविध पशुपक्षी कांही ना कांही तरी आवाज करत. त्यामुळे पहिल्या माणसाच्या तपश्चर्येंत विघ्न येते असे समजून तो दुसरा माणूस त्या पशुपक्ष्यांना दगड मारून तिथून पिटाळून लावायचा. पण पहिला माणूस दुसऱ्याची कदर न करता आपल्याच तपश्चर्येंत मग्न असे.

एक दिवस एक धोबी त्या जंगलात आला व त्याने त्या दोन्ही तपस्व्यांना पाहिले. तिथून जवळच असलेल्या तळ्यांत त्याने कपडे धुवायला सुरवात केली.

धोब्याच्या कपडे धुण्यामुळे दोन्ही तपस्व्यांच्या तपश्चर्येंत बाधा आली. पहिल्या तपस्वीने डोळे उघडून धोब्याला पाहिले व मनांतल्या मनांत त्याच्यावर राग काढला, पण लगेच आपला विचार बदलून तो पुन्हा ध्यानस्थ झाला.

परंतु दुसरा तपस्वी एकदम क्रोधित होऊन धोब्याला रागवूं लागला, ''अरे मूर्खा, तुला कांही अकल आहे की नाही? इकडे कपडे धुवून तू आमची तपश्चर्या भंग करतो आहेस, आत्ताच्या आत्ता चालता हो इथून.''

''महाराज, तुमच्या तपश्चर्येने माझ्या कुटुंबाचा उदरनिर्वाह थोडाच होणार आहे? मला माझे काम करू द्या.'' असे धोब्याने उद्धटपणे उत्तर दिले व तो पुन्हां आपले काम करूं लागला. दुसरा तपस्वी रोज धोब्याबरोबर भांडण करायचा पण धोबी कांही ते तळे सोडून गेला नाही.

कांही काळानंतर धोब्याचे निधन झाले. दुसरा तपस्वीही त्यानंतर मृत्यू पावला. कांही दिवसानंतर पहिल्या तपस्व्याचाही देहांत झाला व तो स्वर्गात जात असताना दुसरा तपस्वी नरकांत घोर यातना सहन करताना त्यांना पाहिले. तेव्हां दुसऱ्या तपस्वी पहिल्याला म्हणाला, ''महाराज, मलाही आपल्या-बरोबर स्वर्गात कां नाही नेत? मी आपली कितीतरी सेवा केली आहे.'' जेव्हां पहिला तपस्वी स्वर्गात पोहोचला तेव्हां धोबी तिथे स्वर्गसुख अनुभवत असलेला त्याने पाहिले. ते पाहून आश्चर्यचकित झालेल्या तपस्वीने आपल्याबरोबर असलेल्या देवदूताला विचारले, ''माझ्याबरोबर तपस्या करणारा नरकांत आणि आमच्या तपांत बाधा आणणारा धोबी इथे स्वर्गात; हे असे कसे झाले?''

त्यावर देवदूत म्हणाला, ''ह्या धोब्याने तुमची तपश्चर्या लवकर सफल होण्यास मदत केली आहे, कपडे धुताना होणाऱ्या आवाजामुळे तुम्ही तुमचे चित्त अधिक एकाग्र करू शकलां. ह्या धोब्याने कुठलेही पाप केलेले नाही. उलट प्रामाणिकपणे व खूप परिश्रम करून आपल्या कुटुंबाचे पालन-पोषण केले आहे, आपले कर्तव्य केले आहे. त्यामुळेच त्याला स्वर्ग-प्राप्ती झाली. पण तुझ्या सहयोग्याने तपश्चर्या केलीच नाही, त्याचे मन अति चंचल होते. तुमच्या तपांत विघ्न येऊ नये म्हणून तो पशुपक्ष्यांना पिटाळायचा व धोब्याबरोबर भांडण करायचा. त्याने आपल्या मनावर कधी संयम ठेवला नाही, एकाग्रता वाढवली नाही. इच्छा आकांक्षा काबूत ठेवल्या नाहीत. म्हणून त्याला स्वर्गप्राप्ती झाली नाही. ईश्वरावर तो आपले मन स्थिर करू शकत नव्हता, म्हणून त्याला नरक मिळाला.''





# आरकू खोरे

जेव्हां तुम्हाला कधीतरी डोंगरमाथ्यांवरील ठिकाणीं सहलीला जावेसे वाटेल, तेव्हां तुम्ही आंध्र प्रदेशांतल्या आरकू खोऱ्यास जरुर भेट द्या. आरकू हे अतिशय शांत व आल्हाददायक ठिकाण आहे. आरकू हे पूर्व घाटांतल्या अनंतगिरी डोंगरमाथ्याच्या कुशीत बसलेले आहे. ते विशाखापट्टणमपासून ११२ कि.मी. अंतरावर असून ते समुद्रसपाटीपासून ९७५ मीटर्स उंच आहे. त्याला झिल्डा धबधब्यापासून सतत पाण्याचा पुरवठा होत असतो.



इथे अनेक वन्य जमातींचे लोक राहतात व ते एक संरक्षित असे ठिकाण आहे. इथले थंड व आल्हाददायक हवामान, आणि रमणीय असे सृष्टिसौंदर्य प्रवाशांना आकर्षित करते.

आरकू हे अनेक गिरीजनांचे व वन्य जमातींचे माहेरघर आहे. तुम्हाला ठिकठिकाणी ही माणसे झाडू, चिंच, मध विकताना वा खरेदी करताना दिसतील.

आरकू खोऱ्याजवळचे बोरा लेणी हे ठिकाण अतिशय प्राचीन असून अनेक पर्यटकांचे आकर्षण ठरलेले आहे. तसेंच टायडाचा जंगल बेल् हा कॅंप जवळपासच आहे.

आरकूमध्ये वन्य जमातींच्या जीवनांवर आधारित असलेल्या गोष्टींचे संग्रहालय आहे. त्यांत विविध वन्य जमातींची जीवनशैली, संस्कृति आणि कलाकौशल्य याबद्दलची माहीती मिळते.

आरकू मध्ये तुम्ही हिरव्या गवताळ प्रदेशांतून, गर्द झाडीतून, खूप लांबवर सैर कराल. तिथें तुम्हाला नावीन्यपूर्ण झाडेझुडपे दिसतील.

## आरकू खोऱ्यांत कसे जाल?

आरकू खोरे हे विशाखापट्टणपासून ११२ कि.मी. वर असून तेथे रस्त्याने वा रेलमार्गाने आपण पोहोचूं शकता. आरकू हे कोट्टवल्सला-किरंदूल रेल्वेमार्गावर असून, रेल्वेगाड्या सकाळी विशाखापट्टणपासून निघून आरकूला पोचतात, व संध्याकाळीं विशाखापट्टणला परत जातात.



# माया सरोवर

## 8

(जयशील व सिद्धसाधकाने धबधब्यातून कशीतरी आपली सुटका करुन घेतली. झाडाला लटकलेल्या बुटक्याला त्यांनी सोडवले. त्यावेळी मेंढ्यांच्या रथांत बसलेली बुटकी राणी तिथे आली. ती आपल्या शत्रूंच्या बद्दल बोलत असतानाच एका भयंकर प्राण्याने त्यांच्यावर एक मोठा खडक फेकला.)

जयशील आणि सिद्धसाधक आश्चर्याने त्या भयंकर प्राण्याकडे पाहिले. आणि असंही बघितलं की त्याच्याबरोबर एक बलदंड माणूस उभा आहे. जयशीलला असे वाटत होते की या माणसाला या पूर्वी आपण कुठेतरी पाहिले आहे. इतक्यात त्या भयंकर प्राण्याने फेकलेला खडक त्यांच्या जवळ येऊन पडला.

मेंढ्यांच्या वाहनांतून जे बुटके आलेले होते ते थरथर कापूं लागले. बुटक्यांची राणी जयशील आणि सिद्धसाधकाला म्हणाली "हे शूर वीरांनो, ज्या बलदंड माणसाने या प्राण्याला माणसाळवले आहे, तो गेले दहापंधरा दिवसांपासून खूप त्रास देत आहे. ते बुटके आमच्यापेक्षा कनिष्ठ जातीचे आहेत. ते आम्हाला त्यांचे गुलाम करुं इच्छितात. ते याच्या मदतीने कुठल्याही क्षणी आमच्यावर हल्ला करतील."

जयशील आणि सिद्धसाधकाला राणीच्या या असहाय्य स्थितीची दया आली. त्यांना स्पष्ट दिसत होते की बुटके धाडसी आहेत पण



त्यांना त्या भयानक प्राण्याची फार भीती वाटते आहे.

एवढ्यात जो माणूस नरवानराच्या मागे उभा होता त्याने तलवारीचे टोक त्याच्या पाठीत टोचून त्याला कांहीतरी हुकूम केला. नरवानर ढांगा टाकत गेला आणि जवळचाच एक मोठा दगड उखडून काढायचा प्रयत्न करूं लागला.

''साधक, तो आपल्यावर परत दगड फेकणार असं दिसतंय. पण त्या मूर्खाला हे कळत नाहीये की दिवसा दगडांचे असे हल्ले चुकवणे सोपे असते.''

मग तो बुटक्या राणीला म्हणाला ''तुमचे लोक शिकार करण्यासाठी जे भाले तुम्ही वापरता, त्यातला एक भाला तावडतोब घेऊन या.''

जयशीलचे भाल्यांबद्दलचे बोलणे ऐकून बुटक्यांचा सेनापती घाबरुन राणीकडे बघूं लागला.

तो राणीला म्हणाला, ''महाराणी, आपल्या रिवाजाप्रमाणे पण बाणांना हातसुद्धा लावूं शकत नाही की त्यांचा उपयोग करूं शकत नाही. पण जंगलात मला जे धनुष्य-बाण मिळाले आहेत ते मी घरी अगदी जपून ठेवले आहेत.''

बुटक्यांची राणी रागवून कांहीतरी बोलणार इतक्यात तिला शांत करत जयशील म्हणाला ''राणीसाहेब, ते बाण जर लौकर इथे आणूं शकलांत तर या नरवानराच्या अत्याचारां-पासून मी तुम्हां लोकांची सुटका करूं शकतो. जेव्हां त्याचं माझं समोरासमोर युद्ध होईल त्यासाठी लागणारा बाण मी स्वतः तयार करीन.''

राणीने सेनापतीकडे पाहिले. सेनापती आपल्या घरुन बाण आणण्यासाठी तावडतोब निघाला.

एवढ्यात नरवानराने अजून एक मोठा दगड उचलला. त्याच्या कंबरेला बांधलेली साखळी पकडलेला माणूस तलवारीचे टोक त्याच्या पाठीत टोचूं लागला. आणि जोरांत ओरडूं लागला.

तो ओरडा ऐकताच जयशील शीळ घालत म्हणाला ''सिद्धसाधक आता हा माणूस कोण ते माझ्या लक्षांत आले आहे. हा आपल्या



अमरावती नगरांतलाच माणूस आहे. यांच्यामुळेच मला आपला देश सोडावा लागला. फार पूर्वी हा आमचे राजे रुद्रसेन यांच्या अश्वदलाचा सरदार होता. याचे नांव आहे कृपाणजित.''

इतक्यांत बुटक्यांचा सेनापती बाण घेऊन आला. ते बाण त्याने जयशीलच्या पायाजवळ ठेवले. जयशील बाण तपासूं लागला. ते चांगले मजबूत आणि टोकदार सहा बाण होते.

सिद्धसाधकाने पण बाण हातात घेऊन पारखून बघितले आणि समाधान दाखवत तो म्हणाला ''जयशील, कृपाणजित आणि वानर यांच्यावर शस्त्र चालवणार वाटतं?''

जयशील हसंत म्हणाला ''साधक, आपण त्यांच्यापासून बरेच दूरवर आहोत. इथून बाण सोडून त्यांना मारणे एवढे सोपे आहे कां? हे तर साधे बाण आहेत. ब्रह्मास्त्र किंवा नागास्त्र थोडीच आहे.''

बुटक्यांच्या राणीने सेनापतीकडे पाहिले. जसं कांही तिला समजून घ्यायचं होतं की त्याचे काय मत आहे ते !

नरवानर एक मोठा दगड घेऊन फेकणार तेवढ्यांत सिद्धसाधक रागवून म्हणाला ''शी, शी, या वानराला दगड फेकण्याशिवाय दुसरं काही येतं असं दिसत नाही. माझ्या त्रिशूळाने याला भोसकून याला संपविले पाहिजे.'' असं म्हणत त्रिशूळ घेऊन तो वेगाने वानराकडे जाऊं लागला.



जयशीलच्या लक्षांत आले की असं करुन साधक आपला जीव धोक्यांत घालणार आहे. त्याने त्याला थांबायला सांगून एक बाण वानरावर सोडला. बाणाचा नेम चुकला आणि तो कृपाणजितच्या हातातील लोखंडाच्या सांख-ळीला लागला. दुसऱ्याच क्षणी कृपाणजितने मान वर करुन आपल्या शत्रूकडे बघितले आणि जयशीलला ओळखले.

कृपाणजित दुसऱ्या कोंडा सरदाराला म्हणाला ''हे बघ! आत्ता शत्रूवर हल्ला करायची वेळ नाही. आत्ता इथून निघून गेलेलंच बरं.'' असं म्हणून तो नरवानराला डोंगरावरुन खाली नेण्याचा प्रयत्न करूं लागला.

गडेकोंडा सरदार जयशील व सिद्धसाधक यांना बारकाईने न्याहाळत म्हणाला ''महाराज,



मी तुमच्या आज्ञेचे पालन करतो. आपण शूर वीर, मोठे योद्धा आहात. आपण आणि नरवानर त्या त्रिशूळधारी आणि धनुर्धरांवर तुटुन पडलात आणि त्यांना मारुन टाकलेत, तर फार चांगले होईल. आपण हे कराल कां? तेवढ्यांत आम्ही आमच्या भाल्यांनी त्या दुष्ट राणीच्या सैनिकांना कापून काढू.''

त्याच्या बोलण्याकडे कृपाणजितने कांही लक्ष दिले नाही. तो नरवानराला पकडून जबरदस्तीने डोंगरावरुन खाली घेऊन जाऊं लागला. मग रागावून तो गडेकोंडाला म्हणाला. ''तू काय मला ससाणा समजतोस कीं मी उडून जाऊन शत्रुवर हल्ला करुं? त्यांना मारायचा अजून एक मार्ग आहे. पण प्रथम सगळेजण वस्तीवर जाऊन पोचा. माझ्या आज्ञेचे पालन करा.''

सरदार गडेकोंडाने ताबडतोब आपल्या सैनिकांना वस्तीवर एकत्र जमण्याची आज्ञा केली. आणि ते डोंगरावरुन खाली उतरुं लागले. शत्रुला पळताना पाहून जयशील बुटक्यांच्या सेनापतीला म्हणाला ''सेनापती, ही तुम्हाला छान संधी आहे. त्यांचा पाठलाग करा, त्यांच्यावर भाले फेका, डोंगरावरुन दगड खाली ढकला आणि जितक्या लोकांना मारता येईल तेवढ्यांना मारा.''

सेनापती आपल्या सैनिकांना आव्हान देत म्हणाला, ''अरे शूर गडेकर सैनिकांनो, वाघ, सिंहांसारखे शत्रूवर तुटून पडा. तुमच्या भाल्यांनी त्या सैनिकांचा बळी घ्या. तो भयानक प्राणी पळून जात आहे. आता आपल्याला त्याला घाबरण्याचे कांही एक कारण नाही.''

सेनापतीच्या या बोलण्याने सैनिकांना जोर आला. ते पुढे जाऊं लागले. शत्रुच्या कांही सैनिकांना त्यांनी पकडले. राणीच्या सैन्याने त्यांना भाल्याने जखमी करुन डोंगरावरुन ढकलून दिले.

हे पाहून सिद्धसाधकाला देखील जोर आला ''जय महाकाली'' असे ओरडत तो जयशीलला म्हणाला ''बघतोस काय? त्या बुटक्यांच्या वस्तीत जाऊया. आपल्याला डोंगराच्या पायथ्याशी दिसते आहे ती तीच वस्ती आहे. तिथे जाऊन त्यांच्यावर तुटून पडूया. आणि कृपाणजित व गडेकोंडाच्या बुटक्या सैनिकांचे इहलोकीचे काम समाप्त करुंया.''



त्याच्या या बोलण्यावर हंसत जयशील म्हणाला ''साधका, त्यांना मारुन टाकण्याची कांही गरज नाही. ते कांही आपले शत्रू नाहीत. जमलं तर त्या दोघांच्यात मैत्री निर्माण करण्याचाच आपण प्रयत्न करुंया.''

''कृपाणजित आपला कट्टर शत्रु आहे. त्यालापण सोडून द्यायचं? आणि त्याच्या त्या पाळीव वानराला पण सोडून द्यायचं? त्यांच्या मदतीनेच तर तो इथला राजा बनला आहे.'' सिद्धसाधक म्हणाला.

जयशील कांही उत्तर देणार इतक्यांत राणीचा सेनापती तिथे येऊन म्हणाला ''शत्रू पळून गेला. त्यांचे कांही सैनिक पण आम्ही मारले. आता काय करायचे त्याची आज्ञा द्यावी.'' जयशील म्हणाला. ''आता गुपचुप डोंगर उतरुन खाली राणीकडे परत जा. आम्ही दोघं पण लौकरच तिथे येऊन पोचतो.''

सेनापतीने सैनिकांना आज्ञा दिली की सर्वजण राणीकडे जा. फक्त एका सैनिकाला सिद्धसाधक व जयशील यांना राणीकडे जाण्याचा रस्ता दाखविण्यासाठी तिथे ठेवले. आणि जयजयकार करत ते डोंगर खाली उतरुं लागले.

सिद्धसाधक थोड्यावेळ गडेकोंडावाल्यांच्या वस्तीकडे बघत म्हणाला ''जयशील या बुटक्यांच्या भानगडीत पडून आपण चूक केली. आता पुढे काय करायचं ते सांग.''

''साधका, शांत हो. आपण जाणून बुजून



थोडेच इथे आलो! मगरीच्या आकाराचा मकरकेतू तर या सगळ्यांचे मूळ आहे. आपण निघालो, कनकाक्ष महाराजांच्या पळवल्या गेलेल्या मुलाला शोधायला. आणि इथे येऊन या जंगलात राहाणाऱ्या लोकांच्या आपसातल्या भांडणात अडकलो, याचं मला देखील नवल वाटतंय. इथून जाण्याआधी त्या कृपाणजितला यमसदनास पाठवलेच पाहिजे.'' जयशील म्हणाला.

''महाकालीची कृपा असेल तर त्याच्या-बरोबर त्या नरवानराला पण मारुन टाकूं. आणि त्याची कातडी काढूं. असल्या विचित्र प्राण्याच्या कातडीवर पद्मासनांत बसून ध्यान केलं तर, या जन्मी नाही, तरी पुढल्या जन्मी तरी श्रेष्ठ योगी बनूं. आता चल, खूप भूक लागली



आहे. बुटक्या राणीच्या वस्तीत जाऊं या.'' आणि ते दोघं तिथून निघाले.

जयशील व सिद्धसाधक यांचे डोंगरावर असे बोलणे चालू असताना झाडांमागे उभे असलेल्या गडेकोंडा आणि कृपाणजित यांच्यात वादावादी सुरुं होती. दोघे एकमेकांना शिव्या देत, ''तुझ्यामुळेच हे सगळं असं झालं'' म्हणून भांडत होते.

सरदार गडेकोंडा कृपाणजितला टोमणा मारत म्हणाला ''तुम्ही दिसायला चांगले धष्टपुष्ट, आडदांड दिसता पण अंगात एक कणभर देखील धाडस नाही. तुम्ही भ्याड आहात. शत्रूला घाबरुन तुम्ही आमच्या अगोदर पळून आलात. ज्या नरवानराची आपण तोंड फाटेपर्यन्त स्तुती करता, तोच पाळीव प्राणी आपल्याला मारुं पाहात होता.''

त्याचा हा टोमणा ऐकून दांतओठ खात कृपाणजित म्हणाला ''अरे ए आंधळ्या कोंडा, मी कांही शत्रूला घाबरुन पळालो नाही. आत्ता ही वेळ आपल्या फायद्याची नाही, म्हणून निघून आलो.

माझ्यावर बाण सोडणाऱ्या त्या जयशील नांवाच्या आपल्या कट्टर शत्रूला उद्या सूर्योदयापूर्वी नाही मारलं, तर माझं नांव कृपाणजित नाही. आता या नरवानराची गोष्ट- त्याला माकडासारखं माझ्या शब्दांवर नाचाय-लांच हवं. बघ हवं तर.''

तेव्हां सेनापती मेंढ्यावर बसलेला होता. तो भाला हातात घेऊन म्हणाला ''महाराज, फक्त तुम्ही त्या दुष्टांवर बाणांचा नेम धरा. आपले बाण त्यांना जसे लागतील तसे ते घाबरुन जातील.

तेव्हां आम्ही त्यांच्यावर चाल करुं आणि डोंगराच्या पायथ्यापर्यन्त त्यांना पळवून लावूनच मग आम्ही थांबू. जमलं तर आम्ही त्यांच्या वस्तीत घुसून तिला आग लावून देऊं.''

सिद्धसाधक पण लगेच आपला त्रिशूळ उचलत म्हणाला ''जयशील, ही चांगली संधी आहे. नेम धरुन बाण मार. नरवानर पण सांखळ्या तोडून त्या बुटक्याला पकडायला बघतो आहे.''

जयशीलने धनुष्यावर बाण चढवून नेम



धरुन बाण सोडला. जोरात जाऊन बाण वानराच्या कमरेला लागला. दुसऱ्याक्षणी वानर थयथयाट करुं लागला आणि एका बुटक्याला उचलून त्याने डोंगरावरुन खाली फेकून दिले. तो बुटका ओरडत जेव्हां खाली पडूं लागला तेव्हां सेनापतीने आपल्या सैनिकांना सावध केले. मेंढ्यावर स्वार असलेले सैनिक व पायदळ भाले उंचावून ओरडत भराभर डोंगर चढूं लागले.

बुटक्यांचा सेनापती व त्याचे सैनिक डोंगरावर चढताना पाहून त्यांच्याशी लढायला कृपाणजित आपल्या माणसांना बोलवूं लागला. त्यांची तयारी व त्यांचे सैन्य बघून जयशील म्हणाला ''साधक, आपल्याला आता राणीच्या सैन्याला मदत करायला पाहिजे. त्या कृपाणजितला बघितलंस? त्याने जंगली वेष घातला आहे, तरी मी त्याला ओळखलं. त्याने पण मला ओळखलं असेल.''

सिद्धसाधक बुटक्यांच्या राणीला म्हणाला, ''तुम्ही इथेच थांबलांत तर बरे होईल. आम्ही दोघे तुमच्या सैन्याबरोबर जाऊन शत्रूचा सर्वनाश करुं.''

आणि जयशील व सिद्धसाधक वेगाने डोंगर चढूं लागले. त्यांनी सेनापतीला सांगितले ''सेनापती, तुमच्या सैन्याला जरा थांबायला सांगा. वानर कदाचित तुमच्यावर परत दगड टाकेल.''

यावर सेनापती म्हणाला ''तुम्ही त्या भयंकर प्राण्यापासून आणि त्याच्या साथीदारापासून आमचे रक्षण करा. मग आम्ही गडेकोंडांना आणि त्यांच्या सैनिकांना आमच्या भाल्याने जखमी करुं आणि खाली ढकलून देऊं.'' असं म्हणून त्याने गडेकोंडाला दाखवत नरवानराला कांहीतरी सांगितले.

दुसऱ्या क्षणी नरवानराने गडेकोंडाला पकडले आणि वर उचलून जोरजोरात ओरडूं लागला. आपल्या मालकांचा जीव धोक्यात आहे असे पाहून गडेकोंडाचे सैनिक आपले भाले पेलत घोषणा देत नरवानर आणि कृपाण-जितच्या दिशेने जाऊं लागले. (क्रमशः)



# संतोषाचे रहस्य

कृष्णगिरीच्या जमीनदारांच्या कचेरीत शिव काम करीत होता. त्याचा चेहरा नेहमी हंसतमुख असे. कचेरीतल्या इतर माणसांना हा इतक्या कमी मिळकतीत संसार कसा चालवतो याचं आश्चर्य वाटत असे. उच्चपदावर, चांगला पगार घेणाऱ्या माधवला तर सदैव चिंता असायची कीं कुणाकडे कर्ज मागावं! एक दिवस दुपारच्या जेवणाच्यावेळीं त्याने शिवला याचं कारण विचारलं.

शिवने हंसत उत्तर दिलं, "त्यांत काय मोठंसं? जो पगार मिळतो, त्याचे मी चार हिस्से करतो. पहिल्या हिश्शांतून कर्जफेड करतो. दुसरा स्वतःसाठी ठेवतो, तिसऱ्यांतून पुण्यकार्य करतो आणि चौथा व्याजावर देतो."

"अरे, तुझ्या पगारांतून तू कर्ज कसं देतोस रे? जरा नीट सांग पाहूं!" माधव म्हणाला.

"पहिला हिस्सा कर्जफेडीसाठी म्हणजे माझ्या जन्मदात्यांसाठी मी खर्च करतो. दुसरा हिस्सा माझी पत्नी व मी आमच्यासाठी वापरतो. तिसरा भाग माझी ताई व भाचे यांच्यासाठी ठेवतो म्हणजे पुण्यकार्यच, आणि राहिला चौथा हिस्सा, तो मुलांच्या शिक्षणावर खर्च करतो. म्हणजे आमच्या म्हातारपणासाठी तरतूद - व्याजावरती दिलेली ठेव!"

गरजेपुरताच खर्च करणारा शिव म्हणूनच सदा हंसमुख होता!

- मंजू भारती



राजा विक्रम व वेताळाच्या नव्या कहाण्या

# सिद्धेंद्राचा हितोपदेश

निश्चयी विक्रमार्क परत झाडाजवळ गेला. झाडावरून शव खाली ओढून त्याने ते खांद्यावर घातले व नेहमीप्रमाणे तो स्मशानाकडे झपाझप चालू लागला. तेव्हां शवांतला वेताळ बोलू लागला, "राजा, तुझ्या धैर्याची खरंच कमाल आहे. आपल्या जीवाचीसुद्धां पर्वा न करता तू हे साहस करतो आहेस. पण कां? यातून तुला काय मिळणार आहे? कां तू इतके कष्ट घेत आहेस? अखेर तू एक राजा आहेत. तुझ्याजवळ अमाप संपत्ती आहे, धन-दौलत आहे. तुझ्या यशाची कीर्ती चारी दिशांना पसरली आहे. सारी जनता तुझ्यावर अपार प्रेम करते, त्यांची तुझ्यावर श्रद्धा आहे, भक्ती आहे. कुणीही तुझ्याशी शत्रुत्व करायला धजत



नाहीत. असे आता असताना आणखी तुला आता काय हवे? कीं तू मंत्र-तंत्र शक्ती अवगत करून घेण्याच्या प्रयत्नांत आहेस? तसे असेल तर तू अतिशय सावध असायला हवेस. कारण ती विद्या अवगत करून घेऊन त्याचा उपयोग करण्यांत धोकेच येतात. धारदार तलवारीवर कसरत करण्याइतके ते अवघड आहे. सिद्धेंद्र नांवाच्या पंडिताने आपला शिष्य विजयसिंहला निक्षून सांगितले होते, कीं आपल्या स्वार्थासाठी या विद्येचा उपयोग करू नये.

पण त्याने आपल्या स्वार्थपूर्तीसाठी या शक्तींचा उपयोग केला. परंतु दुसऱ्या एका पंडिताने विजयसिंहला पाठिंबा दिला व अशी घोषणा केली की तो स्वार्थ किंवा अधर्म होऊंच शकत नाही. त्या पंडिताने असे सांगितले की घोर परिश्रम करून ज्या विद्या आपण अवगत करून घेतो, त्यांचा उपयोग केला तर त्यांत काय चूक आहे? मी तुला उदाहरणार्थ रविवर्मा व विजयसिंह यांची गोष्ट सांगतो, ती लक्षपूर्वक ऐक. कारण त्यामुळे तुझे कल्याण होईल.'' असे म्हणून वेताळाने गोष्ट सांगण्यास सुरवात केली.

महापंडित सिद्धेंद्र जंगलात एक गुरुकुल चालवत होता. विद्याभ्यास पूर्ण झालेल्या शिष्य-वृंदाला निरोप देण्यापूर्वी त्यांनी त्यांना सांगितले, ''मला जी जी विद्या येत होती, ती ती मी तुम्हाला शिकवली आहे. पण तुम्ही सर्वांनी एक मुख्य गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. मनुष्य जी विद्या प्राप्त करून घेतो, त्यासाठी खूप परिश्रम, कष्ट, मानसिक व शारीरिक बळ एकत्र करून साध्य करून घेतो. परंतु कांही वेळा खूप कष्ट करूनही फळ मिळत नाही, किंवा जितके श्रम करतो, त्यामानाने फलप्राप्ती होत नाही. तेव्हां, अशा स्थितीतच ज्या गहन विद्या, मंत्र-शक्ती अवगत केलेल्या आहेत, त्यांचा उपयोग तुम्ही करू शकता. पण असे न करता, कसलेही प्रयत्न न करताच फलप्राप्ती व्हावी या उद्देशाने या शक्तीचा उपयोग केलात, तर तुमचे भले होणार नाही.''

सिद्धेंद्र गुरुंचा हितोपदेश त्यांचे शिष्य रविवर्मा व विजयसिंह या दोघांनाही अतिशय योग्य वाटला. ते दोघेजण चांगले मित्र होते. दहा वर्षांपासून गुरुकुलांत विद्याभ्यास करीत होते. त्या दोघांनाही सिद्धेंद्र गुरुंचे प्रेम व माया सारखीच मिळाली होती. दोघेही विद्याभ्यास करून आपल्या गांवी परत निघाले. जाण्यापूर्वी त्यांनी गुरुंना साष्टांग नमस्कार केला. आशिर्वाद देत त्यांनी एक मृदू हास्य केले त्यांतून ते सूचित करीत होते कीं सांगितलेला उपदेश लक्षांत ठेवा!

आपल्या गांवी परत जातांना वाटेत त्यांना गोपुर नांवाचे एक गांव लागले. गांवाच्या मध्यभागी एक धर्मशाळा होती, तिथे ते राहिले. जेवणानंतर ते धर्मशाळेच्या चबुतऱ्यावर बसले. तेव्हां कांही ग्रामीण लोकांच्या बोलण्यातून त्यांना समजले की त्याच दिवशी संध्याकाळी तिथे मल्लयुद्ध स्पर्धा आहेत. त्या गांवात त्रिनेत्र नांवाचा एक बलदंड इसम होता.

त्याला आपल्याला कोणीही पराभूत करू शकत नाही म्हणून आत्मविश्वास व गर्व होता. गांवात जाहीर केलेले होते की त्याला जो कुणी पराभूत करेल त्याला एक हजार सोन्याच्या मोहरा ग्रामाधिकारी देईल.

ते ऐकून रविवर्मा विजयसिंहला म्हणाला, ''विजय, आपण गुरुकुलांत मल्लयुद्ध शिकलोय. केवळ सोन्याच्या मोहरा मिळवण्यासाठीच नव्हे, तर या विद्येंत आपण किती पारंगत आहोत ते पाहण्यासाठी आपण या स्पर्धेत भाग घेऊं या. तिकडे मी सर्वांना पराजित करीत होतो. इकडे मी स्वत: त्रिनेत्रशी मल्लयुद्ध करेन.''

त्यावर विजयसिंह आपली बाजू मांडत म्हणाला, ''मित्रा, ही संधी तू मला दे. तू श्रीमंत आहेस, तुला संपत्तीची जरूरी नाही. पण मी गरीब आहे. एक हजार सोन्याच्या मोहरा कमवायची ही सुवर्णसंधी तू मला दे.''

रविवर्माने लगेच त्याला होकार दिला. दोघेही संध्याकाळी जिथे मल्लयुद्ध होणार होते त्या ठिकाणीं पोहोचले. तिथे लोकांची प्रचंड गर्दी झाली होती. ग्रामाधिकारी आणि गांवातले इतर प्रमुख लोक समोर मंचकावर बसले होते. थोड्या वेळांतच





मल्लयुद्ध सुरु झाले. पाहता पाहता त्रिनेत्रने अनेक मल्लयोद्ध्यांना पराजित केले.

शेवटी विजयसिंहची पाळी आली. विजयसिंहने असे प्रहार करायला सुरवात केली कीं त्रिनेत्र घाबरुन गेला. लौकरच विजयसिंहने त्रिनेत्रला जमिनीवर उलटे पाडले, आणि त्याचे दोन्हीं पाय धरुन त्याला फिरवायला सुरवात केली.

लोकांनी अत्यानंदाने भरपूर टाळ्या वाजवल्या. ग्रामाधिकारीही खूष झाले, त्यांनी त्याची भरपूर प्रशंसा केली व हजार सोन्याच्या मोहरा त्याला दिल्या. दोन्हीं मित्रांनी रात्र धर्मशाळेतच घालवली व पहाटे ते तिथून निघाले. संध्याकाळ झाली तेव्हा ते एका जंगलात पोहोचले होते. दोघांनाही वाटले की अंधारात आणखी पुढे जाणे योग्य नाही. म्हणून जवळच असलेल्या एका वृक्षाच्याखाली ते झोपले.

मध्यरात्री कुणीतरी त्यांना झोपेतून जागे केले. डोळे उघडून पाहिले तर त्यांच्या समोर तीन धट्टेकट्टे, भले मोठे धटिंगण उभे होते. त्यांच्या हातांत मोठ-मोठ्या तलवारी होत्या. त्यांना पाहून न घाबरता विजयसिंह कठोर स्वरांत म्हणाला, "कोण आहात तुम्ही? काय पाहिजे तुम्हाला?"

त्यांतल्या एकाने खदाखदा हसत म्हटले, "दिसत नाही काय तुला आम्ही कोण ते? मुकाट्याने ग्रामाधिकाऱ्याने दिलेल्या एक हजार सोन्याच्या मोहरा इकडे दे. नाहीतर आम्ही तुम्हा दोघांच्या चिंधड्या चिंधड्या करून टाकू." तलवारीचे पाते विजयसिंहाच्या गळ्यावर धरून तो म्हणाला.

बस, विजयसिंहने एक चुटकी वाजवली आणि तलवार धरलेल्या चोराच्या गळ्यांतून रक्त वाहायला लागले आणि तो जमिनीवर उलटा पडला. ते दृश्य पाहून इतर दोघे चोर "मांत्रिक मांत्रिक!" म्हणून ओरडत धावायला लागले. रविवर्माला आश्चर्य वाटले. त्याने विजयसिंहला विचारले, "खरं सांग, तू या चोरावर मंत्राचा उपयोग केला होतास ना?"

हा प्रश्न ऐकताच विजयसिंह एकदम गांगरून गेला. तो म्हणाला, "क्षमा कर रवि, याच्यावरच नव्हे तर त्रिनेत्रवर सुद्धा मी मंत्राचा उपयोग करून कसलेही श्रम न करता स्पर्धा जिंकली."

"याचा अर्थ असा होतो की स्वार्थासाठी तू कुकर्म केलेस. गुरुजींनी सांगितलेल्या उपदेशाचे पालन तू केलं नाहीस." रविवर्मा जरा रागानेच म्हणाला.

"मित्रा, यांत स्वार्थ कसला? कुठल्या परिस्थितीत मंत्रशक्तींचा उपयोग केला पाहिजे या बाबतीत आपली मते एक नाहीत. आपण प्रथम आपल्या गांवी पोहोचू या. तिथे गेल्यानंतर आपले



लहानपणाचे गुरु विश्वनाथशास्त्री यांना या विषयावर मत विचारूंया. मला वाटते कीं ते योग्य तेच सांगतील." विजय म्हणाला.

रविवर्मा कांहीच बोलला नाही. दुसऱ्या दिवशी सूर्योदयानंतर दोघेही विश्वनाथशास्त्रींच्या आश्रमांत गेले. त्यांचा आश्रम गांवाजवळून वाहणाऱ्या नदीच्या किनाऱ्यावर होता. त्यावेळी ते एका डेरेदार वृक्षाखाली बसून तालपत्रांचे वाचन करत होते.

रविवर्मा आणि विजयसिंहने त्यांच्या पायांना स्पर्श करून प्रणाम केला. त्यांना आशिर्वाद देत ते म्हणाले, "तुमच्या वडलांच्याकडून मला समजले कीं विद्याभ्यास करून तुम्ही परत येत आहात. सिद्धेंद्र गुरुजी ठीक आहेत ना?"

दोघांनी सिद्धेंद्र गुरुजींची हालहवाल सांगितली आणि तसेच त्यांनी दिलेल्या हितोपदेशाविषयीही सविस्तर सांगितले.

त्यावर विश्वनाथ शास्त्री म्हणाले, "सिद्धेंद्र गुरुजींचा हितोपदेश तुमच्या जीवनांत चिरस्मरणीय आहे."

रविवर्माने लगेच म्हटले, "गुरुजी, परंतु दुःखाची गोष्ट ही आहे की गुरुकुल सोडल्याबरोबर विजयसिंह हितोपदेश विसरला."

विश्वनाथ शास्त्री चकित झाले व विजयसिंहला निरखून पाहू लागले. विजयसिंह म्हणाला, "रविवर्मा, तुला जे सांगायचे आहे, ते तूच सांग."

रविवर्मा म्हणाला, "स्वार्थाने प्रेरित होऊन विजयसिंहने मल्लयोद्धा त्रिनेत्रवर आणि चोरावरही मंत्रशक्तीचा उपयोग केला. असे करण्यांत त्याचा स्वार्थ व अधर्म होत नाही कां? गुरुंच्या आज्ञेचा हा भंग नव्हे कां?"



"रवि, मला नाही वाटत की यात विजयचा स्वार्थ आहे किंवा त्याने अयोग्य कार्य केले आहे म्हणून. नीट विचार केलास तर तुलाच सत्य काय ते कळेल."

वेताळाने ही गोष्ट सांगून झाल्यावर राजाला म्हटले, "राजा, विजयसिंह गुरुवचन विसरला यात शंकाच नाही. संपत्तीच्या आशेने त्याने त्रिनेत्रवर आणि नंतर चोरांवरही अवगत केलेल्या मंत्रशक्तीचा उपयोग केला. माझ्या दृष्टीने हा स्वार्थ व अधर्म आहे. पण विश्वनाथ शास्त्रींच्या म्हणण्यानुसार विजय स्वार्थी नाही व अधर्मीही नाही. हे योग्य आहे कां? माझ्या शंकांचे उत्तर माहित असूनही जर तू गप्प बसलास तर डोक्याचे तुकडे तुकडे होतील."

विक्रमार्क म्हणाला, "विजयच्या व्यवहारांत स्वार्थही नाही आणि अधर्मही नाही असे विश्वनाथ शास्त्री म्हणाले ते योग्यच आहे.

स्वार्थाचीसुद्धा एक सीमा आहे, एक मर्यादा आहे. मल्लयोद्धा त्रिनेत्रला आपल्या सामर्थ्याचा गर्व होता. त्याला मंत्रशक्तीने पराजित करणे म्हणजे कांही स्वार्थ नव्हे. जर तो या स्पर्धेत विजयी झाला असता तर आपल्यावर मात करणारे कुणी नाही असे त्याला वाटले असते. त्याचा गर्व दुप्पट वाढला असता, लोकांवर अन्याय व अत्याचार करण्यात त्याने मागेपुढे पाहिले नसते. स्पर्धा जिंकून विजयसिंहने लोकांवरचे संकट टाळले. त्यासाठी त्याने मंत्रशक्तिचा प्रयोग केला तर त्यांत काय चुकले?

आता चोरांच्या बाबतीत म्हणशील तर हे चोर, डाकू कुठलेही क्रूर कार्य करायला तयार असतात. खून, रक्तपात करायलादेखील ते डगमगत नाहीत. हिंसा करणे, दुसऱ्यांना वेदना देणे, हे त्यांचे रोजचे काम असते. त्याशिवाय या चोरांना संपत्ती दिल्याबरोबर ते यांना सोडून देतील याची कांही खात्री नाही. विजयबरोबरच त्याच्या मित्राचे प्राणही त्यांनी घेतले असते. हे सर्व जाणूनच विजयसिंहने मंत्रशक्तिचा उपयोग केला. आपले व आपल्या मित्राचे संरक्षण करण्यासाठी शत्रूला मारले तर त्यांत स्वार्थ आहे असे कसे म्हणता येईल? अधर्म म्हणशील तर सर्व काळांत, सर्व परिस्थितींत, कुठलाही अपरिवर्तनीय धर्म असूंच शकत नाही. युगायुगांपासून सामाजिक परिस्थितींच्या बदलानुसार धर्मही बदलत राहिला आहे. इथे आणखी एका मुद्यावर लक्ष द्यायला हवे. रविवर्माने विजयसिंहवर आरोप केला कीं त्याने गुरुपदेशाचे पालन केले नाही, हितोपदेश तो विसरला, पण त्यावेळीं विजयसिंहाने मौन धारण केले व तो त्याला गुरूकडे घेऊन गेला. कारण त्याला माहित होते कीं आपण कितीही समजावून सांगितले तरी रविवर्मा त्यावर विश्वास ठेवणार नाही व कायमचा त्याला स्वार्थी व अधर्मी समजेल. त्यामुळे धर्म-अधर्माचे सखोल ज्ञान असलेल्या विश्वनाथ शास्त्रींकडे त्याला तो घेऊन गेला. विजयने रविवर्मालाच घडलेला सर्व वृत्तांत कथन करायला लावला. हे सुद्धा त्याची धर्म-बुद्धीच सूचित करते."

राजाने मौनभंग केल्यामुळे यशस्वी वेताळ शवासह अदृश्य झाला व पुन्हां झाडावर जाऊन बसला.

**आधार : पवनकुमारांची कथा**



भारतीय दंतकथा - ६

# दृष्टीहीन साधू



भगवान बुद्ध आपल्या अनुयायांसह पावसाळी हवेत एका डोंगराच्या पायथ्याशी राहिले होते. तेथील अनेक गुहांतून त्यांचे अनुयायी होते. कधीकधी गांवातील व दूरचे अनेक ज्ञानी लोक तत्वज्ञान व धर्म, या विषयांवर चर्चा करण्यासाठी भगवानांकडे येत.

बरेच दिवसांच्या पावसानंतर एक दिवस लख्ख उन पडले. त्या दिवशी भगवान बुद्ध आपल्या गुहेतून बाहेर सैरसपाटा करण्यासाठी निघाले होते. त्यांना अनेक माणसें अभिवादन करीत होती, व बुद्धही त्याचा स्वीकार करुन आनंदाने प्रत्यवदन करत होते. तेवढ्यांतच त्यांना

यांच्याविरुद्ध आहात ना?" भगवान बुद्धांनी सांगितले, "होय, मी त्यांच्याविरुद्धच आहे.

"मग हे भगवन, तुमचा एक अनुयायी अनेक मुंग्यांना चिरडत चाललेला पाहून आम्हाला अतिशय वाईट वाटले आणि तुमचा तोच अनुयायी आता शांतपणे शिळेवर बसलेला आहे." त्या अनुयायाकडे बोट दाखवून तो माणूस म्हणाला.

त्यावर बुद्ध भगवान म्हणाले, "हा माझा अनुयायी एखादी मुंगीही मारुं शकणार नाही."

"मीच काय? माझ्या सहकाऱ्यांनीही त्याला असंख्य मुंग्या चिरडताना पाहिले आहे,"



तरीही भगवान बुद्ध ठामपणे म्हणाले "मुंग्या मेल्या असतील, परंतु त्याने त्या मारल्या नाहीत."

"ठीक आहे, आम्ही मान्य करतो. आम्ही तुम्हाला सांगितले, हीच मोठी चूक केली." तो माणूस म्हणाला.

भगवान बुद्ध शांतपणे म्हणाले "मित्रांनो, जो माणूस तुम्ही मला दाखवलात तो अतिशय प्रेमळ आहे. व त्याच्या मनांत यत्किंचितही द्वेष, राग अशा भावना नाहीत. तो मुंग्यांचा मरणास कारणीभूत झाला असेल, परंतु त्याने त्या मारल्या नाहीत. कारण तो दृष्टीहीन आहे. त्याने मुंग्या पाहिल्याच नसणार. माझ्या मित्रांनो, कृति नव्हे, परंतु कृतिमागच्या भावना त्या त्या कृतिचे समर्थन करतात."

त्या सर्व माणसांना त्याची कृति समजली.

"काय, तो प्रेमळ माणूस आंधळा आहे? त्यांच्यातील एक उद्‌गारला.

भगवान बुद्धांनी सांगितले "हा माझा अनुयायी त्याच्या पूर्वायुष्यातील कृत्यामुळेच दृष्टीहीन झालेला आहे. जरी त्याला दिसत नसले तरी त्याचे अंतचःक्षू उघडे आहेत."

ह्या माझ्या अनुयायाचे नाव चक्षुपाल असून तो एक निष्णात वैद्य होता. एकदा त्याने रस्त्यांत एक बाई चांचपडत जाताना पाहिली. तो तिचा पाठलाग करत म्हणाला, "बाई, तुझी अशी दशा कां झाली?" "माझी दृष्टी तापाच्या विकारात गेली. पूर्वी मी घरकाम करुन उपजीविका करीत असे, पण आता कांहीच काम करु शकत नाही. तुम्ही माझे दुर्दैव जाणू शकता. मला जर देवळाकडे जाण्याचा रस्ता सापडला नाही, तर मला आज उपाशी रहावे लागेल."

चक्षुपालाने तिला देवळाकडे पोहोचवले व सांगितले, "मी तुझी दृष्टी बरी करु शकेन."

"तुम्ही खरंच माझे डोळे बरे करणार असाल तर मी आयुष्यभर तुमची नोकरी करेन." ती दृष्टीहीन बाई म्हणाली.

चक्षुपालाला घरकामाच्या नोकराची निकड होती. त्याने त्या बाईला विचारले "मला काम करण्याचे वचन देतेस का?" हो देते." ती दृष्टीहीन बाई म्हणाली.

चक्षुपालाने कांही मलमे व औषधे देऊन त्या



बाईची दृष्टी सुधारली. परंतु त्या बाईने चक्षुपालास दिसत नाही असे खोटेच सांगितले. कारण तिला पूर्वीच्या श्रीमंत मालकाकडे काम करावयास जायचे होते. चक्षुपालाला तिच्या हालचालीवरुन तिची दृष्टी आली आहे असे समजले होते. तो अतिशय संतापला. "माझी औषधे कधीच वाया जाणार नाहीत." असे म्हणत त्याने औषधे बदलून दिली. त्या बाईने ती औषधे आपली दृष्टी अधिकच सुधारावी यासाठी वापरली. त्या औषधांनी तिची दृष्टी गेली.

"माझी दृष्टी गेली" असे पुन्हां पुन्हां सांगत ती रडून आकांत करु लागली.

"हे दुष्ट स्त्रिये, तुझी दृष्टी आधीच गेली होती; मी ती सुधारण्याचा प्रयत्न केला. परंतु माझे प्रयत्न असफल झाले." असे सांगून उत्तराची अपेक्षा न करता चक्षुपाल तेथून निघून गेला.

जेव्हां भगवान बुद्धांनी ही गोष्ट सांगणे थांबवले, तेव्हां माणसांनी विचारले, "त्या वैद्याने त्या बाईला दिलेला फायदा काढून घेतला, त्याची त्याला कां शिक्षा?"

"माझ्या मित्रांनो, त्या बाईच्या वेडेपणापायी तो वैद्य संतापला व त्याने तिचा बदला घेतला. दुसरी गोष्ट म्हणजे त्याने वैद्याचे पवित्र व्यवसायाला काळिमा फासला. एखाद्याला रोगांतून मुक्त करणे हे वैद्याचे काम आहे. त्याच्या उलट वैद्याने रोग्याला बरे करावे. वैयक्तिक रागालोभापायी त्याच्या उलट औषध देणे हे योग्य नव्हे" गौतम बुद्ध म्हणाले.

"आम्हाला क्षमा करावी आम्ही उगीचच आपल्याला दूषण दिले होते. आपण समजावून सांगितलेत आणि आमचा गैरसमज दूर झाला. कर्तव्य हे नेहमीच श्रेष्ठ असायला हवे हे..." आता आम्ही समजलो.

"आता आम्ही समजलो" असे म्हणून व महाज्ञानी बुद्ध्यांचे आभार मानून ती माणसे मार्गस्थ झाली.





# तो चोर नाही पण चोर आहे

चमन आणि चपल हे दोघे शेजारी आहेत. चमन गरीब आहे. पण शक्य होईल तेवढी दुसऱ्याला मदत करायची त्याची इच्छा असते. चपल श्रीमंत आहे, पण आपल्यापेक्षां जास्त सुखी आयुष्य कोणी घालवूं नये असं त्याला वाटतं.

एक दिवस चपलच्या घरासमोर येऊन एक कुत्रे जोर-जोरांत भुंकूं लागले. चपलने रागवून त्याच्यावर दगड फेकले. कुत्रे तिथून पळून जाऊन चमनच्या घरासमोर उभे राहून भुंकू लागले. चमनला वाटलं कुत्रें भुकेले आहे म्हणून भुंकतंय. म्हणून त्याने एका केळ्याच्या पानावर जेवण वाढून त्याच्यासमोर ठेवले.

कुत्र्याने अन्न खाल्ले आणि कृतज्ञतेने आपली शेपटी हलवत तो तिथे उभा राहिला. मग तो एकदम चमनच्या घराच्या मागच्या बाजूला गेला आणि आपल्या नखांनी एके ठिकाणची जमीन उकरुं लागला.

चमनच्या म्हाताऱ्या आईने हे बघितले आणि चमनला बोलवून ती म्हणाली, "काळभैरव तुझ्यावर प्रसन्न दिसतो आहे. त्या जागी आणखी खोदून पाहा."

चमनच्या बायकोने हे बोलणे ऐकले आणि ती कुदळ घेऊन बाहेर आली. चमन ती जागा खोदूं लागला. बरंच खोल खोदल्यावर तिथे एक लाकडाची पेटी मिळाली. त्यांत सोन्याची नाणी आणि तांब्याचा एक बिल्ला होता. त्या बिल्ल्यावर त्यांच्या आजोबांनी "ही नाणी मी पुढल्या पिढीच्या सुखासाठी इथे पुरुन ठेवली आहेत" असे लिहीले होते.

यानंतर चमनच्या परिस्थितींत जमीन-अस्मानाचा फरक पडला. त्याने चारएकर सुपीक जमीन विकत घेतली. छोटा व्यापार पण सुरुं केला. आता तो आरामांत राहूं लागला, तरी पण त्याच्या चांगल्या स्वभावांत कांहीही बदल झाला नाही.

चमनची सुधारलेली परिस्थिती चपलला कांही बघवली नाही. त्याने शोध सुरुं केला कीं अचानक याची परिस्थिती एवढी कशी बदलली? खरी गोष्ट कळल्यावर तो लगेच ग्रामाधिकाऱ्याला भेटून म्हणाला, "साहेब, चमनला आपल्या घरामागे पुरलेली सोन्याची नाणी मिळाली. तो ती स्वत:चीच आहेत असं समजून उडवत आहे."

ग्रामाधिकाऱ्याने याबाबत सर्व चौकशी करुन चमनचे बरोबर आहे, तूच उगाचच त्याच्यावर आरोप करत आहेस असे सांगितले. ग्रामाधिकाऱ्याचा निर्णय ऐकून तर चपलचा अगदी जळफळाट झाला. तेव्हां त्याला एकदम त्या भुंकणाऱ्या कुत्र्याची आठवण झाली. त्या कुत्र्याकडे दैवीशक्ती आहे असे त्याच्या लक्षांत आले.

चपल त्या कुत्र्याला शोधूं लागला. केळीच्या पानावर अन्न वाढून तो त्याची वाट पाहूं लागला. बहुतेक सर्व कुत्र्यांना हा किती कंजूष आहे हे माहिती होते. त्यामुळे कुणीदेखील तिकडे फिरकले नाही.



शेवटी एक आठवड्याने एक कुत्रा चपलच्या घरासमोर उभा राहून भुंकू लागला. आपण दगड मारलेला हाच कुत्रा आहे म्हणून चपलने लगेच ओळखले. त्याने त्याला खायला दिले. खाऊन झाल्यावर ते कुत्रे अचानक घराच्या पाठीमागे जाऊन माती खोदूं लागले. तिथे चपलला एक लांकडी पेटी मिळाली. त्यात रत्ने, मोती, सोन्याचा हार, चार बांगड्या होत्या. ताम्रपत्राचा त्याने खूप शोध घेतला पण त्याला कांही ते सांपडले नाही. म्हणून त्याने भविष्यात कांही अडचण येऊं नये म्हणून आपल्या आजोबांच्या नांवाने एक ताम्रपत्र तयार करुन घेतले.

शहाणी, सज्जन माणसे धनाचा उपयोग योग्य

- वसुन्धरा -









तऱ्हेने करतात. पण वाईट लोक आपल्या धनसंपत्तीचे लोकांपुढे प्रदर्शन करण्यांतच आनंद मानतात. त्या दिवसापासून चपलच्या कुटुंबातले सगळे लोक दागिने घालून मिरवू लागले. त्याची बायको सोन्याचा हार घालून रुबाबांत हिंडू लागली.

त्यावेळीं त्या देशाचा राजा वेषांतर करुन सगळीकडे हिंडत होता. तो या गांवी आला. देवळांत चपलच्या पत्नीच्या गळ्यांतला हार पाहून तो चकितच झाला. तो त्याच्या पूर्वजांचा हार होता.

सूर्यास्ताच्या वेळी बागेत ती एकटी फिरत असताना चोराने राणीला मारुन टाकून तिचे दागिने पळवले होते. राजाच्या आजोबांनी त्या हाराची प्रतिकृती बनवून राज्यभर ती फिरवली होती, कीं त्यामुळे कदाचित चोर पकडला जाईल.

पण चोर सांपडला नाही. या दुःखांतच राजाचे आजोबा वारले. राजाच्या वडिलांनी देखील चोर पकडायचा प्रयत्न केला होता आणि आता या राजाकडे त्या हाराची प्रतिकृती होती.

राजाने ग्रामाधिकाऱ्याला भेटून स्वतःची ओळख देऊन सर्व हकिगत सांगितली. इकडे तिकडे चौकशी केल्यावर राजाची खात्री झाली की चपलचे आजोबाच चोर आहेत. राजाने चपलला बोलावून सांगितले, "हे बघ, तू आपल्या आजोबांचा वारसदार आहेस. तेव्हां त्या दुष्टाने जे काम केले आहे त्याची शिक्षा तुला भोगायला पाहिजे. तेव्हांच माझ्या पूर्वजांच्या आत्म्याला शांती मिळेल. तुला एक वर्ष तुरुंगात राहावे लागेल."

आता चपलला कळले कीं त्याच्या हातून केवढी मोठी चूक झाली आहे. त्याने ते सर्व दागिने व पैसे राजाच्या स्वाधीन केले. घराच्या मागे सांपडलेले धन त्याने खरे तर राजाच्या हवाली करायला हवे होते. त्या ऐवजी ताम्रपत्र बनवून घेऊन तो स्वतःच संकटात सापडला. चोरी न करता चोर बनला. तो स्वतःच स्वतःला म्हणून घेऊं लागला की माझ्यासारख्या लोभ्याला बरोबर शिक्षा मिळाली.






## मूषक कथा



तुम्ही जर राजस्थानातील करणी देवीचे मंदीर पाहायला जात असाल तर तुमचे उंदराचे सापळे घरींच ठेवा. देश्नोक नांवाच्या खेड्यांतील या देवळांत उंदरांचा आदर केला जातो. त्यांना खायला घालून त्यांचे रक्षण केले जाते. ते सगळीकडे हिंडत असतात, आणि स्थानिक लोक त्यांचे रक्षण करतात. त्यांचा असा विश्वास आहे की मानवी आत्मे त्यांना दुसरे मानवी शरीर मिळेपर्यन्त या उंदरांच्या शरीरांत राहातात.

स्थानिक दंतकथे प्रमाणे १०० वर्षांपूर्वी देश्नोक गांवी करणीदेवी ही एक संतीण होऊन गेली. तिच्या अंगात दैवी शक्ती होती. असं सांगतात, कीं एकदा एक लहान मुलगा मेला तेव्हां तो जिवंत व्हावा म्हणून तिने प्रार्थना केली. तिची प्रार्थना देवाने ऐकली. पण योग्य शरीर नसल्याने मुलाला जिवंत करता येईना. म्हणून त्याला योग्य शरीर मिळेपर्यन्त उंदराचा जन्म मिळाला. तेव्हांपासून देश्नोकच्या लोकांना उंदीर प्रिय आहेत. आणि करणीदेवीचे देऊळ हे उंदरांचे नंदनवन आहे.

## मधुर भाषा



तेलगू भाषिकांना हे ऐकून फार आनंद होईल. जिच्या प्रत्येक शब्दाचा शेवट स्वराने होतो अशा जगातील फक्त दोन भाषांपैकी त्यांची मातृभाषा ही एक आहे. आणि हेच



# भुतांची मेजवानी

गंगा आपल्या गांवात एक भांडखोर बाई म्हणून प्रसिद्ध होती. पतीच्या निधनानंतर उदरनिर्वाहसाठी तिला स्वयंपाक करण्याचे काम करावे लागले. लोक म्हणायचे की तिने केलेला स्वयंपाक अतिशय चविष्ट असतो. म्हणून भांडखोर असली तरी घरांत कांही शुभकार्य असले की तिला लोक स्वयंपाकाला बोलवीत असत.

एक दिवस गंगा रात्री शांत झोपलेली असताना तिला कोणी तरी आपली पाठ थोपटतंय असं वाटून जाग आली. समोर बघितलं तर तीन बुटकी भुतें उभी होती. त्यांना बघून घाबरुन ती ओरडूं लागली.

भुतें म्हणाली ''हे बघ गंगा, आम्ही तुला कांही त्रास द्यायला आलेलो नाही. ओरडायला लागलीस तर आजूबाजूचे लोक जमा होतील. घाबरुं नकोस. आज रविवार आहे. अमावास्येचा दिवस आहे. स्मशानांत स्वयंपाक करण्याची आम्ही सर्व तयारी केली आहे. तू फक्त भांडीकुंडी घेऊन चल.''

''माझी तब्येत बरी नाही. हे काम दुसऱ्या कोणाला तरी करायला सांगा.'' गंगा म्हणाली. तिच्या उत्तराने भुतांचे डोळे रागाने लाल झाले. कठोर आवाजात तिन्ही भुतें म्हणाली, ''उगीच सबबी सांगितल्यास तर तुला आगींत फेकून तुझे तुकडे तुकडे करुन खाऊन टाकूं. चुपचाप आमच्या मागे स्मशानांत ये.'' असं म्हणून तिन्ही भुतें वटवाघळाचे रुप घेऊन खिडकीतून बाहेर अंधारात उडून गेली.

दुसरा कांहीच मार्ग नसल्याने एका पिशवीत भांडी घालून गंगा घरांतून बाहेर पडली. गांवाच्या बाहेर आल्यावर एका उजाड घराच्या कट्ट्यावर बसून ती विचार करुं लागली कीं आता या संकटातून मी कशी सुटूं? तिला वाटले आता आपण यातून कांही जिवंत बाहेर पडत नाही. या विचाराने तिला बसल्या बसल्या रडूं येऊं लागले.

- अनिल गर्ग -

त्यावेळी तिथून एक माणूस जात होता. गंगाची परिस्थिती पाहून तो तिच्याजवळ आला आणि तिच्या रडण्याचे कारण विचारुं लागला. तिने त्याला सर्व हकिगत सांगून म्हटले, ''हे भुतांचे निमंत्रण माझा जीव घेतल्याशिवाय राहाणार नाही. या संकटातून मी कांही वाचणार नाही.''

तिची समजूत घालत प्रवासी म्हणाला ''आई, माझं नांव शिव आहे. शेजारच्या गांवच्या जमीनदाराच्या मुलीच्या लग्नाचे जेवण बनविण्यासाठी मी गेलो होतो. आत्ता तिथूनच येतो आहे. तुझ्या ऐवजी मीच भुतांच्या जेवणाची व्यवस्था करतो. मग तर ठीक झालं?''

''याहून मला अधिक काय पाहिजे मुला?'' असें म्हणून भांड्यांची पिशवी तिने त्याच्या डोक्यावर ठेवली आणि म्हणाली, ''गांवाच्या मधोमध जे वडाचे झाड आहे त्याच्या जवळ माझं घर आहे. उद्या सकाळी भांडी माझ्याघरी नक्की आणून दे बरं कां.'' असं म्हणून मागे न बघता भराभर तिथून ती निघून गेली.

शिव जेव्हां स्मशानांत पोचला तेव्हां तिन्ही बुटकी भुतें एका ढिगाऱ्यावर बसून आपसांत बोलत होती. शिवला बघून ते तिघे म्हणाले, ''ए मुला, तू कोण आहेस? आणि ती गंगा कुठे आहे?''



शिव न घाबरतां म्हणाला ''गंगाच्या एकदम अंगात आले. तिने माझ्या डोक्यावर ही पिशवी दिली आणि - 'जटावाली आई, मी येते आहे' असे ओरडत गांवाच्या वेशीबाहेर ती पळून गेली.'' असं बोलत शिवने स्वयंपाकाला सुरवात केली आणि भुतें त्याला सामग्री देत गेले.

एक तासाच्या आंत शिवने स्वयंपाक पूर्ण केला. त्यांनी केलेली कोंबडी, आणि ज्वारीची भाकरी खाऊन भुतें संतुष्ट झाली.

त्याच्या जेवणाचे कौतुक करांत भुतें म्हणाली ''आम्ही आजपर्यन्त इतकं चवदार जेवण कुठेच खाल्ले नव्हते. मेजवानी असावी तर अशी.'' यानंतर वडाच्या झाडाच्या ढोलीतून भुतांनी एक चामड्याची पिशवी काढून शिवला दिली आणि पहांट होण्याआधी कबुतरें बनून ती निघून गेली.

ते गेल्यावर शिवने पिशवी उघडली. त्यांत सोन्याच्या मोहोरा होत्या.

भांड्यांची पिशवी घेऊन तो गंगाच्या घरी गेला तेव्हां ती केरं काढत होती. शिवने झालेली हकिगत तिला सांगून म्हटले, "भुतांनी दिलेल्या मोहोरांतील अर्ध्या मोहोरा मी तुला देतो." म्हणून मोहोरा द्यायला पिशवी उघडूं लागला.

गंगाने लगेच ती पिशवी हिसकावून घेत म्हटलें, "यांतल्या अर्ध्या मोहोरा तू मला देणार? या सोन्याच्या मोहोरा तुला कशा मिळाल्या? विचार कर. मीच तुला भुतांकडे पाठवले. नाहीतर तुला या मिळाल्या असत्या कां? तिथे तू जो बेचव स्वयंपाक केला असशील त्याला ही एक मोहोर पुरेशी आहे." असे म्हणत तिने त्याच्या हातावर एक मोहोर टिकवली.

शिव म्हणत राहिला की हा सरासर अन्याय आहे आणि गंगा ओरडत त्याला कांहीबाही बोलत राहिली. शेजारी परमेश या भांडणाने कंटाळून म्हणाला, "तुमच्या भांडणाचा निकाल ग्रामाधिकारीच देतील. चला माझ्या बरोबर."

सर्व हकिगत ऐकल्यावर ग्रामाधिकारी म्हणाला, "हो, या मोहोरा गंगालाच मिळायला पाहिजेत."

शिव दुःखी होत म्हणाला, "गंगाच्या भांडखोर स्वभावाला घाबरुन तुम्ही माझ्यावर अन्याय केला आहे. कारण मी या गांवचा नाही ना!"

तेव्हां ग्रामाधिकारी हंसत म्हणाला, "घाई करुं नकोस." मग गंगाकडे वळून म्हणाला, "गंगा, तू शिवला भुतांकडे पाठवलंस म्हणून थैली तुझी झाली. तसेच परमेश जर तुम्हाला माझ्याकडे घेऊन आला आहे, त्या हिशोबाने थैली त्याची झाली. माझे हे म्हणणे ऐकतेस की नाही?"

यावर गंगाकडे उत्तर नव्हते. तिने परमेश आणि शिवची माफी मागितली. तेव्हां ग्रामाधिकारी म्हणाला "जे तोंडाला येईल ते बोलतेस हे बरोबर नाही गंगा." नंतर मोहोरांची थैली शिवला देऊन तो म्हणाला, "न्याय्य धन तुला घेऊन उरलेले तिला दे."

"मला हिचे धन नको." असं म्हणत शिवने तिला अर्ध्या मोहोरा दिल्या. लाजेने खाली मान घालून गंगा चुपचाप तिथून निघून गेली.





# उत्तम कवि

वर्धन हा कुंतल देशाचा राजा होता. तो विद्वानांचा, कवींचा आदर-सत्कार करत असे. तो स्वतः एक कवी असल्याने दुसऱ्या कवींच्या कवितांच्या गुणदोषांचे मूल्य मापन तो चांगल्या तऱ्हेने करुं शकत होता.

वर्षभर तो कवींचा सत्कार करत असे. त्या खेरीज तो नवरात्रांत सरस्वती पूजा मोठ्या धूमधडाक्याने करीत असे. या वेळी जे कोणी कवी त्याच्याकडे येत असत, त्यांचे काव्य तो वाचत असे. त्यांतल्या सर्वांत चांगल्या काव्याला तो विजयादशमीला बक्षिस देत असे. त्या काव्याच्या कवीचादेखील सत्कार त्या दिवशी होत असे. कधी कधी उत्तम काव्य करणाऱ्या कवींची राजकवी

एका वर्षी सरस्वती पूजेच्या वेळीं दोन कवींचे काव्य उत्तम म्हणून निवडले गेले. रामशर्मा व कृष्णशास्त्री हे ते दोन कवी होते. राजाच्या बरोबर आणखी कांही विद्वानही त्याच्या काव्यातले गुणदोष पारखत होते.

विद्वानांनी आपला अंतिम निर्णय सांगत म्हटलें की "रामशर्मांचे काव्य कृष्णशास्त्रींच्या काव्यापेक्षा चांगले आहे. आम्ही मान्य करतो की काव्यांत माधुर्य आहे, गोडी आहे, लालित्य आहे, पण कुठे कुठे व्याकरण चुकीचे आहे आणि कांही ओळी नीरस आहेत. पण रामशर्मांचे काव्य यापेक्षां निराळे आहे. त्यांत सुरवातीपासून शेवटपर्यन्त गोडी आहे, आणि एकसंधपणा आहे.










मानले पाहिजे. आणि त्यांच्या काव्याला बक्षिस मिळाले पाहिजे.''

पण राजा वर्धनने या मताचा स्वीकार न करता म्हटले की, ''तुम्ही लोकांनी काव्य वाचन करताना कवींच्या जीवनशैलीचा पण विचार करायला पाहिजे. त्याच्या पूर्वीच्या किंवा सध्याच्या आयुष्याबद्दल माहिती मिळवली पाहिजे.

राजकर्मचाऱ्यांच्याकडून दोघांबद्दल माहिती मिळाली. रामशर्मा हे उच्चशिक्षित व श्रीमंत होते. तरी सुद्धां ते एका जमीनदारांच्या आश्रयाला होते. त्यांचे गांव फुलाफळांनी, चांगल्या पिकांनी बहरलेले होते.

''त्यांना सर्व प्रकारच्या सुखसोयी प्राप्त होत्या. तरीपण ते एवढेच लिहू शकले, याचा अर्थ त्यांच्या काव्यरचनेला मर्यादा आहेत. आता कृष्णशास्त्र्यांची गोष्ट घेऊं या. ते एक सामान्य शेतकरी आहेत. त्यांचे शिक्षणसुद्धां अपुरेच म्हणावे लागले. ते आपल्या कुटुंबाचे पालन पोषण करण्यासाठी रोज कष्ट करतात. त्यांच्या गांवची जमीन देखील सुपीक नाही. खूप कष्ट केल्यावरच हातांत कांही तरी मिळते. तरी देखील त्यांनी मधुर रसाळ काव्य रचिले आहे, कारण त्यांच्या अंतःकरणांत असलेले प्रेम! त्यांचे जीवन बज्रासारखे कठीण आहे, तरीसुद्धां त्यांच्या कोमल, प्रेमळ अंत:करणाला भेदून कविता बाहेर पडल्या. अशा व्यक्तीला आपण जर स्वास्थ्य व सुखसोयी उपलब्ध करुन दिल्या तर ते एक अद्भुत सृष्टी निर्माण करतील, अजरामर काव्यें रचतील. आता आपणच सांगा की उत्तम कवी कोणाला मानावें? रामशर्मा की कृष्णशास्त्री यांना?''

राजाचे म्हणणे ऐकल्यावर विद्वानांना आपली चूक समजली. त्यांनी एकमुखाने घोषणा केली की ''कृष्णशास्त्री उत्तम कवी आहेत.''

राजा वर्धन यांनी कृष्णशास्त्रींचा सत्कार केला. त्यांना उत्तम कवी म्हणून घोषित केले आणि राजकवी म्हणून त्यांची नेमणूक केली.



# खास बातम्या

## अनोखे पाहुणे



रिओ-द-जानिरो या ब्राझीलच्या राजधानींत एक हॉटेल आहे. तिथें प्रवासी नेहमी आगाऊ कळवून आरक्षण करतात. पांथस्थही झटपट खानपानासाठीं इथें जरा थांबतात. ऑगस्टमधें मात्र इथे अचानक दोन पाहुणे आले. टेबलांच्याभोवती त्यांच्या येरझाऱ्या पाहून गिऱ्हाईकें आणि कर्मचारी घाबरून किंचाळायला लागले. पाहुण्यांच्यावर सुरवातीला कांही परिणाम झाला नाही. पण थोड्या वेळानंतर मात्र त्यांनी निषेध दाखवला. एक कांचेचा दरवाजा फोडला आणि टेबलक्लॉथ ओढून काढून टेबलावरचे कांचसामानही फोडले. तोपर्यंत हॉटेलच्या व्यवस्थापकाने स्थानिक पर्यावरण कचेरीला फोन केला होता. त्यांचे स्वयंसेवक पिंजरे घेऊन आले आणि त्यांनी या पाहुण्यांना त्यांत प्रवेश करण्यास प्रवृत्त केले. हे पाहुणे होते दोन चित्ते!

## केवळ कुत्र्यांसाठीच!

जर तुम्ही जपानला भेट देणार असाल, तर अकागी न्यूगो यांनी बनवलेल्या आईस्क्रीमची चौकशी करा. या कंपनीने एक खास प्रकारचे आईस्क्रीम - केवळ कुत्र्यांसाठीच - तयार केले आहे. नेहमीच्या आईस्क्रीममधें लॅक्टोस असते, ते त्यांच्या मते कुत्र्यांना पचायला जड असते.



या जपानी प्रकारांत लॅक्टोस नाही. अर्थात हे श्वानस्पेशल आईस्क्रीम माणसांनीही खाण्याजोगे आहे. ते जास्ती गोड नाही, त्यामुळें मधुमेहींना चालते.

परंतु त्याची चव पाहण्यास लोक चटकन धजावणार नाहीत. कारण ३.३ औंसाच्या आईस्क्रीम कपाची किंमत आहे

# भारताची ओळख

इतर देशांशी तुलना केली तर भारतांत साजरे करण्यासाठीं सणांचा अगदी सुकाळ आहे. त्याचं हेही कारण असूं शकेल कीं कित्येक धर्म आपल्या या भारतभूमधे जन्मले आहेत. तसेंच इतर ठिकाणी जन्मलेल्या पंथांचे देखील आपल्या देशांत ते येऊन स्थायिक झाल्यावर आपण स्वागतच केले आहे. सप्टेंबर, ऑक्टोबर व नव्हेंबर महिन्यांत तर सणांची रांगच लागलेली असते. म्हणून या महिन्याच्या प्रश्नमंजूषेत तुम्हाला सणांची किती माहिती आहे हे पडताळून पाहूं या.

१. दक्षिण भारतातील दसऱ्यांसाठी प्रसिद्ध असलेले स्थळ. हे कुठले स्थळ आहे? व या उत्सवाचे वैशिष्ट्य काय?

२. रस्त्यावरुन रथ नेण्यापूर्वी महाराजाने रस्ता झाडला पाहिजे. हा कुठला उत्सव आहे? व कुठे होतो?

३. हा सण एका राज्यात पतंग उडवून तर दुसऱ्या राज्यात तांदूळ शिजवून साजरा करतात. हा सण कोणता? व ती राज्यें कोणती?

४. मुसलमान संत महंमदाच्या मुलाचे हौतात्म्य या दिवशी पाळतात. या दिवसाला काय म्हणतात?

५. पारसी लोक फरवादीन (ऑगस्ट-सप्टेंबर) महिन्यांत झरतुष्टाची जन्मतिथी साजरी करतात. या सणाचे नांव काय?

६. मदुरै तल्या चित्रै उत्सवाचे महत्व काय?

७. जानेवारी-फेब्रुवारी महिन्यांत चेन्नईत एक महत्वाचा उत्सव असतो. त्यांत देवाला रंगीबेरंगी सजविलेल्या बोटीतून मिरवले जाते. कुठले देऊळ हा उत्सव करते आणि हा कोणता देव आहे?

८. होळीच्या सणाचे गोव्यांत वेगळे नांव आहे. ते कोणते?

**(उत्तरें पुढील महिन्यांत)**

**सप्टेंबर महिन्याच्या प्रश्नमंजूषेची उत्तरें**

१. मेघनाद साहा
२. बिशप कॉटन
३. बृहस्पती
४. आर्यभट
५. थॉमसन कॉलेज ऑफ् ॲंजिनीअरींग
६. रूरकी युनिव्हर्सिटी
७. इंडियन् इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट अहमदाबाद
८. के.एम. पण्णीकर





# गणेश पुराण

गंगा आणि पार्वतींमधला द्वेष वाढत गेला. दोघी एकमेकींना पाण्यांत पाहू लागल्या. तेवढ्यात गंगेचा मेळा आला. नारदमुनींनी पार्वतीला म्हटले - "तीन करोड देव ह्या मेळ्याच्या प्रसंगी गंगेत स्नान करणार आहेत. त्यामुळे गंगेला खूपच महत्व प्राप्त होईल. तेव्हां हे देवी, तू पण असंच केलंस तर सर्व जग तुझी प्रशंसा करेल आणि अत्यंत विशालहृदया आणि दयाळू म्हणून तुझी जगांत प्रसिद्धि होईल!" त्यानंतर गंगेला जाऊन म्हणाले, "गंगाभवानी, तुला पवित्र करण्यास पार्वती येत आहे."

"ओहो! अशी गोष्ट आहे? कां आपली दया दाखवायला येत आहे? येऊं दे. मी तिला समजावते!" गंगा म्हणाली. त्यानंतर पार्वती तयार होऊन केस सोडून गंगेत उतरणार इतक्यांत गंगा म्हणाली - "थांब, माझे पाणी अपवित्र करूं नकोस." असे म्हणून गंगेने नाही म्हटल्यानंतर गंगा पार्वतीचे खूप जोरदार भांडण झाले.

"हे बघ, कुमारस्वामीला शरवणसरोवराने जन्म दिला आहे. तुझ्या लेमळ्या हाताखाली दबून, भावल्यासारख्या मुलाला गजमुख बनावे लागले! तू तर वांझच आहेस!" गंगा हंसतच म्हणाली.

"माहिती आहे मी कोण आहे ते? महाशिवाची अर्धांगिनी आहे!" पार्वती म्हणाली.

"कां नाही माहीत? लग्नानंतर आपल्या भोळ्या पतीला अर्धे खाणारी महापातकी आहेस नं?" गंगेने तीर सोडला.



''हो, तू तर घसरून खाली पडलेली भ्रष्टा आहेस!'' पार्वतीने म्हटले.

''हो, हो, ही गोष्ट तर सर्व जगाला माहीत आहे की शंकराच्या गळ्यांत विषाची भयंकर गर्मी होती; तेव्हां मी त्यांना शांत केले. त्यामुळे प्रसन्न होऊन त्यांनी आपल्या शिरावर मला धारण केले. तेव्हां सगळेच जाणतात की मी पवित्र आहे की पापी!'' गंगा म्हणाली.

''कुणी बोलावलं आणि तू चालायला लागलीस आणि त्यांच्या डोक्यावर येऊन बसलीस, अनाथ आहेस अनाथ!'' पार्वती मजेने म्हणाली.

''तू प्राण्यांचे बळी घेणारी निर्दयी माता आहेस! वामाचारिणी आहेस! अस्पर्श्य मातंगिनी आणि कर्कशहृदया शक्ति आहेस!'' गंगा कुत्सितपणे म्हणाली.

''गंगे, तू खूप आठवण करून दिलीस. हो, मी शक्ति आहे. महाशक्ति आहे.'' असे म्हणतच पार्वती रागांत आली आणि जोरांत वारे वाहू लागले. चारी दिशांमधे अंधार झाला. ढग गडगडूं लागले. वीज कडकडूं लागली. पाऊस पडूं लागला. धरणी कांपू लागली आणि बर्फ विरघळूं लागला. निसर्गांत गडबड सुरूं झाली आणि सर्व दूर हाहाकार सुरूं झाला.

पार्वतीच्या क्रोधाला पाहून गंगा म्हणाली – ''मला शीतल आणि शांत समजून खाली पहायला लावतेस होय? पण हे विसरूं नकोस कीं मी जलशक्ति आहे. मला क्रोधित करण्याचे पाप तुलाच लागणार.'' असे म्हणतच गंगा नदीने भयंकर पुराबरोबर संपूर्ण उत्तर भारताला बुडवून टाकले.

देव आकाशांतून हे भांडण बघत होते. त्यांना वाटले देवींच्या आपसांतल्या भांडणाने बिचाऱ्या माणसांना मात्र त्रास होतो आहे. ते भांडण लावणाऱ्या नारदमुनिला दोष देऊन ते निंदा करु लागले. त्याच वेळेस विघ्नेश्वर दक्षिणेकडून परत येत होते.

ते नारदाला म्हणाले – ''कलहीभोजा! तुम्ही असा उपद्रव कां केलात?'' ह्यावर नारद शांतपणाने म्हणाले – ''अशा वेळेसच कळते की जगत्कल्याणाकरितां खरे कष्ट करणारा कोण आहे?'' असे म्हणून ते हंसतच पुढे गेले. विघ्नेश्वर कैलासावर पोहोचले.

कैलासावर पार्वती आपल्या करणीवर पश्चाताप करीत बसली होती. तिने विचार केला



– ''परत एका भागीरथाने जन्म घेऊन गंगेला इथून घेऊन गेल्याशिवाय गंगेचा हा उपद्रव कमी होणार नाही.''

आपल्या मातेचा विचार विघ्नेश्वराला समजला. पण भोळेपणाने पार्वतीला नमस्कार करून ते म्हणाले – ''माते, मी एक पुण्यकर्म करूं इच्छितो, मला आशीर्वाद द्यावा.''

''विघ्नेश्वराने संकल्प केल्यावर त्याला थांबवू शकणारा जगांत कुणीही नाही. तू दक्षिणेतून आलास कां? तिकडची काय खबरबात आहे?'' पार्वती म्हणाली.

''हे माते, विंध्याचलाच्या दक्षिणेकडील सर्व जमीन कोरडी पडली आहे! तो सर्व प्रदेश समृद्ध बनून तुम्ही अन्नपूर्णेचे नांव सार्थक कराल आणि गंगामाता आपली कृपाहष्टि तिकडे टाकेल, तर किती चांगले होईल.''

''मी काय सांगणार? ही सर्व ईश्वराची, विश्वनाथाची कृपा आहे.'' पार्वती म्हणाली.

''असा विचार करून मौन बाळगून कसे चालेल? आपल्याला पण कांही प्रयत्न करायला हवा !'' विघ्नेश्वर म्हणाले. ''अवश्य करायला पाहिजे. आणि तुझ्यासारखा देव सहयोग देईल तर काम जरूर फळाला येईल.''

''बस, माते! मी आपल्याकडून हेच ऐकण्याची इच्छा करीत होतो. आता मला आज्ञा द्यावी!'' असे म्हणून पार्वतीला नमस्कार करून विघ्नेश्वर सरळ गौतम ऋषींच्या आश्रमाकडे चालू लागले.

गौतम मुनि पश्चिमी पहाडांमधे आश्रमांत



शेती करीत असत. विघ्नेश्वर गाय बनून मुनिंच्या शेतांत चरूं लागले.

शेत खराब करणाऱ्या गायीला पळवण्याच्या उद्देशाने गौतम ऋषिंनी आपल्या कमंडलूतले जल हातांत घेऊन फेकले. पाणी पडतांच गाय बेशुद्ध होऊन खाली पडली. ह्यावर गौतम मुनिंनी आपल्या तपश्चर्येचे पुण्य तिला समर्पित केले. तरी पण गायीने डोळे उघडले नाही. ह्यावर नारदाने इंद्राला उकसावले.

इंद्र अगोदरच गौतम मुनिंवर रागवलेला होता. ब्रह्मदेवाने एका अपूर्व सुंदरीच्या रूपाने अहिल्येला निर्माण केले होते. इंद्र तिच्यावर मोहित झाले. अनेक लोक अहिल्येला प्राप्त करण्याचा प्रयत्न करूं लागले. त्यावर ब्रह्मदेवाने अट घातली की जो कुणी पृथ्वीप्रदक्षिणा करून सर्वप्रथम येईल, त्याला अहिल्या प्राप्त होईल.



गौतम मुनिंनी प्रसवणाऱ्या गाईची प्रदक्षिणा केली, आणि तर्कविद्येने ब्रह्मदेवाला हरवून अहिल्येला जिंकले.

गौतम मुनि म्हणाले कीं गाय साक्षात भूदेवी प्रमाणे आहे. आणि आता त्यांच्याच हातून गोहत्या झाली आहे. इंद्राला आता गौतम ऋषींचा बदला घेण्याचा मोका मिळाला. त्याने एका ऋषिंचा वेष धारण करून चारी लोकांत भ्रमण करीत प्रचार करण्यास सुरवात केली - "गौतम मुनि गोहत्या करणारे महान पापी आहेत. त्या पापामुळे त्यांचा आश्रम अपवित्र झाला आहे. म्हणून कुणीही गौतम ऋषिंचे दर्शन घेतले किंवा त्यांच्या आश्रमात पाय ठेवला, तरी त्यांना पाप लागेल. ह्या पापाचे प्रायश्चित म्हणजे गंगेचे पाणी त्या आश्रमांत पडलेल्या गायीवरून प्रवाहित व्हायला पाहीजे. ह्याशिवाय दुसरा कोणताच उपाय नाही." इंद्राने असे सांगितल्यावर आश्रमांतले सगळे मुनि आश्रम सोडून जाऊं लागले.

त्यांनी आश्रमावर बहिष्कार घातला. कुठे गंगा! आणि कुठले पश्चिमी पहाड! तरीपण गौतम ऋषींनी भगीरथाला आदर्श मानून हिमालयांत असणाऱ्या गंगेला प्रसन्न करण्याकरिता घोर तपश्चर्या करण्यास आरंभ केला. कपिल महामुनिंच्या क्रोधाग्नित भस्म झालेल्या आपल्य पूर्वजांचा उद्धार करण्यासाठी, एके काळी भगीरथाने देवीगंगेला प्रसन्न करण्याकरितां घोर तपस्या केली.

त्यानंतर गंगेचे गंगाभवानी असे नांव पडले. भगीरथाने गंगेला मुक्त करण्यासाठी शंकराची प्रार्थना केली. शंकराने आपल्या जटेला सैल करून एक छोटीशी धारा सोडली. ही धारा वेगाने येऊन हिमालयाच्या चारी बाजूस पसरली.

ह्यानंतर गंगेचा प्रवाह भगीरथाबरोबर पूर्व दिशेला वळला. ह्याकारणाने गंगेचे नांव भागीरथी असे पडले.

हिमालयांत असलेली गंगेची एका शाखा हिन्दुकुश पर्वतांमधून वहात गेली. तिला इन्दु असे नांव पडले. पुढे इन्दुचे सिन्धु नदीत रूपांतर झाले. भारताच्या पश्चिमोत्तर भागांत वाहणाऱ्या सिन्धु नदीमुळेच भारताचे नांव 'हिन्दुस्तान' असे पडले.

गंगा जेव्हां भगीरथाच्या मागे वेगाने चालली होती, तेव्हां ह्या तेज धारेपासून नष्ट होणाऱ्या आपल्या आश्रमाला वांचविण्याकरिता जन्हु महामुनिंनी गंगेला पिऊन घेतले. त्यानंतर



भगिरथाने जन्हु मुनिंची प्रार्थना करून परत गंगेला मुक्त केले. गंगा मुनिंच्या कानातून निघाली, म्हणून तिचे नांव जान्हवी असे पडले.

त्यानंतर कपिला आश्रमांत पोचून भगीरथाने गंगेला आपल्या पूर्वजांना मुक्त करण्याची विनंती केली. भगीरथाचे पूर्वज शापमुक्त झाले. तेव्हां कुठे भगीरथाचा प्रयत्न यशस्वी झाला. गंगा गौतम मुनिंच्या तपश्चर्येवर प्रसन्न झाली आणि त्यांच्या मागे चालूं लागली. मार्गात गंगेच्या पदचिह्नांच्या जागी अनेक तलाव, कालवे, छोटे-मोठे पहाडी झरे, निर्माण झाले.

गौतम मुनिंच्या आश्रमांत पोहोचतांच गंगेने प्रवाहरूप धारण केले. गौतम मुनि मार्ग दाखवत पुढे चालले होते. गंगा गायी वरून प्रवाहित झाली आणि तिचे नांव गौतमी असे पडले. त्यावर मायावी गाय पटकन उठली, चार पावलें चालली, आणि उंच उडून आकाशांत जाऊन अदृश्य झाली. तेव्हा विघ्नेश्वराने दर्शन दिले.

विघ्नेश्वर गंगेला प्रणाम करून म्हणाले - "हे माते, आपल्या ह्या पुत्राला क्षमा कर! मी हे सर्व एवढ्याकरिता केले आहे की तुझ्या कृपेने आणि अमृतासमान जलधारेनी विंध्याचलाच्या दक्षिणेकडील भूमि 'सस्य शामल' व्हावी! दक्षिण गंगेच्या रूपाने अवतार घेऊन गायीला वांचवले म्हणून आजपासून तुझे नांव गोदावरी म्हणून प्रसिद्ध होईल."

अशा तऱ्हेने गंगेची परम स्तुति करून विघ्नेश्वर अदृश्य झाले. गोदावरीने आपल्या अनेक शाखा दक्षिणेभर पसरून दक्षिणेला हिरवेगार,



समृद्ध केले. सप्त ऋषि आणि देवतांनी गोदावरीत स्नान केले. त्यानंतर गौतम ऋषींची प्रशंसा करून त्यांना सिद्धभगीरथ असे नांव दिले. गोदावरीने स्वतःला सात नद्यांमधे विभागले आणि सप्त गोदावरी म्हणून ती पूर्वी समुद्राला जाऊन मिळाली.

गंगा जेव्हां गोदावरी म्हणून प्रवाहित होत होती त्यावेळेस तिची वेणी पश्चिमी घाटांत अडकली. तेव्हां विष्णुने आपल्या बोटांनी तिला सोडवले. कृष्णवर्णधारी विष्णुच्या बोटांमधून वेणीची धारा वाहूं लागली तिचे नांव कृष्णवेणी असे पडले. पुढे कृष्णा ह्या नांवाने ती एक मोठी नदी बनली.

अशाप्रकारे गंगाजल आकाशांत उडी मारून, दक्षिणेत स्थित असलेल्या कवेर महामुनिंच्या आश्रमांत, त्यांच्या कमंडलूत त्याची धार पडली आणि तिने कन्येचे रूप धारण केले. तेव्हां

अगस्त्यांच्या आश्रमामागे असलेल्या जंगलांमधून वहात कावेरी नदीचे रूप धारण करून सुंदर धबधबे निर्माण करीत ती दक्षिणेत वहात आली.

अशा तऱ्हेने गौतम ऋषिंनी आणलेल्या गंगेने तीन मोठ्या नद्यांचे रूप धारण केले, आणि दक्षिणेला समृद्ध बनविले. म्हणून गंगा गोदावरी, कृष्णा आणि कावेरी म्हणून प्रसिद्ध झाली.

गंगेमुळे गौतम ऋषिंचा आश्रम परत आनंदित झाला. गोदावरी तटावर अनेक तीर्थक्षेत्रें स्थापित झाली आणि बरोबरच गौतम मुनिंची कीर्ति चारी बाजूला पसरली. गंगेचे पश्चिमी घाटांमध्ये प्रवाहित होणे असंभव होते, म्हणूनच् इंद्राने गौतम मुनिंना त्यांच्या पापाचे हेच प्रायश्चित सांगितले होते. पण असंभवाला संभव बनवणाऱ्या गौतम मुनिंची इन्द्राने क्षमा मागितली.

पण गौतम ऋषि संतुष्ट झाले नाहीत. कारण ह्यापूर्वी इंद्राने धोका दिल्यामुळे नाराज होऊन गौतम ऋषिंनी अहिल्येला शिळा होऊन पडण्याचा शाप दिला होता, तेव्हां त्यांनी विंध्याचल पार करून पश्चिमी घाटांमध्ये तपश्चर्या करण्यास प्रारंभ केला होता.

गोदावरीच्या आगमनाने पश्चिमी घाटात अनेक ऋषि-मुनिंनी आपापले आश्रम स्थापन केले. अत्रि महामुनिंना त्रिमूर्तिंच्या अंशामुळे त्रिमूर्ति पुत्र लाभला. अनुसूया अन्नदान करू लागली. प्रदेश समृद्ध झाला.

गौतम मुनिंच्या आश्रमांत चारीबाजूला समृद्ध शेती होती. पण अहिल्येची अनुपस्थिति त्यांना दुःखी करू लागली. घाई करून अहिल्येला शाप देण्याबद्दल त्यांना पश्चात्ताप होऊ लागला.

अशा वेळी विघ्नेश्वराने दर्शन देऊन सांगितले - "हे गौतम महर्षि! लौकरच विष्णु रामचंद्राचा अवतार घेऊन आपल्या चरणस्पर्शाने अहिल्येचा उद्धार करतील. ती परत मानवरूप धारण करेल! ती परत पवित्र होईल. गोदावरीला जन्म देण्याकरितां मी आपणांस खूपच त्रास दिला आहे! आजपासून गोदावरी गौतमी ह्या नांवाने प्रसिद्ध होईल."

गौतम मुनि प्रसन्न होऊन म्हणाले - "विघ्नेश्वरा! हे सर्व तुझ्या संकल्पाचे फळ आहे. गोदावरीचे जल आणि विघ्नेश्वराची कृपा, आमचे सदा-सर्वदा रक्षण करो!"





# योग्य जोडी

फार जुनी गोष्ट आहे ही सराहपुरांत गोरख नांवाचा एक शेतकरी राहात होता. त्याला एकच मुलगा होता. मुलगा मोठा झाल्यावर त्याने त्याचे लग्न करुन दिले. दीड वर्षाच्या आंत त्याला एक गोंडस नातू झाला. गोरख दांपत्य खूष झाले.

नातू एक महिन्याचा असताना त्यांचा मुलगा आणि सून नावेत बसून नदी पार करत होते. अचानक नाव उलटली आणि ते दोघें नदीत बुडून मेले.

या घटनेने गोरख दांपत्य फार दुःखी झाले. त्यांना आता जगायचीच इच्छा उरली नाही. त्यांनी खाणेंपिणें सोडून दिलें. शेजाऱ्यापाजाऱ्यांनी त्यांची समजूत घातली कीं "जे झालं ते झालं. आता तेच आठवून रडत बसण्यात काय फायदा? कमीतकमी तुमच्या नातवासाठी तरी तुम्हाला जगायला हवं. त्याचं नीट पालनपोषण करणं हे तुमचं कर्तव्य आहे."

आता ते जरा सावरले. त्यांना वाटलं आपले शेजारी बरोबर सांगताहेत. कांही दिवसांनी ते आपल्या नातवाला शिवमंदिरांत घेऊन गेले. पुजारी गंगाधर शास्त्रांच्या सांगण्याप्रमाणे त्यांनी आपल्या नातवाचे नांव शिव असे ठेवले. त्यांनी देवाकडे प्रार्थना केली की हा मोठा होऊन चांगलं नांव मिळवूं दे.

आता शिव मोठा झाला. त्याच्या रुपागुणाचे, हुषारीचे सगळेजण कौतुक करीत. वृद्ध पुजारी गंगाधर शास्त्रींना तो फार आवडत होता. तो आपल्या आजोबांबरोबर जवळजवळ रोज देवळांत येत असे. त्याच्याशी दोन शब्द बोलल्याशिवाय शास्त्रीजींना चैन पडत नसे.

एक दिवस संध्याकाळी आजोबा व नातू दोघे मंदिरात आले. देवाचे दर्शन घेतल्यानंतर



ते मंडपात विश्रांती घेणाऱ्या गंगाधर शास्त्रांना भेटले.

शास्त्रींनी त्यांना आदराने बसायला सांगितले व विचारले "शिव, आजकाल तुझे आजोबा चिंतामग्न दिसतात. त्यांचा चेहराही उदास दिसतो. लहान सहान गोष्टींवरुन चिडतात. काय झाले आहे असं व्हायला?"

यावर शिव हसत म्हणाला, "आजोबा माझ्यावर रागवले आहेत."

"काय म्हणतोस? आजोबा तुझ्यावर रागवलेत? हे कसे शक्य आहे?" आश्चर्याने शास्त्री म्हणाले. तेव्हां गोरख मधे पडत म्हणाले "हे रागावणं कां काळजी हे तुम्हीच ठरवा शास्त्री. मी याला लग्न कर म्हणतोय पण हा ऐकायलाच तयार नाही. आज मी याला खूप रागवलो, पण हा कांहीतरी असंबद्ध बडबड करुन लग्नाचे टाळत आहे. आता त्याचे म्हणणे ऐका आणि तुम्हीच काय योग्य आहे ते सांगा."

शास्त्रींनी शिवकडे बघितलं. तो मान खाली करुन म्हणाला, "आजोबांनी कुठलीतरी एक मुलगी दाखवली आहे आणि तिच्याशी लग्न कर म्हणून आग्रह करत आहेत. एखादी मुलगी सुंदर आहे तर तिला कामधाम येत नाही. एखादी सुंदर, हुषार आणि कामधाम येणारी असली, तर ती गर्विष्ठ असेल. अशा मुलीशी लग्न केलं तर ती आजीआजोबांना नीट सांभाळणार नाही. आता या वयांत त्यांना कांही त्रास होऊं नाही, असं मला वाटतं. माझ्या या बोलण्यानेच आजोबा रागवले आहेत."

शिवचे बोलणे पटून शास्त्री म्हणाले "नातू बरोबर तर बोलतो आहे. मलाही तसंच वाटतंय."

गोरख यावर कांही बोलणार एवढ्यांत त्या गांवातलाच चांद नांवाचा शेतकरी तिथे आला. त्याच्या बरोबर एक सुंदर मुलगी होती. चांदने त्यांना नमस्कार करुन एक फणस दिला.

शास्त्रींनी त्याचे आभार मानत त्याला विचारले "ही मुलगी कोण?" "माझ्या मेव्हणीची मुलगी आहे. शहरांत राहाते पण तिला सगळं काम येतं. ज्या कामाला माझ्या बायकोला एक तास लागतो, ते काम ही पंधरा मिनिटांत करते." ही अतिशय हुशार आहे.





अगदी चांगली गृहिणी होईल! चांद म्हणाला. एवढ्यांत गौरीने पुढे होऊन शास्त्रींना नमस्कार केला. "लौकर लग्न होऊं दे!" असा शास्त्रींनी तिला आशिर्वाद दिला. "शिव तिच्याकडे एकटक बघतच राहिला शास्त्रींनी ते बघितले" आणि तेव्हांच गौरी शिवच्या मनात भरली आहे हे त्यांच्या लक्षांत आले.

मग ते चांदला म्हणाले, "तुझ्या म्हणण्या प्रमाणे गौरी एक चुणचुणीत आणि हुषार मुलगी आहे. आणि शिव किती हुषार आणि देखणा आहे हे तू जाणतोसच. या दोघांत जास्त समर्थ कोण आहे हे जाणण्याची मला फार उत्सुकता आहे. याला गौरीची कांही हरकत नाही ना?"

गौरीने मान हलवून आपली संमती दर्शवली. हे बघून शास्त्री शिवला म्हणाले, "तुला गौरीला जे कांही विचारायचंय ते विचार."

तेव्हां उत्साहाने शिवने गौरीला विचारले, "तुझ्या घराचे सर्व दरवाजे छोटेच आहेत की मोठे पण आहेत?"

त्याच्या या प्रश्नावर शास्त्री हसले, पण गोरख आणि चांदना वाटले, "हा काय प्रश्न झाला कां?"

गौरी धष्टपुष्ट शिवला निरखून बघत म्हणाली, "आमचे कुटुंब हे शेतकऱ्याचे कुटुंब आहे. साधारण घरांचे दरवाजे छोटेंच असतात. आमचे घर तर तुमच्या घरापेक्षा छोटेंच आहे."

लहानपणापासूनच त्याच्या आजोबांनी शिवला लाडांत वाढविले होते. खूप खायला प्यायला पण घातले होते. त्याला अशी स्पष्ट उत्तरें कुणाकडूनही ऐकून घ्यायची सवय नव्हती. गौरीच्या या उत्तराने चिडून जाऊन तो म्हणाला, "बरं बरं, पण हे सांग कीं जर सकाळीं पाण्याने भरलेली घागर तुला दिली, तर संध्याकाळपर्यन्त तरी ती रिकामी होईल की भरलेलीच राहील?" गौरी म्हणाली, "पाणी उगीचच वापरले नाही, सांडले नाही आणि झांकून ठेवले तर घागर रिकामी होणारच नाही." तिचे उत्तर ऐकून शिवच्या आता लक्षांत आले की ती काटकसरी आहे आणि कोणत्याही वस्तूची किंमत तिला कळते. त्यामुळे खूष होऊन तो म्हणाला "हों, हो, कळलं. पण हे तर सांग की म्हाताऱ्या कुचकामी बैलाचे काय करायचे?"









"प्रत्येक प्राण्याला केव्हां ना केव्हांतरी म्हातारपण हे येतंच. पण आपण लक्षांत ठेवायला पाहिजे की तारुण्यांत त्याने आपली कितीतरी कामे केली आहेत. तेव्हां नेहमीसारखेच आपण त्याचे पालनपोषण केले पाहिजे." गौरीने उत्तर दिले.

तिचे हे उत्तर ऐकून शिवची खात्री पटली की जर या मुलीशी लग्न केले तर ती आपल्या आजीआजोबांना चांगले सांभाळेल.

तरी पण गप्प न बसता त्याने आणखी एक प्रश्न केला. "बरं तर, एका बरोबर एकच जोडावा की त्याही पेक्षा अधिक जोडावे? कांही जोडावे? कां कांही जोडायची गरज नाही?"

त्याचा प्रश्न ऐकून थोडं रागवून गौरी म्हणाली, "जर तो एक मोठा असेल तर कांही जोडायची जरुर नाही. पण तो आपल्या देवाचा असेल तर त्याच्याबरोबर दहा जोडले तरी चालेल."

गंगाधर शास्त्री आत्तापर्यन्त गप्प बसून मोठ्या आवडीने त्यांचे बोलणे ऐकत होते. हे उत्तर ऐकून ते चांगलेच खळखळून हसले. पण हे उत्तर ऐकून शिवचा चेहरा मात्र गंभीर झाला.

गोरख आणि चांदला कांहीच कळलं नाही. ते शास्त्रींकडे पाहातच राहिले. शिवच्या शेवटच्या प्रश्नाचे गौरीच्या उत्तराशिवाय, बाकीची दोन्ही उत्तरें तुम्हाला कळली असतीलच. आता शेवटचा प्रश्न शिवने असा विचारला होता कीं कोणी एक गोष्ट आपल्याला बोलली तर त्याला उलट दहा गोष्टी बोलून उत्तर द्यायचं कां?" त्यावर रागवून गौरीने असे उत्तर दिले, "कुटुंबातल्या एखाद्या मोठ्या व्यक्तिने एखादी न आवडणारी गोष्ट केली तर गप्प बसले पाहिजे. पण जर नवऱ्याने अशी नावडती गोष्ट बोलली तर एकाची दहा उत्तरे सुद्धां द्यावी." याने गौरीने असे सिद्ध केले की पतीपत्नीतली भांडणे ही नैसर्गिक असतात. दोघांनी एकमेकांचा आदर करणे सर्वात चांगले. "या दोघांची जोडी खरोखरच सुयोग्य आहे. लौकरच यांचा विवाह होवो." असे म्हणून शास्त्रींनी त्यांना आशिर्वाद दिला.

गौरी आणि शिवने जोडीने शास्त्रींना वांकून नमस्कार केला.





# घरांतला चोर

दुपारची वेळ होती. कमलाचा पती माधव जेवण करून कांही आवश्यक कामासाठी बाहेर निघून गेला. स्वयंपाकाच्या खोलीजवळच असलेल्या आणखी एका खोलीत कमला झोपायला गेली. थोड्या वेळाने तिला कसला तरी आवाज ऐकू आला म्हणून तिने हळूच डोळे किलकिले करून पाहिले तर तिला धक्काच बसला. कमलाच्या नणंदेचा नवरा, शरद, तिची पेटी उघडत होता.

पण झोपल्याचा बहाणा करून कमला गप्प बसली. शरदने पेटी उघडली आणि रेशमी साड्यांच्या खाली लपवून ठेवलेला दहा तोळ्यांचा सोन्याचा सुंदर हार त्याने बाहेर काढला. व झटपट आपल्या खिशांत टाकला व तो निघून गेला. कमलाला ते पाहून अतिशय आश्चर्य वाटले व ती क्षणभर सुन्न झाली.

लक्ष्मी कमलाच्या नवऱ्याची मोठी बहीण होती. तिच्याशिवाय त्याला सख्खे असे कुणी नव्हते. लक्ष्मीचा नवरा शरद कचेरीत नोकरी करत असे. तो स्वभावाने अतिशय शांत व सुशील होता.

कमला शरदबिषयी विचार करू लागली, "शरद भावजी तर इतके चांगले आहेत. त्यांच्यात एक कणभर सुद्धां वाईट गुण दिसत नाही. मग त्यांनी अशी चोरी कां केली? याचा शोध लावलाच पाहिजे."

कमलाने या गोष्टीचा बिलकुल गवगवा केला नाही. घरामधे असे कांही घडले आहे असे कुणाला तिने जाणवूं दिले नाही. नवरा घरी आल्यानंतर कांहीतरी एक निमित्त करून तिने त्याच्यासमोरच पेटी उघडली. नंतर दागिन्याची चोरी झाली म्हणून तिने जोरजोराने आरडाओरडा करायला सुरवात केली, जणूं कांही आत्ताच तिला ही गोष्ट समजली होती.



कमलाचा आरडाओरडा ऐकून घरांतले सर्व लोक एकत्र आले. सर्वजण तिचा दागिना इकडे तिकडे शोधू लागले. कमलाने सुद्धां घाबरल्याचे नाटक करत म्हटले, ''ज्यावेळी असे कांही घडते त्यावेळी मी सर्व देवावर सोडून देते. यावेळी सुद्धां मी तसेच करणार आहे. त्याशिवाय दुसरा कांही उपाय मला सुचत नाही.'' असे म्हणून ती जवळच्या देवळांत गेली व डोळे बंद करून प्रार्थना करू लागली.

ह्या घटनेनंतर दहाव्या दिवशी कुणीतरी घराचे दार ठोठावले. कमलाच्या नवऱ्याने दार उघडले तर दारांत एक वयस्कर साधू उभे होते. साधू म्हणाले, ''मला आंत येऊ देशील कीं जे कांही सांगायचे आहे ते इथंच सांगून निघून जाऊं? सांग माधव.''

माधव काय उत्तर द्यायचे याचा विचार करत होता, तेवढ्यांत शरद पुढे आला व साधूला प्रणाम करत त्यांना आंत घेऊन गेला.

आंत आल्यानंतर साधूने शरदला निरखून पाहिले. नंतर तिथे आलेल्या कमलाला पाहून हंसत म्हटले, ''कशी आहेत तू मुली? देवाने प्रेरणा दिल्यामुळे मला आज इकडे यावे लागले. तुझ्या माहेरच्या माणसांनी दिलेला एक मूल्यवान दागिना अचानक नाहीसा झाला आहे, होय ना?''

कमलाने ''हो'' असे भाव दाखवीत डोके हालवले. त्यावर साधूने तिला आश्वासन दिले, ''काळजी करूं नकोस. तुझा हरवलेला दागिना एक दोन दिवसांतच मिळेल. मी दोन तीन दिवसांनी कांही आवश्यक कामासाठी पुन्हां इकडे येणार आहे. तोपर्यंत तुझा दागिना तुला मिळेलच.'' नंतर शरदकडे पाहून ते म्हणाले, ''पुत्रा, माझ्याबरोबर जरा येशील?''

साधूला पाहून आधीच घाबरलेला शरद बुचकळ्यांत पडला वा साधुच्या मागोमाग भयभीत होऊन चालूं लागला. जवळ जवळ अर्ध्यापाऊण तासाने शरद घरीं आला तेव्हा त्याचा चेहरा शांत दिसत होता. दोन दिवसांपासून तो अतिशय अस्वस्थ व बेचैन होता, त्याच्या चेहऱ्यावर उदासीनता व एक प्रकारची भीती व लज्जा दिसत होती. ती आता नव्हती. त्याचे मन शांत, स्वस्थ व समाधानी होते.

त्या दिवशी संध्याकाळी कमलाने साडी काढण्यासाठी पेटी उघडली तर तिचा दागिना तिला दिसला. तिला अतिशय आनंद झाला.



अत्यानंदाने ती म्हणाली, ''माझा दागिना मिळाला.''

घरच्या सर्व लोकांना दागिना मिळाला म्हणून खूप आनंद झाला. तिसऱ्या दिवशी सांगितला-प्रमाणे साधू घरी आले तेव्हा त्यांचे सर्वांनी भव्य स्वागत केले. साधु पद्मासन घालून चटईवर बसले व म्हणाले, ''घरच्या सर्व लोकांनी एक गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे की कुटुंबियांचे सुख, त्यांचा चांगलेपणा, वाईटपणा, त्यांचे सौभाग्य, सर्व कांही घरच्या सुनेवरच अवलंबून असते.'' कुणीही कांही प्रश्न विचारण्याआधी किंवा शंका प्रकट करण्यापूर्वीच साधू तिथून निघून गेले.

माधव त्या रात्री साधूची आठवण काढत म्हणाला, ''खरंच, त्या साधुमध्ये देवाचा अंश आहे, देवाचा अवतार आहे.''

कमला हंसत म्हणाली, ''लग्न झाल्यापासून पाहते, ताई नेहमी असंतुष्ट दिसतात. त्यांच्या या असंतुष्ट प्रवृतीमुळेच शरद भावोजींना चोरी करावी लागली. हे साधू म्हणजे दुसरे कुणी नसून माझे विश्वनाथ मामाच होते. त्यांच्या मदतीनेच मी ही योजना आंखली, ''ती आणखी पुढे कांही सांगण्यापूर्वीच माधव म्हणाला, ''तू तर कमालच केलीस. मी कित्येकवेळा गांवी गेल्यानंतर तुझ्या मामांना भेटलो आहे. पण साधूच्या वेषात मी त्यांना ओळखलंच नाही.''

''ते पौराणिक नाटकात काम करीत असत, आणि तुम्हाला माहित आहे कां भावजींना बाहेर नेऊन त्यांना ते म्हणाले, ''मला माहित आहे दागिन्याची चोरी तूच केली आहेस. पण तू असं का केलंस?'' तेव्हां भावजी खूप रडले आणि त्यांनी सांगितलं कीं ताई त्यांना खूप हैराण करते, त्यांना दागिने घेऊन देता येत नाहीत म्हणून खूप बोलते, त्यामुळे त्यांना चोरी करावी लागली. त्यांनी साधूमामांना वचन दिलंय की ते पुन्हां असं कांही करणार नाहीत, आणि ताईला काबूत ठेवतील म्हणून. नंतर त्यांनी दागिना गुपचूप पुन्हां माझ्या पेटीत आणून ठेवला.''

कमलाकडे आदराने व प्रेमाने पहात माधव म्हणाला, ''घरचा मान राखण्यासाठी, घरच्या जांवई माणसाची बदनामी होऊ नये म्हणून तू किती योग्य बेत आखलास! सासरचा मान मरातब राखून ठेवण्यासाठी कष्ट करणारी सून खरंच धन्य आहे. तिच्यापेक्षाही सुंदर व मूल्यवान दागिनाच असूं शकणार नाही.''



# पिचावरम



पुढच्या वेळेला तुम्ही जेव्हां तमिळनाडला जायचे ठरवाल, त्यावेळीं तुमच्या दौऱ्यांत पिचावरमचा समावेश जरूर करा. हे एक देखणे व रमणीय स्थळ आहे.

पिचावरमच्या जंगलातल्या वनराजींत कचितच आढळणारा एक खास विशेष आहे - इथली दलदलींतली झाडी. या झाडांची मुळें कायमच पाण्यांत असतात. पिचावरमची दलदल-झाडी ही जगांत सर्वोत्तम मानली जाते. २,८०० एकरांची ही झाडी घनदाट आहे व नदीच्या प्रवाहाजवळचे सांठलेले पाणी संथ असल्यामुळें इथें अनेक चिमुकली बेटे तयार झाली आहेत. नदीच्या मुखाशी वाळूचा बांध आहे त्यामुळें हे अरण्य समुद्रापासून वेगळे झाले. असले तरी अतिशय सुंदर आहे. वेल्लार आणि कोलेरुनच्या प्रवाहांमुळें हे पाणी अनेक प्रकारच्या सांघिक जलक्रीडांसाठी उपयुक्त ठरते.

या प्रवाहांच्या कांठावर असलेली गर्द झाडी हे तर निसर्ग प्रेमींसाठी वरदान आहे. कांही दुर्मिळ झाडांच्या जाती इथें सांपडल्या आहेत.

पिचावरमला जाताना तुमचा कॅमेरा व दुर्बीण न्यायला विसरूं नका. पक्षीनिरीक्षण करण्यासाठी ही फारच छान जागा आहे. अनेक प्रकारचे करकोचे, बगळे, करढोक, मोठ्या चोचीचे पाणकोळी, वगैरे निरनिराळे पक्षी इथें दिसतात.

तमिळनाड पर्यटन खात्यातर्फे प्रवाशांसाठी इथें लहान होड्या वल्हविण्यासाठीं देतात.

## पिचावरमला जायचा मार्ग

नटराजाचे मंदिर असलेल्या चिदंबरम गांवापासून पिचावरम हे सोळा किमी अंतरावर आहे. चेन्नई, मदुराई व त्रिचीहून इथें रेल्वेने जाता येते. राज्यांतल्या सर्व प्रमुख गांवांना जोडणारे मार्ग इथून आहेत. त्रिचीचा विमानतळ इथें सर्वांत जवळचा आहे. तमिळनाड पर्यटन विकास खात्यातर्फे इथें राहाण्यासाठी लहान बंगल्या व उपाहारगृहे यांची सोय आहे. बस, टॅक्सी व ऑटोरिक्षा या सुविधाही इथें आहेत.



# माया सरोवर

## 9

*(जयशीलने फेंकलेला बाण जेव्हां नरवानराला लागला, तेव्हां कृपाणजितने डोंगरावरुन खाली पाहिले. त्याने आपला शत्रू जयशील याला ओळखले. तो पुन्हां लगेच गडेकोंडाच्या अनुचरांबरोबर त्या वस्तीच्या दिशेने पळायला लागला. गडेकोंडाने त्याची थट्टा केली म्हणून कृपाणजित नाराज झाला. आणि नरमानवाला त्याच्यावर हल्ला करण्यासाठी त्याने त्याला टोंकले. - त्यानंतर)*

गडेकोंडाच्या अनुचरांनी जेव्हां पाहिले कीं कृपाणजित त्याच्या सरदारावर तुटून पडण्यासाठी नरमानवाला सांगतो आहे, तेव्हां तेही चिडून उठले. हातांत हत्यारे घेऊन ते कृपाणजितवर हल्ला करण्यासाठी पुढे सरसावले. त्यांना पाहून कृपाणजित घाबरुन गेला. तो एकटाच होता, आणि जरी ठेंगणे लोक असले तरी त्यांची संख्या जास्त होती.

कृपाणजितने एक युक्ती लढवली. त्याच्या दिशेने पुढें येत असलेल्या गडेकोंडाच्या अनुचरांकडे पाहून हंसतहंसत तो म्हणाला, ''घाई करुं नका. मी तर तुमचा जवळचा मित्र आहे. मी फक्त तुम्हाला दाखवत हो तो कीं नरमानव हा मी पाळलेला आहे.'' असं म्हणून त्याने नरवानराच्या हातांत पकडलेल्या गडेकोंडाला सोडवले.

गडेकोंडा तर भीतीने थरथर कांपत होता. त्या वस्तीतल्या एका झोंपडीसमोर तो मटकन खाली बसला. त्याचे अनुचर त्याच्याभोंवती उभे राहिले आणि आता पुढे काय करायला हवे ते त्याला विचारुं लागले. गडेकोंडाच्या एव्हाना लक्षांत आलं



होतं कीं त्या सशक्त मानवाची मदत घेण्यात गडेकोंडाची फार मोठी चूक झाली होती.

आपल्या अनुचरांना गंभीर स्वरांत तो म्हणाला, "मी सांगतो आहे ते नीट लक्ष देऊन ऐका. आपल्या नरवानराच्या शेजारीं उभा राहून तो आपल्याकडे रोखून बघतोय. आपण सरळपणें त्याला पराभूत करूं शकणार नाही. तो वानर आणि ती लांब तलवार आपल्या ताब्यांत आली पाहिजे. तेव्हांच त्याच्या तावडीतून आपली सुटका होईल. मग त्यापायीं आपले कांहीजण मरण पावले तरी चालेल."

"आपण म्हणताय ते ठीक आहे. पण त्यासाठीं काय आणि कसं करायला हवं?" एका ठेंगण्याने विचारलं. "हा बलदंड मानव जेव्हां मरेल, तेव्हां गडाची राणी आपल्याला सहजगत्या नष्ट करूं शकेल. आता त्या दुष्ट राणीच्याबरोबर राक्षसासारखे हे दोघेजण आहेत. ते निश्चितच तिला मदत करतील." आणखी एका ठेंगूने आपली भीती व्यक्त केली.

गडेकोंडा नाराज होऊन त्या दोघांना म्हणाला, "जर आपण मरणारच असलो तर आपल्या जातीच्या बांधवांच्या हातून तरी मरूं! त्यासाठी आणखी एक उपाय आहे. आपण राणीशी तह करूं या. तिला आपण सांगू कीं आम्ही तुझे सेवक बनण्यास तयार आहोत. आपण तिची क्षमा मागू. माझी पक्की खात्री आहे कीं ती आपल्याला माफ करील."

दूर उभा असलेला कृपाणजित हे सारं कांही बघत होता. आपल्या वानराला घेऊन तो त्यांच्याजवळ आला. तो गडेकोंडाला म्हणाला, "खरं काय ते सांगा, माझ्याविरुद्ध कसला कट तुम्ही रचना आहात? तुम्ही मला मारणार आहात कां? खरं काय आहे ते सांगा!" त्याने जरा जोरांतच सांगितलं.

गडेकोंडा उठून उभा राहिला आणि बोलला, "बलवानजी, आम्ही कसलाही कट करत नाही आहोत. आम्ही फार काळजींत आहोत. आम्ही संकटांत सांपडलो आहोत. सूर्यास्त होण्यापूर्वीच आम्हाला अरण्यांत दूरवर जाण्याची इच्छा आहे."

गडेकोंडाचे बोलणें ऐकून कृपाणजित एकदम घाबरून गेला. जंगलात राहताना ज्या अनेक अडचणी त्याने सोसल्या होत्या, त्या साऱ्या त्याला आठवूं लागल्या. त्याने लागलीच मोठ्या नम्र स्वरांत गडेकोंडाला म्हटलं, "गडेकोंडा, तूं घाबरूं नकोस. तुम्ही लोकांनी जर मला मदत केलीत तर आज मध्यरात्रींच मी त्यांचा नायनाट करीन. ती आणि



माझा नरवानर मिळून त्यांना कायमचीच कालझोंप देऊन टाकूं. त्यानंतर तर या पर्वतराजीचे, या अरण्यांचे तुम्ही एकमेव राजे बनाल. गडेकोंडा महाराजांचा विजय असो." असं म्हणून त्याने जयघोष केला.

यावर गडेकोंडा खूष झाला आणि त्याने मान डोलावली. कृपाणजिताने नरवानराची सांखळी पकडली आणि त्याला पुढें ओढत तो म्हणाला, "आम्ही दोघे उपाशी आहोत. आमच्या जेवणाची कांहीतरी व्यवस्था करा." हे बोलतबोलत तो आपल्या झोंपडीच्या दिशेने जाऊं लागला.

"तुमचं दोघांचही जेवण तिथे तयार आहे." गडेकोंडाने स्वतःशी हंसतच म्हटलं. कृपाणजितची झोंपडी इतर झोंपड्यापेक्षां जरा दूर अंतरावर होती. तिथें पोंचल्यानंतर त्याने ओरडून सांगितलं, "मी आता मध्यरात्रीपर्यंत भरपूर झोंप घेणार आहे. तोपर्यंत तुम्ही कुणी मला उठवूं नका. त्यानंतर शत्रूचा संहार होईल."

गडेकोंडा जास्तच खूष झाला आणि त्याने आनंदाने मान डोलावली. चार विश्वासू आणि साहसी अनुयायांना बरोबर घेऊन तो आपल्या झोंपडीत गेला. त्यानंतर कांही घटकानंतर ही घटना घडली. झोंपलेला कृपाणजितला अचानक जाग आली आणि तो म्हणूं लागला, "हा तेलाचा वास कुठून येतोय?" इकडे-तिकडे बघत तो ओरडूं लागला, "बाहेर कोण आहे? हा एरंडेल तेलाचा वास येतोय तरी कुठून?"

बाहेरच्या बाजूने लगेच उत्तर आलं, "महाशय, हा कांही एरंडीच्या तेलाचा वास नाही. हे तर तिळाचे तेल आहे. डांसामुळें आणि इतर किडे-कीटकांमुळें तुमची झोंपमोड होऊं नये अशीच आमची इच्छा आहे. तुम्ही निर्धास्तपणें झोंप घ्यावी असं आम्हाला वाटतं. मध्यरात्रीं शत्रूचा संहार करायला जायचं आहे ना तुम्हाला?" गडेकोंडाच्या एका माणसाने बाहेरुन ओरडून सांगितलं.

"वा, वा, छान, छान!" असं म्हणून कृपाणजिताने मोठी जांभई दिली आणि आपले डोळे पुन्हां मिटले.

त्यावेळीं गडेकोंडा आपल्या कांही अनुयायांबरोबर तिथें आला. त्याने खूण करताच एक ठेंगू इसम मुकाट्याने झोंपडीच्या आंत गेला आणि भिंतीवर लटकवलेली तलवार त्याने हलकेच उचलली. तो तलवार घेऊन बाहेर आला आणि त्याने झोंपडीला चारी बाजूंनी आग लावली.

कांही क्षणांतच आंत झोंपलेल्या कृपाणजितला





त्या आगीची धग जाणवली. तो जोरांत ओरडायला लागला, "अरे ठेंगण्यांनो, मी याचा सूड जरूर घेईन." त्याने तलवारीसाठी भिंतीकडे पाहिलें. तिथें तर तलवार नव्हती.

तितक्यांत नरवानरही जोराने ओरडायला लागला. सांखळी ओढण्यासाठी त्याने आपली पूर्ण शक्ति एकवटली, आणि त्याच्या कमरेला बांधलेली ती सांखळी तुटली. चारी बाजूंनी झोंपडी पेटलेली पाहून तो झोंपडीच्या दाराकडे जाऊं लागला. दुसरा कांही मार्ग दिसेना म्हणून कृपाणजितने स्वतःला वांचवण्यासाठी नरवानराच्या कमरेला असलेली सांखळी पकडली. वानराने जोर लावून दार तोडले आणि तो बाहेर आला. त्याच्याबरोबर कृपाणजितही बाहेर आला पण तो खाली पडला, आणि त्याच्या हातांतून सांखळी सुटली.

हे दृश्य जेव्हां गडेकोंडाने पाहिलं तेव्हां त्याने ओरडून आपल्या अनुयायांना सांगितलं, "नरवानराला जाऊं द्या, पण या कृपाणजितला भाल्याने भोंसकून काढा."

"आता कृपाणजित लटलट कांपायला लागला. जवळच पडलेले एक सुकें लांकूड त्याने हातांत घेतले आणि त्याने तो गडेकोंडाच्या अनुयायांना मारायला लागला.

वस्तीतल्या इतर ठेंगण्या लोकांनी पाहिलं कीं आगीच्या ज्वाळा आजूबाजूला पसरत आहेत. जोरजोराने होणारा आरडाओरडा ऐकायला येत होता. त्यावेळीं अरण्यांतल्या वृक्षांच्या बुंध्या-जवळ दोन विचित्र प्राणी दिसत होते. घोड्यां-सारख्या दिसणाऱ्या दोन अद्भुत प्राण्यांवर ते बसलेले होते. त्या प्राण्यांच्या शरीरावर माशांच्या कातडीवर असतात तसे खवले होते. नीट लक्षपूर्वक बघितलं तर ते मकरकेतूच्या वाहना-सारखे, जलग्रहसारखे दिसत होते. दोन्ही स्वारांच्या अंगावर खवल्यांसारखेच कातड्याचे कपडे होते. त्यांच्या कमरेला लांबलांब तलवारी लटकत होत्या.

त्यांच्यापैकीं एकाने चटकन आपली तलवार म्यानांतून काढली आणि म्हटले, "अग्रज सर्पनख, त्या वस्तीला कुणीतरी आग लावलेली दिसते आहे. हे त्यांच्या शत्रूचेच काम असेल बहुतेक. ते यांचा सर्वनाश करण्यासाठी टपलेलेच आहेत."

दुसऱ्याचे नांव होते सर्पसख. त्याने चिडून म्हटलं, "होऊं दे त्यांचा सर्वनाश! आपण आहोत नि ते लोक आहेत. आपल्याला त्यांच्याशी कांहीही देणंघेणं नाही. जे व्हायचं असेल ते होऊन



जाऊं दे. आपण इथें कशासाठी आलो आहोत ते लक्षांत आहे ना? या अरण्यांत आपण कां भटकतोय ते विसरलास कीं काय?"

"हो, हो, लक्षांत आहे कीं, सारं कांही लक्षांत आहे." असं म्हणत सर्पनख घोड्यावर उभा राहिला आणि त्या वस्तीकडे पाहात आश्चर्यचकित स्वरांत म्हणाला, "फारच विचित्र वाटतंय रे! एक भयंकर नरवानर ठेचकाळत त्यांतून पळून जायचा प्रयत्न करतोय. ते ठेंगणे लोक त्याला हरतऱ्हेने त्रास देत आहेत. त्याच्याबरोबर एक सामान्य माणूस आहे. ते ठेंगणे लोक त्यालाही खूप सतावताहेत. हे सगळं पाहिल्यानंतर गप्प कसं बसता येईल?"

"मला तरी हे सगळं थोडंच माहीत होतं? त्या नरवानराला आणि त्या मानवाला आपण जिवंत पकडलं पाहिजे. त्या मानवाच्याकडून आपल्याला आपल्या हरवलेल्या भावाचा पत्ता सांपडेल कदाचित!" असं म्हणून सर्पसखने आपल्या घोड्याला प्रेमाने गोंजारले. आणि खोगीराच्या चारी बाजूंनी कमळाच्या देठांपासून तयार केलेली जी दोरी लटकत होती ती हातांत घेतली.

दोघेही त्वरेने गडेकोंडाच्या वस्तीकडे निघाले. नरवानर आपल्या मजबूत हातांनी झोंपड्या तोडत होता. असं वाटत होतं कीं कृपाणजितला वेड लागलंय. तो जोरजोराने ओरडत होता आणि लांकडाच्या फांट्यांनी ठेंगण्या मंडळींना मारत होता.

"दादा, मी त्या नरवानराचा समाचार घेतो. तू त्या धष्टपुष्ट माणसाला पकड." असं म्हणून सर्पसखने आपला घोडा नरवानराच्या दिशेने वळवला.

सर्पनखने कमळदेठाची दोरी वर उचलली आणि त्याचा फांस कृपाणजितच्या गळ्यांत पडेल असा फेंकत तो ओरडला, "मायासरोवरकी जय!" सर्पनखने फेंकलेली दोरी कृपाणजितच्या गळ्याभोंवती बरोबर पडली. त्याचा फांस घट्ट ओढण्यापूर्वीच कृपाणजित जोराने आक्रोश करूं लागला, "महोदय, मला मारूं नका हो! तोही





तुमच्यासारखाच एक मनुष्य होता, आणि मी पूर्वी त्याला मदत केली होती. तो एका विचित्र दिसणाऱ्या हत्तीवर बसत असे.''

त्याचे बोलणें ऐकून सर्पनख आश्चर्यचकित झाला व म्हणाला, ''याचा अर्थ असा होतो कीं तू मकरकेतुला ओळखतोस. तो मोठा पराक्रमी व शूर योद्धा असूनसुद्धां त्याने तुमची मदत मागितली, त्याच्यावरून असं वाटतंय कीं तो संकटात सांपडलेला आहे. तर मग सांगा, तो मकरकेतु आता कुठे आहे?''

कृपाणजितने आपले दोन्ही हात पसरून म्हटले, ''आपली कमळाच्या देंठाची दोरी माझ्या गळ्याला टोंचतेय हे! मला नीट बोलतादेखील येत नाही. ही दोरी जरा सैल करता कां?''

''हो, हो, सैल करतो ना! पण जर कां पळून जायचा प्रयत्न केलास तर हीच दोरी तुझ्या गळ्यांत यमपाश बनेल हे मात्र लक्षांत ठेव.'' गंभीर आवाजांत सर्पनखने सांगितलं.

जेव्हां दोरी जराशी सैल करण्यांत आली, तेव्हां कृपाणजित म्हणाला, ''महोदय, मकरकेतु आता कुठे आहे ते कांही मला माहीत नाही. कांही दिवसांपूर्वी अमरावती नगराच्या जयशील नांवाच्या एका माणसाने आणि त्याच्या एका मित्राने मकरकेतुला फार छळले होते. ही खरी गोष्ट मला अरण्यांत राहणाऱ्यांच्याकडून समजली.''

तितक्यांत गडेकोंडा सर्पनखच्या समोर आला आणि वाकून नमस्कार करीत म्हणाला, ''अहो जल अश्व शूरवीर, या दुष्टाशी बोलताना तुमच्या सहकाऱ्यावर काय संकट कोसळलं आहे, त्याच्याकडे तुमचं लक्ष गेलेलं नाही!''

सर्पनखने लगेच चारी बाजूंना नजर फिरवली, आणि गडेकोंडाला विचारलं, ''माझ्या भावावर कसलं संकट आलंय?''

गडेकोंडाने उत्तर दिलं, ''तुमचा भाऊ आणि नरवानर यांच्यात मारामारी झाली. दोघेही लढतालढता त्या झाडींत शिरले आहेत. जलअश्व दुसऱ्या दिशेने पळून गेला. त्या नरवानराने तुमच्या भावाची मानगूट पकडून त्याला उचलले आणि आपल्या खांद्यावर टाकून तो तिसरीकडे पळाला. तो वानर या कृपाणजितने पाळलेला आहे. त्यानेच त्या वानराला असं करण्याचा इशारा केला असावा.''

''अरे बुटक्या, ही गोष्ट सांगायला इतका वेळ कां लावलास? घे ही दोरी, पकड नीट!'' असं म्हणून त्याने ती दोरी गडेकोंडाच्या हातांत दिली व पुढे तो म्हणाला, ''तो दुष्ट कुठे पळून तर



जाणार नाही ना, याची जबाबदारी तुझ्यावर आहे.'' एवढं बोलून त्याने घोडा पिटाळला व तो त्वरेने त्या वृक्षराजींत नाहीसा झाला.

ठेंगू लोकांच्या वस्तींत जी आग लागली होती, कृपाणजित व नरवानराशी गडेकोंडाचे अनुयायी यांची जी लढाई चालली होती, त्यांचा आरडा-ओरडा व जोरदार आवाज डोंगराच्या पलीकडच्या बाजूला असलेल्या जयशील व सिद्धसाधकाला ऐकू जात होता. त्यांनी तिकडे काय होते आहे व काय चालले आहे, ते पाहायला ठेंगण्या लोकांच्या सेनापतीला पाठवले.

दोघांना घेऊन सेनापती त्या डोंगरावर चढला. तिथून त्याने वस्तीच्या बाजूला एक नजर टाकली. तिथें जे कांही चाललेलं होतं ते पाहून तो फारच खूष झाला. ही आनंदाची बातमी जयशीलला सांगण्यासाठी तो परत मागे वळणार, तेवढ्यांत तिथें आलेल्या सर्पनख व सर्पसख यांना त्याने पाहिले.

ठेंगण्याचा सेनापती धांवतच आला आणि त्याने जयशील व सिद्धसाधकास सविस्तर माहिती दिली.

ती ऐकून सिद्धसाधकाने आपला शूळ उचलला आणि तो ओरडत उठला, ''जय महाकाली!'' आणि त्याने जयशीलला म्हटलं, ''जयशील, आपण ज्या कामासाठी आलो आहोत, ते काम निश्चितच यशस्वी होईल. ही माणसें जलाश्वांच्यावर स्वार होऊन आली आहेत, ती मकरकेतूचीच माणसें आहेत यांत संशयच नाही. त्या दोघांना आपण पकडूं या आणि त्यांना नीट समजावून सांगून किंवा जरा धाक दाखवून त्या मायासरोवराची जागा कुठे आहे त्याचा तपास करूं या. त्यानंतरच कनकाक्ष महाराजांची मुलें - कांचनवर्मा व कांचनमाला यांना सोडवून बरोबर घेऊन जाणें आपल्याला शक्य होईल.''



त्यावर जयशीलने हंसतच उत्तर दिलं, ''साधक, विचित्र घोड्यांवर स्वार होऊन आलेल्या दोन माणसांकडून आपली समस्या थोडीच सुटणार आहे? त्यामुळें आपल्याला कनकाक्ष राजाची मुलें काय सहजासहजी मिळणार आहेत? तुझा उत्साह कौतुकास्पद आहे, पण आपण कांहीही करण्याच्या अगोदर जलअश्वावर स्वार होऊन ते या भागांत कां आले आहेत आणि त्यांना जिवंत कसें पकडता येईल याचा आपण आधी विचार करायला हवा!''

जयशीलचे हे उत्तर ऐकून सिद्धसाधकाचा उत्साह मावळला, आणि आपला शूळ खाली








टाकत त्याने म्हटलं, ''तूच विचार कर नि सांग कीं त्यांना जिवंत कसं पकडायचं ते!'' जयशीलने होकारार्थी मान डोळावत म्हटले, ''तू आपला शूळ खाली कशासाठी टाकलास? कीं आत्तापासून आपल्या मंत्रशक्तीवरच तू अवलंबून राहाणार आहेस?''

'जय महाकाली' असा घोष करीत सिद्ध-साधकाने हातांत शूळ घेतला आणि तो म्हणाला, ''जयशील, अजून माझी मंत्रशक्ती तितकी जागृत झालेली नाही. त्या दिवशी स्मशानांत महाकालीचा सेवक कालकाल याने जवळजवळ माझी जीवच घेतला होता, हे तुला माहित आहेच की.''

'हो हो' म्हणत जयशीलने ठेंगण्या लोकांच्या सेनापतीच्या दिशेने वळून पाहिले व पुढें म्हटले, ''तुम्ही आपले कांही सैनिक बरोबर घेऊन आमच्या पाठीमागून आलं पाहिजे.''

''महोदय, मी अशाच आज्ञेची वाट पाहात होतो'' सेनापती म्हणाला.

त्याला घेऊन जयशील व सिद्धसाधक जरा दूर गेले. डाव्या बाजूच्या मोठमोठ्या वृक्षांच्या झाडीतून त्यांना नरवानराचा भयंकर चीत्कार ऐकूं आला. सर्वजण आश्चर्यचकित होऊन तिकडे बघू लागले.

नरवानर झाडांच्या बुंध्यावर उड्या मारत जात होता. त्याच्या खांद्यावर अजीब पोशाखांतला एक माणूस पडला होता, आणि तो तिथून हलण्याचं चिन्ह दिसत नव्हतं.

''जयशील, ज्या माणसांना जिवंत पकडून आपण मायासरोवराचे रहस्य जाणून घेण्यास उत्सुक आहोत, हा माणूस त्यांच्यापैकींच एक असावा. बहुतेक तो नरवानराच्या हातून मेला असावा. पण तो दुसरा माणूस आता कुठे असेल?'' सिद्धसाधकाने उत्सुक स्वरांतच विचारलं.

सिद्धसाधक आपले बोलणे पूर्ण करण्यापूर्वींच जलाश्ववर स्वार झालेला सर्पनख त्वरेने झाडा खाली आला व जोराने ओरडूं लागला, ''सर्पसख, तू कुठे आहेस रे सर्पसख, अरे सर्पसख?''

जयशीलने चटकन हात वर करून सर्वांना सांगितले, ''सगळ्यांनी झाडांच्या मागे लपून बसा. हा जलाश्वावरचा स्वार जो आहे, त्याला आपण दिसता कामा नये. कोणत्याही परिस्थितींत, आपण त्याला जिवंतपणीं पकडलंच पाहिजे.'' असं म्हणून त्याने सर्वांना धोक्याची सूचना दिली. (क्रमश)



वेताळ कथा

# चूक जनतेची आहे

निश्चयी विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, त्याने शव खाली ओढले, खांद्यावर घेतले व तो स्मशानाकडे चालूं लागला. तेव्हा शवांतून वेताळ बोलूं लागला, ''राजा, मी इतके सांगूनही तूं पुन्हा तेच काम करतो आहेस. पण मला सांग, इतकं करून तुला त्यांत यश मिळालं का? तुझ्या परिश्रमांना फळ मिळालं कां? दिवसेंदिवस तुझा हट्टी स्वभाव वाढतच चालला आहे, राज्याकडे दुर्लक्ष करून तू उगीच इकडे आपला वेळ वांया दवडतो आहेस. तू साहसी आहेस, तुझ्यांत अपार सहनशक्ती आहे, ध्येय साधण्याचा तुझा निश्चय आहे, हे सर्व मला माहित आहे, पण काय उपयोग? शेवटी तू काय साधलंस? मला हे समजत नाही, कीं इतके कठोर परिश्रम तू कशासाठी करतो



आहेस? खूप पूर्वी विक्रमसिंह नांवाचा एक राजा होता. त्याने आपल्या राज्याची जबाबदारी कर्तव्यदक्ष मंत्र्यावर लादायला पाहिली, पण तो त्यांत यशस्वी झाला नाही. मला वाटतं, तू पण तसाच पराभूत होशील. मी तुला त्याची गोष्ट सांगतो, ती लक्ष देऊन ऐक. तुझा थकवाही दूर होईल.'' असे म्हणून वेताळाने कथा सांगायला सुरवात केली.

विक्रमसिंह विशालदेशचा राजा होता. त्याला मूलबाळ नव्हते. पण तरीही प्रजेलाच तो आपली संतान समजायचा. आणि आपल्याला संतान नाही म्हणून त्याला त्याची कधी चिंताही वाटत नसे. परंतु गांवातल्या नागरिकांना नेहमी वाटायचे की विक्रमसिंहाच्या मृत्यूनंतर कोण राजा होईल? तो कसा असेल? कांही मुख्य नागरिकांनी राजाची भेट घेतली आणि त्याला सांगितले, ''महाराज, आपण योग्य अशा एका मुलाला दत्तक घ्या. त्याला लहानपणापासून सर्व शिक्षण द्याल व इतर सर्व विद्येंत पारंगत कराल, तरच तो आपल्या-सारखा एक आदर्श व उत्तम राजा होईल.''

जेव्हां विक्रमसिंहाने लोकांच्या या गोष्टी ऐकल्या, तेव्हां त्याला वाटले की राजा होऊन कर्तव्य पार पाडण्यासाठी माझेच संतान असायला हवे असे कांही नाही. पण राजा होण्यासाठी त्या व्यक्तीला चांगले शिक्षण देऊन त्याची योग्यता वाढवली पाहिजे. हे राणीला सांगितल्यावर तिलाही ते पटले. दोघांनी मिळून या विषयावर असा निर्णय घेतला की गांवातल्या योग्य तरुणांची निवड करायची. मग गांवात दवंडी पेटवली की शूर, वीर, हुशार, समर्थ तरुणांनी निवडीसाठी पुढे यावे. पाहता पाहता राजधानीत हजारों तरुण राजाच्या निवडीसाठी आले. राजाने स्वत: लक्ष देऊन अनेक तरुणांच्या परीक्षा घेऊन त्यांतले दोन तरुण निवडले. त्यांचे नाव होते सुशाल आणि कुशाल. हे दोघेही इतरांपेक्षा सर्व बाबतीत समर्थ व योग्य होते.

या दोघांपैकी एकालाच राजा म्हणून निव-डायचे होते. पण ते दोघेही सर्व विद्येंत सारखेच तरबेज होते, त्यामुळे राजाला एकालाच निवडणे कठीण गेले. राजाने त्या दोघांना सांगितले, ''तुम्ही दोघेही सर्व कलांत सारखेच निपुण आहात, पण कोणी एकच विशाल देशचा राजा बनूं शकतो. राजा होणे म्हणजे कांही साधी, सोपी गोष्ट नाही. राजाला लोक देवासमान मानतात. मानवाने प्राप्त करून घेण्यासारख्या सर्व कलागुणांत तुम्ही पारंगत आहात, आता देवाची तपश्चर्या करून दैवीशक्ती प्राप्त करून घेऊन एका वर्षानें या. तुम्हा दोघांपैकी जो कोणी देवाची जास्त कृपा प्राप्त करून घेईल, त्याला मी या



राज्याचा राजा करेन. आता तुम्ही जाऊं शकता.'' सुशाल आणि कुशाल जवळच्या जंगलात गेले व त्यांनी घोर तपश्चर्या सुरु केली. एक वर्ष पूर्ण होण्याआधीच देव त्यांच्यावर प्रसन्न झाले. व खूष होऊन त्यांना वर मागायला सांगितले. सुशाल म्हणाला, ''माझी प्रजा सदैव सुखी असू दे.'' देव प्रसन्न होऊन म्हणाले, ''बाळ, तुझी मेधाशक्ती अद्‌भुत असेल. तिच्या बळावर तू कुठल्याही अवघड समस्यांना तोंड देऊ शकशील. तुझ्या राज्यांत कोणत्याही रोगांवर मात करणारी शक्ती असलेले वैद्य असतील. तू राजा झाल्याबरच या वरांचे फळ तुला मिळेल.'' असे म्हणून देव अदृश्य झाले.

नंतर देव कुशाल समोर प्रगट झाले. तेव्हां कुशाल म्हणाला, ''प्रजा माझे सांगणे म्हणजे दगडावरची रेघ समजतील. जे कोणी मला विरोध करतील, त्यांचा सर्वनाश करण्याची शक्ती मला द्या. माझ्यावर विश्वास ठेवतील ते सदैव आनंदात व सुखांत असतील.''

''तथास्तु! जेव्हां तू राजा होशील तेव्हांच या वरांचा तुला उपयोग होईल. आणि या वरांची सीमा तुझ्या राज्यापर्यंतच असेल.'' असे म्हणून देव अदृश्य झाले.

कुशाल व सुशाल दोघेही राजधानींत परतले. ते राजा विक्रमसिंहाला भेटले. त्या दोघांनी प्राप्त करून घेतलेल्या दैवी शक्तींविषयी राजाला सांगितले. सर्व ऐकून घेतल्यानंतर राजा म्हणाला, ''कुठल्याही राजाचे हे पहिले कर्तव्य आहे की त्याने आपली प्रजा म्हणजे संतान आहे असे मानले, पाहिजे. त्यानंतर शत्रूचा नाश करण्याचं बळ त्याच्यांत असलं पाहिजे. पण तुम्हां दोघांमध्येही अर्धे अर्धेच लक्षण आहे. त्यामुळे





तुमच्यापैकी एकाला मी राजा व एकाला सेनाधिपती करू शकेन. पण तुमच्या वरप्राप्तीप्रमाणे या शक्तींचा उपयोग तुम्ही राजा झाला तरच करू शकता. दोघांच्याही शक्तींचा उपयोग एकाच वेळीं करणे शक्यच नाही. तुम्ही एक काम करा. तुम्ही लोकांमध्ये मिसळून राहा, त्यांची सेवा करा, त्यांचा आदर करा, नि त्यांचे प्रेम मिळवा."

राजाने सांगितल्याप्रमाणे सुशाल व कुशाल जनतेची सेवा करू लागले. लोकांच्या सुखदुःखांत सहभागी होऊ लागले. विक्रमसिंहाने राज्य-कारभाराची जबाबदारी मंत्र्यावर टाकली व तो जवळच्या जंगलात निघून गेला. तीन महिने त्याने कठोर तपश्चर्या केली आणि देव त्याच्यावर प्रसन्न झाले. राजाचे दुःख त्यांना माहित होते. ते म्हणाले, "राजा, सुशाल चांगला माणूस पण कुशाल वाईट आहे. आपल्या बुद्धीप्रमाणेच त्यांनी वर मागितले. त्यांच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊनच मी त्यांना वर दिले."

विक्रमसिंह त्यावर म्हणाला, "देवाधिदेवा, चांगल्या माणसाची इच्छा पूर्ण करण्यासाठी तू त्याला वर दिलास हे ठीक आहे, पण वाईट कुशाललाही वरदान कां दिलंस?"

"माझ्यावर त्यांनी ठेवलेली श्रद्धा, निष्ठा ही मला मुख्य आहे. त्यांच्या चांगुलपणा वाईट-पणाशी माझा संबंध नाही. त्या दोघांतल्या कोणाला राजा करायचे ते प्रजेवर सोडून दे. याचा निर्णय प्रजाच घेऊं दे. प्रजेतसुद्धा चांगली व वाईट अशी दोन्ही प्रकारची माणसें असतात. तुझ्या विशाल राज्याचे दोन विभाग कर. सुशालला निवडणारी प्रजा सुशालच्या राज्यात राहील व कुशालला राजा करणारे लोक कुशालच्या राज्यांत राहतील. आता तुझा प्रश्न मिटला ना? आता प्रश्न आहे जनतेचा! तेच आपला राजा निवडणार आहेत. त्यांच्या निर्णयाचें फळ त्यांना मिळेल, तू काळजी करू नकोस."

विक्रमसिंह आपल्या राजधानीत परत आला. त्याला वाटले, वाईट माणसाला कोण आपला राजा करेल? पण देवाने सांगितल्याप्रमाणे त्याने सुशाल व कुशाल दोघांनाही राजा म्हणून घोषित केले. अधिक लोकांनी सुशालला आपला राजा मानण्याचा निर्णय घेतला तर कांही लोकांनी कुशालला आपला राजा मानले. जनसंख्येनुसार राज्याचा मोठा हिस्सा सुशालला व लहान हिस्सा कुशालला मिळाला.

वेताळाने आपली कथा ऐकवून राजाला विचारले, "राजा, विक्रमसिंहाने जो निर्णय घेतला, त्याविषयी माझ्या मनांत दोन शंका आहेत. विक्रमसिंह जनतेला आपली संतान मानत होता. प्रजा-सुख हेच मुख्य समजून तपश्चर्या करून ज्या सुशालने वरदान मिळवले, त्यालाच खरे तर राज्य करायला द्यायला हवे होते. पण राजाने तसे केले नाही. हे वागणं जरा विचित्र वाटत नाही? आता दुसरे म्हणजे देवाने दिलेले वरदान. वरदान मिळवण्यासाठी निष्ठापूर्ण, श्रद्धापूर्ण तपश्चर्या हवी. मानवी गुणांचा त्याच्याशी संबंध नाही असे देव मानतात. हे असे मानणे योग्य आहे कां? माझ्या शंकांचे उत्तर माहित असूनही जर तू गप्प बसलास तर तुझ्या डोक्याची शकले शकले होतील."

राजा विक्रमार्क म्हणाला, "कुठल्याही देशात सुख-शांती हवी असल्यास तिथे एक असा राजा हवा की जो आपल्या प्रजेची काळजी घेईल, प्रजेची सेवा करेल आणि त्याचबरोबर शत्रूंवर ताबा ठेवेल, वेळ पडल्यास शत्रूंचा नाश करेल. हे दोन्ही गुण राजामध्ये असले पाहिजेत. सुशाल आणि कुशाल या दोघांतही ते अर्धे अर्धेच होते. सुशालला राजा म्हणून घोषित केले तर कुशाल रागाने उग्र रूप धारण करेल, रागाच्या भरात सुशालवर आघात करेल. म्हणूनच राजाने देवाच्या सल्ल्या-प्रमाणें वागायचे ठरवले. वरदानाविषयी सांगायचे तर देवाने जे म्हटले ते अगदी बरोबर आहे. निष्ठा व श्रद्धा ठेवून दुष्ट तपस्या करतात खरे, पण त्याचे फळ त्यांचा नाश करते. कुठल्याही परिस्थितीत त्यांचे भले होत नाही. स्वभावाने दुष्ट असलेले दुष्ट वरदानच मागतात व ते वरदानच त्यांचा सर्वनाश करते. पुराणांत सुद्धां अशा किती तरी कथा आहेत. परंतु दुष्ट लोकांपासून जनतेचे रक्षण करणे, त्यांच्यापासून जनतेला दूर ठेवण्याची जबाबदारी शासकांची आहे. म्हणून विक्रम-सिंहाला देवाने सल्ला दिला की शासकांची निवड करण्याचा निर्णय जनतेवरच सोडून दे. अधिक संख्येने चांगले असलेल्या लोकांनी सुशालला राजा म्हणून निवडले, तर अल्प संख्येने जे वाईट होते त्यांनी कुशालला निवडले. मनुष्य आपल्या स्वभावा-प्रमाणेच चांगल्यावाईटाची निवड करतो, त्याच्या निर्णयानुसारच त्याला सुख-दुःख, शांती-अशांती, समाधान असमाधान, आनंद इ. प्राप्त होते. देवाचे वरदान चुकीचे नाही. ते नेहमी न्यायाला धरून असते."

राजाने आपले मौनव्रत भंग केल्यामुळे वेताळ नेहमीसारखी शवासहित अदृश्य झाला व परत झाडावर जाऊन बसला.

**(सुचित्राच्या रचनेवर आधारीत)**



भारतीय दंतकथा - ७

# जेव्हां देव म्हातारे झाले होते



दुर्वास ऋषी हे शीघ्रकोपी म्हणून प्रसिद्ध होते. जर ते कुणावर रागावले किंवा कांही घटनेमुळे त्रासले, तर ते शाप देत असत. आणि त्यांची शक्ती एवढी प्रखर होती की त्या शापांतून दुसऱ्या कुठल्याही शक्ती द्वारे मुक्तता मिळत नसे. स्वतः ऋषी सुद्धा त्याबाबतीत कांही करुं शकत नसत. परंतु ते उःशाप देऊन त्याची तीव्रता कमी करुं शकत. परंतु महत्वाची गोष्ट अशी की त्यांचे शाप शेवटी वरदानच ठरले.

आपण इतके देवदेवादिक पाहातो तरी हे सर्व देव एकाच वर्गात मोडत नाहीत. विष्णू, शिव, ब्रह्मा, हे महान देव आहेत. विष्णूंनी राम, कृष्णासारखे कितीतरी अवतार घेतले. परंतु देवांचा असाही एक वर्ग होता जे आनंदी, दयाळु आणि शक्तीशाली होते. विष्णू आणि त्याच्या अवतारांसारखा त्यांचा मानवजातीशी फारसा संबंध नसे. तरीदेखील त्यांनी मानवाला वेळोवेळी जरुर तेव्हां मदत केली होती. वर्षानुवर्षे ते राक्षसांशी युद्ध करीत आले. ते देवांचे आणि मानवाचे शत्रू होते. इंद्र या देवांचा राजा होता. ते देव कधीही मरत नसत. त्यांना अमरत्वाचे वरदान होते.

एकदा दुर्वासऋषी या देवांच्या प्रांतात आले. एका अप्सरेने त्यांचे आदरातिथ्य करुन त्यांना फुलांचा हार अर्पण केला. हा हार अतिशय सुगंधित आणि सुंदर होता.

दुर्वासांना तो पुष्पहार आवडला, पण



ऋषींनी कोणत्याच गोष्टीचा मोह करणं योग्य नाही हे जाणून देवांचा राजा इंद्र याच्या दरबारी पोचेपर्यन्त त्यांनी तो हार इंद्राला देण्याचे ठरवून टाकले होते. आणि तसा त्यांनी तो इंद्राला दिल्यावर इंद्राला फार आनंद झाला.

थोड्यावेळाने दुर्वास पुन्हां पृथ्वीवर परत जायला निघाले तेव्हां इंद्र त्यांना आपल्या महालाच्या द्वारापर्यन्त पोंचवायला आला. ऋषी गेल्यानंतर इंद्र जवळच उभ्या असलेल्या, आपले वाहन असलेल्या स्वर्गीय हत्ती ऐरावताकडे गेला. त्याला पाहून इंद्राला वाटले की याच्या गळ्यांत जर आपण हा पुष्पहार घातला, तर हा सुंदर व रुबाबदार दिसेल. म्हणून त्याने तो सुंदर पुष्पहार ऐरावताच्या गळ्यांत घातला. ऐरावत पण खूष दिसूं लागला. इंद्राने आपल्या सुंदर दिसणाऱ्या वाहनाचे कौतुक केले आणि तो आपल्या दरबारांत परत गेला.

थोड्याच वेळांत फुलांच्या सुगंधाने आकर्षित झालेल्या मधमाशांचा थवा हारावर येऊन बसला. यामुळे अस्वस्थ झालेल्या ऐरावताने मधमाशांपासून सुटका करुन घेण्यासाठी तो हार तोडून टाकून दिला.

दुर्दैवाने दुर्वासांना ही गोष्ट सांगितली गेली. दुर्वासांना असं वाटलं की त्यांनी दिलेल्या भेटवस्तूची कदर न करता इंद्राने तो हार हत्तीला घातला आणि त्याने तो खेळांत तोडून टाकला. ऋषींना अपमान झाल्यासारखे वाटले.

"हे देवांनो, तुम्हाला तुमच्या चिरतारुण्याचा गर्व आहे ना? बरं तर, ते तुमच्या आयुष्यातून निघून जावो. तुम्ही मर्त्यांसारखे म्हातारे व्हाल!"











त्यांच्या राजाच्या उद्धट वागणुकीबद्दल दुर्वासांनी सर्व देवांना शाप दिला.

"महर्षी, हे आपण काय केलेत!" जवळ असलेले सर्व ऋषी त्यांना म्हणाले. संतापी दुर्वासांच्या देखील लक्षांत आले की त्यांच्या शापाप्रमाणे जर देव म्हातारे, व निर्बल होऊं लागले, तर राक्षस या संधीचा फायदा घेऊन पृथ्वीचा ताबा घेतील. आणि त्यांच्या राज्यांत मानवाची सर्व प्रगती थांबेल. राक्षस दुष्ट आणि उद्धट आहेत. ते मनुष्याला ज्ञान आणि सत्य यांच्या शोधास कधीही स्वातंत्र्य देणार नाहीत.

"देवांनी क्षीरसागराच्या मंथनातून अवतरणारे अमृत प्राशन केले तर त्यांचे चिरतारुण्य ते परत मिळवूं शकतील." दुर्वास चिंतित झालेल्या ऋषींना म्हणाले.

शापामुळे दुःखांत असलेल्या देवांना आशेचा किरण दिसला. परंतु क्षीरसागराचे मंथन? ते कसे शक्य होणार? त्यासाठी राक्षसांची मदत हवी होती. राक्षसांनी अमृताचा कांही हिस्सा आपल्याला मिळेल या आशेने मंथनात मदत करण्याची तयारी दाखविली. ही आणखी एक वेगळीच गोष्ट आहे.

ऐरावताला त्याने पुष्पहार तोडल्यामुळे देवांना शाप भोगावा लागणार या गोष्टीचे फार दुःख आणि लाज वाटली. देवांना कसं तोंड दाखवायचे म्हणून तो क्षीरसागरांत तळाशी जाऊन लपला.

परंतु क्षीरसागराचे जसजसे मंथन होऊं लागले तसा इतर गोष्टींच्या बरोबर तोही बाहेर आला. परंतु आता त्याचा रंग संपूर्ण पांढराशुभ्र झाला होता. क्षीरसागराच्या तळाशी राहिल्यामुळे त्याच्यांत हा बदल झाला होता. तेव्हांपासून तो इंद्राचे वाहन म्हणून समजला जाऊं लागला.

यावेळीं झालेल्या समुद्रमंथनातून अमृत बाहेर पडले व त्यांतला कांही भाग देवांना मिळाला. अमृतप्राशन केल्यानंतर देवांना आपले चिरतारुण्य परत मिळाले. आणि हा अपरसमजामुळें झालेला गोंधळ सांवरला गेला.

- बिंदुसार



# जग ही एक रंगभूमी आहे





पी. पवनकुमार, बेल्लारी



अर्चना जगताप, सांगली

राजसभेंत सारे पुरुष निमूट बसले होते. मरुदनाडचा राजा महेंद्रवर्मन, त्याचा मुलगा विजयादित्य आणि मंत्री मतीवानन हे तिथें होते. कारण महेंद्रवर्मन राजाला वाटत होतं कीं युवराज विजयादित्याने आता राज्यकारभाराची जबाबदारी स्वीकारावी. पण राजपुत्राने आपल्या वडिलांची विनंती अव्हेरली होती.

"पण तुला राजा होण्याची इच्छा कां नाही?" महेंद्रवर्मनने विचारलं.

राजपुत्राने निर्भयपणें म्हटलं, "पिताश्री, मला राज्यकारभार चालवण्याच्या कुटिल राजकारणांत अडकण्याची काडीमात्र इच्छा नाही. मला एक मोठा नटवर्य होण्यांत स्वारस्य आहे."

राजा गप्प होता, "तुम्हाला तुमचे कर्तव्य टाळता येणार नाही. ह्या भूमीवर राज्य करणें हा क्षत्रियांचा धर्म आहे. नाट्यकलेची आवड तुम्हाला कशी काय आली आहे, ते कळत नाही." मंत्री म्हणाला.

"अहो, नाट्यकला म्हणजे कल्पनेच्या जगांत विहार असतो. रंगमंचावरुन लोकांना आनंद द्यावा ही माझी महत्वाकांक्षा आहे. "कलैमगल आर्ट गॅलरी" तर्फे जी नाट्यकलेची कार्यशाळा होणार आहे त्यांत मी सहभागी होणार आहे. राज्य चालवण्याचा भार तुम्ही माझा धाकटा भाऊ जयंता त्याच्यावर कां सोंपवत नाही?" विजयादित्याने विचारले.

त्यावर राजा महेंद्रवर्मन संतापून म्हणाला, "अरे! हे राज्य चालवण्यासाठी तुला योग्य ते



शिक्षण दिलेले आहे. नाटकांत काम करायला आणि असा वेळ फुकट घालवायला तुला लाज वाटत नाही कां?" राजाचा राग

# भारताची ओळख - प्रश्नावली

नव्हेंबर महिन्यांत दोन महत्वाचे जन्मदिन येतात - १४ तारखेला भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरु यांचा, आणि १९ तारखेला भारताची पहिली महिला पंतप्रधान इंदिरा गांधी यांचा जन्म दिन! या महिन्याची प्रश्नावली या दोघांचे व्यक्तिमत्व, त्यांची कारकीर्द व त्यांची कर्तृत्वगाथा यावर आधारलेली आहे.

१. पंडित नेहरुंनी बालगोपाळांसाठी लिहीलेल्या पुस्तकाचे नांव काय?

२. "अनेक वर्षांपूर्वी आम्ही नियतिशी एक करार केलेला होता आणि त्यांतून आपण वचनमुक्त होण्याची वेळ आता आलेली आहे" हे वाक्य पंडितजींच्या भाषणांतले आहे. हे भाषण केव्हां आणि कुठे केले होते? तो प्रसंग कोणता?

३. पंडित नेहरुंना दोघी बहिणी होत्या. त्यापैकीं एकजण मंत्री होणारी भारतांतील पहिली महिला होती. ही भगिनी कोण आणि ती कोणच्या राज्यांत मंत्री झाली होती?

४. भारत स्वतंत्र झाला त्यावेळीस पंडित नेहरु हे इंडियन नॅशनल कॉंग्रेसचे अध्यक्ष होते. बरोबर कीं चूक?

५. बाळवयांत, इंदिरा गांधी या लहान मुलांच्या एका समूहाचे नेतृत्व करीत असत. हा समूह वडील मंडळींच्या स्वातंत्र्य लढ्यांत मदत करीत असे. या समूहाचे नांव काय? ही मुलें, कोणते काम करीत असत?

६. १९७१मधें इंदिरा गांधींची लोकप्रियता कळसाला पोंचली होती. ती कशामुळे?

(उत्तरें पुढील महिन्यांत)

## ऑक्टोबर प्रश्नावलीची उत्तरें

१. म्हैसूर, इथें दहादिवसांच्या उत्सवांत शेवटी भव्य मिरवणूक असे व त्यांत अलंकृत हतीवर महाराजांची स्वारी सामील होत असे.

२. जगन्नाथ पुरी-ओरिसा इथली रथयात्रा. त्यावेळीं श्रीजगन्नाथ, बलभद्र आणि सुभद्रेच्या मूर्तींना सजवलेल्या रथांतून फिरवले जाते. भक्तगणाना हा रथ ओढण्याची तीव्र इच्छा असते.

३. जानेवारीमधें येणारी मकरसंक्रांत. यावेळीं गुजरातमधें पतंग उडवतात आणि तमिळनाडमधें तांदूळ (पोंगल) शिजवतात.

४. ईद-उल-झुआ

५. खोरदाद साल

६. मदुराईमधल्या चित्रै उत्सवांत गांवातली प्रमुख देवता मीनाक्षी हिचा सुंदरेश्वराशी विवाह साजरा होतो.

७. मैलापूर (चेन्नई)चे कपालीश्वर मंदिर. कपालीश्वर हे शंकराचे एक नांव आहे.

८. शिमगो





# गणेश पुराण

एकदा लक्ष्मी मानससरोवरात स्नान करत असतांना, पार्वतीने विष्णूचे रूप धारण केले व ती लक्ष्मीजवळ आली. अत्यंत मनोहर दिसणाऱ्या सुंदर विष्णुला पाहून तिचे देहभान हरपले. आणि विष्णुरूपी पार्वतीसुद्धां लक्ष्मीचे अतिसुंदर रूप पाहून मुग्ध झाली. दोघांनी एकमेकींना अतिप्रेमाने पाहिले. त्यांच्या दोघांच्या त्या मीलन दृष्टीतून त्या सरोवरांत एक सुवर्ण कमल उगवले. त्यांतून एक आश्चर्यचकित करुन टाकणारी एक बालिका उत्पन्न झाली. लक्ष्मीने नारायणाच्या जवळ जाऊन त्याला प्रेमाने मिठी मारली. तेव्हां पार्वतीला खूप हसू आले. ती म्हणाली - "मी नारायण नाही. मी पार्वती आहे." असे म्हणून तिने आपले प्रत्यक्ष रूप धारण केले.

लक्ष्मी खेदाने म्हणाली - "तू सुद्धां आपल्या भावाला शोभणारीच झालीस."

पार्वती म्हणाली - "एकदा विष्णूंनी मोहिनीचे रूप धारण करून शंकराला माया-जालात फसवले होते. त्याची परतफेड मी अशी केली. समजले?"

त्यानंतर त्या सुवर्ण कमलातून आलेल्या बालिकेकडे पाहून लक्ष्मी व पार्वती अत्यानंदित झाल्या. अत्यंत वात्सल्यप्रेमानी दोघींनी त्या बालिकेला हातात उचलून घेतले. तेव्हां गणपतीने प्रवेश केला व म्हणाला, "मातांनो, आपणा दोघांच्या अंशांनी प्रकट झालेल्या हिचे पार्वतीच्या कडून 'जया' व लक्ष्मीच्या कडून 'श्री'नी नामकरण करुन तिचे नाव 'जयश्री' असे प्रसिद्ध व्हावे. तिचा वरसुद्धां असाच शिव

११. गणपतीची लीला



व केशव यांच्या अंशाचाच जन्माला आला आहे. तेव्हां त्यांनी कमळातल्या बालिकेला कावेरी नदीत सोडून यायला वायुदेवाला सांगितले. तेव्हां वायुदेवांनी जयश्रीला कावेरी नदीत सोडून दिले.

दक्षिणेत राज्य करणाऱ्या एका राजाने त्या मुलीला आपल्या राजवाड्यांत आणले व तिचा नामकरण उत्सव केला. तेव्हां आकाशवाणी झाली - "तिचे नांव जयश्री ठेवण्यांत यावे." तसे सर्वांनी ऐकले. जयश्री राजकुमारी बनून राजवाड्यात मोठी होऊं लागली व तिन्ही लोकांत अत्यंत रूपवती व साहसी म्हणून ओळखली जाऊं लागली.

जयश्रीला महालात वेळ घालवण्यापेक्षां जंगलातले सृष्टीसौंदर्य पहायला आवडत असे व हिंडायफिरायला आवडत असे.

शिव आणि केशव ह्यांच्या अंशानी झालेला एक किशोर एक दिवस गणपती व कार्तिकस्वामीना भेटायला कैलास पर्वतावर गेला. तेव्हां दोघेजण प्रेमाने गप्पा मारीत असतांना दिसले. मानस सरोवरांत लक्ष्मी व पार्वती याच्यांतून निर्माण झालेली व किशोर याला अनुरूप होणारीच पत्नी निर्माण झाली आहे, राजाने असे म्हणून ते दोघे गप्प राहिले.

तेव्हां त्या तरुणाला खूप आश्चर्य वाटले. त्यांनी थोडे दिवस तेथेच वास्तव्य केले. परंतु जेव्हां तो तेथून परत निघाला. तेव्हां गणपतीने सांगितले - "हे तरुण किशोरा, आमच्या दोघांपेक्षा तू वयाने मोठा आहेस. तेव्हां आपण असे ब्रह्मचारी राहणे चांगले वाटत नाही. तेव्हां लवकरच आपण विवाह करावा."

त्यानंतर गणपती व कार्तिकस्वामींनी त्यांचा आदरपूर्वक आभार मानून निरोप दिला.

एकदा स्वामी सिंहावर आरूढ होऊन मजेने जंगलात हिंडत फिरत होते. तोच त्यांना थांबवण्याकरीता म्हणून कोणी तरी बाण सोडले व त्यांच्या जवळच ते जमिनीत घुसले. स्वामींनी बाण जेथून आले त्या दिशेकडे पाहिले. परंतु दुसऱ्याक्षणींच त्यांचा राग नाहीसा झाला. धनुष्यबाण हातांत धरून मोठ्या दिमाखाने उभी असलेली हंसरी जयश्री त्यांना दिसली. तिची दृष्टी त्यांच्या दृष्टीत विलीन झाली व स्वामी अदृश्य झाले.

गणपतीने जयश्रीला स्वप्नांत येऊन सांगितले होते तेव्हांपासून ती त्याच्याच शोधांत जंगलात फिरत होती. नारदाच्या आदेशानुसार राजाने जयश्रीचे स्वयंवर मांडले. राजाच्या रूपाने इन्द्र व देवदेवता वेगळेवेगळे वेष करून विवाह स्थळी आले होते. परंतु स्वामीने एका सामान्य भिल्लाच्या रूपात एक काळे कुत्रे घेऊन प्रवेश केला.

राजांनी भिल्ल कुमार व त्याच्या कुत्र्याची चेष्टा केली व आपल्या बरोबर बसण्यास त्याला जागा दिली नाही. तेव्हां स्वामींनी सिंहाचा जबडा पकडण्यासारखे कुत्र्याचे तोंड धरले व ते पाठीवर चढून बसले. दुसऱ्या क्षणीच त्या कुत्र्याचे सिंहात रूपांतर झाले. तेव्हां जयश्रीने स्वामींना ओळखले व तिने वरमाला त्याच्या गळ्यांत घातली. स्वामींनी जयश्रीला सिंहावर बसवले. तेव्हां इतर सर्व राजे देवता नाराज होऊन स्वामींच्यावर तुटून पडले. परंतु त्यांना सर्वांना त्यांनी थोपवून धरले.

स्वामीच्या बाणांच्या प्रहारांनी सर्वजण घाबरून इकडे तिकडे सैरावैरा पळू लागले. त्यांनी दिव्यास्त्राचा प्रहार करण्यास सुरवात केली. त्याच्यापुढे कोणाचा टिकाव लागणे शक्य झाले नाही. इन्द्राचे वज्रायुध कुचकामी निघाले. तेव्हां त्यांनी आपले रूप धारण केले. पण सर्व देवदेवता हात जोडून त्यांना शरण आल्या. सर्वांनी क्षमा मागितली.

अश्या तऱ्हेने स्वामी व जयश्रीचा लग्न समारंभ सर्व देवदेवतांच्या समवेत वैभवांत, थाटांत झाला व स्वामी जयश्रीसह आपल्या निवासस्थानी परत जाण्यास निघाले.

त्रेतायुगात आर्यावर्तामध्ये कोसल, केकय व वसुमित्र नावाचे राजे आपसांत खूप प्रेमाने



रहात होते. त्यांना प्रत्येकांना कोसलला कौसल्या, केकयला कैकयी व वसुमित्रला सुमित्रा नांवांच्या कन्या होत्या. तिन्ही राजांच्या मनांत एकाच वेळी एकच विचार निर्माण झाला कीं, अयोध्येचा राजा दशरथ ह्याच्याबरोबर आपल्या मुलींचा विवाह करून द्यावा. दशरथाने त्यांच्या विचारांना संमती दिली.

तिन्ही राजांनी जैमिनी मुनिंच्या करवी मुलींच्या लग्नाचा मुहूर्त काढला. जैमिनी मुनींनी सांगितले - "मी जो लग्नाचा मुहूर्त निश्चित केला आहे, तो असा गणपतीला साक्षी बनवून ह्या मुलींचा विवाह दशरथ राजाबरोबर लावून द्यावा. परंतु लग्नाच्या आधी ह्या मुलींना राक्षसांपासून भय आहे. तिघींना काळजीपूर्वक सांभाळले पाहिजे."

तेव्हां राजांनी त्या तिघी मुलींना एका जड



पेटीत सुरक्षित समजून ठेवले.

तिकडे नारदमुनींनी रावणासुराकडे जाऊन सांगितले - "अरे लंकेश्वरा, तिकडे दशरथ राजाचा विवाह होणार आहे, आणि दशरथाचा होणारा मुलगा तुझा नाश करेल."

त्यावर रावणाने तिन्ही राजकुमारींना पळवून आणण्यासाठी महोदर नांवाच्या एका बलवान राक्षसाला पाठवले. महोदरनी त्या तिन्ही मुली एका जड पेटीत सुरक्षित ठेवल्या असल्याचा पत्ता काढला व त्याने ती पेटीच उचलली. तो जेव्हां आकाशमार्गानी जात होता तेव्हां समुद्रावरून लंकेकडे जात असता अचानक त्याच्या पोटांत असह्य कळा येऊ लागल्या. त्या वेदनेने त्याच्या हातून ती पेटी समुद्रांत पडली व समुद्राच्या लाटांवरून पेटी वेडीवांकडी होऊन वाहूं लागली.

त्याच वेळी दशरथ राजा एका मोठ्या नावेत बसून नगरात परत चालले होते. त्यांना प्रवासात विलंब होणार म्हणून ते त्या गोष्टींचा विचार करीत बसले. मुहूर्त ठरवलेल्या वेळांत ते नगरांत पोहोचू शकणार नाहीत. असा विचार करीत त्यांनी समुद्रांत दूरवर पाहिले. तेव्हां नावेच्या जवळूनच एक वजनदार पेटी वहात येत असल्याचे दिसले. तेवढ्यांत त्या पेटीचा धक्का बोटीला लागला व त्या पेटीचे झांकण उघडले गेले व पेटीतील तीन राजकुमारी त्यांच्या दृष्टीस पडल्या. त्यांनी दोरींची शिडी करून त्यांना बोटीत चढवून घेतले. तेव्हां दशरथाला कळले की; तो ज्या तीन मुलींशी लग्न करणार आहे त्याच ह्या मुली आहेत आणि जैमिनी मुनींनी सुद्धां लग्नाचा तोच मुहूर्त नक्की केला होता. तेव्हां गणपतीने प्रत्यक्ष दर्शन देऊन त्या मुलींचा विवाह दशरथ राजाबरोबर लावून दिला व गणपती अदृष्य झाला. दशरथ राजा आपल्या तिन्ही राण्यांसह आपल्या नगरांत परत निघाला.

ह्या घटनेनंतर बऱ्याच दिवसांनी दशरथाला चार मुलगे झाले. त्याचा मोठा मुलगा श्रीरामचंद्र कैकयीच्या हट्टामुळे सीता व लक्ष्मणासहित चौदा वर्षे वनवासास गेला. रावणाने सीतेला पळवून लंकेत नेऊन ठेवले व रामानी हनुमान, सुग्रीव व इतर वानरसेनेसह लंकेवर चाल करून रावणाचा नाश केला व सीतेला पुष्पक विमानात बसवून परत आणले. जिथें सेतू बांधला त्या समुद्रकिनाऱ्यावर रामचंद्रांनी शंकराची पूजा करून अयोध्येला परतण्याचा विचार केला.

शिवलिंगाची प्रतिष्ठापना करण्याकरिता



रामचंद्रानी हनुमानाला कैलासला पाठवले हनुमान वायुवेगाने कैलासाला पोहोचले. तेथील सर्वांत मोठ्या लिंगाला पाहून त्यांनी ते उचलण्याकरिता हात लावला. परंतु कितीही प्रयत्न केला तरी लिंग कांही जागचे हलले नाही. तेव्हां त्यांनी लहान लिंग उचलण्याचा प्रयत्न केला. परंतु छोटे लिंग सुद्धा हलूं शकले नाही.

तिकडे वेळ निघून चालली होती. हनुमान आपल्या असमर्थतेवर दुःखी होवू लागला. तेव्हां एक लहान मुलगा तेथे आला. त्याने विचारले, - "हे महाशया, तू कोण आहेस? दिसायला तर हनुमानासारखाच दिसतो आहेस, पण तू हनुमान नाहीस!"

"मी हनुमानच आहे. रामचंद्रानी मला एक शिवलिंग आणण्याकरिता इकडे पाठवले आहे. परंतु तू कोण आहेस?"

कोणीही लिंग उचलून घेऊन जाऊ नयेत म्हणून मला त्या लिंगाच्या देखरेखीकरता इथे बसवले आहे. परंतु मी असे ऐकले आहे की हनुमान शंकराचाच अवतार आहे आणि तोच पंचमुखी आंजनेय आहे. पण तुमची पांच तोंडे कुठे आहेत?"

तेव्हां हनुमानाने गरुड, वराह, सिंह आणि अश्व यांची तोंडे जोडून पंचमुखी आंजनेयाचे रूप धारण केले आणि आकाशापर्यंत जाऊन पोहोचेल अशा आवाजात हंसून तो त्या मुलाला म्हणाला - "गजानना, आता माझी वेळ संपली. आता पंचतोंडी रूप तुम्हाला धारण करावे लागेल." तेव्हां गजाननानी आपले विश्वरूप दर्शन दिले. त्या पंचमुखी गजाननाला नमस्कार करून हनुमान म्हणाला, - "महानुभाव, जेव्हां तुम्ही लहान बालकाचे



रूप घेऊन माझ्याकडे निघालात तेव्हांच मी आपल्याला ओळखले होते. शिवलिंगाला आपण हलूं दिले नाहीत. तेव्हां कृपा करून मला एक शिवलिंग अर्पण करा.

त्यावर गणपती म्हणाला - ''हनुमाना, तुझ्या पंचमुखी दर्शनाकरताच मी हे सर्व नाटक रचले होते. तू शिवाच्या अंशानेच निर्माण झाला आहेस. तेव्हां तुला अडवणारा मी कोण? परंतु तू माझ्याजवळ मागितले आहेस म्हणून मी तुला देतो. तुझ्याकरिता अतिविशेष असे लिंग मी अगोदरच निवडून ठेवले आहे. ते तू घेऊन जा.'' असे म्हणताच त्यांनी हनुमा- नाच्या ओंजळीत एक ज्योतिर्लिंग ठेवून दिले.

हनुमान लिंगाला सांभाळून धरत उडत निघाला. तोपर्यंत वेळ निघून गेली होती. तिकडे वेळेच्या आधीच सीतादेवीने एक वाळूचे शिवलिंग तयार केले व पाण्याचा अभिषेक करून रामचंद्र त्याची पूजा करावयास लागले. तेवढ्यांत हनुमानाने लिंगासह प्रवेश केला. ते पाहून हनुमानाने आपल्या शेपटीने गुंडाळून त्या लिंगाचा नाश करण्यास आरंभ केला. परंतु वाळूचे लिंग जसेच्या तसेच राहिले. तेव्हां रामचंद्रानी हनुमानाला शांत करून सांगितले - ''हनुमाना, बुद्धिमान लोकसुद्धां कधीतरी विसरून जातात. तू तर सर्व जाणणारा आहेस, तेव्हां वाळूचेच असले म्हणून काय झाले, शिवलिंगच हे ना जाणणारा? आणि ते तर शिवाचा अंशच आहे. शंकराबरोबर गंमत करायला, खेळायला, कोणाला आवडेल? तरी अजून कांही बिघडले नाही. तू जे लिंग घेऊन आला आहेस, त्याचे वाळूचे रूपांतर करून त्याची प्रतिष्ठापना करून पूजा करूं या. चालेल ना?''

हनुमानांनी जे आपल्याबरोबर लिंग आणले होते, ते रामचंद्राच्या हातांत देऊन स्वतःचे कान पकडले व वाळूच्या लिंगाला भक्तिपूर्वक हात जोडून नमस्कार केला.

रामचंद्रांनी हनुमानानी आणलेल्या लिंगाची रामचन्द्रांनी प्रतिष्ठापना केली व सीतेसह विधीपूर्वक त्यांची पूजा केली. ते नंतर सर्वजण पुष्पक विमानात बसून अयोध्या नगरीला निघाले.







# भवानीचा अनुग्रह

भवानीपुरमधें बुक्क नांवाचा एक चोर राहात होता. तो नेहमी चोऱ्या करीत नसे. शेतीच्या कामांच्या दिवसांत, लावणी-कापणीच्या काळांत, तो शेतावर मजुरी करीत असे. जिथें काम मिळेल, तिथें तो काम करीत होता. त्याचे लग्न झालेले होते आणि त्याला एक मुलगा होता. आपला पती चोरी करतो हे त्या पत्नीला ठाऊक होते. परंतु हे रहस्य त्याच्या मुलाला मात्र माहीत नव्हते.

चोरी करायला निघण्यापूर्वी गांवातल्या भवानीच्या मंदिरात बुक्क जाई व देवीची मनोभावे प्रार्थना करीत असे. ''माते, मला गरज आहे म्हणून आज मी चोरी करणार आहे. ज्या प्रकारें तू सर्वांच्याकडून मिळणारी भेटवस्तू स्वीकारतेस, त्याचप्रमाणें तू माझी भेटदेखील स्वीकार! माझ्या आजच्या कमाईतला चौथा हिस्सा मी तुला भेट म्हणून आजवर देत आलो आहे. एक माझा हिस्सा, एक माझ्या पत्नीचा, एक माझ्या मुलासाठीं, आणि चौथा हिस्सा, माते, तुझ्यासाठीं! मी तुला माझ्या कुटुंबातली एक सदस्य मानतो. मला प्रत्येक संकटातून तू वांचव. मी पकडला जाणार नाही आणि मी घरी सुखरूप परत येईन इतकंच तूं सांभाळ!''

बुक्कचे दिवस अशा रितीने चालले होते. आपल्या हातून हे पापाचरण होते आहे अशी भिती त्याला मात्र कधीही वाटली नाही.

एक दिवस बुक्क शहरांत चोरी करायला गेला. त्यावेळीं तिथें रंगमंचावर वाल्मिकी महर्षींच्या जीवनावरचे एक नाटक सुरुं होते. वाल्मिकीचे पूर्वीचे नांवही बुक्क होते, हे ऐकून या बुक्क चोराला उत्सुकता वाटली. त्याने संपूर्ण प्रयोग नीट लक्ष देऊन पाहिला. चोर बुक्काचा वाल्मिकी झाला आणि त्याने रामायणाची रचना केली याचे आपल्या बुक्कला फारच आश्चर्य वाटले. त्याच्या मनांत आलं कीं जर मी चोरी करणें सोडून दिले तर मीही असा मोठा विद्वान बनूं शकेन.

- सुप्रिया -



"माते भवानी, आजची माझी अखेरची चोरी असेल. त्यानंतर मात्र मी पंडितांजवळ विद्याभ्यास करीन आणि एक ग्रंथ लिहीन. तेव्हां यावेळीं मला जास्तीत जास्त माल मिळेल, एवढाच माझ्यावर अनुग्रह कर." मनांतल्या मनांत त्याने देवीची प्रार्थना केली. पण यावेळेला मात्र तो चोरी करताना पकडला गेला. शिपायांनी त्याला शिक्षा देणाऱ्या अधिकाऱ्यांकडे नेले. त्या अधिकाऱ्यांनी त्याला तुरुंगात टाकले.

बरेच दिवस बुक्क घरी परत आला नाही, तेव्हां त्याची बायको घाबरली. आपल्या नवऱ्याला पकडले तर नसेल ना अशी तिला भिती वाटायला लागली. एके दिवशी सूर्यास्ताच्यावेळीं आपला मुलगा नारायण याला बरोबर घेऊन ती भवानीदेवीच्या मंदिरात गेली. तिने देवीला सांगितलं, "माते, माझा पती चोर आहे हे मला माहीत आहे, परंतु तो तुझा भक्त आहे. श्रीमंत होण्यासाठी किंवा घर बांधण्यासाठी तो चोऱ्या करत नाही. आमची गरिबी आहे म्हणून त्याला चोरी करणें भाग पडते. माझ्या पतीला सुखरूप घरीं परत येऊं दे." असं विनवून ती रडायला लागली.

आईचे हे बोलणें ऐकून नारायण चकित झाला. आपला बाप एक चोर आहे हे समजल्यानंतर त्याला फार वाईट वाटलें. त्याला हा धक्का सहन झाला नाही. तो आईच्याबरोबर घरी परत गेला नाही. मंदिराच्या मंडपातच तो बसून राहिला.

नारायणच्या मनांत विचार येत होता कीं भवानीदेवी आपल्या भक्तांचे रक्षण करते, तेव्हां त्याच्या पित्यालाही ती क्षमा करील व त्याला वांचवील. विचार करताकरता त्याला झोंप लागली. झोंपेंत त्याला एक स्वप्न पडले. स्वप्नांत देवी भवानी एका सुवासिनीच्या रुपांत त्याच्यासमोर आली आणि त्याला म्हणूं लागली, "नारायण, आपल्या भक्तांचे रक्षण करता येत नाही, म्हणून तू भवानी देवींला दोष देतो आहेस कां?"

तिचा प्रश्न ऐकून नारायण भेदरला, "नाही, नाही, माते, मी फक्त तिने कृपा करावी म्हणून प्रार्थना करायला आलो आहे."

त्यावर त्या सुवासिनीने गंभीर स्वरांत म्हटलं, "मी सुवासिनीच्या वेषांत आले, तरी तू मला ओळखलं आहेस. तुझ्या चिकाटीचें कौतुक केल्याशिवाय मला राहावत नाही. तुझ्या पित्याच्या मनांत वाल्मिकी होण्याची तीव्र इच्छा आहे, पण त्यांनी आपल्या मनांतल्या विकारांचा त्याग केलेला नाही. त्याच्या मनांत राग, द्वेष जसे आहेत तसे सांचलेले आहेत. कुटुंबाचा उदरनिर्वाह करण्यासाठी तो चोऱ्या करीत होता, तोपर्यंत मी त्याला माफ केलं होतं. पण वाल्मिकीसारखा मोठा माणूस



होण्याची इच्छा बाळगून जेव्हां त्याने चोरी केली तेव्हां तो पकडला गेला."

"माते, आता माझ्या आईचा सांभाळ करणें ही माझी जबाबदारी आहे. पोट भरण्यासाठीं वर्षभर मोलमजुरी करायची असली तरी काम मिळणार नाही. कांही बारीक सारीक व्यापार मी करूं शकेन, पण माझ्याजवळ भांडवल नाही." त्याला पुढें कांही बोलता येईना.

सुवासिनी दिसेनाशी झाली. नारायण जागा झाला आणि स्वतःशीच बोलूं लागला, "मी किती भाग्यवान आहे. भवानीमातेला मी प्रत्यक्ष जरी पाहिलं नाही, तरी स्वप्नांत कां होईना, तिने मला दर्शन दिलंय." असं म्हणून तो उठणार तितक्यांत त्याला जवळच एक छोटी थैली दिसली. त्या थैलींत चांदीचे रुपये होते. ते पाहून नारायण विचारांत पडला.

"मी तर हे रुपये कांही चोरलेले नाहीत. भवानीमातेने हे रुपये मला स्वतः दिलेले आहेत." ती थैली उचलून तो तिथून निघाला आणि राजधानीला पोंचला. बरीच खटपट केल्यानंतर त्याला राजाचे दर्शन मिळण्याची संधी लाभली. त्याने राजाला आपल्या पित्याबद्दल सर्व कांही सांगितले. त्याचबरोबर त्याला स्वप्नांत जे दिसले तेही त्याने सांगितले.

त्याची कहाणी ऐकून राजाला फार आश्चर्य वाटले, "अरे नारायण, तू इमानदार आहेस. म्हणूनच भवानीमातेने दिलेले धन घेऊन तू सरळ इथें आलास! दुसरा कुणी असता तर हे रुपये घेऊन पळाला असता. जरी तुझ्या पित्याला वाल्मिकी-सारखा मोठा होण्याची इच्छा असली, तरी त्यांत त्याची कांहीच चूक नाही. पण त्याच्यासाठी त्याने जो मार्ग स्वीकारला, तो चुकीचा होता. म्हणून भवानीमातेने एका तऱ्हेने त्याला शिक्षा दिली, आणि दुसऱ्या प्रकारें, त्याच्यावर आपला अनुग्रहही दाखवला."

त्यानंतर राजाने शिपायांना बोलावले आणि बुक्कला तुरुंगातून सोडवून आणण्यास सांगितले. पिता व पुत्र आनंदात राहातील याची राजाने आवश्यक ती व्यवस्था केली.

या प्रसंगातून राजानेही धडा शिकला. त्या दिवसापासून गुन्हेगारांचे परिवर्तन व्हावे म्हणून त्याने पुष्कळ प्रयत्न केले. नाईलाज असला तरच तो अपराध्यांना शिक्षा करायला लागला. परंतु त्याचबरोबर त्या अपराध्यांच्या कुटुंबियांच्या पालनपोषणाची व्यवस्था तो करुं लागला.





# कृतज्ञ-कृतघ्न

रत्नागिरीच्या जमिनदाराचा माळी साप चावल्याने अचानक मृत्यू पावला. त्याच्या बायकोचे सांत्वन करण्यासाठी जमिनदार माळ्याच्या घरी गेला. त्याच्या बायकोला जमिनदार म्हणाला, ''मला माहित आहे तुमच्यावर दुःखाचं आभाळ कोसळलंय. रोजच्या भाजी-भाकरीचा सुद्धां मोठा प्रश्न तुमच्यापुढे असेल. त्यासाठी तुम्हाला मदत करणं माझं कर्तव्य आहे. तुमच्या मोठ्या मुलाला मी माझ्याकडे नोकरीला ठेवीन, त्याच्या या कमाईमुळे तुम्हाला उदरनिर्वाहासाठी त्रास होणार नाही.''

त्यावर माळ्याची बायको म्हणाली, ''मालक, माझा मोठा मुलगा अगदी समजूतदार आहे, तसेच खूप परिश्रमी देखील आहे. अवघडात अवघड परिस्थितीलाही तो सामना देऊ शकतो व कुठेही नोकरी मिळवण्याची त्याची लायकी आहे. पण माझा दुसरा मुलगा मोठ्या मुलासारखा समजूतदारही नाही आणि परिश्रमीही नाही, म्हणून तुम्ही ही नोकरी कृपा करून धाकट्याला द्या.''

त्यावर जमिनदाराने मोठ्या मुलाचे मत व त्याची अनुमती विचारली. त्याने आईच्या सांगण्याचा सहर्ष स्वीकार केला. धाकट्याला जमिनदाराच्या इथे नोकरी मिळाली व त्याचे जीवन सुखांत जाऊ लागले.

मोठा मुलगा आता शेती सांभाळू लागला. वडिलांची दोन एकर जमीन होती पण ती नापीक होती. दिवस रात्र त्याच्यावर मेहनत करून त्याने ती सुपीक केली. त्यासाठी त्याने कर्ज घेतले व आंब्याची रोपे लावली. डोळ्यांत तेल घालून तो त्यांची निगराणी करू लागला आणि लवकरच त्याच्या कष्टांना फळ मिळाले.

चार वर्षांनंतर आंब्याच्या बागा फळफळून आल्या. हिरव्या गर्द झाडांवर भरभरून आंबे आले. ते विकून त्याला भरपूर उत्पन्न यायला लागले. दोन तीन वर्षांनी त्याने एक टुमदार बंगला बांधला, घर घेतले.

रत्नागिरीत नोकरी करणाऱ्या धाकट्या मुलाला हे सर्व कळले. मोठ्या भावाची उन्नती त्याला सहन झाली नाही. त्याच्या निस्वार्थीपणामुळे व त्यागामुळे आपल्याला ही नोकरी मिळाली आहे हे सुद्धां तो विसरला होता. कृतज्ञतेचा एक अंशही त्याच्यामध्ये नव्हता.

एक दिवस तो अकस्मात् आपल्या गावी आला. आणि आईला म्हणाला, ''आई, हे सगळं काय चाललंय? तुम्ही सर्वजण माझ्यावर अन्याय करायलाच पाहात आहात काय? वडलांच्या संपत्तीवर आम्हां दोघांचाही अधिकार आहे. पण याचा सगळा फायदा मोठ्या भावालाच का म्हणून? तूच सांग, हे योग्य आहे का? तू असं कसं होऊ दिलंस?''

तिला मोठ्या मुलाची बाजू घ्यायची होती पण तसे केल्याने धाकटा मुलगा नाराज होईल म्हणून ती गप्प बसली.

आईने घेतलेले मौन पाहून धाकटा गावात राहणाऱ्या शरभकडे गेला. तो त्याचा लांबचा नातेवाइक होता. त्याला त्याने आपल्यावर होणारा अन्याय सांगितला व त्याची मदत मागितली. शरभ आगलाव्या होता. त्याला दुसऱ्यांच्या भांडणात मध्यस्थी करायला फार आवडत असे. होईल तितके दोघातले भांडण वाढवून त्यांतली गंमत बघण्यात त्याला एक प्रकारचा आनंद मिळायचा. तसेच त्या दोघांच्या भांडणामुळे आपला फायदा कसा होईल हेही तो पाहात असे.

शरभने धाकट्याला म्हटले, ''अरे बाबा, हे काही सोपं काम नाही झटपट व्हायला! आपल्याला ग्रामाधिकाऱ्यापाशी ही तक्रार न्यावी लागेल.''

ग्रामाधिकारी शरभचा चांगला मित्र होता. शिवाय तो अतिशय लांचखाऊ होता. शरभच्या मध्यस्थीने न्याय धाकट्या भावाच्या बाजूनेच दिला गेला.

जेव्हा धाकट्याला एक एकर जमीन मिळाली तेव्हां तो विचारांत पडला की आता या जमिनीचे काय करायचे? शेतीविषयी तर त्याला कांहीच



- शिवकुमार -

माहिती नव्हती. कुणीतरी माणसं ठेवून शेती करवावी असा त्याचा विचार होता. मिळालेली संधी सोडायची नाही असे समजून लांडग्यासारखा टपून बसलेला शरभ पटकन् म्हणाला, "अरे दोस्ता, कसली इतकी काळजी करतोयस? मी आहे ना! मी सगळं सांभाळून घेईन. वर्षभरात जे काही उत्पन्न येईल ते अर्धे अर्धे वांटून घेऊ."

आनंदाने धाकट्याने ती सर्व जबाबदारी शरभवर टाकली. आणि त्यानंतर दुसऱ्याच दिवशी तो रत्नगिरीला परतला.

आई हे सर्व लक्षपूर्वक पाहात होती. ग्रामाधिकारी व शरभने मिळून केलेला हा कट तिला बिलकुल आवडला नाही. मोठ्या मुलावर होणारा अन्याय तिला सहन झाला नाही. आपल्या मोठ्या मुलाला घेऊन ती रत्नगिरीला गेली आणि आपला धाकटा मुलगा व शरभची तक्रार तिने जमिनदाराजवळ केली.

जमिनदाराने दोघांनाही आपल्या कचेरींत बोलावून घेतले. विषयाची छाननी करण्यासाठी व सत्याच्या बाजूने न्याय मिळावा म्हणून त्याने त्या दोघांना धमकावले. खरे कळल्यानंतर जमिनदाराला धाकट्याचा अतिशय राग आला. तो त्याच्यावर तुटून पडला. "अरे कृतघ्न, ज्याने तुझ्यावर उपकार केले, तुझं चांगलं होण्यासाठी स्वतः कष्ट स्वीकारून आरामाचे जीवन त्याग केलें अशा निस्वार्थी भावाशी तू असा वागलास? हे लज्जास्पद आहे. साधू लोक म्हणतात की खून करणाऱ्यापेक्षांही कृतघ्न माणसं जास्त पापी असतात. माझ्या कचेरींत तुझ्यासारख्या अयोग्यांना स्थान नाही. मी तुला आत्ताच्या आत्ता नोकरीवरून काढून टाकतो. चालता हो आणि राहिलेलं सगळं जीवन शेती करण्यांत घालव."

नंतर जमिनदाराने शरभ व ग्रामाधिकाऱ्यांनाही भरपूर रागवले. त्यांना शिक्षा म्हणून भुर्दंड द्यायला लावला. मोठ्या भावाला तो म्हणाला, "तू घोर परिश्रम करून नापीक जमीन सुपीक केलीस. आता ही एक एकर जमीन तुझी आहे. तू निस्वार्थी आहेस, तुझ्या उदार मनाची मी कदर करतो, प्रशंसा करतो. तुला मी ग्रामाधिकारी म्हणून नेमतो आहे." नंतर जमिनदाराने आवश्यक ती कागदपत्रे तयार केली.

अशा रीतीने चांगल्या भावाला चांगले दिवस आले.





# दोन नौकर



कोदंड जमीनदाराकडे नोकर होता. शेतांत काम करणाऱ्या मजुरांच्यावर लक्ष ठेवण्याची त्याची जबाबदारी होती. बारीकसारीक गोष्टींत तो आपला अधिकार त्या मजुरांवर गाजवत असे. जमीनदाराच्या आदेशाप्रमाणें रोज जे जे काम केले जाई, त्याची नोंद तो एका वहींत करत असे. आठवड्यांतून एक दिवस ती वही जमीनदारासमोर दाखवली जाई.

कांही दिवसांनंतर रतन नांवाचा एक नवा नोकर जमीनदाराकडे कामाला लागला. तो कोदंडाच्याबरोबर राही आणि मजुरांवर कामें सोंपवीत असे. त्या कामाची नोंद तोही एका वहींत लिहीत असे आणि आठवड्यांतून एक दिवस ती वही जमीनदाराला दाखवीत असे. एक दिवस कोदंडाने दुपारीं सहज बघितले तर रतन मजुरांच्याबरोबर एका झाडाखाली मजेंत दारू पीत बसला होता. त्याने याची नोंद आपल्या वहींत केली आणि रतनलाही ती नोंद दाखवली.

रतन गयावया करीत म्हणाला, "अरे कोदंडा, तू हे काय केलं आहेस? वहींत तू ही गोष्ट लिहीलीस, ती जर जमीनदार साहेबांनी पाहिली तर ते मला नोकरीवरून काढून टाकतील रे! माझ्यावर दया कर. जे लिहीलं आहेस, ते खोडून टाक. नाहीतर माझा सत्यानाश झालाच म्हणून समज. मला दुसरी नोकरी देखील कुठे मिळायची नाही."

कोदंडाने त्याला सांगितलं, "हे पहा, मी आहे प्रामाणिक! कोणत्याही परिस्थितींत सत्य लपवून ठेवायचं हे मला आवडत नाही. मी मालकांना ही वही जरूर दाखवीन. त्यांनाही कळूं दे कीं तू दारूडा आहेस!"

त्यानंतर रतनने आपल्या वहींत कांहीतरी मजकूर लिहीला आणि कोदंडाला दाखवला. त्यांत लिहीलं होतं, "इतक्या दिवसांनंतर, आजच प्रथम मी पाहिलं, कीं आज कोदंडाने दारू प्यायली नव्हती."

- भवानी प्रसाद



# कुशाग्र बुद्धी

एका गांवात एक राजा होता. दरवर्षी तो एक विशेष सभा भरवत असे व त्या सभेला गांवातल्या हुशार, कुशाग्र बुद्धीच्या तरुणांना आमंत्रण देत असे.

राजाचा प्रधानमंत्री त्या तरुणांच्याबरोबर चर्चा करी, आणि त्यांतल्या चतुर, तल्लख बुद्धीच्या तरुणांना आपल्या दरबारांत नियुक्त करत असे.

एकदा राजदरबारांतल्या या चर्चेत गणपती नांवाच्या एका तरुणाने आपल्या कुशाग्रबुद्धीची झलक दाखवली.

प्रधानमंत्र्यांनी त्या चर्चेसाठी जमलेल्या युवकांना विचारले, "तुमच्यापैकी कुणीही हात असलेला लुळा पाहिला आहे का?" यावर उत्तरादाखल गणपतीने म्हटले, "मी इकडे येत होतो. बाहेर एक भिकारी कागद आणि पेन्सील घेऊन बसला होता. मला पाहताच तो म्हणाला, "बाबा, भिकाऱ्याला कांहीतरी दान द्या." मी त्याला पैसे दिले. चटकन् त्याने कागदावर "दोन" लिहीले. मी त्याला विचारले "हे काय तू लिहीत आहेस?" भिकारी म्हणाला, "हात असून जे लुळे नाहीत त्यांची मोजणी करतोय." त्याच्या म्हणण्याचा अर्थ होता, की जे दान देत नाहीत ते हात असूनही लुळे आहेत.

"असेच डोळे असूनही आंधळे असू शकतात ना?" मंत्र्याने विचारले. त्यावर गणपतीने उत्तर दिले, "अवश्य असू शकतात. एकदा मी एका शहरांत गेलो होतो. तिथे एका घराला बाहेरून मोठे कुलूप लावले होते, पण आंत बराच आवाज येत होता. मी मोठ्याने ओरडून विचारले, "कोण आहे आत?" पण आंतून कांहीच उत्तर आले नाही. मी लगेच शेजार पाजारच्या लोकांना एकत्र केले. आंत असलेला चोर पळून जाण्याच्या प्रयत्नात होता. सर्वांनी मिळून त्याला धरले.

त्या चोराने माझ्याकडे रागाने पहात म्हटले, "तुझ्यासारखे डोळे असून आंधळे नसलेले लोक खूप कमी आहेत. त्यामुळेच आजपर्यंत मी माझा धंदा व्यवस्थित करत आलो." यावरून आपण समजले पाहिजे की घराला कुलूप असलेले पाहूनही आंत कांही आवाज येत असल्यास तिकडे दुर्लक्ष करून जाणारे डोळे असूनही आंधळेच म्हणावे लागतील."

"जीभ असूनही मुका माणूस कोण असू शकतो?" मंत्र्याने विचारले.

गणपती म्हणाला, "मी एकदा एका श्रीमंताकडे कर्ज घेतले. जेव्हा व्याजाविषयी विचारले तेव्हां तो मला म्हणाला, "जीभ असूनही जे मुके आहेत, त्यांना प्रत्येक रुपायाला एका महिन्याला चार आणे व्याजाप्रमाणे कर्ज देतो, जे असे नाहीत त्यांच्याकडून व्याज घेत नाही." मी त्याला याचा अर्थ विचारला. त्याने सांगितले, जे लोक उधार घेऊन संपूर्ण मुदत संपेपर्यंत कर्जाचे पैसे न देता खोटेनाटे सांगून पैसे द्यायचे टाळतात, आणि जे लोक खोटे सांगून कर्ज मागतात, ते जीभ असूनही मुके असतात."

मंत्र्याने आणखी एक प्रश्न विचारला, "न सांगता जाणारी आणि न सांगता येणारी मृत्यूशिवाय अन्य कुठलीही घटना आहे का?"

गणपतीने म्हटले, "तारुण्य न सांगता निघून जाते, त्यामुळे नेहमी सावध राहिले पाहिजे. त्याचप्रमाणे नशिबावर विश्वास ठेवून आयुष्य वांया जाणार नाही याची काळजी घेतली पाहिजे. या साऱ्या गोष्टी माझे आजोबा मला नेहमी योग्य तऱ्हेने सांगत असत."

"या जगांत अनेक वेळा मरणारी माणसे असू शकतात कां?" मंत्र्याने विचारले.

त्यावर गणपती म्हणाला, "या गांवात मी एका रडत असलेल्या बाईला पाहिले. मी तिला विचारले, "कां तू अशी रडते आहेस?" तिने उत्तर दिले, "माझे संबंध आयुष्य आता रडण्यांतच संपणार आहे. दोन वर्षांपूर्वी माझ्या शूरवीर पुत्राला एकदाच मरण आले. पण माझा घाबरट नवरा दिवसांतून दहा वेळा मरतो."

गणपतीच्या एकंदर सर्व प्रश्नांच्या उत्तराने मंत्री खूष झाला. त्याने राजाला गणपतीला दरबारात नोकरी देण्याविषयी सल्ला दिला आणि राजाने त्याला नोकरी दिली.



चांदोबातील २५ वर्षांपूर्वीची कथा













# नागार्जुनकोंडा



ज्या जागी इतिहास आणि वर्तमान एकमेकांचे शेजारी आहेत आणि तुमचे लक्ष वेधून घेण्याची चढाओढ करीत आहेत, अशा स्थळाला भेट द्यायला तुम्हाला आवडेल कां? तर मग सरळ आंध्रप्रदेशांतल्या नागार्जुनकोंडाला जा. तिथें प्राचीन बौद्धगुंफा आणि विद्यापीठाजवळच जगांतले सर्वांत मोठे धरण आहे.

पूर्वी विजयपुरी नांवाने प्रसिद्ध असलेले नागार्जुनकोंडा ईश्वाकू वंशाच्या काळांत भरभराटीस आले.

बौद्ध संस्कृतीचे इथले अवशेष इ.पू. तिसऱ्या शतकांपूर्वीचे आहेत. मात्र चौथ्या शतकानंतर ईश्वाकू वंशाला उतरती कळा लागली आणि नागार्जुनकोंडाचा ऱ्हास सुरुं झाला.

इथें दिसणारा स्मारकें ईश्वाकू वंशाच्या उत्कर्षाच्या काळांत बांधली गेली होती. पण त्यांचा शोध मात्र १९२६ सालीं लागला.

पिरॅमिडच्या धर्तीवर बांधलेल्या एका बौद्धमठाचे अवशेष तुम्हाला इथें दिसतात. या पांच मजल्यांच्या मठांत एकंदर १५०० खोल्या होत्या. त्यांत पाण्याची व खेळत्या नैसर्गिक हवेची सोय केलेली होती. एक प्रसिद्ध बौद्ध विद्यापीठ इथें वसलेलं होतं.

इथें कृष्णा नदीवर नागार्जुनसागर धरण बांधलेलं आहे. भारतांतल्या पहिल्या कांही प्रमुख योजनांपैकीं ही धरणाची योजना होती. १२४ मीटर्स उंची असलेलं हे धरण जगांतल्या सर्वांत उंच बांधकामांपैकी एक आहे.

## तिथें कसे जाल?

नागार्जुनकोंडा हे हैदराबादहून १५० किमी अंतरावर आहे आणि तिथपर्यंत हैदराबाद, विजयवाडा व गुंटूर इथून बसेस आहेत.



# माया सरोवर

## 10

*(सर्पनख व सर्पस्वर नांवाचे दोन भाऊ जल-अश्वावर स्वार होऊन बौनांच्या वस्तीत आले. तिथें सर्पनखने कृपाणजितच्या गळ्यांत दोरी घालून त्याला बांधून ठेवले. नरवानर, सर्पस्वरवर तुटून पडला आणि त्याला घेऊन गेला. हे समजताच जयशील व सिद्धसाधक वस्तीच्या दिशेने धांवू लागले, तेव्हां वाटेत त्यांनी पाहिले की सर्पनख जलाश्वावर स्वार होऊन वेगाने जात आहे)-याच्यानंतर*

सर्पनख एका वृक्षाजवळ आला आणि थांबला. नंतर तो 'सर्पस्वर'च्या नांवाने मोठमोठ्याने हांका मारूं लागला. पण कुणीच त्याच्या हांकेला प्रतिसाद दिला नाही. त्यामुळे सर्पनख हताश झाला. परंतु तो आपल्या असहाय्यतेवर काबू ठेवूं शकला नाही. त्याचा राग अनावर झाला आणि आवेशांत येऊन त्याने म्यानांतून तलवार बाहेर काढली व जवळच असलेल्या वृक्षाच्या बुंध्यात भोसकली. नंतर तो म्हणाला, "मी प्रतिज्ञा करतो की माझा भाऊ जर जिवंत मिळाला नाही, तर त्याला मारणाऱ्या नरवानराचे आणि त्याच्या मालकाचे डोके धडापासून वेगळे केल्याशिवाय मी राहणार नाही. माझी ही प्रतिज्ञा पूर्ण होईपर्यंत मी इथेंच राहीन".

झुडपांमध्ये लपून बसलेल्या जयशीलने हे सर्व ऐकले. खूष होऊन तो सिद्धसाधकाला म्हणाला, "साधका, तू त्या सर्पनखाची प्रतिज्ञा ऐकलीस ना? त्याने जंगलांतल्या वृक्षांना साक्षी ठेवून ही कठोर प्रतिज्ञा केली आहे."

"जयशील, आपला प्रिय भाऊ बेपत्ता



झाल्यामुळे तो अतिशय दुःखी झाला आहे, त्यामुळे त्याची मानसिक अवस्था ठीक नाही. पण आपल्याला त्याला जिवंत पकडता येईल कां?''

क्षणभर विचार करीत जयशील म्हणाला, ''साधका, तुझे रूप, तुझी बोलण्याची पद्धत सामान्य माणसांपेक्षां वेगळी आहे. त्यामुळे तू एकटाच त्याला जिवंत पकडूं शकशील. कांहीही असो, तू त्याच्याजवळ जा आणि त्याच्याजवळून त्याची तलवार हिरावून घेण्याचा प्रयत्न कर. त्याच्याकडून आम्हांला हे समजून घेतले पाहिजे की मायासरोवराला जाण्यासाठी आम्हाला कसे व कुठून जावे लागेल. ते काम मी स्वतः सांभाळीन''.

सिद्धसाधक त्यानंतर सर्पनखाला भेटायला गेला. तो गेल्यावर जयशील बौनांच्या सेनाध्यक्षाला भेटून म्हणाला, ''सेनाध्यक्ष, त्या विचित्र रूप असलेल्या व्यक्तीचे शक्ती-सामर्थ्य किती आहे याची कांही आम्हाला कल्पना नाही. परंतु जरूर पडली तर तुम्हाला सिद्धसाधकाला मदत करावी लागेल. तुम्हाला मोठ्या वृक्षांच्या मागे लपून राहून त्यांच्यावर देखरेख करता येईल कां?''

''आपली आज्ञा मी कधीतरी अव्हेरली आहे कां?'' असे म्हणून सेनाध्यक्ष आपल्या वाहनावर स्वार होऊन निघून गेला. सिद्धसाधकाने आपला शूळ उंच धरीत सर्पनखाजवळ जाऊन मोठ्याने म्हटले. ''माझ्या वृक्षाला कोणी ही तलवार भोसकून ठेवली आहे? मी या वृक्षाची पूजा करतो ते माहित नाही? कुणी माझ्या वृक्षाला जखम केली? या वृक्षाचे कण्हणे ऐकून मला त्याच्या वेदना पाहावत नाहीत''. तो रागाने किंचाळून म्हणाला.

ते ऐकताच सर्पनखने वृक्षांत भोसकून ठेवलेली तलवार ओढून बाहेर काढली व ती साधकाला मारण्यासाठी, त्याच्याकडे त्याच्यावर वार करण्यासाठी तयार ठेवली. त्याच्याकडे रागाने पहात साधक म्हणाला, ''अरे, तुला पाहिले तर तू मायासरोवरचा सेवक आहेस असे वाटते. माझा अंदाज बरोबर आहे ना?'' साधकाचे बोलणे ऐकून सर्पनखाला भीती वाटली. त्याला वाटले की हा कोणी मांत्रिक तर नाही? नाहीतर त्याला कसे कळले कीं आपण माया सरोवरचे सेवक आहोत?

सिद्धसाधकाला कळून चुकले की आपला वार बरोबर त्याच्या वर्मी लागलेला आहे व आपण यशस्वी होत आहोत. मनांतल्या मनांत खूष होत तो गंभीर स्वरांत म्हणाला, ''सरोवराचा सेवक असूनही तुला इतका गर्व? ''माझे बोलणे ऐकूनही



इतक्या थाटामाटांत घोड्यावर बसला आहेस, प्रथम खाली उतर''.

सर्पनख त्वरित जलाश्वावरून खाली उतरला. साधक त्याच्या समोर जात म्हणाला, ''ज्या तलवारीने माझ्या वृक्षाला जखमी केलेस, ती तलवार तू माझ्या ताब्यांत दे''.

सर्पनखाला जरा शंका आली व तो म्हणाला, ''तुम्हाला माझ्या मालकाचे नांव कसे काय माहित आहे? वृक्षाचे कण्हणें समजण्याइतके तुम्ही मोठे मांत्रिक आहात काय?''

सिद्धसाधक मोठ्याने हंसत म्हणाला, ''अरे सर्पनखा, मी तुझ्या मित्रांना, मकरकेतूला सुद्धां ओळखतो. ह्या तलवारीमुळे तुझे नुकसान होणार आहे. त्यामुळे ती तलवार मुकाट्याने माझ्याकडे देऊन ठेव. त्यांतच तुझे हित आहे''.

सर्पनख दांत ओठ चावत म्हणाला, ''हा, आत्ता माझ्या लक्षांत आलं कीं तू कोण आहेस? नरवानराच्या मालकाने म्हणजे कृपाणजितने तुला व तुझ्या मित्राला जंगलात पाहिले होते. तू कापालिकच ना?'' तलवार हातांत घेत सर्पनख म्हणाला.

सिद्धसाधकाने शूळ जमिनींत घुसवत म्हटले, ''तुला कदाचित् वाटत असेल की मी एक साधारण कापालिक म्हणून. पण नाही, मी एक महान् सिद्धसाधक सुद्धां आहे.''

''मला तुझ्या काळ्या कृत्यांचा अंदाज आहे. मला पकडून कुठल्यातरी देवतेच्या पायावर माझा बळी चढवायचा तुझा प्रयत्न आहे, ते मला माहित आहे.'' असे म्हणून तो साधकावर तुटून पडला.

पण क्षणांतच बस्तीच्या सेनाध्यक्षाच्या जंगली बकऱ्याने सर्पनखवर हला केला. त्यामुळे सर्पनख तोंडघशी उताणा पडला व त्याच्या हातांतली तलवार दूरवर पडली.





सिद्धसाधकाने लगेच त्याच्या तलवारीवर आपला पाय ठेवला. तितक्यांत जयशीलही तिथे येऊन पोहोचला. उताणा पडलेल्या सर्पनखाला उठवत तो म्हणाला, ''अरे सर्पनख, तुझं नांव तर विचित्र आहेच, पण तुझं रूप सुद्धा विचित्र आहे. आम्हाला हे माहित आहे की सांपाला दांत असतात, पण हे माहित नाही कीं सापाला नखंही असतात''. असे म्हणून त्याने सिद्धसाधकाकडून तलवाल घेऊन त्याला दिल्यासारखे नाटक करीत म्हटले. ''खड्ग-युद्ध करायची आताही तुझी इतकी इच्छा असेल तर ही घे''.

त्यावर सर्पनख त्वेषाने म्हणाला, ''जे झालं ते काय खड्ग-युद्ध होतं? ते तर मल्लयुद्धापेक्षा हीन आहे.''

दुसऱ्याच क्षणीं सर्पनखने जमिनीवर पाय दाबून धरले, व सर्व शक्ती एकवटून साधकावर हल्ला केला. तेवढ्यांत सिद्धसाधकाने त्याच्या कमरेला पकडले, त्याला उंच धरून जोरांत फेकून दिले. त्याने खाली पडण्याआधीच त्याला पकडायचा साधकाचा विचार होता. पण त्याचा गळा व एक हात साधकाच्या हातांतच राहिला. हवेंत फिरवत साधक त्याला म्हणाला, ''वा, हे माझ्या हातात आलं, किती चांगलं झालं. हा महाकालचा बळी देण्याचा पशू आहे यांत शंकाच नाही''. असे म्हणून त्याने त्याला जमिनीवर आपटले.

सर्पनख थरथर कांपू लागला. जमिनीवर बसून तो हताशपण म्हणाला, ''महाराज, मला मारूं नका. मी आणि माझा भाऊ मकरकेतूला शोधत शोधत या प्रांतात आलो, माझा भाऊ, सर्पस्वराला एक नरवानर घेऊन गेला. मी त्याला शोधून काढीन आणि आम्ही दोघेही परत जाऊ''.

''बरं झालं, तुझं डोकं ठिकाणावर आलं!'' असे म्हणून जयशील साधकाकडे वळून म्हणाला, ''साधक, याचा बळी चढवायला अजून अवकाश आहे. तेव्हां आता कसलीही गडबड करूं नकोस''. नंतर पुन्हा सर्पनखाजवळ येत म्हणाला, ''तुझ्या भावाला शोधून काढण्यासाठी आम्ही तुला मदत करतो. परंतु त्याआधी तू आम्हाला एक वचन दिल पाहिजेस. तू आम्हाला माया सरोवराच्या सरेश्वराजवळ घेऊन जा''.

ते ऐकताच सर्पनखाचा चेहरा हिरवानिळा झाला. घाबरल्यामुळे त्याचा आवाज कांपू लागला. तो म्हणाला, ''ज्या सरोवरांत ते राहतात, त्या सरोवराचा पत्ता सांगितला तर माझ्या डोक्याचे तुकडे तुकडे होतील, हा शाप आहे.''

''बरं ठीक आहे. तो शाप मी स्वतःच अंमलात आणतो'' असे म्हणून जयशीलने आपली तलवार वर उचलली इतक्यांत कुणीतरी



ओरडलेले ऐकू आले. म्हणून सर्वांनी त्या दिशेने पाहिले.

कृपाणजित जलाश्ववर स्वार होऊन तलवार फिरवत किंचाळत येत होता, ''जयशील कुठे आहे? त्याचा साथीदार कापालिक कुठे आहे? मला त्यांचा खून करायचा आहे, त्यांचे तुकडे तुकडे करायचे आहेत''. झाडांच्या मधून त्याचा घोडा वेगाने धावत होता.

कृपाणजितला पाहताच सिद्धसाधकाच्या डोळ्यांत आग उतरली. रागाने तांबडालाल होत तो घोगऱ्या आवाजांत म्हणाला, ''वा! कधीपासून वाट पाहात होतो, इतक्या मोठ्या प्रतिक्षेनंतर आता आपणहून माझ्या हातांत येत आहे. आज माझ्या शूळाचा हा शिकारी होणार''.

सर्पनखाने चटकन त्याचा हात पकडला व म्हटले, ''महाराज, थांबा. माझं ऐका. ह्या दुष्टाच्या नरवानरानेच माझ्या भावाला उचलून नेले. प्रथम माझा भाऊ कुठे आहे, तो नरवानर कुठे घेऊन गेला आहे हे समजून घेतल्यावर मग त्याचा वध करूं या''.

जयशीलने तलवार सर्पनखाच्या हातात दिली आणि सांगितले, ''हे बघ, तो कृपाणजित खड्ग-युद्धात चांगला प्रवीण आहे. जरा जागरूक रहा.'' नंतर तो साधकाला घेऊन वृक्षांच्या मागे लपून बसला. तेवढ्यांत जलाश्ववर दौड करीत कृपाणजित तिथे आला. सर्पनखाला पाहून तो थांबला आणि म्हणाला, ''तू कोण आहेस? गडेकौंडा वस्तीत मला गळफांस लावलेला तूच तर नाहीस?''. ''हां, मी तोच आहे. तू ज्या जलाश्वावर आलेला आहेस, तो माझ्या भावाचा आहे. माझा भाऊ कुठे आहे? काय केलंस तू माझ्या भावाला?'' असे म्हणत तो कृपाणजितच्या



दिशेने पुढे गेला.

कृपाणजितने आपले दोन्ही हात उंच केले आणि म्हटले, ''तू जिथे आहेस, तिथेच थांब. नरवानर जलाश्वावर बसलेल्या तुझ्या भावावर अचानक तुटून पडला. आणि कुठे तरी घेऊन गेला. ह्या घोड्याला मी वस्तीच्या एका झाडाजवळ पकडले''.

''मी विचारलेल्या प्रश्नाला सरळ सरळ उत्तर दे.माझा भाऊ कुठे आहे?'' असे म्हणून त्याने घोड्याला कृपाणजितजवळ दौडावले.

भरधाव येणाऱ्या घोड्याला पाहून कृपाणजित गर्भगळित झाला. त्याने आपल्या घोड्याला उलटे फिरवले व विरुद्ध दिशेने त्याला पळवायला लागला. जाता जाता तो म्हणाला, ''माझ्या कट्टर शत्रूला, जयशीलला मारल्यानंतरच मी मरण पत्करीन. त्यामुळे आता तुझ्याशी लढाई करण्याचा माझा उद्देश नाही''. असे म्हणून



घोड्याला घेऊन तो भरधांव निघाला.

सर्पनखने त्याला तेवढ्यावरच सोडले नाही. तो त्याचा पाठलाग करू लागला. हे सर्व पहात व ऐकत असलेला जयशील वृक्षांच्या मागे लपून बसलेल्या जागेवरून पुढे येत म्हणाला, "साधका, पळून जाणारा हा आमचा सर्वांत कट्टर दुष्मन आहे आणि दुसऱ्याला आपण मित्र म्हणून भासवले तर माया सरोवराजवळ पोहोचणे काही कठीण नाही."

सिद्धसाधक म्हणाला, "तुझा विचार योग्य आहे. पण आता जर आपण उशिर केला तर हे दोघेही आपल्या दृष्टीआड होतील. तर आता पुढे काय करायचं पटकन, सांग".

बौंना वस्तीचा सेनाध्यक्ष दूर उभे राहून हे सर्व आश्चर्याने पाहात होता. जयशीलने त्याला जवळ बोलावून विचारले, "सेनाध्यक्ष, ते पळून जात आहेत ना, त्यांना पकडायचे आहे. या प्रदेशाच्या आजूबाजूला तुझ्या जातीचे लोक विखुरलेले आहेत. त्यांना सावध कर, त्या दोघांना पकडायचे आहे म्हणून सांग पण त्यांना जिवंत पकडणे शक्य आहे का?".

"मालक, हे कांही एक मोठे काम नाही. मी माझ्या लोकांना आदेश देत जाईन." असे म्हणून सेनाध्यक्ष घोड्यावर वस्तीच्या दिशेने जाऊ लागला.

"सिद्धसाधक, इथून पुढे जी एक छोटी टेकडी दिसते ना, तिथे तू जा आणि तिथून बौंना जातीचे लोक काय काय करतात ते पहा." असे म्हणून जयशील टेकडीच्या दिशेने जाऊ लागला. सिद्धसाधक जयशीलच्या मागोमाग चालू लागला.

सर्पनख कृपाणजिताचा पाठलाग करत होता. पण अरण्यांतल्या घनदाट वृक्षांतून व झाडीतून त्याचा पाठलाग करणे अवघड जात होते, त्यामुळे त्याला पकडणे आता असंभव आहे असे त्याला वाटले. तो जोरजोराने किंचाळू लागला, "अरे कृपाणजित, जरा थांब, जरा थांब. आपल्या दोघांनाही माहित नाही की माझा भाऊ जिवंत आहे की नाही! तू त्याचा जलाश्व मला परत दे आणि निघून जा".

"पण अश्व घेतल्यानंतर तू मला मारणार नाहीस याची खात्री मी कशी बाळगूं? याचा अर्थ असा नाही की मी तुझ्याशी युद्ध करायला घाबरतो. युद्धांत कोण जिंकेल ते त्या एकट्या देवालाच माहित! पण मला प्रथम त्या जयशीलवर वचपा घ्यायचा आहे. त्याच्यानंतर मी तुझी खबर घेईन". असे म्हणत घोड्याला आणखीनच पळवत कृपाणजित एका नदीच्या किनाऱ्यावर पोहोचला.

सर्पनखाने आपल्या घोड्याला जोराची टांच



दिली आणि भरधांव पळणारा घोडा बघता बघता नदीकिनाऱ्यावर आला. तटावर धांवणाऱ्या कृपाणजितचा पाठलाग तो करूं लागला.

तोपर्यंत डंका पिटून सावध केलेले बौना जातीचे कित्येक लोक सर्पनख व कृपाणजितला पकडण्यासाठी हातांत भाले घेऊन धावूं लागले. कृपाणजितने ते समोरून येणारे वस्तीतले लोक पाहिले. आता त्याला पुढेही जाता येत नव्हते कारण भाले घेऊन आदिवासी येत होते व मागे सर्पनख येत होता. तो आपल्या हरवलेल्या भावाचा सूड घेण्यासाठी टपून बसला होता.

अशा अवस्थेंत कृपाणजितला आपल्या घोड्यासह नदीत उडी मारण्यावाचून दुसरा उपाय नव्हता. नदींत घोड्यासह उडी मारण्यासाठी तो नदीच्या कांठावर आला आणि नदींत दोन मोठ्या मगरी पोहत असल्याचे अचानकपणे त्याला दिसले.

ते पाहून तर तो अगदी गर्भगळित झाला. म्हणतात ना, "इकडे आड तिकडे विहीर" तशी त्याच्या मनाची द्विधा अवस्था झाली. कुठेही गेले तरी संकट आ वासून त्याच्यापुढे उभे होते. त्याने विचार केला, "छातीत आदिवासी लोकांचे टोचणारे भाले बरे, कीं पाण्यांत पोहणाऱ्या मगरींच्या जबड्यांत जाणे बरे? छे, दोन्हींमुळे माझा प्राण जाईलच. कांहीही झाले तरी मरण अटळ आहे." दुसरा मार्गच नाही म्हटल्यावर त्याने मनाशी निश्चय केला की बौनांच्या भाल्यांपासून किंवा सर्पनखाच्या हातून मरण येण्यापेक्षा मगरींच्या जबड्यातले मरण मी पत्करीन, नंतर त्याने स्वतःच्या मनाला सांवरले, धैर्य देत म्हटले की "आपण आता जलाश्वावर बसलेलो आहोत. आणि हा अश्व पाण्यांतलाच असल्याने आपले प्राण वाचवण्यासाठी खूप प्रयत्न करेल व स्वतःचे प्राण वांचवताना तो



माझेही प्राण वांचवेल''. असा विचार करून त्याने नदीत उडी मारली.

त्याच्या मागोमाग येत असलेल्या सर्पनखने हे दृश्य पाहिले व म्हणाला, ''अरे, हा तर मूर्खच आहे. पण मला आता बसून चालणार नाही. याला मगरीने खाल्लें तर खाऊ दे, पण त्याच्या जवळ असलेल्या जलाश्वाला मला कसेही करून वांचवले पाहिजे. माझा भाऊ जिवंत असेल तर मायासरोवरपर्यंत पोहोचण्यासाठी हा अश्वच एकमात्र आधार आहे''. असे म्हणत त्यानेही अश्वासहित नदीत उडी मारली.

नदीच्या प्रवाहाबरोबर जाणाऱ्या अश्वावर स्वार असलेल्या कृपाणजितचा दोन्हीं मगरींनी पाठलाग सुरु केला. सर्पनख तलवार घेऊन त्यांना मारण्यासाठी त्यांच्या मागोमाग गेला. कांठावर असलेल्या बौना वस्तीतल्या लोकांनी जवळ असलेले दगड उचलून कृपाणजितला मारायला सुरवात केली. सर्पनखाने मोठ्या आवाजांत त्यांना सांगितले, ''मी तुम्हां सर्वांचा दोस्त आहे. मी त्या दुष्टाला जिवंत पकडण्यासाठी जात आहे. त्याला दगड मारू नका''. हे सांगत असतानाच त्याने पाहिले की एक मगर आपला जबडा वासून कृपाणाजीतचा पाय पकडायला येत आहे. त्याने लगेच आपल्या तलवारीने त्याच्या पाठीवर जोराने वार केला.

ह्या वारामुळे मगरीला मोठी जखम झाली, ती पाण्यांत तडफडूं लागली. दुसरी मगर पाण्याच्या खालून जबडा उघडा करून कृपाणजितच्या दिशेने जाऊं लागली. ते पाहून जलाश्व घाबरला. कृपाणजितने लगाम ओढून त्याला थांबवण्याचा प्रयत्न केला पण तो न थांबता अतिवेगाने पोहत नदीच्या दुसऱ्या किनाऱ्याच्या दिशेने आला. प्राण घेणारा एक मृत्युवृक्ष किनाऱ्यावर होता, त्या दिशेने तो भरधाव निघाला.

या मृत्युवृक्षाच्या थोडया अंतरावर उभ्या असलेल्या बौना आदिवासींनी मोठमोठ्याने ओरडून सांगितले, ''अरे शक्तीमान, आपल्या घोडयाला घेऊन परत जा. नाहीतर हा वृक्ष तुला खाऊन टाकेल.'' त्यांनी कृपाणजितला साव-धानतेचा इशारा दिला.

पण घोडयाला थांबवणे आता त्याच्या काबूंत नव्हते. मृत्युवृक्षाच्या एका फांदीने कृपाणजितला आवळून धरले व तो त्याला उंच उंच खेचूं लागला.

(अपूर्ण)





वेताळ कथा

# भानुमंताची कहाणी

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरून शव खाली उतरवले आणि खांद्यावर घेतले. तो स्मशानाच्या दिशेने जाऊं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, ''तुझा हट्ट पाहिला कीं वाटतं तुला आपल्या विजयाबद्दल गाढ विश्वास आहे. म्हणूनच संकटाशी सामना करताना तू घाबरत नाहीस. स्मशानांत हिंस्त्र श्वापदे आहेत, भुतेंप्रेते आहेत, पण तुला त्याची पर्वा दिसत नाही. परंतु दर वेळेला आपला विश्वास खरा ठरतोच असं नाही हां! फार पूर्वीची एक गोष्ट आहे. एक अरण्यांत राहणाऱ्या वन्य जातीचा तरुण होता. तुझ्यासारखाच त्याला खूप आत्म-



विश्वास होता. त्याने महाराजांशी टक्कर दिली आणि विजयदेखील मिळवला. पण त्याने जाणूनबुजून आपल्या हातून यश घालवले. त्याची गोष्ट मी तुला सांगतो. म्हणजे तुझा थकवाही दूर होईल.'' आणि वेताळाने गोष्ट सांगायला सुरवात केली.

विंध्यारण्यांत लहानलहान राज्यें होती. त्यांत शोणपूर होते. तिथला राजा आजारी पडून वारला. भानुमंत हा त्याचा एकुलता एक मुलगा होता. जरी तो वयाने लहान होता, तरी तो अत्यंत बुद्धिमान होता. राजनीतिचे डावपेच त्याला परिचित होते. थोड्याच काळांत त्याला आपल्या देशाविषयी व राज्यशासनासंबंधी सारी माहिती समजली. ज्येष्ठ मंडळींचा सल्ला घेऊन तो हुशारीने राज्य करुं लागला.

एकदा एक कर्मचारी भानुमंताला म्हणाला, ''आपल्या राज्याच्या पूर्व व उत्तर सीमेवर अरण्य आहे. मी तिकडचा राहाणारा आहे. आपल्या पिताश्रींनी मला नोकरीवर ठेवले होते. पूर्व दिशेला असलेले अरण्य उत्तरेपेक्षां जास्त सुंदर आणि मनमोहक आहे. निसर्गाने तिथें सौंदर्याची मुक्तहस्ताने उधळण केली आहे. तिथें जितकी जनावरे प्राणी दिसतात, तशी व तितकी इतरत्र दिसत नाहीत.''

भानुमंताला शिकारीची आवड होती. त्यामुळें हे वर्णन ऐकून त्याला त्या अरण्यांत जायची तीव्र इच्छा झाली. त्याने राज्यकारभार मंत्र्यांवर सोंपवला आणि कांहीजणांना बरोबर घेऊन तो अरण्याकडे निघाला. तिथें पोंचल्यानंतर त्याला बरेच आदिवासी नागरिक भेटले. त्यांच्याशी परिचय करून देताना त्याच्या एका मदतनीसाने, केवलने सांगितले, ''हे लक्ष्मण जातीचे लोक आहेत. इतर आदिवासींपेक्षां हे जास्त शिक्षित आहेत. असं सांगतात कीं जेव्हां प्रभु रामचंद्र सीतेच्या शोधार्थ निघाले, तेव्हां वाटेंत असलेल्या इथल्या मंडळींनी त्यांची श्रद्धेने सेवा केली होती. श्रीराम प्रसन्न झाले आणि त्यांनी सांगितलं, ''तुम्ही लक्ष्मणासारखे शूरवीर, धैर्यशाली व कर्तव्यपरायण बनाल. तेव्हांपासून या जातीचं नांव लक्ष्मण पडलं; त्यांचा आणखी एक विशेष गुण आहे. या अरण्यांत अनेक हिंस्र जनावरे असतात, तेव्हां या जातींतले फक्त पुरुषच नव्हे, तर स्त्रियादेखील तीर चालवण्यांत कुशल असतात.''

भानुमंताने केवलचे बोलणें लक्षपूर्वक ऐकले.



थोड्याच वेळानंतर त्याने एका रानटी बार शिंग्यावर तीर मारला. पण बारसिंगाला तो तीर लागला नाही व तो जोरांत पळूं लागला. तितक्यांत आणखी एक तीर येऊन त्याच्या शरीरांत घुसला. बारसिंगा विव्हळत जमिनीवर कोसळला.

आपल्या डोळ्यांसमोर घडलेली ही घटना बघून भानुमंत आश्चर्याने थक्क झाला. तो घोड्यावर स्वार होऊन थांबला. तितक्यांत एका घोड्यावरून एक लक्ष्मणजातीची तरुण मुलगी त्या बारशिंग्याजवळ आली.

तिला पाहून भानुमंत मंत्रमुग्ध झाला. तिचा वेष जरी आदिवासी पद्धतीचा होता, तरी तिचे सौंदर्य मात्र अनुपम होते.

ती जेव्हां खाली उतरली, तेव्हां तिने भानुमंताला पाहिले. प्रथम ती घाबरली, पण नंतर तिने धीर एकवटून भानुमंताला विनयपूर्वक नमस्कार केला, नंतर ती दोघे एकमेकांशी बोलायला लागली तेव्हां समजलं कीं तिचे नांव चंपा असून ती लक्ष्मणजातीच्या सरदाराची मुलगी होती. तिच्या निमंत्रणावरून भानुमंत तिच्या घरीं गेला.

त्याला बघून चंपाचा पिता फारच प्रसन्न झाला. त्याने भानुमंताला तिथें दोन दिवस राहायचा आग्रह केला. नाईलाजाने त्याला तिथें मुक्काम करावा लागला. त्या दोन दिवसांत चंपाचा सुस्वभाव, सुमधुर गायन आणि बुद्धिमत्ता पाहून भानुमंताचे मन तिच्यावर जडले. त्याने तिला विवाहाची मागणी घातली.

चंपाने खाली मान घालून उत्तर दिले, ''महाराज, देवाच्या दयेने माझ्या मनांतले विचार आपल्याला समजले. खरंच, हे माझं सौभाग्य आहे. पण माझा आतेभाऊ राम याला माझ्याशीच लग्न करायचे आहे. सर्वांना हा संबंध पसंत आहे, पण मलाच हा विवाह पसंत नाही. पण आमच्या रिवाजानुसार





जर एखाद्या मुलीसाठी दोघाजणांचे मत अनुकूल असेल, तर त्या दोघांच्यामधें एक स्पर्धा ठेवली जाते. आमच्या राममंदिरात एक फार पूर्वीपासूनचे एक धनुष्य आहे. जो कुणी या धनुष्यावर सहजपणें दोरी चढवेल, तो विजयी होतो, व त्याच्या मनांत असलेल्या कन्येशी विवाह करतो. माझ्याशी विवाह करण्याची आपण इच्छा व्यक्त केली आहे, तेव्हां आता आपण आणि राम यांच्यामधें स्पर्धा व्हायलाच हवी. तसं पाहिलं तर राम दुर्बल आहे, थोडा मंदही आहे, तेव्हां देवाचा निर्णय कुणाच्या बाजूने आहे ते पाहायला हवं."

भानुमंतने प्रेमळपणें हंसत म्हटलं, "ठीक आहे, पुढें काय होईल ते पाहूं या."

दुसऱ्या दिवशीं ही स्पर्धा होती. रामने धनुष्याला नम्रतापूर्वक प्रणाम केला. तो पुढे वांकला आणि धनुष्य वर उचलून त्याने अगदी सहजपणें त्याची प्रत्यंचा बांधली. सर्व लोक आश्चर्याने त्याच्याकडे बघत होते.

भानुमंताने मात्र त्याच्याकडे प्रसन्नपणें पाहिले व म्हटले, "राम, मला माहीत होतं कीं तुझाच विजय होणार आहे ते! पण फक्त एकदाच, त्या दिशेला पाहा. जिच्यासाठीं तू ही स्पर्धा जिंकलीस, ती तुझ्या या विजयामुळें आनंदित झाली आहे कां? नीट लक्षपूर्वक बघ!"

रामने वळून चंपाकडे पाहिले आणि तिच्या चेहऱ्यावरची दाट निराशेची छाया त्याला स्पष्ट दिसली. तिचे मलूल हास्य पाहून तो एकदम खचला. त्याचा सारा उत्साह मावळला. सावकाश उठून तो भानुमंताजवळ आला. आणि धीम्या स्वरांत म्हणाला, "मला माझी चूक समजली आहे. मला माफ करावे आणि आमच्या चंपाला आपली राणी करावी."

भानुमंताने त्याच्या खांद्यावर हात ठेवला, आणि स्नेहभराने चंपाच्या पित्याकडे पाहून म्हटले, "हे कलियुग आहे. त्रेतायुगांतल्या गोष्टींना घट्ट पकडून अंधविश्वास जतन करणें हे केव्हांही उचित ठरत नाही. त्यांत कुणालाच समाधान मिळत नाही.

काळानुसार आपण आपले रिवाज थोडेसे तरी बदलायला लागतात. अशा नव्या योग्य पद्धतींना प्रोत्साहन देणे आणि लोकांना मार्गदर्शन करणें हे नेत्याचे कर्तव्य असते. आत्तापासूनच मुलींचे विवाह ठरवताना, नवरा गुणवंत, योग्य असा पाहून मगच विवाह निश्चित करायला हवा." असं म्हणून त्याने ते धनुष्य उचलून दूर फेंकून दिलं.

ही कहाणी सांगून वेताळ राजा विक्रमार्काला म्हणाला, "राजन्, भानुमंताच्या वागण्यांत आपण राजा असल्याचा गर्व स्पष्ट दिसून येतो. राम दुर्बळ होता, पण त्याच्यामधे आत्मविश्वास पुरेपूर भरला होता. त्याच्या जोरावरच त्याने विजयश्री मिळवली. पण भानुमंताने त्याबद्दल त्याचे जरादेखील कौतुक केले नाही, किंवा त्याची स्तुती केली नाही. रामनेही आपली चूक कबूल केली आणि पराजय स्वीकारला. मला तर वाटतं कीं रामची कांहीएक चूक झालेली नव्हती. तो राजाला पाहून घाबरला तर नव्हता ना? चूक नसताना त्याने चुकीची कबुली कां द्यावी? माझ्या शंकांची उत्तरें तुला माहीत असूनदेखील जर तू गप्प बसलास तर बघ. तुझ्या डोक्याचे तुकडे-तुकडे होतील.

विक्रमार्कने उत्तर दिलं, "भानुमंताने सांगितलंत ते योग्यच होतं, कीं लक्ष्मण जातीच्या कांही पद्धती अयोग्य व अन्यायी होत्या. मुलीच्या इच्छेविरुद्ध तिचा विवाह करणें हे सर्वस्वी अयोग्य होते. असल्या रूढी तो आज्ञा देऊन बंद करूं शकत होता. पण असं न करता त्याने त्या मुलींच्यावर कसा घोर अन्याय होऊं शकतो याचे प्रात्यक्षिक दाखवले. ह्यांत भानुमंताचा दिलदारपणा दृष्टीस येतो. त्याची विचारसरणी न्यायाला धरून आणि धर्माला अनुसरूनच आहे. त्यांत त्याचा अहंकार दिसतच नाही. आता रामकडे पाहूं. चंपाला तो पसंत नव्हता हे त्याला माहीत होतं. तरीही तिच्या भावनांची पर्वा न करता तो आपला विजय सिद्ध करुन दाखवण्यासाठीं मोठ्या विश्वासाने पुढें सरसावला. भानुमंताने स्नेहशील स्वरांत त्याला जे सांगितलं, ते त्याला पटलं व त्याने आपली चूक कबूल केली व राजाची क्षमाही मागितली. राजाचे एकमात्र उद्दिष्ट होते कीं त्या जातींत प्रचलित असलेल्या वाईट रूढी नष्ट करणें! हा हेतू सफल झाला. रामने क्षमा मागणे हा त्याचा पुरावा आहे. लक्ष्मणजातींतल्या लोकांमधें भानुमंताच्या शक्तिसामर्थ्याबद्दल शंका राहूं नये, म्हणून त्याने धनुष्य उचलले आणि दूरवर फेंकून दिले."

राजाचे मौन भंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित पुन्हां गायब झाला आणि झाडावर जाऊन बसला.

(लक्ष्मीगायत्रीच्या रचनेवर आधारित)



भारतीय दंतकथा - ८

# विद्वान बालकाकडून पित्याची सुटका



कोहोर हा एक विद्वान ऋषी होता. रोज सकाळीं स्नान करून वेदपठण करण्याचा त्याचा नेम होता. त्याचे पठण ऐकायला वाटेवरचे वाटसरू थांबून राहात. त्याचे गुरू मुनी उद्दालक यांची मुलगी सुमती ही त्याची पत्नी होती. तीही त्याचे वेदपठण ऐकत थांबायची.

एके दिवशी कोहोरला एक कोमल स्वरांतला हुंकार ऐकूं आला. त्याला वाटलं कीं त्याच्या पठणाला कुणीतरी दिलेली कौतुकाची पावती आहे. कुणाचा स्वर होता तो? त्याला समजेना. त्याच्या झोंपडीजवळून जाणाऱ्या एखाद्या व्यक्तीचा असेल. वेदांचे महत्व जाणणारे अनेक अभ्यासक जवळपास राहात होते.

कोहोरला तोच स्वर पुन्हां दोनतीन वेळा ऐकूं आला, पण त्याने त्याच्याकडे फारसे लक्ष दिले नाही. परंतु एक दिवस त्या आवाजाने एक सूचना केली ती ऐकून कोहोर चकित झाला. त्याच्या पठणांतली एक बारीकशी चूक त्या आवाजाने दाखवून दिली होती.

तो उभा राहिला आणि त्याने खिडकीतून बाहेर पाहिले. तिथें कुणीच नव्हते. त्याने आजूबाजूला पाहिले तर त्याची पत्नी सुमती हिच्याखेरीज तिथे कुणीच नव्हते.

"कोण बोललं आत्ता? तुझं नांव काय? कुठे आहेत तू?" त्याने विचारलं. पण त्याला उत्तर मिळालं नाही. त्याने आणखी सात वेळां तेच प्रश्न विचारले, पण कांही उपयोग झाला नाही. साहजिकच, त्याला राग आला.

"तू माझी चूक दाखवण्याचा उद्धटपणा करतो आहेस आणि आपला परिचय मात्र देत नाहीस! तू माणूस आहेस कीं आणखी कुणी अमानवी आहेस? तू कुणीही अस, पण माझ्या आठवेळां विचारलेल्या प्रश्नाला साधे उत्तरही तू दिले नाहीस म्हणून तुझे शरीर आठ जागी वांकडे होईल असा मी तुला शाप देतो." मुनीने सांगितले.

त्यानंतर लौकरच तो जनक राजाच्या दरबारांत जाण्यासाठी निघाला. त्याला कांही द्रव्यसाहाय्य हवे होते आणि त्यासाठी राजाकडे याचना करण्याचा त्याचा विचार होता.

राजदरबारांत आल्यानंतर त्याला समोरच वंदी नांवाचा एक पंडित इतर कांही विद्वानांबरोबर तत्वज्ञानाविषयी कांही वादविवाद करताना दिसला. पण वंदीची एक निराळीच अट होती. एखाद्या पंडिताने जर वंदीला वादविवादांत हरवले तर त्याला भरपूर बक्षीस मिळाले असते. पण जर तो पंडित हरला तर मात्र त्याने उर्वरित आयुष्य पाण्याखाली बांधलेल्या एका घरांत बंदीवान म्हणून राहायचे अशी शिक्षा होती. कोहोरला स्वतःच्या ज्ञानाविषयीं पूर्ण खात्री होती आणि त्यामुळें त्याने हे आव्हान स्वीकारले. दुर्दैवाने तो त्यांत हरला आणि त्याला त्या पाण्यांतल्या तुरुंगात पाठवण्यांत आले.

कोहोर जनकराजाकडे गेल्यानंतर कांही दिवसानंतर त्याची पत्नी सुमती प्रसूत झाली. परंतु तो मूलगा अव्यंग नव्हता. त्याचे अवयव वांकडे तिकडे होते. मातेच्या गर्भात असताना त्याने आपल्या पित्याचे वेदपठण ऐकलेले होते त्यामुळें त्याला वेदांचे उत्तम ज्ञान होते. आणि त्यानेच गर्भातून हुंकार दिला होता व पित्याच्या पठणांतली चूक दाखवून दिली होती.

त्याचे शरीर आठ ठिकाणी वांकडे होते, म्हणून त्याला सारेजण अष्टावक्र म्हणूं लागले.

पतीची दीन अवस्था पाहून सुमती अगोदरच दुःखी होती. त्यांत हा असा कुरूप मुलगा झाला



       

म्हणून ती जास्तच दुःखी झाली. परंतु जसा हा मुलगा मोठा होऊं लागला, तसा तिला त्याचा अभिमान वाटूं लागला. वैदिक कथापुराणांबाबतीत त्याचे ज्ञान आसपासच्या पंडितांपेक्षां खूपच चांगले होते.

जेव्हां अष्टावक्र बारा वर्षांचा झाला, तेव्हां तो राजा जनकाच्या दरबारांत जायला निघाला. गर्विष्ठ वंदीपेक्षां इतर पंडितही जास्त ज्ञानी असूं शकतात, हे सिद्ध करायची त्याची तीव्र इच्छा होती.

हा लहान मुलगा एका सर्वश्रेष्ठ विद्वानाला आव्हान देतो आहे हे पाहून जनकराजाच्या दरबारांतल्या मानकऱ्यांना मौज वाटली. कांहीजणांना वाटलं कीं याचे जसे शरीर वांकडे आहे, तशी याची बुद्धीही वेडीवांकडी असावी. परंतु जनकराजाने, जो स्वतः फार महान विचारवंत होता, हा लहान मुलगा सामान्य नाही हे जाणले होते. त्याने अष्टावक्राला वंदीबरोबर वादचर्चा सुरु करण्याची अनुमती दिली.

सुरवातीला वंदीला वाटलं होतं कीं या धिटाई दाखवणाऱ्या नि विचित्र दिसणाऱ्या मुलाला आपण अगदी सहज पराभूत करूं. परंतु लौकरच त्याच्या ध्यानांत आलं कीं तो मुलगा त्याला वारंवार निरुत्तर करतो आहे. दरबारांत उपस्थित असलेले सर्व विद्वान या लहान मुलाची विद्वत्ता पाहून आश्चर्यचकित झाले. त्यांना त्याचे फारच कौतुक वाटले. अखेरीस वादांत नाईलाज झाल्याने वंदीने आपला पराभव स्वीकारला.

"तुला काय बक्षीस हवंय ते माग!" राजाने सांगितलं. "माझ्या पिताश्रींना आपण लगेच मुक्त करावे एवढीच माझी इच्छा आहे."

त्याप्रमाणे आज्ञा झाली. मुनी कोहोर यांनी बंदीवासांतला काळ ध्यानधारणा, योग व चिंतनात घालवला होता. त्याच्यामुळें त्यांना नव्या सिद्धी प्राप्त झाल्या होत्या. त्यांनी आपल्या पुत्राला आशिर्वाद दिला आणि नदींत बुडी मारून येण्यास सांगितले. अष्टावक्राने त्याप्रमाणें केले. तो नदीतून बाहेर आला तेव्हां त्याचे वांकडे अवयव सरळ झालेले होते. आता तो एक देखणा तरुण दिसूं लागला.

कांही काळानंतर, अष्टावक्राची कीर्ती दूरदूरवर पसरली त्याने अष्टावक्र संहिता नांवाचा एक उत्कृष्ट ग्रंथ लिहीला.






## मनभावन ताल



जेव्हां पाऊस येत नाही आणि दुष्काळाची चिन्हें दिसूं लागतात तेव्हां तर्कशास्त्र गुंडाळून ठेवले जाते. पाऊस यावा म्हणून लोक निरनिराळे तोडगे करायला लागतात. ओरिसांत खेडूत बेंगई नानी नाचा (एका बेडकाचे नृत्य) ही अर्चना करतात. यामुळें पाऊस निश्चित पडेल अशी त्यांची श्रद्धा असते. गांवकरी एक बेडूक पकडून पाण्याने भरलेल्या मडक्यांत ठेवतात. ते मडके नंतर एका बांबूच्या मध्यभागीं अडकवतात. दोघेजण तो बांबू खांद्यावर घेतात व या पालखीमागे मुलेमाणसे जाऊं लागतात. गांवातल्या देवळासमोर ही मिरवणूक जाऊन थांबते व तिथें पूजा केली जाते. नंतर त्या बेडकाला नदींत किंवा तळ्यांत सोडून देतात. तोही पावसाच्या शोधांत निघणार

## मायाँगचे मायावी चेटूक

भोजनासाठी मासळी भाजून शिजवली व त्याचे छानसे कालवण करून वाढायला आणले. भुकेलेल्या पाहुण्याने भांड्यात वांकून पाहिले तो काय? शिजवलेली मासळी रश्शांत मस्तपैकीं पोहत होती. मायाँगच्या चेटकिणींबद्दल अशा अनेक गोष्टी सांगितल्या जातात, त्यांपैकीं ही एक आहे. मायाँग हे आसामांतल्या नौगांव जिल्ह्यांतले एक खेडेगांव आहे. कोणे एके काळी तिथें अनेक चेटकिणी व जादुगार राहात असत असं मानतात. शेंकडो वर्षांपूर्वी आसामच्या राज्यावर चालून येणाऱ्या सैन्यांतली शिपायांची फौज एकाएकी आसमंतात नाहीशी झाली, अशा ऐकीव कथा प्रचलित आहेत.





# सत्यवानची इच्छा

भानुमती आणि भूपती हे कोट्याधीश होते. बरीच वर्षे त्यांना मूलबाळ झाले नव्हते. त्यामुळें दोघेही फार दुःखी असत. पण एका साधूच्या सांगण्यानुसार त्यांनी शेजारच्या गांवातल्या विश्वनाथाच्या मंदिरात जाऊन पूजा केली. त्यानंतर भानुमतीला बाळ झाले. ते आता तीन वर्षांचे झाले होते. दुसऱ्या दिवशीं बाळाचा तिसरा वाढदिवस होता.

"उद्यां पहिल्या प्रथम आपण विश्वनाथाच्या मंदिरात जाऊं आणि पूजा करूं." मुलाला झोंपवताना भानुमती म्हणाली. "फक्त उद्यांच नव्हे, तर मुलाच्या प्रत्येक वाढदिवसाला आपण मंदिरात जरूर पूजा करूं आणि ईश्वराचा आशिर्वाद घेऊं." भूपती म्हणाला.

पतीपत्नींनी सकाळीं उठून स्नान केले व घोडागाडींत बसून ते मंदिराकडे पूजेसाठी निघाले. मंदिरात पूर्णकुंभाने त्यांचे भव्य स्वागत झाले. पुत्रजन्म झाल्यानंतर भूपतीने देवासाठी सोन्याचा मुकुट बनवला होता.

जेव्हां पूजेचा विधी चालला होता तेव्हां बाहेर ओरडा ऐकूं आला. भूपती व भानुमती डोळे मिटून ध्यानमग्न होते तेवढ्यांत त्यांचा मुलगा बाहेर गेला. मंदिरातल्या तलावांत कमळें होती, ती पाहून त्याला आनंद झाला. तो तलावाच्या पायऱ्या उतरून पाण्याकडे जाऊं लागला. पण त्याचा पाय घसरला आणि तो पाण्यांत पडला. त्याच वेळीं तलावाच्या कांठावर एक भिकारी आपले कपडे सुकवत होता. तो बाळ पाण्यांत बुडताना त्याने पाहिलं आणि लगेच त्याने पाण्यांत उडी मारली आणि बाळाला वांचवले.

हे कळताच भानुमती व भूपती धांवतच तिथे आले. भानुमतीने मुलाला घट्ट मिठी मारली आणि तिला रडूं कोसळले. कांठावरच्या त्या भिकाऱ्या- [illegible] गितले, "माझ्या मुलाला तू पुनर्जन्म दिला आहेस. तुझे उपकार मी कधीही विसरणार नाही. तुझं नांव काय? तुला हवं असेल ते माग." त्यावर भूपती त्याला म्हणाला, "माझ्या पत्नीने योग्य तेच सांगितलं आहे. बोल, तुला काय हवंय?"

भिकाऱ्याने मोठ्या नम्रतेने सांगितलं, "महाराज, माझं नांव सत्यवान आहे. मी असं कांहीही मोठं काम केलेलं नाही."

"तरीसुद्धां आमच्या समाधानासाठी तरी तू कांहीतरी माग." भूपतीने आग्रह केला.

सत्यवानाने कांही क्षण विचार केला आणि नंतर तो म्हणाला, "माझी बरेच दिवस एक इच्छा अपुरी राहिली आहे. मला किमान एक दिवस तरी असा घालवायचा आहे कीं त्या दिवशी सर्व लोक माझा मान राखतील. आपण एवढीच व्यवस्था करा. यापेक्षां दुसरं तिसरं मला कांहीही नको आहे."

"तुझी इच्छा जरूर पूर्ण होईल. त्यासाठीं तूही आमच्या गांवाला चल." भूपतिने सांगितलं.

त्यादिवशी भूपतीच्या मुलाचा वाढदिवस होता, म्हणून कितीतरी व्यापारी, मित्र, मुलाला आशिर्वाद व भेटवस्तू देण्यासाठी भूपतीच्या वाड्यावर येऊं लागले. तोपर्यंत भूपतीने सत्यवानाला नीटनेटके, शानदार किंमती कपडे घालायला दिले होते. जे कुणी पाहुणे येत होते, त्यांच्याशी सत्यवानाची ते ओळख करून देत होते. "हा सत्यवान माझा बालमित्र आहे. शहरांत त्याचा फार मोठा व्यापार आहे."

सत्यवान श्रीमंत व आदरणीय लोकांच्यामधें बसला होता. येणारे वांकून त्याला प्रणाम करीत होते. त्याला वाटलं कीं तो एक स्वप्नच पाहातोय.



त्या दिवशीं संध्याकाळीं, त्याच्या सन्मानार्थ एक मेजवानीचा समारंभ केला गेला. गांवातले सर्व धनवंत सहपरिवार त्या मेजवानीसाठी आले होते.

त्या सर्वांनी भूपतीबद्दल जो आदर नि स्नेहभाव दाखवला, तशीच भावना सत्यवानाबद्दलही दाखवली. त्यांच्यापैकीं कांहीजणांनी त्याला निमंत्रण दिले, "सत्यवानजी, आपण आमच्या घरी एकदा आलं पाहिजे हं! आम्हाला खुप आनंद होईल. विसरायचं नाही!"

हा सभारंभ मध्यरात्रीपर्यंत चालू होता. सत्यवानाने भूपतीने दिलेले चांगले कपडे बदलले आणि आपले जुने कपडे अंगावर चढवले. भूपतीला नम्रपणें नमस्कार करून तो म्हणाला, "महाराज, माझी आयुष्यांतली इच्छा आज पूर्ण झाली ती केवळ तुमच्या कृपेने! कुणीही मला 'अरे ए' म्हणून बोलवत, आणि मला झिडकारून टाकत असत.

- कपिल -










माझा अपमान होत होता. आयुष्यांत निदान एक दिवसतरी लोकांना मला आदराने वागवावे, मला नांवाने हाक मारावी, असे मला नेहमी वाटे. आज माझे हे स्वप्न साकार झाले. मी आज अगदी खुषींत आहे.''

भूपतीने हंसत विचारले, ''लोक तुझा तिरस्कार कां करीत होते? तुझा अनादर कां करीत होते ते तुला ठाऊक आहे कां?''

''कारण मी पडलो एक भिकारी. मी कांही आदर दाखवण्याच्या योग्यतेचा नाही ना!'' सत्यवान म्हणाला.

''हा तुझा गैरसमज आहे. तूं कांही आजारी बिजारी नाहीस. तू कष्ट करूं शकतोस. मंदिराच्या पायऱ्यांवर बसून तू भीक मागतोस, पण लोकांनी तुला सन्मानाने वागवावे अशी स्वप्नें पाहतोस? तुझे नांव घेऊन तुझ्याशी बोलावे अशी कां अपेक्षा धरतोस?''

त्या बोलण्यांतला गर्भितार्थ सत्यवानला समजला. ते सत्य दिसले तेव्हां तो म्हणाला, ''मला कांहीही काम येत नाही. तेव्हां मला कोण नि कसलं काम देणार?''

''सबबी सांगू नकोस. तू जर काम करायला तयार असशील तर मीच तुला काम देईन. उद्यांच तू ये आणि माझे कापडाचे दुकान आहे तिथें कामावर यायला लाग.'' भूपतीने म्हटलं.

''होय साहेब, मी उद्यांपासून कामावर यायला लागेन.'' असं म्हणून तो भिकारी तिथून निघून गेला. शेजारच्या दालनांत बसलेल्या भानुमतीने त्यांचे हे बोलणे ऐकले होते. ती भूपतीला म्हणाली, ''त्याने आपल्या एकुलत्या एक बाळाचे प्राण वांचवले आहेत. त्याला दहा लाख रुपये दिले तरी कमीच पडतील.'' ती आवेशाने म्हणाली.

त्यावर भूपती हंसून बोलला, ''आधी शांत मनाने मी काय म्हणतो ते ऐक. तो आळशी झालाय. प्रथम त्याचा इतक्या वर्षांचा आळस दूर करायला हवा. जेव्हां तो मेहनतीने काम करेल, तेव्हां कापडाचे दुकान त्याच्या स्वाधीन करूं. जो स्वतः कष्ट करीत नाही आणि इतरांवर विसंबून राहातो, तो कधी चांगला व्यापारी होऊं शकत नाही. आपली संपत्ती सुरक्षित ठेवूं शकत नाही.''

पतीचे दूरदर्शी धोरण पाहून भानुमती फारच खूष झाली.



# खास बातम्या

## समुद्रावर चार महिने!




अमेरिकेत राहाणार बासष्ट वर्षांचा व्हिएटनामी रिचर्ड वॅन फॅम, हा आपली शिडाची साधी होडी घेऊन दिवसभर नौकानयन करायला कॅलिफोर्नियामधल्या लाँग बीच बंदरातून निघाला. आणि त्याची बोट समुद्रांत वाहात गेली. तब्बल चार महिन्यांच्या ४००० किमी प्रवासानंतर अमेरिकन नौसेनेच्या लढाऊ जहाजाने त्याला कॉस्टा रिकाजवळ उचलले. इतके दिवस त्याने कसे काढले असतील असं तुम्हाला वाटलं ना? त्याने कासवें, आणि शिडाला गळ लावून पकडलेले मासे, यांच्यावर त्याने गुजराण केली.

## मंगळावर उंदीर

पृथ्वीवर आणि अंतराळांत केलेल्या अनेक चांचण्यांनंतर अजूनही मंगळावर मानव केव्हां जाऊं शकेल ते सांगता येत नाही. सध्यांच्या अंदाजाप्रमाणे, हा सहामहिन्यांचा प्रदीर्घ प्रवास असेल. शास्त्रज्ञांना अद्याप मानव त्या ग्रहावर राहू शकेल कां हे ठरवता आलेले नाही. कारण तिथें पृथ्वीपेक्षां ३८ टक्के




गुरुत्वाकर्षणाचा प्रभाव कमी आहे. ऑस्ट्रेलिया आणि अमेरिकेतले संशोधक मॅसॅच्युसेट्स् इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी (MIT) च्या सहकार्याने २००३ सालीं मंगळावर उंदीर पाठवण्याचा बेत करीत आहेत. त्यांच्या मते, जर उंदीर तिथें राहू शकले, तर मंगळावर मानवदेखील वस्ती करूं शकेल.



# दोघेही सारखेच!

भूषण गोधूली गांवचा राहाणारा! तो आजारी पडला आणि योग्य औषधोपचारानंतर बरा झाला. प्रकृति जास्त सुधारावी म्हणून कांही दिवस त्याने जवळच्या सीतापूर गांवी जाऊन राहावे असा सल्ला वैद्याने दिला. त्याप्रमाणें भूषण सीतापूरला गेला आणि आपल्या एका नातलगाच्या घरीं राहूं लागला. तिथें त्याची नीट देखभाल होऊं लागली.

दररोज संध्याकाळीं तो पायीं चालत बाजारांत जाऊं लागला. त्यावेळेला हवेंत गारवा असायचा आणि वातावरण सुखद असे. भूषण बाजारांतून डाळिंबे विकत घेऊन घरीं परत येई. वैद्याने सांगितलंच होतं कीं चालण्याने आणि डाळिंबे खाण्याने प्रकृति निश्चित सुधारेल.

पण भूषणला कांही कधी चांगली डाळिंबाची फळें मिळाली नाहीत. विकत घेण्यापूर्वी भूषण चांगली फळें निवडून घेत होता, पारखून उलट सुलट पाहून घेत होता, तरीही त्याला नेहमी खराब फळेंच मिळत होती. ज्याच्याकडून तो फळें खरेदी करी, त्या फळविक्याकडे तो दुसऱ्या दिवशी जातच नसे.

असा एक आठवडा उलटला. एका संध्याकाळीं जेव्हां भूषण बाजारांत हिंडत होता तेव्हां त्याला एका तरुणाचा जोरदार आवाज ऐकूं आला. तो ओरडून सांगत होता, "या बाजारांत मी जरी नवा असलो तरी मला फळांची चांगली पारख आहे. एकदा माझ्याकडची फळं तुम्ही घेतलीत कीं पुन्हां दुसरीकडे जाणारच नाही तुम्ही बघा!" भूषण त्या तरुणापाशी गेला. त्याने त्या तरुणाला म्हटलं, "प्रत्येक फळवाला हेच सांगतो, पण सगळेच एकजात लबाड आहेत." आणि भूषणने आपला अनुभव त्याला सांगितला.

"ते सारं कांही मला ठाऊक नाही, साहेब. मला तर वाटतं कीं इमानदारी, विश्वास याचंच दुसरं नांव म्हणजे व्यापार! मी चांगला माल घेऊन येतो आणि चांगलाच माल विकतो. एकदा किंमत सांगितली कीं त्यांत बदल नाही होत. एकवार माझ्याकडचा माल घेऊन तर पहा!" त्या तरुण विक्रेत्याने मोठ्या आश्वासक स्वरांत सांगितलं.

भूषणने त्याचं नांव विचारलं तेव्हां त्याने आपलं नांव ईश्वर असं सांगितलं. त्याची फळें चांगली दिसत होती, पण ईश्वरने भाव कमी केला नाही किंवा फळें निवडून घेण्यास परवानगी दिली नाही.

भूषणला त्याचे परखड बोलणें आवडले होते. ईश्वरची डाळिंबे खरोखरीच चांगली होती. ज्यांनी ती फळें खाल्ली त्या सर्वांनी सांगितले कीं इतकी गोड व चवदार फळें त्या बाजारांत आजपर्यंत कधीच आली नव्हती. त्यावेळेपासून भूषण ईश्वर-च्याच दुकानांतून फळें विकत घेऊं लागला. ईश्वरने देखील भूषणला कधीही खराब माल दिला नाही.

महिनाभरांत भूषणची प्रकृति बरीच सुधारली. त्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारची चमक दिसूं लागली. आता गोधूलीला परत जावे असे भूषणला वाटूं लागले. भूषण दुसऱ्या दिवशी सीतापूरहून निघणार होता. जाण्यापूर्वी आपल्याला चांगली फळें देणाऱ्या ईश्वरला भेटून



धन्यवाद द्यावे, जाण्यापूर्वी थोडी डाळिंबे खरेदी करावी म्हणून तो ईश्वरच्या दुकानावर गेला. पण तिथली फळें चांगली नव्हती. त्याला ती सगळी फळें खराब दिसत होती.

"तुम्हाला तसं अुगीचच वाटतंय साहेब, पण हे सोनं आहे, सोनं! जर मी तुम्हाला फसवलं तर उद्यां तुम्ही माझ्याकडे याल तरी कां?" असं म्हणत त्याने डाळिंबांचे वजन करायला सुरवात केली. भूषणला रोजच्यासारखे पैसे त्याला द्यायचे नव्हते. तो ईश्वरला म्हणाला, "माझ्या एका मित्राने रस्त्यांत हातउसने पैसे मागितले नि मी त्याला दिले. आत्ता माझ्याजवळ अगदी कमी पैसे आहेत. इतकी फळें देऊं नकोस."

"तुमचे पैसे थोडेच बुडणार आहेत? आज नसले तरी उद्यां मिळणार आहेतच. असतील तेवढे द्या, बाकीचे उद्यां पाहूं." ईश्वरने सांगितलं.

- निर्मल पांडे -

''पण बघ हं, माल चांगला असेल तरच रक्कम चुकती करीन.''

आपण गांवी परत जाणार आहोत हे भूषण त्याला सांगणार नव्हता. त्याला शंका होती फळें चांगली असली तरच बाकीची रक्कम तो आपल्या नातेवाईकांकडे देऊन ईश्वरला देण्यास सांगणार होता. फळें चांगली नसली तर मात्र पैसे द्यायचेच नाहीत असा त्याचा विचार होता. म्हणून ईश्वरने सांगितलेल्या रकमेपैकीं निम्मी रक्कम त्याने ईश्वरला दिली. भूषणने रात्रीं फळें सोलून पाहिली तर एकही फळ चांगले नव्हते. ''दिलेत पैसे तेवढे आता पुरेसे आहेत. जास्त पैसे द्यायची जरूर नाही'' भूषणने सोईस्कर विचार केला.

ईश्वरने आपल्याला फसवलंय या गोष्टीचं भूषणला फार वाईट वाटलं. ईश्वरच्या मनांत काय विचार असेल याची त्याला फिकीर नव्हती.

दुसऱ्याच दिवशी सकाळीं गोधूलीस जाण्यासाठी तो घोडागाडींत बसला. त्याच्याबरोबर आणखी तिघे प्रवासी होते. तो पाठीमागें बसला होता. कुणीतरी गाडी थांबवली.

''मी चालत जात होतो आणि पाय मुरगळला. मी गोधूलीजवळच्या गौरीपूरला उतरीन. कारण भाडें द्यायला माझ्याजवळ पुरेसे पैसे नाहीत हो. तुमच्या शेजारीं बसून राहीन.'' कुणीतरी गयावया करीत बोलत होता.

भूषणला तो आवाज ओळखीचा वाटला. गाडीवान चिडून म्हणाला, ''इतकं बोलतो आहेस, पण तू कोण ते कांही सांगितलं नाहीस!''

''माझं नांव ईश्वर. मी सीतापुरांत फळें विकत होतो. आमच्या गांवांतल्या एका बागाईतदाराने त्याच्या फळबागेची निगराणी करायचे काम मला दिले आहे, म्हणून मी पुन्हां गांवी राहायला चाललो आहे.'' ईश्वरने आपली ओळख सांगितली.

भूषणने मागे वळून पाहिले. ईश्वरनेही गाडींत चढताना भूषणला पाहिले. क्षणभर दोघांची नजरानजर झाली.

डाळिंबे चांगली नव्हती हे भूषण बोलला नाही. आणि उरलेले पैसे द्यायचे आहेत हे ईश्वरनेही सांगितले नाही. दोघेही बरमून निमूट बसले होते!







# हजार रुपयांची चोरी

चंपानगरमधें चोऱ्यांचे प्रमाण दिवसें दिवस वाढत होते. धनसेन कोतवाल चोरांना सामील आहे अशी अफवा लोकांमधे होती. त्यामुळें राजापर्यंत कोणतीही तक्रार पोंचत नसे. खरी गोष्ट काय ती जाणून घ्यावी म्हणून राजाने वेष पालटून रात्रीं शहरांत हिंडायचे ठरवले. त्या रात्रीं तो एका खानावळींत राहिला.

''तुमच्यापाशीं पैसे असले तर माझ्याजवळ सुरक्षित ठेवायला द्या. गांवात चोऱ्या फार होतात, म्हणून मी तुम्हाला सूचना देतो आहे.'' खानावळीच्या मालकाने राजाला सांगितले.

''माझ्याजवळच्या थैलींत हजार रुपये आहेत. पण ते मी माझ्या जवळच ठेवीन. म्हणजे चोराला कांही ते पळवता येणार नाहीत.'' राजाने निर्भयपणें सांगितले आणि तो आपल्या खोलींत निघून गेला. तिथें प्रवासी म्हणून आलेल्या चोराने ही गोष्ट ऐकली. त्याच रात्रीं त्या चोराने राजाच्या खोलींत शिरुन ती थैली पळवली आणि तो चोर ती थैली घेऊन पसार झाला.

सकाळीं उठल्यानंतर ही गोष्ट राजाच्या लक्षांत आली. त्याने खानावळमालकाला सांगितले, ''माझी थैली चोरीला गेली आहे. मी एका महत्वाच्या कामासाठी बाहेर जातो आहे. रात्रीं उशीरा परत येईन. तोपर्यंत तुम्ही कोतवालाकडे तक्रार करा. माझी थैली जर परत मिळाली तर मी त्याला चांगले बक्षीस देईन असंही सांगा!''

त्यावर तो खाणावळवाला म्हणाला, ''अहो, या देशाचा राजा फार चांगला आहे, पण हा कोतवाल दुष्ट आहे, म्हणून मी तुम्हाला अगोदरच सांगितलं होतं. प्रवाशांचे पैसे सुरक्षित ठेवण्यासाठी

- श्रीरामकमल -



माझ्याकडे पहारेकरी आहेत. पण प्रवाशांच्या जवळ असलेले पैसे मी कसे सांभाळणार? म्हणून कोतवालाकडे तक्रार केली ना, तरी त्याचा कांही उपयोग होणार नाही.''

''या सगळ्या अफवा असतात! कोतवालावर माझा पूर्ण विश्वास आहे. मी जसं सांगतोय, तसं तुम्ही करा.'' राजाने गंभीरपणे सांगितलं आणि तो तिथून निघून गेला.

रात्रीं पुन्हां वेष पालटून राजा खानावळींत परत गेला. त्याला पाहून खानावळवाल्याने कुत्सितपणें हंसून म्हटलं, ''मी कोतवालाकडे फिर्याद केली होती, पण कांही उपयोग झाला नाही.''

राजा मुकाटचाने आपल्या खोलींत गेला. थोड्या वेळानंतर एक अपरिचित व्यक्ती राजाच्या खोलींत येऊन म्हणाली, ''तुम्ही खोटारडे आहात!''

आश्चर्यचकित होऊन राजा त्याला म्हणाला, ''मी तुम्हाला प्रथमच पाहातो आहे. मी खोटा आहे हे तुम्हाला कसं कळलं?''

''काल रात्रीं तुमची थैली मीच चोरली होती. तशी दिसायला चांगली जाडजूड दिसत होती. पण त्यांत होती मातीची डिखळें नि दगडगोटे! आणि तुम्ही कोतवालाकडे तक्रार करता कीं तुमचे हजार रुपये चोरीला गेले म्हणून?''

राजा त्याच्याकडे निरखून बघत म्हणाला, ''तू चोरी केलीस ते अगदी बेडरपणें सांगतो आहेस मला!''

''हे पहा, गप्पा मारायला कांही आत्ता मला वेळ नाही. तुम्हाला प्रथम माझ्याबरोबर कोतवालाच्याकडे यायला हवं आणि तिथे तुम्ही सांगितलं पाहिजे कीं त्या थैलींत फक्त शंभर रुपयेच होते म्हणून!''

''आणि जर मी तसं सांगितलं नाही तर?'' राजाने विचारलं.

चोराने झटकन कमरेला खोंचलेला सुरा काढला आणि राजाला दाखवत तो म्हणाला, ''नाही सांगितलंत तर तुमच्या अंगावर जखमा दिसूं लागतील.''

राजाने चपळाईने त्याचा हात घट्ट पकडला व दाबून हातांतला सुरा खाली पाडला. नंतर त्याचे दोन्ही हात मागे धरुन बांधले आणि राजा म्हणाला, ''चल, आता तुला कोतवालाकडे घेऊन जातो नि त्याच्या स्वाधीन करतो.''

''ठीक आहे, करा मला कोतवालच्या स्वाधीन, पण तुमच्या थैलींत हजार रुपये नव्हते नि फक्त शंभरच रुपये होते हे मात्र तुम्ही



कोतवालाला सांगितलंच पाहिजे. नाहीतर तो मला जिवंत सोडणार नाही.'' चोराने रडवेल्या सुरांत म्हटलं.

''तू चोरी केल्याबद्दल पकडला गेला आहेस पण त्याची तुला भिती नाही. माझ्या थैलींत किती पैसे होते त्याचीच तुला जास्त काळजी वाटते. हे तुझं वागणं मला विचित्र वाटतंय.'' राजा म्हणाला.

चोराने एक दीर्घ सुस्कारा टाकून म्हटले, ''मी चोर आहे हे खरं, पण तरीही मी प्रामाणिक आहे हे कोतवालाला पटलं पाहिजे. मी जी थैली चोरली होती, त्यांत फक्त शंभरच रुपये आहेत असं म्हणून त्याने माझी पाठ चाबकाने फोडली. तुम्हाला खरं वाटत नसेल तर माझी पाठ बघा जरा!''

राजाने पाहिलं तर खरोखरच त्याच्या पाठीवर चाबकाचे वळ होते.

''कोतवाल आपलं काम नीट करतोय तर. चोरी केल्याच्या अपराधाबद्दल तुला शिक्षा ही व्हायलाच हवी'' राजाने चोराला म्हटलं.

''साहेब, तुमचे शंभरच रुपये गेले आहेत ना? मी तुम्हाला दोनशे रुपये देतो. तुम्ही कोतवालाला खरं काय ते सांगा. माझ्या प्रामाणिकपणाबद्दल त्याला शंका आली तर माझे जगणें अशक्य होऊन बसेल. अहो, चोरी केल्यानंतर मी कोतवालाकडे थैली घेऊन गेलो आणि त्याला सांगितले कीं थैलींत शंभर रुपये आहेत. नंतर त्यांतले अर्धे रुपये त्याला दिले आणि मी परत गेलो. पण नंतर खानावळीच्या मालकाने हजार रुपये चोरीला गेले आहेत अशी जेव्हां फिर्याद दाखल केली, तेव्हां कोतवालाने मला बोलावून घेतले आणि उरलेले चारशेपन्नास रुपये मी द्यावेत म्हणून मला चाबकाने मारले. माझी ईमानदारी सिद्ध व्हावी म्हणून मी तुमच्याकडे आलो आहे.''

आता सारा प्रकार राजाच्या लक्षांत आला. त्याने आपली खरी ओळख सांगितली आणि शिपाई पाठवून कोतवालाला कैद केले. राजा त्याला म्हणाला, ''तू चोरांकडून प्रामाणिकपणाची अपेक्षा करतोस, पण तुझ्यांत प्रामाणिकपणा मात्र बिलकूल नाही. कांही काळ तू तुरुंगात इतर चोरांच्याबरोबर राहा आणि त्यांच्याकडून प्रामाणिकपणा शीक.''

त्यानंतर चंपानगरमधल्या चोऱ्या बंद झाल्या.



# भारताची ओळख

भारत देश पंचावन्न वर्षांपूर्वी स्वतंत्र झाला. आपली लोकशाही जरी असली, तरी देशांत परिस्थितीचे चढउतार सतत होत राहिले आहेत. त्यापैकीं कांही गोष्टींची उजळणी या महिन्याच्या कोड्यांत आपण करूं या.

१. राष्ट्रपित्याची हत्या ३० जानेवारी १९४८ रोजी झाली. त्यापूर्वी दहा दिवस अगोदरच प्राणघातक प्रसंगातून ते बांचले होते. तो प्रसंग कोणता?

२. भारतीय सेनेसाठी १५ जानेवारी १९४९ हा सुवर्णाक्षरांत लिहीण्याजोगा दिवस होता. त्या दिवसाचे महत्त्व काय?

३. १९५१ ऑक्टोबर ते १९५२ फेब्रुवारीपर्यंत पहिल्या सार्वत्रिक निवडणुका घेतल्या गेल्या. या निवडणुकींत किती पक्षांनी निवडणूक लढवली? त्यापैकीं राष्ट्रीय पातळीवर किती पक्ष होते?

४. कोणत्या अर्थमंत्र्यांनी सर्वांत जास्त वेळा अंदाजपत्रक सादर केले? किती वेळा सादर केले होते?

५. भारतांतल्या प्रसिद्ध कुंभमेळ्यांत प्रथमच गर्दीमुळें चेंगराचेंगरी झाली. ही घटना केव्हां घडली? यांत कितीजण सांपडले होते?

६. भारतरत्न प्रथम केव्हां दिले गेले? याचे पहिले मानकरी कोण होते?

७. १९५१ मधें दिल्लींत प्रथमच आशियाई खेळांच्या स्पर्धा झाल्या. भारताला पहिले सुवर्णपदक कुणी मिळवून दिले? कोणत्या स्पर्धेमधें?

८. पहिले भारतीय कार्डिनल कोण होते? त्यांचा दीक्षाविधी केव्हां झाला?

९. १९४८च्या मे मधें भारतांतल्या राज्यांचे सर्वांत मोठे संघ राज्य निर्माण झाले होते. त्याचे नांव काय? त्याची राजधानी कोणती होती?

१०. १९५० च्या एप्रिल व डिसेंबर या महिन्यांत भारतांतले दोन धार्मिक नेते दिवंगत झाले. त्यांची नांवे सांगा.

*(उत्तरें पुढील अंकीं)*

## नव्हेंबरच्या कोड्याची उत्तरें

१. एका पित्याची कन्येस पत्रें
२. १४ ऑगस्ट १९४७ची मध्यरात्र - लोकसभेचे मध्यवर्ती सभागृह - एका स्वतंत्र राष्ट्राचा उदय.
३. विजयालक्ष्मी पंडित, संयुक्त प्रांत (उत्तर प्रदेश).
४. चूक
५. वानरसेना. राष्ट्रीय नेत्यांचे संदेश आपणे व पोंचवणे ही कामगिरी ही मुलें करीत असत.
६. भारत व पाकिस्तान लढाईतला विजय (३ ते १६ डिसेंबर)



# गणेश पुराण

गणेशचतुर्थीच्या दिवशी संध्याकाळी विघ्ननाश गणनायक आपल्या दांतासारखी पांढरी शुभ्र व बांकदार असलेली चंद्राची कोर पहायला निघाला. वर चंद्राकडे डोळे लागले होते आणि पाय पुढे चालू होते. त्यावेळी तो पंचपक्वान्ने जेवलेला होता. बरोबर उंदीर होताच.

असं सांगतात की द्वितीयेचा चंद्र हे गणेशाचे चिन्ह असते. गणपतीच्या कपाळावर चंद्राच्या कोरेसारखे आडवे गंध असते ते चवथीच्या चंद्रासारखेच तर असते. म्हणूनच कीं काय त्याला भालचंद्र हेही एक नांव आहे.

चालत असतां गणपतीच्या पायाच्या अंगठ्याला एका दगडाची ठेंच लागली व तो तोंडघशी पडला आणि त्याचे पोट फुटले. त्यासरशी त्याने खाल्लेले सर्व मोदक लाडू व इतर पक्वान्ने जमिनीवर विखुरली. ते पाहून आकाशांतला चंद्र खदखदा हसला. देव धावले व त्यांनी एका मोठ्या सापाचे कातडे आणून त्याने गणपतीचे पोट शिवले.

गणपतीची आई पार्वती, तिला चंद्राचा राग आला. तिने त्याला शाप दिला की गणेश चतुर्थीला कोणी चंद्राचे तोंड पाहिले तर त्याच्यावर खोटा आळा येईल. त्या दिवसापासून लोक गणेश-चतुर्थीच्या दिवशी चंद्र दृष्टीस पडू नये याची काळजी बाळगूं लागले.

द्वापार युग सुरू झाले. श्रीकृष्ण वसुदेव व देवकीच्या पोटी जन्माला येऊन यशोदेच्या घरी गोकुळांत वाढू लागला. पुढे त्याच्या ज्या लीला झाल्या त्याची लोकांना माहिती आहेत, उदाहरणार्थ पूतनावध, शकटासुर व तृणावर्त राक्षसांचा संहार इत्यादि.



एकदा गणेशचतुर्थी होती. यशोदा कपिला गाईचे दूध काढीत होती. श्रीकृष्णाने आईच्या पाठीवर चढून कासंडीतल्या दुधांत चंद्राचे प्रतिबिंब पाहिले आणि टाळ्या वाजवून म्हणाला - "आई! तो बघ चांदूमामा!"

यशोदाने दचकून मुलाला पाठीवरुन उतरविले व पोटाशी धरून म्हणाली - "कान्हा, हे कारे केलेस? त्या मूर्खाचे तोंड तू आज कां पाहिलेस? तुझ्यावर विनाकारण खोटा आळ येईल ना!"

"खोटा आळ म्हणजे ग काय आई?" कृष्णाने विचारले.

"तुला लोक चोर म्हणतील किंवा असाच खोटा आरोप तुझ्यावर लावतील!" यशोदा म्हणाली.

"आई, तू उगाच मनाला लावून घेतेस बघ! मी दूध, दही, लोण्याची चोरी केली, तर तो खोटा आरोप होईल का ग?" कृष्णाने खट्याळपणाने विचारले.

"लबाडा, तुझ्या तोंडात एवढे ब्रह्मांड कोठून आलं रे?" असे म्हणत यशोदेने बोटे मोडून त्याची दृष्ट काढली.

"आई, तू कधी ब्रह्मांड पाहिले आहेस कां?" कृष्णाने विचारले.

"ब्रह्मांडाची गोष्ट राहू दे रे, परंतु तू मोठा झाल्यावर तुझ्यावर खोटा आळ लोक लावतील." असे म्हणत आईने प्रेमाने त्याचा गालगुच्चा घेतला.

"तर मग मोठेपणी मी गणेशचतुर्थीला चंद्राने तोंड पाहिले पाहिजे, नाही का, आई?" कृष्णाने पुन्हां विचारले.

"मोठा झाल्यावर गणेशचतुर्थीला चंद्राचे तोंड पाहिलेस तर आणखी मोठा आळ येईल." यशोदा म्हणाली. नंतर स्वतःशीच पुटपुटली - "हे विघ्ननाश गणनायका! माझ्या भोळ्या मुलाने चुकून चंद्राचे प्रतिबिंब पाहिले आहे. त्याला क्षमा कर!"

दुसऱ्या दिवशी बलराम धांवत पळत येऊन आईला सांगू लागला - "आई, आई! छोटा कान्हा माती खातो आहे, बघ! अगदी खरं! मी खोटं नाही सांगत. जाऊन त्याचं तोंड तर पहा!" म्हणून यशोदा धावत कृष्ण माती खात होता तेथे गेली.

कृष्ण त्यावेळी मातीची ढेकळें जमा करीत होता. यशोदेने जवळ जाऊन कृष्णाचा कान धरला व म्हणाली - "उघड तोंड, पाहूं दे, किती माती खाल्लीस?"

"आई, मी नाही माती खाल्ली, कोणीतरी खोटी कागाळी केली असेल. कालच तू म्हणाली होतीस ना, की माझ्यावर खोटा आळ येईल म्हणून! मी मातीचे मोदक आणि लाडू करणार आहे बघ. मातीच्या गणपतीला मातीचे मोदकच आवडतील



नाही का?" कृष्णाने आईला समजावून सांगण्याचे सोंग केले.

यशोदाने आपल्याच थोबाडीत मारून घेऊन विघ्ननाशाची माफी मागितली व म्हणाली - "बाळा, असं बोलू नये. मातीचा असला किंवा दगडाचा असला तरी देव देवच असतो बाबा! देवा रे देवा! चूक झाली माझ्या पोराची, मुलाच्या वटवटीवर ध्यान देऊ नकोस!" म्हणत यशोदेने डोळे मिटून देवाची विनवणी केली.

"आई, तर मग तू साधे आणि तळून खूप मोदक तयार कर. पाहतो मी की हा लंबोदर किती मोदक खातो ते आणि त्याने खाल्ले नाहीत तर त्याच्या तोंडात कोंबून घालीन!" कृष्ण म्हणाला.

"पुरे झाली तुझी वटवट, अगोदर तोंड उघड पाहूं!" असे म्हणत डोळे वटारून यशोदेने कृष्णाकडे पाहिले. तेव्हां कृष्णाने 'आ' करून आईला दाखविला.

तिने कृष्णाच्या तोंडात पाहिले आणि घामाघूम झाली. तिची बोबडीच वळल्यासारखे झाले. दचकून मागे सरकली. तिला कृष्णाच्या तोंडात ब्रह्मांड दिसले. सूर्य, चंद्र व नक्षत्रमंडळ सर्व दिसले. त्याचबरोबर तिच्या पाठीवर चढून दुधाच्या कासंडीत चंद्राचे प्रतिबिंब पाहणारा कान्हापण दिसला. स्वप्न पाहिल्यासारखे झाले यशोदेला! तिने आपल्या चारी बाजूला दृष्टी फिरवून पाहिले, कोणी देवाने आपली माया तर पसरविली नाही? यशोदेला त्या स्थितीत पाहून गोकुळातली मुलें तिच्या चारी बाजूला घोळका करून उभी राहिली. खांबाच्या आड उभा राहून बलराम हंसत होता.

कृष्ण यशोदेच्याकडे भोळ्या नजरेने पहात



विचारूं लागला - "आई, तुला माझ्या तोंडात माती दिसली का ग? पहा, पुन्हा पाहिजे तर नीट पहा!" यशोदेला त्याच्या तोंडात मातीच काय, सर्व विश्वच दिसले होते. स्वतः कृष्ण मुरली वाजवीत होता, व गणनायक तांडवनृत्य करीत होता. कृष्ण एका काळ्याकुट्ट नागाच्या फणेवर नृत्य करीत होता. नाग कृष्णाला विळखा घालून बसला होता. यशोदा ते दृश्य पाहून बेशुद्ध होऊन पडली. तिने डोळे उघडून पाहिले तेव्हां तिच्या चारी बाजूला गोपिकांचा घोळका उभा होता. तिने त्यांना विचारले - "मला असे काय होते आहे?"

तिला कांही आठवतच नव्हते. तिने काय पाहिले व ती बेशुद्ध होऊन कां पडली कांहीच आठवेना. गवळणी म्हणाल्या - "काय ग, झालं तुला? आम्हाला सुद्धा कांही कळत नाही! आमच्या घरांत चोरी झाली आहे आणि चोरी करणारा दुसरा तिसरा कोणी नसून तुझा लाडका पोरगा आहे. लोणी, साय,



दही कांही राहू देईल तर ना! तो आपल्या सवंगड्यांना व माकडांना वांटून देत असतां आम्ही आपल्या डोळ्यांनी पाहिले आहे.''

यशोदा चिडली व म्हणाली - ''काय म्हणता, आमच्या घरांत दही, लोणी नाही कीं काय, तुमच्या घरांत शिरायला? अर्ध्या गोकुळात मिळणार नाही इतकं दुभतं आहे माझ्या घरांत.'' असे सांगून तिने सर्व गोपींना पळवून लावलं. त्याचवेळी कृष्ण तेथे मांजराच्या पावलांनी आला आणि म्हणाला - ''आई, काय ग, या गवळणी कशाला आल्या होत्या?''

''मी सांगितलं होतं ना, अगदी तसंच झालं, बघ या सर्व तुझ्यावर दही, लोणी चोरणारा म्हणून आरोप लावीत होत्या.'' यशोदा म्हणाली.

''आई, मग खोटा आळ माझ्यावर नाही आला, मी सुटलो. कारण त्या म्हणाल्या ते सर्व खरं होतं!'' कृष्ण म्हणाला.

तेव्हां मात्र यशोदेला राग आला. तिने कृष्णाला धरून एका उखळीला बांधून ठेवले.

कृष्ण ती उखळ ओढीत यमलार्जुन नांवाच्या जोड झाडाच्या मध्ये गेला. जोराने उखळी ओढू लागला आणि ती दोन्ही झाडे मुळांपासून उपटली गेली. त्या झाडांच्या मुळांतून दोन शापदग्ध गंधर्व निघाले व त्यांचा उद्धार केल्याबद्दल कृष्णाची स्तुती करीत आकाशांत उडून गेले.

एक वर्ष लोटलें. पुन्हां गणेशचतुर्थी आली. नंदाने गणपतीची एक मूर्ती घडवून तिला विविध रंगांनी रंगविले. यशोदेने पिठीचे मोदक तयार करून त्यांवर खूप तूप घातले.

नैवेद्याची सर्व तयारी करून ताटे पूजेच्या खोलींत नेऊन ठेवली आणि बाहेरून दार बंद करू ठेवले.

कृष्ण यशोदेच्या नजरेआड त्या पूजेच्या खोलीत शिरला आणि आंतून दार लावून घेऊन नैवेद्यातले मोदक वगैरे खाद्य पदार्थ गणपतीसमोर ठेवून बडबडू लागला - ''घेरे बाप्पा, पोटभर खा, बर का!''

गणपतीच्या मूर्तीने सोंड पुढे करून मोदक उचलले व म्हणाली - ''कृष्णा, मी तुझ्या हातांत जे कांही देईन ते सुद्धां खाल्ले पाहिजेस.'' गणेशपुराणातील हे पर्व अपूर्वच होय! गणपतीने कृष्णाला आपल्या हाताने खूप भरविले. ताटेच्या ताटें एकामागून एक रिकामी होऊ लागली.

यशोदा पूजेच्या खोलीकडे आली आणि दाराच्या फटीतून आंत घडत असलेले सर्व कौतुक करून पाहू लागली. ती तर चकितच झाली. तिच्या सर्वांगाला घामच सुटला. नंतर स्वतःला सांवरून ती मनांत म्हणाली - ''बाई, बाई! मला तर भ्रम



झाल्यासारखं वाटतं आहे. माझ्या डोळ्यांसमोर हे सर्व काय घडत आहे? देवाची माया काय विचित्र आहे!'' असे म्हणत तिने दार उघडले आणि आंत गेली.

परंतु गणपतीची मूर्ती मात्र जगाच्या जागी स्थिर होती. सर्व ताटे रिकामी झालेली होती. कृष्ण चकित होऊन आईकडे पहात होता.

''अरे, खादाड पोरा, गणपतीसाठी तयार केलेला नैवेद्य तूच सर्व खाऊन टाकलास?'' असं म्हणत यशोदेने कृष्णाच्या पाठीत एक हलकासा धपाटा मारला. कृष्ण जोराने रडत कालिंदी नदीच्या डोहाजवळ पळत गेला. त्याच्या पाठोपाठ यशोदा व गोकुळांतले सर्व लोक यमुनातीरी धावले.

कालिंदीच्या डोहांतला कालिया नाग गोकुळच्या लोकांना फार त्रास देत होता. कृष्णाने नदीवर वांकलेल्या एका झाडावरुन डोहांत उडी टाकली आणि नेमका कालियाच्या अंगावरच पडला. नागाने त्याला विळख्यांत धरण्याचा प्रयत्न केला. परंतु कृष्ण त्याच्या फडांवर चढून नृत्य करू लागला. अशा तऱ्हेने कालियामर्दन झाले. कालियासुद्धा शाप मुक्त झाला. त्याने आपल्या मुलींना वासुकी नागाकडे पाताळ लोकांत पाठवून दिले आणि स्वतःकालियारूप सोडून विघ्न रूप धारण केले आणि विघ्नेश्वराचा सेवक झाला.

आपल्या मुलाला घेऊन यशोदा घरी आली तर तिला काय दिसले? पूजेच्या खोलीत ताटे नैवेद्याच्या



पदार्थांनी भरलेली आहेत आणि कृष्णाच्या पाठीवर चापटीचे वण स्पष्ट दिसत होते. ते पाहून यशोदा स्वत:लाच शिव्या देऊ लागली - ''माझे हात कां नाही तुटले! मी केवढी पापीण! माझ्या अंगात कोण राक्षसीण शिरली होती! मी माझ्या लाडक्याला विनाकारण मारलं!''

मध्येच कृष्ण हळूच म्हणाला - ''आई, पूजा करना! उशीर होतो आहे!'' नंद यशोदेने कृष्णाकरवीच पूजा करविली आणि नैवेद्यांतला प्रसाद साऱ्या गांवाला वांटला. सर्व गवळी व गवळणी म्हणत होते, ''हा प्रसाद अमृतासारखा गोड आहे!''

हळूंहळूं कृष्ण मोठा झाला. एकदा इंद्राने रागावून मुसळधार वृष्टी केली. कृष्णाने गोवर्धन पर्वत धारण करून गाय, गोपी व गोपालांचे रक्षण केले आणि इंद्राचे गर्वहरण केले.

एकदां कृष्ण गोवर्धन पर्वताजवळ गाई चरायला घेऊन गेला होता. तेव्हां एक म्हातारा आपल्या कांखेत ढोल घेऊन आला व म्हणाला - ''येथे कृष्ण नांवाचा मुलगा आहे असे ऐकतो. तो छान मुरली वाजवितो, मी त्याची मुरली ऐकायला आलो आहे. तो कोठे आहे सांगाल का?''

कृष्ण म्हणाला - ''मीच तो मुरलीधर कृष्ण! तुम्ही कोणीतरी थोर मृदंगवादक दिसता. कोण आपण?'' कृष्णाने हात जोडून विचारले.

''मला मृदंगकेसरी म्हणतात मी दक्षिणी देशां-तला राहणारा आहे, मथुरेला जातो आहे. कंसाने धनुर्यज्ञ सुरू केला आहे. मी त्यावेळी आपले मृदंग वाजवून दाखवावे म्हणून जातो आहे!'' तो म्हातारा म्हणाला.

त्या म्हाताऱ्याच्या पायांत रत्नखचित कडे होते. हातांत सिंहाकृती आभूषणे होती. गळ्यांत सोन्याच्या मण्यांची माळा होती आणि कानांत मोठमोठी सुवर्ण कुंडले होती. मृदंगावर नवरत्न व सुवर्ण पदकें वसविलेली होती.

कृष्ण ते पाहून चकित झाला व म्हणाला - ''अहो, मी एक सामान्य गुराखी आहे. माझी मुरली ही साध्या वेळूची केलेली आहे. तुमच्या दक्षिणेकडच्या लोकांना तालस्वराचे अद्भुत ज्ञान असते. परंतु मी एक सामान्य गुराख्याचा पोरगा आहे व मुरलीवर साधी गाणीं वाजवितो. गुरांची राखण एवढाच काय तो माझा धंदा आहे.''







# डोळे उघडले

राम आणि सोम हे दोन भाऊ कटनी नांवाच्या गांवात राहात होते. घरच्या संपत्तीवरून दोघांमध्ये एकदा भांडण झाले. पण गांवातले कांही लोक रामच्या बाजूने बोलत तर कांही सोमच्या बाजूने बोलत. लोकांच्या या दुलर्फी बोलण्याने दोघेही अगदी कंटाळून गेले. त्यांच्यामधले भांडण कमी करून त्यांची समस्या दूर करण्याऐवजी ती ते अधिकच गुंतागुंतीची व अवघड करत होते.

दोघेही विचारांत पडले की आता हा प्रश्न कसा सोडवायचा? त्याचवेळी कमल नांवाचा एक पशूंचा दलाल त्यांच्या गांवात आला. तो त्यांना म्हणाला, ''मी माझ्या धंदाच्या निमित्ताने गांवोगाव फिरत असतो. इथून एक कोस दूर नागार म्हणून एक गांव आहे. तिथे धर्मवीर नांवाचे एक गृहस्थ राहतात. ते अतिशय सरळ व योग्य न्याय देतात. तुम्ही त्यांच्याजवळ जा.''

राम व सोम नागार गांवी पोहोचले. गांवाच्या वेशीपासून बरेच आंत गेल्यानंतर त्यांना एक शेतकरी दिसला. त्याला त्यांनी विचारले, ''आम्हाला धर्मवीर नांवाच्या व्यक्तीला भेटायचे आहे, त्यांचे घर कुठे आहे ते सांगू शकाल का?''

त्यावर आश्चर्याने तो म्हणाला, ''काय, त्या बहिऱ्याला भेटायला आलाय? ठीक आहे, सरळ पुढे जा.'' असे म्हणून तो निघून गेला. शेतकऱ्याच्या त्या उत्तरामुळे दोघे भाऊ स्तंभितच झाले. थोडे पुढे गेल्यानंतर रस्त्याच्या कोपऱ्यावर एक बाई भेटली. त्यांनी तिला पुन्हां धर्मवीरचा पत्ता विचारला.

''त्या आंधळ्या धर्मवीरचा पत्ता विचारताय होय? ते समोर नारळाचे झाड आहे ना, तिथपर्यंत जा, मग उजवीकडे वळा.'' असे म्हणून तीही चालती झाली. तिथपर्यंत पोहोचल्यानंतर त्यांना आणखी एक बाई दिसली, तिला त्यांनी विचारले.

ती त्या दोघांकडे विचित्रपणे पाहात म्हणाली, ''त्या मुक्या धर्मवीरशी तुमचे काय काम आहे? कांही कां असेना, मला काय

- ईश्वर -



करायचंय? समोर ते देवीचं देऊळ आहे ना, त्याच्या बाजूलाच आहे." असे म्हणून ती झट्कन् निघून गेली.

त्या तिघांच्या उत्तराने हे दोघे भाऊ चक्रावून गेले. एक आंधळा म्हणतो, एक बहिरा म्हणतो, एक मुका म्हणतो आणि कमलने तर तो सच्चा व न्यायप्रिय म्हणून सांगितले होते. इथवर आल्यावर आता खऱ्याखोट्याची छाननी करूनच जाऊं, असा त्यांनी विचार केला. धर्मवीरच्या घरासमोर उभे राहून त्यांनी मोठ्याने हाका मारल्या, "धर्मवीरजी, धर्मवीरजी."

"कोण आहे?" असे म्हणत एक वयस्कर गृहस्थ बाहेर आले. "आम्हाला धर्मवीरजींना भेटायचं आहे." दोघांनी उत्तर दिले.

"मीच धर्मवीर. सांगा, काय हवं होतं तुम्हाला?" धर्मवीर म्हणाला. दोघे भाऊ अवाक् होऊन पहातच राहिले.

रामने स्वतःला सावरत म्हटले, "एक शेतकऱ्याने सांगितले की आपण बहिरे आहात, आपल्याला ऐकू येत नाही."

"हो, हो म्हटलं असेल. गांवातले शेतकरी मी पुन्हां तलाव खोदावा म्हणून हट्ट धरून बसले आहेत पण ते काम माझ्याने झालं नाही. म्हणून माझ्यावर ते नाराज आहात, त्यामुळेच कदाचित् त्याने तसे सांगितले असेल." धर्मवीर म्हणाला.

"एक बाई तर म्हणाली कीं तुम्ही आंधळे आहात." सोम म्हणाला.

"हो, हो अवश्य म्हणाली असेल. माझ्या घरावरच्या छताची कौले उडून गेली आहेत. ती मी परत बसवावीत असं तिला वाटतं. मी ते केलं नाही म्हणून मला आंधळा म्हणाली असेल." धर्मवीर म्हणाला.

"आणखी एक बाई तर म्हणत होती की तुम्ही मुके आहात, तुम्हाला बोलता येत नाही." राम म्हणाला, "गांवातली कांही पुरुष मंडळी त्यांच्या बायकांना त्रास देतात आणि त्या बायका माझ्या घरी येऊन आपल्या नवऱ्यांविषयी तक्रार करीत बसतात. त्यांना सर्वांना वाटतं की मी त्यांच्या नवऱ्यांना सुधारायला हवं. पण मी ते करूं शकलो नाही. म्हणून त्या बिचारीने मला मुका म्हटले असेल." धर्मवीर म्हणाला.

दोघा भावांनी सांगितले, "आमचा हा प्रश्न ऐकून तुम्ही कृपया रागवूं नका. आमच्या गांवात कमल नांवाचा एक पशूंचा दलाल आला होता. तो म्हणाला कीं जमीनजुमल्याविषयी आम्हा भावांत जे मतभेद आहेत व जी भांडणं होत आहेत, ती आपण दूर करूं शकाल व दोघांना न्याय देऊन मतभेद दूर करून शांती व समाधान देऊं शकाल."

"मी जो निर्णय देतो, तो न्यायाला धरून असतो. कुणावरही अन्याय होणार नाही याची मी काळजी घेतो. पण स्वार्थी, अहंकारी व अज्ञानी लोकांना माझा निर्णय योग्य वाटत नाही. मला माहीत आहे कीं तलाव खोदण्यासाठी ही योग्य वेळ नाही. व जरी खोदला तरी त्याचा कुणाला उपयोग होणार नाही. म्हणून मी गप्प बसलो. पण हे कोणी समजून न घेताच मला बहिरा म्हणूं लागले आहेत. आता उन्हाळ्याचे दिवस आहेत. घराच्या छतावर कौले घालून ते बंद करायलाच पाहिजे असे नाही. त्याच्यामुळे कुठलेही नुकसान किंवा हानी होणार नाही. पण ही गोष्ट माझी बायको समजून घ्यायला तयारच नाही. व माझ्यावर रागावून आता ती मला आंधळा म्हणायला लागली आहे. पती-पत्नीमध्ये भांडण होणे स्वाभाविकच आहे. कुठल्या घरांत लहान-मोठ्या कारणांवरून भांडणं होत नाहीत? पण त्याचा बाहेर गवगवा न करता आपापसांत तडजोड केली पाहिजे, दुसऱ्याला सांभाळून घेतले पाहिजे. त्या दोघांत तिसऱ्याने मध्यस्थी करणे बरोबर नाही. अशामुळे भांडण आणखीनच वाढण्याची शक्यता असते." धर्मवीर म्हणाला.

ते ऐकतांच दोघे भाऊ चपापले. एकमेकांकडे पहात दिलगिरीच्या स्वरांत ते धर्मवीरला म्हणाले, "आता आमचे डोळे उघडले. चूक आमचीच आहे. आमच्या संपत्तीचा प्रश्न आम्हीच सोडवला पाहिजे. तिसऱ्या परक्या माणसाचा त्यांत संबंध नाही. आता आमची खात्री झाली आहे की ही समस्या आमची आम्हीच सोडवू."

असे म्हणून दोघे भाऊ आपल्या गांवी परतले.





# जमीनदार तलाव

हयग्रीव नांवाच्या गांवात एक माणूस राहात होता. त्याच्याजवळ स्वतःचा जमीनजुमला, थोडेफार शेत व थोडीफार संपत्ती होती. पण माणूस मनाने अतिशय चांगला व उदार होता. तो गांवातल्या प्रत्येकाला त्याच्या अडीअडचणींत मदत करायचा, गरीबांच्या गरजा पुरवायचा. गांवचा तो आधारस्तंभच होता. कुणालाही दान देताना तो कधी मागेपुढे पहात नसे. सर्व लोक म्हणत, जर हा जमीनदार असता तर त्याने आणखी किती तरी दान केले असते व लोकांच्या मागण्या पुऱ्या केल्या असत्या. असा दानवीर आढळणेच या जगांत विरळ. ते असेही म्हणत कीं दुसऱ्यांना दानें देऊन देऊन याने आपले दिवाळे नाही केले म्हणजे झाले!

हळूं हळूं त्याच्या दानीपणामुळे लोक त्याचे नांव विसरून त्याला जमीनदार म्हणूनच ओळखूं लागले. त्याला आणखी कोणी नातेवाईक नव्हते, त्यामुळे कुणाचाही भार त्याच्यावर नव्हता. चित्रदुर्ग संस्थानातले हयग्रीव हे एक गांव होते. संस्थानाच्या जमीनदाराला आपल्या व्यतिरिक्त अन्य व्यक्तिला जमीनदार लोक म्हणतात, हे जेव्हां कळले, तेव्हां त्याला ते चांगलेच खटकले. त्याने आपल्या दिवाणाला त्याची सर्व चौकशी करून माहिती मिळवायला सांगितली.

तेव्हां दिवाण म्हणाला, "कुठल्याही व्यक्तीला प्रभु म्हणून नांवाजले तरी तो देव बनत नाही. तसेच हा माणूस दानी आहे, परोपकारी आहे म्हणून लोक त्याला प्रेमाने जमीनदार म्हणतात. पण त्यामुळे तुमच्या नांवाला डाग लागणार नाही. मी या बाबतीत सर्व माहिती मिळवली आहे. त्याला त्याची वडिलोपार्जित संपत्ती मिळाली आहे. सध्यां तो एकटाच आहे. त्याचे लग्न झालेले नाही. यौवनाच्या उंबरठ्यावर उभा असताना तो दान-धर्म करतो आहे. पण एकदा त्याचे लग्न झाले कीं हे सर्व थांबून जाईल. आपल्याला त्यामुळे इतके गंभीर व्हायची गरजच नाही."

त्याचे बोलणे ऐकून जमीनदार हंसला व गप्प बसला. त्याचवेळीं हयग्रीव गांवच्या ग्रामाधिकाऱ्याचा अचानक मृत्यू झाला. नवा ग्रामाधिकारी नेमायचा होता. दिवाणाला जमीनदार म्हणाला, "आजपासून आपल्या संस्थानात केवळ मी एकटाच जमीनदार आहे. मृत ग्रामाधिकाऱ्याचा कोणी वारस नसल्यामुळे सर्वांना जो आदरणीय वाटेल, जो सर्वांचा प्रिय असेल अशा व्यक्तीलाच ग्रामाधिकारी म्हणून नियुक्त करणे योग्य ठरेल. आता ही संधी त्या दानवीराला द्या. त्यामुळे लोक आपोआपच त्याला जमीनदार म्हणण्याचे थांबवतील. त्याशिवाय, त्या गांवातल्या लोकांकडून तो कर वसूल करून आणेल व आम्हाला आणून देईल."

जमीनदाराच्या हुकमानुसार त्या माणसाला ग्रामाधिकारी म्हणून नेमण्यांत आले. पण तरीसुद्धां लोक त्याला जमीनदारच म्हणत. ही गोष्ट दिवाणाला माहित होती पण त्याने ते जमीनदाराला सांगितले नाही व ही गोष्ट गुप्त ठेवली.

एक वर्ष उलटले. हयग्रीव गांवाच्या ग्रामाधि-काऱ्याला कर वसूल करायचा होता. परंतु लोकांच्या दारिद्र्यामुळे व लाचारीमुळे रक्कम गोळा होऊ शकली नाही. त्यामुळे स्वतःच आठशे रुपये रक्कम त्याने भरली व नोकराकडून चित्रदुर्ग, संस्थानाच्या खजिन्यांत जमा करण्यासाठी पाठवून दिली.



चित्रदुर्गला हयग्रीवच नव्हे तर इतर सर्व गांवातून कर भरण्यासाठी अनेक नोकर आले होते. परंतु खजिनदार कामात दंग असल्यामुळे आपला नंबर येईपर्यंत हयग्रीवचा नोकर आपले पैसे सुरक्षित ठेवून वाट बघत बसला.

त्याचवेळी दिवाण तिथून जात होता. किंचित् घाबरलेल्या या भोळ्या नोकराला पाहून त्याने त्याला कुठून आला आहेस म्हणून विचारले. हयग्रीवहून आल्याचे कळताच त्याने विचारले, "काय रे, किती कर आणलायस भरायला?"

"साहेब, आठशे रूपये आणले आहेत" नोकर म्हणाला. "अस्सं? मला वाटतं तुझा जमीनदार ग्रामाधिकारी मोठा चतुर आणि हुशार आहे. आधीच्या ग्रामाधिकाऱ्याने इतकी मोठी रक्कम कधीच भरली नव्हती. पण तू आणलेली रक्कम बरोबर आहे की नाही हे पाहिल्याशिवाय

- कृष्णा देशपांडे -



तुला पावती मिळणार नाही. पण तरीही एका चांगल्या ग्रामाधिकाऱ्याचा नोकर म्हणून तुझा आदर केला पाहिजे.'' असे म्हणून दिवाणाने आठशें रुपये मिळाल्याची पावती मागवून घेऊन त्याला दिली.

पण इकडे एक मोठी चूक झाली होती. दिवाणाला वाटले की नोकराने रक्कम भरली आहे व तो फक्त पावती मिळण्याची वाट पाहात आहे. खजिनदाराला पण वाटले की रक्कम भरली आहे, म्हणून दिवाणाच्या सांगण्यावरून त्याने पावती लिहून दिली. आणि नोकर घाबरलेला व भोळसट होता. त्याला वाटले आपण कांही बोललो तर दिवाणाला राग येईल किंवा तो नाराज होईल, म्हणून कांहीही न बोलता तो गांवी परतला. व त्याने पूर्ण रक्कम ग्रामाधिकाऱ्याला परत दिली.

जमीनदाराने ती रक्कम व पावती सुरक्षितपणे आंत ठेवली. एक दिवस तो शेतांतून परत येत असताना कांही बायका डोक्यावर पाण्याने भरलेल्या घागरी घेऊन जाताना त्याने पाहिले. तेव्हां त्याला वाटले की लगेच एक तलाव खोदायला पाहिजे. त्यामुळे पाण्याचे हाल कमी होतील व बायकांना पाण्यासाठी खूप दूर जाण्याची गरज उरणार नाही.

लगेच त्याने पाण्याचा शोध घेण्यासाठी बोलावले. त्यांनी सर्वत्र चांचण्या करून तज्ञांना निर्णय दिला कीं जमीनदाराच्या शेतांतच तलाव खोदल्यास योग्य होईल. ग्रामाधिकारी जमीनदाराने तलावासाठी एक एकर जमीन दिली व खोदण्याचे काम सुरूं झाले. या सर्व कामासाठी त्याने त्या आठशे रुपयांचा उपयोग



करायचे ठरवले. तलाव खोदण्याचे काम पूर्ण झाल्यावर लोक त्याला जमीनदार तलाव म्हणू लागले. त्या तलावाची जो तो प्रशंसा करू लागला. चित्रदुर्गच्या जमीनदाराला कळले की लोक त्या तलावाला जमीनदार तलाव म्हणतात.

त्यासंबंधी सर्व सविस्तर माहिती जमिनदाराने दिवाणाला विचारली. तेव्हां त्यांना कळून चुकले कीं हयग्रीवचे आठशें रूपये खजिन्यांत भरलेलेच नाहीत. जमीनदाराला राग आला व तो स्वतः हयग्रीवला ग्रामाधिकाऱ्याला भेटायला गेला.

ग्रामाधिकाऱ्याने घडलेली हकीकत सांगितली व पावती पण दाखवली. नंतर तो म्हणाला, ''आपण कुठल्याही दृष्टिकोनांतून पाहिले तरी हा जमीनदार तलावच आहे. जागा माझी आहे पण आपण आपल्या अधिकाराच्या बळावर ती आपली बनवूं शकता. तलाव खोदण्यासाठी जो खर्च झाला ती रक्कम आपल्या खजिन्यांतलीच आहे. पण रक्कम पोहोचल्याची पावती माझ्याकडे असल्याने मी ती रक्कम तलावाच्या कामासाठी बापरण्याचे धाडस करूं शकलो. आम्ही सर्वजण आपले सेवक आहोत. जमीनदाराचा सेवक या नात्याने मी हा खोदण्याचे धाडस केले. त्यामुळे जमिनदार तलाव म्हटले तर त्यांत काय चूक आहे?''

सर्व गांवकऱ्यांनीदेखील एकेकाने पुढे येऊन खऱ्या जमीनदाराला सांगितले, ''साहेब, हा जमीनदार तलाव आमच्यासाठी फारच उपयुक्त आहे. आपण थोडा कर वाढवलात तरी चालेल, आम्ही तो द्यायला तयार आहोत.''

जमीनदार थोडा वेळ बुचकळ्यांत पडला. नंतर विचार करून तो म्हणाला, ''तुझी व्यवहारशैली स्पष्ट सांगते कीं जो लोकांमध्ये मिळून मिसळून वागतो, जो लोकांचे भले करतो तोच खरा जमीनदार! जो उदार आहे, प्रजेचे हितच आपले हित समजतो व वेळ पडली तर आपली संपत्ती द्यायलासुद्धां कचरत नाही, तोच खरा जमीनदार. जो सदैव लोकांच्या कल्याणाविषयी विचार करतो व बदल्यांत कशाचीही अपेक्षा करत नाही, इतकेच नव्हे तर त्यांचे सुखदुःख तेच आपले सुखदुःख समजतो, तोच खरा जमीनदार हे सर्व गुण तुझ्यांत आहेत, तू सर्वांचा आदर्श आहेस, तू ह्या लोकांना प्रिय आहेस, ते तुझा खूप आदर करतात, त्यामुळे मी जमीनदार म्हणून तुझा स्वीकार करतो.''





# धर्मदाता

कोसल नांवाच्या देशांत सिद्धीस्वामी नांवाचा एक माणूस होता. तो खूप उदार होता. त्याच्या दानशीलतेची कीर्ती त्या देशाच्या राजापर्यंत पोहोचली. राजाला वाटले, "अशा व्यक्तिला आपण मदत करावी, ते एक पुण्य आहे." असे समजून राजा रोज सिद्धीस्वामीच्या घरी खाण्याच्या वस्तू पाठवू लागला.

सिद्धीस्वामीची पत्नी हंसमती त्याला योग्य ठरेल अशीच होती. इतरांना ती इतके भरपूर खायला द्यायची की आपल्याला कांही राहिले आहे की नाही हे सुद्धां ती पहात नसे. राजाकडून अन्न येऊं लागल्यापासून ती दोघे आणखीनच भरपूर प्रमाणात अन्नदान करू लागली.

एकदा कोसल देशचा राजा तीर्थयात्रा करीत काशीला येऊन पोहोचला. त्यावेळीं गंगा नदीत स्नान करून परत येत असलेल्या लोकांना बाजूला ढकलत कांही शिपाई म्हणाले, "वाट द्या, वाट द्या, बाजूला व्हा, काशीचे महाराज येत आहेत." त्यांनी कोसल राजालासुद्धां ढकलून दिले. ते पाहून कोसल राजाच्या शिपायांना अतिशय राग आला. ते रागाने ओरडले, "कोसल राजाला तुम्ही लोक काय समजता? काशी राजाला इतका कसला गर्व?"

ते काशी राजाने ऐकले. त्याने लगेच आपला घोडा थांबवला व कोसल राजाला नमस्कार करून म्हटले, "ओहो, आपण सिद्धीस्वामीच्या देशाचे राजा आहात काय? माझ्या शिपायांना ते माहित नव्हतं, म्हणून त्यांच्या हातून चूक झाली. त्याबद्दल क्षमा करा."

काशी राजाचे ते बोलणे ऐकताच कोसल राजाच्या मनांत एक प्रकारची असूया जागी झाली. "मी दिलेल्या अन्नपदार्थांचे दान करून हा सिद्धीस्वामी इतकी कीर्ती, इतकी प्रशंसा आणि यश मिळवतोय काय?" कोसल राज्यांत पोहोचल्याबरोबर त्याने सिद्धीस्वामीला मदत पाठवण्याचे लगेच बंद केले. इतकेच नव्हे तर त्याला त्रास देण्यासाठी, त्याला अपयश यावे म्हणून कोसल राजा त्याच्या घरी अधिकाधिक अतिथींना पाठवू लागला.

सिद्धीस्वामीला आपल्या अतिथींचे स्वागत करण्याकरता स्वतःचा जमीनजुमला विकावा लागला. ते कमी पडून देणग्या एकत्र करण्यासाठी घरोघर फिरावे लागले. ज्यांच्या मनामध्ये त्यांच्या दानधर्माविषयी आदर होता अशांनी सढळ हाताने मदत केली. पण अखेर ते पण संपले. एक दिवस सिद्धीस्वामीला मोठ्या मुष्किलीने थोडेसे तांदूळ मिळाले. पण घरी येऊन बघितले तर वीस अतिथी जेवणाची वाट बघत बसले होते. ते पाहून सिद्धीस्वामीला काय करूं, कसे करूं अशी घोर चिंता पडली.

नवऱ्याची ती अवस्था हंसमतीला पाहावली नाही. ती पटकन् पुढे आली व आपले मंगळसूत्र त्याच्या हातात देत म्हणाली, "आपण कसली चिंता करताय, हे घ्या आणि आपलं काम पूर्ण करा." मग काय अतिथींचा आदरसत्कार मनाप्रमाणे झाला.

त्या दिवशी संध्याकाळपर्यंत एक फुटकी कवडीसुद्धा शिल्लक राहिली नाही. सिद्धीस्वामीने पत्नीला घेऊन लगेच काशीला जायचा निर्णय घेतला.

प्रवास करीत ते रात्री एका धर्मशाळेत विश्रांती घ्यायला थांबले. त्याच धर्मशाळेत आणखी तीन प्रवासी आले होते. त्यांतला एक म्हणाला, "कोसल देशच्या सिद्धीस्वामीचे इतके नांव ऐकले आहे की त्यांचे आदरातिथ्य अनुभवल्याशिवाय परत जाऊं नये असे मला वाटते. आपण तिथे अवश्य जाऊं या." ते ऐकून सिद्धीस्वामीला व त्याच्या बायकोला अतिशय आश्चर्य वाटले.

ते तिन्ही प्रवासी झोपल्यानंतर हंसमती पतीला म्हणाली, "आपण आत्ताच घरी जाऊ या. या तिघांनी पोहोचण्याआधी आपल्याला तिथे जाऊन यांच्या जेवणाची सोय करायची आहे. घरांत एक जातं आणि दोन मुसळं आहेत, ते विकूं या."

दोघंही सकाळ होईपर्यंत घरी येऊन पोहोचली. विकण्यासाठी ते भले मोठे जाते हलवले, तर त्याच्याखाली पूर्वजांनी लपवून ठेवलेला एक मोठा हंडा त्यांना मिळाला व त्यांत संपत्ती भरलेली होती. त्या संपत्तीमुळे त्या दांपत्याने फक्त त्या तीन प्रवाश्यांनाच नाही तर साऱ्या गांवच्या लोकांना जेवण दिले.

ही वार्ता कोसल राजाच्या कानावर पडली. त्याला अतिशय आश्चर्य वाटले. पण त्याचबरोबर त्याला कळून चुकले कीं आपण मदत केली नाही तरी देव सज्जन व खऱ्या माणसाला मदत करतो. आपण केलेल्या चुकीबद्दल त्याला पश्चात्ताप झाला आणि परत तो पूर्ववत् सिद्धीस्वामीला भोजनाचे पदार्थ पाठवूं लागला.



# गंमत जंमत

## मंडूकरावाला मदत!

छोट्या मंडूकाला या हंसऱ्या सापांच्या विळख्यातून व त्यांच्या गुंत्यातून बाहेर पडायचे आहे.







## राहुलची सावली

राहुलबाळाने रांगताना आपली सावली पाहिली. पण त्याची सावली या तिन्हीपैकी कुठली आहे ते कांही त्याला कळत नाही. तुम्ही सांगा बरं!





## गोंधळवन

हे चित्र आहे एका अरण्याचे! तिथे पक्षी व प्राणी गुण्यागोविंदाने नांदत आहेत. पण चित्रांत कांही चुका आहेत. तुम्हाला ओळखता येतील कां?

(उत्तरें पान ६६ वर)

## फरक शोधा

दोन्ही चित्रे सारखीच दिसत आहेत. पण त्यांत आठ बाबतींत फरक आहे. शोधून तर बघा!



